भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प १२१ वें

# श्रीमन्महाभारतार्थ

( महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर )



## दशम खंड

शांतिपर्व, अ० ३२-२१२



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भ. गी. अ. ४, ३८

लेखक

भालचंद्र शंकर देवस्थळी

अधनं दुर्बलं प्राहुर्धनेन बलवान् भवेत् ।
सर्वं धनवता प्राप्यं सर्वं तरति कोशवान् ॥ पृ. २५६

अकाले कृत्यमारब्धं कर्तुर्नार्थाय कल्पते ।
तदेव काल आरब्धं महतेऽर्थाय कल्पते ॥ पृ. २७३

शके १८५७] किंमत ४ रुपये [सन १९३५

# विषयानुक्रमणिका.



## १२ शांतिपर्व—( पुढें चालू )



### राजधर्मपर्व १. पृष्ठें १–२५६.


**अध्याय ३२ वा**—युधिष्ठिराला व्यासाचा उपदेश १; प्रजापालन हाच राजाचा धर्म १.

**अध्याय ३३ वा**—शोक करणाऱ्या युधिष्ठिराला देवासुरसंग्रामवृत्तांत कथन करून व्यास अश्वमेध करण्याविषयीं उपदेश करितो ३.

**अध्याय ३४ वा**—युधिष्ठिरप्रश्न ६; युधिष्ठिराला व्यासाकडून कार्याकार्यकथन ६.

**अध्याय ३५ वा**—व्यासाकडून युधिष्ठिराला पापांबद्दल प्रायश्चित्तकथन ८.

**अध्याय ३६ वा**—व्यासाकडून युधिष्ठिराला भक्ष्याभक्ष्य व पात्रापात्रविचारकथन ११.

**अध्याय ३७ वा**—भीष्माच्या तोंडून राजधर्म ऐकून घेण्याविषयीं व्यासानें सांगितल्यावरून कृष्णादिकांच्या आज्ञेनें धृतराष्ट्रादिकांसहवर्तमान धृतराष्ट्राचें हस्तिनापुराला गमन १५.

**अध्याय ३८ वा**—युधिष्ठिराचा राजमंदिरीं प्रवेश १७; सभास्थानीं चार्वाक राक्षसाकडून पांडवांची निंदा १९; ब्राह्मणांच्या हुंकारानें त्याचा नाश १९.

**अध्याय ३९ वा**—कृष्णाकडून युधिष्ठिराला चार्वाकाचें पूर्ववृत्तांतकथन २०.

**अध्याय ४० वा**—कृष्णादिकांकडून युधिष्ठिराला राज्याभिषेक २१.

**अध्याय ४१ वा**—युधिष्ठिरानें कार्यांची वांटणी करून केलेली मंत्रियोजना २२.

**अध्याय ४२ वा**—युधिष्ठिराकडून ज्ञातिजनांचें और्ध्वदेहिक व पतिपुत्ररहित अनाथ स्त्रियांचें प्रतिपालन २३.

**अध्याय ४३ वा**—युधिष्ठिरकृत कृष्णस्तवन २४.

**अध्याय ४४ वा**—युधिष्ठिराज्ञेनें भीमादिकांचा दुर्योधनमंदिरांत निवास २५.

**अध्याय ४५ वा**—जनमेजयाचा प्रश्न २६; राज्यप्राप्ति झाल्यावर युधिष्ठिरानें काय काय केलें तें वैशंपायन सांगतो २६; युधिष्ठिराचें कृष्णाकडे गमन व कुशलप्रश्नपूर्वक त्यानें केलेली कृष्णस्तुति २७.

**अध्याय ४६ वा**—भीष्माकडे जाऊन चार विद्या, चार आश्रम आणि सर्व राजधर्म समजून घेण्याविषयीं युधिष्ठिराला कृष्णाचें प्रोत्साहन २८; युधिष्ठिराच्या प्रार्थनेवरून भीष्माकडे जाण्याचा निश्चय करून आपला रथ जोडण्याविषयीं श्रीकृष्णाची दारुकाला आज्ञा २९.

**अध्याय ४७ वा**—जनमेजयाचा प्रश्न ३०; वैशंपायनाकडून जनमेजयाला भीष्मकृत कृष्णस्तवराजाचा अनुवाद ३०; भीष्माच्या शरीरत्यागाचें कथन ३१.

**अध्याय ४८ वा**—कृष्ण-युधिष्ठिरादिकांचें कुरुक्षेत्राला गमन ३७; परशुरामचरित्र कथन करण्याविषयीं श्रीकृष्णाला युधिष्ठिराची प्रार्थना ३८.

**अध्याय ४९ वा**—कृष्णाकडून युधिष्ठिराला परशुरामचरित्रकथन ३८.

**अध्याय ५० वा**—कृष्णकृत भीष्मप्रशंसा ४४; युधिष्ठिराला धर्मोपदेश करण्याविषयीं भीष्माला कृष्णाकडून प्रेरणा ४५.

**अध्याय ५१ वा**—भीष्माकडून स्तुतिपूर्वक कृष्णाची श्रेयःप्रार्थना ४६; धर्मविषयक गोष्टींनीं युधिष्ठिराचें समाधान करण्याविषयीं कृष्णाकडून भीष्माला प्रेरणा ४७.

**अध्याय ५२ वा**—शरवैक्लव्यामुळें धर्मविषयक गोष्टींचें कथन करण्याविषयीं आपण असमर्थ असल्याचें भीष्म सांगतो ४७; कृष्णाकडून भीष्माला शरीरदार्ढ्यादिप्रदान ४८; सायंकाळीं युधिष्ठिरादिकांचें आपल्या मंदिरीं गमन ४९.

**अध्याय ५३ वा**—दुसरे दिवशीं प्रभातकाळीं कृष्णयुधिष्ठिरादिकांचें धर्मश्रवणार्थ भीष्माकडे गमन ५०.

**अध्याय ५४ वा**—जनमेजयप्रश्न ५१; भीष्माला धर्मविषयक प्रश्न करण्याविषयीं नारदाची सूचना ५१; कृष्णाचें कुशलप्रश्नपूर्वक भीष्माला धर्म कथन करण्याविषयीं प्रोत्साहन ५३.

**अध्याय ५५ वा**—युधिष्ठिरानेंच आपणाला प्रश्न करावे, अशी भीष्म इच्छा प्रदर्शित करितो ५४; कृष्ण भीष्माला धर्माच्या भीतीचें कारण सांगतो ५४; भीष्माचें युधिष्ठिराला आश्वासन ५४.

**अध्याय ५६ वा**—युधिष्ठिरप्रश्न ५५; भीष्माकडून युधिष्ठिराला राजधर्मकथन ५५.

**अध्याय ५७ वा**—भीष्माकडून युधिष्ठिराला राजधर्मकथन ५९.

**अध्याय ५८ वा**—भीष्माकडून युधिष्ठिराला राजधर्मकथन ६२; संध्याकाळीं कृष्णादिकांचें आपापल्या स्थानीं गमन ६३.

**अध्याय ५९ वा**—राजा ही पदवी कशी उत्पन्न झाली तें सांगण्याविषयीं धर्माचा प्रश्न ६४; भीष्माकडून युधिष्ठिराला राजोत्पत्ति व राजधर्मांचें कथन ६४.

**अध्याय ६० वा**—युधिष्ठिरप्रश्न ७५; भीष्माकडून युधिष्ठिराला चातुर्वर्ण्य-धर्मकथन ७५.

**अध्याय ६१ वा**—युधिष्ठिराला आश्रमचतुष्टयाचें धर्मकथन ८०.

**अध्याय ६२ वा**—युधिष्ठिराला भीष्माकडून ब्राह्मणधर्मांचें कथन ८२.

**अध्याय ६३ वा**—ब्राह्मणांनीं कोणत्या धर्माचा त्याग करावा, त्याचें कथन ८३; क्षत्रियादि धर्मांचें कथन व राजधर्मप्रशंसा ८४.

**अध्याय ६४ वा**—क्षात्रधर्मश्रेष्ठत्वकथन ८६; इंद्र-मांधातृसंवाद ८७.

**अध्याय ६५ वा**—इंद्रानें मांधात्याला सांगितलेल्या राजधर्मांचें भीष्म युधिष्ठिराला कथन करितो ८९.

**अध्याय ६६ वा**—युधिष्ठिराला वर्णाश्रमधर्मकथन ९१.

**अध्याय ६७ वा**—भीष्माकडून युधिष्ठिराला लोकांच्या सराजक व अराजक स्थितींचें गुणदोषनिरूपण ९४.

**अध्याय ६८ वा**—वसुमनानामक कोसलाधिपतीपुढें बृहस्पतीनें केलेल्या राजगुणवर्णनाचें भीष्माकडून युधिष्ठिराला कथन ९७.

**अध्याय ६९ वा**—युधिष्ठिराचा प्रश्न १००; राजनीतिकथन १०१.

**अध्याय ७० वा**—राजनीतीच्या छत्तीस प्रकारांचें वर्णन १०८.

**अध्याय ७१ वा**—युधिष्ठिराचा राजधर्मप्रश्न व त्यास भीष्माचें उत्तर १०९.

अध्याय ७२ वा—ब्राह्मणश्रेष्ठत्वपूर्वक चातुर्वर्ण्यधर्मकथन १११.

अध्याय ७३ वा—पुरोहितलक्षणादिवर्णन ११३; ऐल-कश्यपसंवाद ११४.

अध्याय ७४ वा—युधिष्ठिराला मुचकुंदचरित्रकथन ११७.

अध्याय ७५ वा—राज्यस्वीकार करण्याविषयीं युधिष्ठिराला भीष्माचा उपदेश ११८.

अध्याय ७६ वा—भीष्म युधिष्ठिराला ब्राह्मणांचीं निषिद्ध कर्में व राजधर्म कथन करितो १२१.

अध्याय ७७ वा—युधिष्ठिरप्रश्न १२२; भीष्माकडून युधिष्ठिराला केकयराजोपाख्यानकथन १२३.

अध्याय ७८ वा—ब्राह्मणानें आपत्कालीं वैश्यवृत्ति स्वीकारावी कीं काय असा युधिष्ठिराचा प्रश्न १२५; आपद्धर्मकथन १२५.

अध्याय ७९ वा—भीष्माकडून युधिष्ठिराला ऋत्विजांचीं लक्षणें, इत्यादिकांचें कथन १२८.

अध्याय ८० वा—मित्रामित्रलक्षणें १३०.

अध्याय ८१ वा—नारद-कृष्णसंवादकथन १३३.

अध्याय ८२ वा—भीष्माकडून युधिष्ठिराला अमात्यपरीक्षणार्थ कालकवृक्षीयोपाख्यानकथन १३५.

अध्याय ८३ वा—भीष्माकडून युधिष्ठिराला मंत्र्यादिलक्षणकथन १४०.

अध्याय ८४ वा—इंद्र-बृहस्पतिसंवादकथन १४४.

अध्याय ८५ वा—अमात्यलक्षणांदिकांचें कथन १४५; राजानें दूतवध कधींहि करूं नये १४७; सेनापति कसा असावा १४७.

अध्याय ८६ वा—नगरें कशा प्रकारचीं असावीं १४७; नगरांचीं लक्षणें व त्यांतील व्यवस्था १४७.

अध्याय ८७ वा—राष्ट्ररक्षणादिप्रकारकथन १५०; राष्ट्रसंरक्षणांत वैश्य लोकांना महत्त्व १५२.

अध्याय ८८ वा—भीष्माकडून युधिष्ठिराला करग्रहणादिप्रकारकथन १५३; धनवंतांची महती १५४.

**अध्याय ८९ वा**—युधिष्ठिराला राजनीतिकथन १५५.

**अध्याय ९० वा**—युधिष्ठिराला उतथ्य व मांधातृ यांमधील संवादाचें–धर्म-माहात्म्याचें–कथन १५७.

**अध्याय ९१ वा**—उतथ्य-मांधातृ-संवादकथन—नृपतीचीं कर्तव्यें १५९.

**अध्याय ९२ वा**—युधिष्ठिरप्रश्न १६३; युधिष्ठिराला वामदेव व वसुमना यांमधील संवादाचें भीष्माकडून कथन १६३.

**अध्याय ९३ वा**—वामदेवानें सांगितलेली गीता–राजाचें वर्तन १६५.

**अध्याय ९४ वा**—युधिष्ठिराला भीष्माकडून वामदेवानें सांगितलेल्या राजधर्मांचें कथन १६८.

**अध्याय ९५ वा**—युधिष्ठिराला युद्धधर्मकथन १६९.

**अध्याय ९६ वा**—भीष्माकडून युधिष्ठिराला राजधर्मकथन १७०.

**अध्याय ९७ वा**—भीष्माकडून युधिष्ठिराला सयुक्तिक युद्धधर्मकथन १७२.

**अध्याय ९८ वा**—सुदेवानें रणयज्ञ करून इंद्रलोकाची प्राप्ति कशी करून घेतली, तद्विषयक इंद्र व अंबरीष यांमधील संवाद भीष्म युधिष्ठिराला सांगतो १७४.

**अध्याय ९९ वा**—जनकानें आपल्या योद्धयांना स्वर्ग व नरक दाखवून युद्धार्थ कसें उत्तेजन केलें, त्याचें भीष्माकडून युधिष्ठिराला कथन १७८; वीरवृत्ति कशी असावी १७८.

**अध्याय १०० वा**—युद्ध करण्याच्या प्रकारांचें कथन १७९.

**अध्याय १०१ वा**—योधपुरुषांचीं लक्षणें १८२.

**अध्याय १०२ वा**—जयचिह्नें व राजनीति ह्यांचें युधिष्ठिराला कथन १८४.

**अध्याय १०३ वा**—शत्रूंशीं वर्तन कसें ठेवावयाचें त्याचें इंद्र-बृहस्पतिसंवाद-रूपांचें कथन १८७.

**अध्याय १०४ वा**—भीष्म युधिष्ठिराला कौसल्य-कालकवृक्षीयसंवादरूपानें अस्थिर ऐश्वर्य कसें असतें तें सांगतो १९१.

**अध्याय १०५ वा**—राजानें शत्रूवर जय मिळविण्याकरतां कपटाचें कसें वर्तन करावें, ह्याचें कालक-वृक्षीयसंवादांत कथन १९५.

**अध्याय १०६ वा**—कालक-वृक्षीयाच्या आज्ञेवरून कोसलाधिपतीस विदेहाधीशाकडून पुनः ऐश्वर्यप्राप्ति झाल्याचें भीष्माकडून युधिष्ठिरास कथन १९७.

**अध्याय १०७ वा**—वीरमंडळ कसें असावें, ह्याविषयीं कथन १९९.

**अध्याय १०८ वा**—माता, पिता आणि गुरु ह्यांचें माहात्म्यवर्णन २०१.

**अध्याय १०९ वा**—सत्यासत्यविवेचन २०३.

**अध्याय ११० वा**—संकटांतून तरून कसें जावें, त्यासंबंधीं युधिष्ठिराला उपाय-कथन २०६.

**अध्याय १११ वा**—चांगले-वाईट सेवक ओळखण्याचीं लक्षणें काय, असा युधिष्ठिराचा प्रश्न २०८; व्याघ्र-गोमायुसंवादरूपानें भीष्माकडून त्याचें कथन २०८.

**अध्याय ११२ वा**—भीष्म युधिष्ठिराला उष्ट्रग्रीवाचे चरित्राख्यानाचे द्वारा आलस्याचा परिणाम कथन करितो २१४.

**अध्याय ११३ वा**—विनयाचा आश्रय करून शत्रूला वश कसें करून घ्यावें, ह्याचें सरित्सागरसंवादरूपानें कथन २१५.

**अध्याय ११४ वा**—सभेमध्यें दुष्टाचें दुर्भाषण सहन करण्यांत कांहींच अप्रिय नाहीं २१७.

**अध्याय ११५ वा**—राजाला उत्तम प्रकारच्या साहाय्यकर्त्यांची आवश्यकता २१८; तें साहाय्य कशा प्रकारचें असावें, यासंबंधीं पात्रापात्रविचार २१९.

**अध्याय ११६ वा**—युधिष्ठिराला कोणी एका मुनीनें व्याघ्रभयानें भयभीत झालेल्या कुत्र्याला व्याघ्र केल्याचें कथन २२०.

**अध्याय ११७ वा**—गजाला पाहून भयभीत झालेल्या व्याघ्राला मुनीच्या वराच्या योगानें गजत्वप्राप्ति २२२; सिंहभयानें गजाला सिंहत्वप्राप्ति २२२; शरभभयानें सिंहाला शरभत्वप्राप्ति २२२; दुष्टबुद्धि धारण करून आपणावर चालून येणाऱ्या त्या शरभास मुनीकडून पुनः श्वानत्वप्राप्ति २२३.

**अध्याय ११८ वा**—सचिवाचें गुणवर्णन २२३; राजगुण कसे असावे २२४; योद्धयांचे गुण २२५.

**अध्याय ११९ वा**—योग्यतेनुसार भृत्यांची त्या त्या ठिकाणीं योजना २२५; भृत्यांचे गुण २२६.

**अध्याय १२० वा**—युधिष्ठिर भीष्मास राजधर्म साररूपानें आपणास सांगण्याविषयीं विनंति करितो २२७; भीष्माकडून प्रजापालनादि प्रकारांचें कथन २२७; शत्रूवर चाल करून कसें जावें २२७; योग्य मनुष्याची योग्य कार्यावर योजना २२९; राजवर्तन कसें असावें २२९.

**अध्याय १२१ वा**—दंडस्वरूपादिकांचें कथन २३२.

**अध्याय १२२ वा**—भीष्म वसुहोम-मांधातृसंवादाच्या रूपानें दंडोत्पत्तिकथन करितो २३५.

**अध्याय १२३ वा**—कामंदकागरिष्टसंवादरूपानें भीष्माकडून युधिष्ठिरास धर्मार्थकामविचारकथन २३९.

**अध्याय १२४ वा**—शीलाचें लक्षण काय व त्याची प्राप्ति कशी करून घ्यावी, असा युधिष्ठिराचा प्रश्न २४१; भीष्म दुर्योधन-धृतराष्ट्रसंवादरूपानें शीलमहत्त्व कथन करितो २४१.

**अध्याय १२५ वा**—आशास्वरूपाचें निरूपण करीत असतां भीष्माकडून ऋषभ-सुमित्रसंवादकथन २४५; मृगयासक्त सुमित्राकडून बाणविद्ध झालेला हरिण बाणासह महारण्यांत प्रवेश करितो व त्यामागून सुमित्र राजा धांवत जातो २४६.

**अध्याय १२६ वा**—आपल्या आश्रमांत आलेल्या सुमित्राचा ऋषींकडून सत्कार २४७; आशा आणि अंतरिक्ष ह्यांमध्यें श्रेष्ठ कोण असा सुमित्राचा ऋषींस प्रश्न २४७.

**अध्याय १२७ वा**—ऋषभाचा तनुनामक महर्षीशीं संवाद २४८; तनु-वीरद्युम्नसंवादकथन २४९.

**अध्याय १२८ वा**—वीरद्युम्न आपल्या अरण्यागमनाचें कारण सांगतो २४९; आशेच्या कृशपणाचें वर्णन ऐकून सुमित्राचा आशात्याग २५१.

**अध्याय १२९ वा**—यम-गौतमसंवादकथन २५२.

**अध्याय १३० वा**—संकटकालीं मुख्य साधन म्हणजे द्रव्यसंचयरूपच होय २५२.

---

## आपद्धर्मपर्व २. पृ. २५७–३७५

**अध्याय १३१ वा**—विपत्कालीं राजानें सर्वस्वाचा त्याग करूनहि आपलें रक्षण करावें २५७.

**अध्याय १३२ वा**—धर्माचा ऱ्हास होऊं लागला असतां आणि दुष्ट लोकांचें प्राबल्य झालें असतां ब्राह्मणांनीं आपली उपजीविका कोणत्या उपायांनीं करावी असा युधिष्ठिरप्रश्न २५८; दुष्ट लोकांकडून द्रव्य हरण करून ब्राह्मण-लोकांचें रक्षण करावें, म्हणून भीष्माचें उत्तर २५८; सज्जनदुर्जन शील-कथन २५९; राजर्षीचें वर्तन २५९.

**अध्याय १३३ वा**—आपन्नस्थितींत कोशसंग्रहाची आवश्यकता २६०; लोकांशीं राजाचें कर्तव्य २६१; राजाचें दस्युलोकांशीं वर्तन २६१.

**अध्याय १३४ वा**—बलप्रशंसा २६२; पाप्याचें पापमोचन २६२.

**अध्याय १३५ वा**—दस्युलोकांनींहि मर्यादेनें वागल्यास परलोकप्राप्ति होते, ह्याचें कायव्यनामक क्रव्यादचरित्रदृष्टांतानें भीष्माकडून कथन २६३.

**अध्याय १३६ वा**—कोशवृद्धीचे कामीं राजानें कोणाचें द्रव्य हरण करावें, ह्याविषयीं विवेचन २६५.

**अध्याय १३७ वा**—मत्स्योपाख्यानकथन २६६.

**अध्याय १३८ वा**—कार्यपरत्वें मित्रांशीं वैर व शत्रूशीं सख्य कसें जोडावें, याविषयीं मार्जारमूषकचरित्रकथन २६७.

**अध्याय १३९ वा**—कोणावरहि विश्वास न ठेवतां राजानें कसें वागावें, असा युधिष्ठिराचा प्रश्न २८१; त्यावर पूजनी-ब्रह्मदत्तसंवादाचें युधिष्ठिराला भीष्माकडून कथन २८१.

**अध्याय १४० वा**—युगक्षयाचे वेळीं धर्मलोप होऊन सर्वत्र दस्यूंची पीडा होत असतां राजानें कसें वागावें, म्हणून युधिष्ठिराचा प्रश्न २८९; भीष्माकडून भारद्वाज-शत्रुंजयसंवादरूपानें आपद्धर्मकथन २८९.

**अध्याय १४१ वा**—आपत्कालीं अभक्ष्य भक्षण करूनहि आत्म्याचें रक्षण करणें योग्य आहे, ह्याचें विश्वामित्र आणि चांडाळ यांमधील संवादरूपानें युधिष्ठिराला कथन २९५.

**अध्याय १४२ वा**—युधिष्ठिरसंशयनिरसन ३०३; केवळ शास्त्रानें अथवा बुद्धीनें धर्मनिर्णय होत नाहीं ३०३; ब्राह्मणसेवा हें अत्यंत पवित्र कृत्य होय ३०५.

**अध्याय १४३ वा**—शरणागतरक्षकाचा धर्म कोणता, म्हणून युधिष्ठिरप्रश्न ३०६; भीष्माकडून युधिष्ठिराला कपोताख्यानप्रस्ताव ३०६.

**अध्याय १४४ वा**—वृक्षावरील कपोताचा आपली चरावयास गेलेली स्त्री परत आली नाहीं, म्हणून प्रशंसापूर्वक शोक ३०८.

**अध्याय १४५ वा**—पतिविलाप ऐकून व्याधाच्या पिंजऱ्यांत असलेल्या कपोतीकडून विधिपूर्वक त्या व्याधाचाच सत्कार करण्याविषयीं पतीस प्रेरणा ३०९.

**अध्याय १४६ वा**—कपोतीचें तें भाषण श्रवण करून कपोतानें आत्मदानानें केलेलें अतिथिसंतर्पण ३१०; कपोताची ती स्थिति पाहून व्याधाचा आपल्या निंद्यकर्माबद्दल विलाप ३११.

**अध्याय १४७ वा**—कपोतानें अग्निप्रवेश केल्याचें पाहून अनुतप्त व्याधानें काठी, जाळें वगैरे टाकून दिलीं, कपोतीला बंधमुक्त केलें आणि तो परलोकगमनाच्या मार्गास लागला ३१२.

**अध्याय १४८ वा**—पतिशोकानें कपोतीचा अग्निप्रवेश ३१३; कपोत आणि कपोती यांचें विमानांत बसून स्वर्गगमन ३१४.

**अध्याय १४९ वा**—विमानांत बसलेल्या कपोताला व कपोतस्त्रीला पाहून त्या व्याधानें महारण्यांत प्रवेश केला आणि तेथें अग्निदग्ध होऊन तोहि स्वर्गाला गेला ३१४.

**अध्याय १५० वा**—युधिष्ठिराचा अबुद्धिपूर्वक झालेल्या ब्रह्महत्येच्या प्रायश्चित्तासंबंधीं प्रश्न ३१५; शौनककुलोत्पन्न इंद्रोत आणि जनमेजय यांच्या संवादाचा उपक्रम ३१६.

**अध्याय १५१ वा**—जनमेजयाची प्रार्थना ऐकून शौनक ब्रह्महत्येच्या पातकाची निष्कृति कशी करतां येईल, तें सांगतो ३१७.

**अध्याय १५२ वा**—शौनक जनमेजयाकडून अश्वमेध यज्ञ करवितो ३१९; त्यामुळें तो पापमुक्त होतो आणि त्याला पुनः रज्याप्राप्ति होते ३२१.

**अध्याय १५३ वा**—मृत मनुष्याचें पुनरुज्जीवन झाल्याचें तूं कधीं पाहिलें किंवा ऐकिलें आहेस काय, असा युधिष्ठिरप्रश्न ३२२; त्यावर गृध्र-जंबूक-संवादाचें युधिष्ठिराला भीष्माकडून कथन ३२२; करुणार्द्र शंकराकडून त्या मृतपुत्राला पुनर्जीवदान ३२९.

**अध्याय १५४ वा**—दुर्बलानें बलाढ्याचा द्रोह केला आणि त्या दुर्बलावर बलिष्ठ चालून आला असतां त्यानें कसें वागावें असा युधिष्ठिरप्रश्न ३३०; भीष्माकडून शाल्मलि वृक्ष व वायु यांच्या कथेचा उपक्रम ३३०; नारदाकडून शाल्मलिवृक्षाचें रमणीयत्ववर्णन ३३१.

**अध्याय १५५ वा**—पर्वतादिकांनाहि उपटून टाकण्याचें सामर्थ्य वायूमध्यें असून तो तुझ्या शाखांचें रक्षण करितो, याचें कारण काय म्हणून शाल्मलीला नारदप्रश्न ३३२; आपल्या शाखांचा भंग करण्याचें सामर्थ्य वायूमध्यें नाहीं, असें वायुनिर्भर्त्सनापूर्वक शाल्मलीचें कथन ३३२.

**अध्याय १५६ वा**—नारदाच्या सांगण्यावरून शाल्मलीचा भंग करीन अशी वायूची प्रतिज्ञा ३३३; बुद्धिबळाचा अवलंब करून मी उद्यां वायूची प्रतिज्ञा खोटी करीन, असा शाल्मलीचा निश्चय ३३४.

**अध्याय १५७ वा**—प्रातःकाळीं येऊन वायु पाहतो, तों शाखा-स्कंध-पर्णरहित शाल्मलिवृक्ष त्याच्या नजरेस पडला ३३५; अत्यंत बलाढ्याशीं मूर्खानें कधीं वैर करूं नये, म्हणून युधिष्ठिरास भीष्माचा उपदेश ३३५.

**अध्याय १५८ वा**—पापाचें अधिष्ठान कोणतें, असा युधिष्ठिरप्रश्न ३३६; प्रवृत्ति लोभापासून होय, असें भीष्माचें उत्तर ३३६; शिष्टलक्षण ३३७.

**अध्याय १५९ वा**—अज्ञानमहत्त्वकथन ३३८; अज्ञान आणि अतिलोभ हे एकच आहेत ३३९.

**अध्याय १६० वा**—आत्मनिग्रहप्रशंसा ३३९.

**अध्याय १६१ वा**—युधिष्ठिराला भीष्माकडून तपोनिरूपण ३४२.

**अध्याय १६२ वा**—भीष्माकडून सत्यप्रशंसन ३४३.

**अध्याय १६३ वा**—युधिष्ठिरास भीष्माकडून लोभादिकांचें निरूपण ३४५.

**अध्याय १६४ वा**—नृशंसधर्मकथन ३४७.

**अध्याय १६५ वा**—यज्ञाकरितां कोणतें द्रव्य संपादन करावयाचें, त्याचें भीष्माकडून युधिष्ठिराला विवेचन ३४८; पापविशेष आणि त्यांचीं प्रायश्चित्तें ३५०.

**अध्याय १६६ वा**—भीष्माकडून नकुलाला खड्गोत्पत्तिकथन ३५३.

**अध्याय १६७ वा**—विदुरासह आपल्या बंधूंना धर्मार्थकामांमध्यें श्रेष्ठ कोण, असा युधिष्ठिराचा प्रश्न ३५९; विदुर, अर्जुन आणि भीमसेन यांजकडून अनुक्रमें धर्म, अर्थ आणि काम हे श्रेष्ठ असें उत्तर ३५९; युधिष्ठिराचें सर्वांत मोक्षच श्रेष्ठ असें प्रतिपादन ३६२.

**अध्याय १६८ वा**—संधेयासंधेयपुरुषलक्षणकथन ३६३.

**अध्याय १६९ वा**—धनार्जनाकरितां वणिक्समूहासह निघाला असतां एका मदोन्मत्त वन्यगजाकडून तो तांडा उध्वस्त होऊन गौतमाचें उत्तरेकडे प्रयाण ३६६; एका न्यग्रोध वृक्षाच्या मूळावर त्याचें शयन ३६७; तेथें बकाधिपति राजधर्म्याचें गौतमास दर्शन ३६८.

**अध्याय १७० वा**—बकाचें आतिथ्य स्वीकारून त्याच्याच प्रेरणेनें गौतमाचें विरूपाक्ष राक्षसाच्या नगरीं गमन ३६८.

**अध्याय १७१ वा**—विरूपाक्षाकडून विपुल धनप्राप्ति होऊन गौतमाचें पुनः बकालयीं येणें ३७०; दुसरे दिवशीं स्वभवनाला जाण्याच्या इच्छेनें मार्गांत प्राणरक्षणार्थ भक्ष्य म्हणून बकवध करण्याविषयीं त्याचा दुष्ट विचार ३७१.

**अध्याय १७२ वा**—राजधर्म्याचा वध करून व त्याचें मांस घेऊन गौतमाचें स्वपुराला गमन ३७२; दुसऱ्या दिवशीं बकाची भेट न झाल्यामुळें विरूपाक्षाकडून त्याच्या शोधार्थ स्वपुत्राची योजना ३७२; पित्राज्ञेनें विरूपाक्षाकडून गौतमाचा सहपरिवार वध ३७३.

**अध्याय १७३ वा**—विरूपाक्षाकडून बकराजाचें चितारोपण झालें असतां आकाशांतून सुरभीच्या मुखांतून दुग्धमिश्र फेंस चितेवर पडून राजधर्म्याचें पुनरुज्जीवन व इंद्राकडून त्याला ब्रह्मशापादिकथन '३७४; राजधर्म्याच्या सांगण्यावरून इंद्राकडून पुनः गौतमाला जीवप्रदान ३७४; कृतघ्न गौतमाला नरकप्राप्ति होईल, असा देवांचा शाप ३७५; मनुष्यानें सर्वदा कृतज्ञ असावें ३७५.

## मोक्षधर्मपर्व पृ. ३७६–४८०.


**अध्याय १७४ वा**—भीष्माकडून युधिष्ठिराला विप्र आणि सेनजित् यांमधील संवादाचें कथन ३७६; विप्राकडून सेनजिताला पिंगलोपाख्यानकथन ३८०.

**अध्याय १७५ वा**—काळ वेगानें चालला असतां कोणतें कृत्य मनुष्याला कल्याणकारक आहे, अशा युधिष्ठिराच्या प्रश्नाला पितापुत्रसंवादानें भीष्माचें उत्तर ३८१.

**अध्याय १७६ वा**—युधिष्ठिराला शंपाकगीताकथन ३८५.

**अध्याय १७७ वा**—धनतृष्णाग्रस्त झालेल्यांनीं काय केलें असतां ते सुखी होतील, या युधिष्ठिरप्रश्नास अनुलक्षून भीष्माकडून मंकिगीताकथन ३८७.

**अध्याय १७८ वा**—भीष्म युधिष्ठिराला बोध्य-नाहुषसंवादरूप इतिहास कथन करितो ३९१.

**अध्याय १७९ वा**—युधिष्ठिराला भीष्माकडून प्ऱ्हाद आणि अजगरमुनि यांच्या वादाचें कथन ३९४.

**अध्याय १८० वा**—काश्यपमुनि आणि शृगालरूपी इंद्र यांच्या संवादाचें कथन ३९५.

**अध्याय १८१ वा**—पूर्वजन्मार्जिताचें स्वरूप ४००.

**अध्याय १८२ वा**—पूर्वजन्मार्जिताविषयीं भृगु-भरद्वाजांचा संवाद ४०१.

**अध्याय १८३ वा**—भृगु-भरद्वाजांचा सृष्टिविषयक संवाद ४०४; भूतोत्पत्ति ४०५.

**अध्याय १८४ वा**—पांचांनाच भूतसंज्ञा कां? ४०६; स्थावरांचें पांचभौतिकत्व. ४०६; पृथिव्यादिकांचे गुण ४०८.

**अध्याय १८५ वा**—शरीरस्थ अग्नि व वायु यांचें स्वरूप ४०९.

**अध्याय १८६ वा**—जीवस्वरूपाविषयीं भरद्वाजाचा आक्षेप ४१०.

**अध्याय १८७ वा**—जीवस्वरूपनिरूपण ४१२; पंचभूतविलक्षण असें जीवनस्वरूप कोणतें, असा भरद्वाजाचा प्रश्न ४१२; भृगूचें उत्तर ४१३.

**अध्याय १८८ वा**—भृगूकडून भरद्वाजाला चातुर्वर्ण्यविभागांचें कथन ४१४.

**अध्याय १८९ वा**—भृगूकडून भरद्वाजाला ब्राह्मणादिवर्णलक्षणनिरूपण ४१६; परब्रह्माचें साधन वैराग्य हेंच होय, ह्याचें कथन. ४१७.

**अध्याय १९० वा**—धर्माधर्म हीं सुखदुःखसाधनें होत असें भृगूचें प्रतिपादन ४१८; निरिच्छ योगनिष्ठ मुनि त्यांची इच्छाच करीत नसतात, असा भरद्वाजाचा आक्षेप ४१९; सुखाची प्राप्ति होण्यास निष्काम कर्मांचीच आवश्यकता आहे, असें भृगूचें उत्तर ४१९.

**अध्याय १९१ वा**—दानादिक धर्माचरण, तप, अध्ययन आणि हवन यांचें फल काय? हा भरद्वाजाचा प्रश्न ४२०; दानांचे प्रकारांचें वर्णन ४२०; भृगूकडून भरद्वाजाला चारहि आश्रमांचें कथन ४२०.

**अध्याय १९२ वा**—भृगूकडून भरद्वाजाला वानप्रस्थाश्रमाचें निवेदन ४२१; संन्यासाश्रमाच्या लक्षणांचें निरूपण ४२२.

**अध्याय १९३ वा**—भीष्माकडून युधिष्ठिराला आचारविधिकथन ४२६.

**अध्याय १९४ वा**—भीष्माकडून युधिष्ठिराला अध्यात्मनिरूपण ४२८.

**अध्याय १९५ वा**—भीष्माकडून चतुर्विधध्यानयोगकथन ४३३.

**अध्याय १९६ वा**—जापकोपाख्यान ४३५; युधिष्ठिराला यमब्राह्मणसंवादेतिहासाचें भीष्माकडून कथन ४३६.

**अध्याय १९७ वा**—जापकाला ब्रह्मलोकाशिवाय दुसरी कोणती गति मिळते? ४३७.

**अध्याय १९८ वा**—आपत्काळीं कोणत्या प्रकारचे नरक प्राप्त होतात ४३८.

**अध्याय १९९ वा**—भीष्माकडून इक्ष्वाकु, यम, ब्राह्मण, काल आणि मृत्यु यांच्या एका पुरातन कथेचें कथन ४३९.

**अध्याय २०० वा**—जपकर्त्यांस मिळणाऱ्या फलाचें कथन ४४९.

**अध्याय २०१ वा**—ज्ञानयोगाचें फळ सांगतांना भीष्माकडून मनु-बृहस्पतिसंवादकथन ४५१; परब्रह्मस्वरूपवर्णन ३५३.

**अध्याय २०२ रा**—आत्मतत्त्वकथन ४५४.

**अध्याय २०३ रा**—दृष्टांतपुरस्सर आत्म्याचें अस्तित्वकथन ४५६.

**अध्याय २०४ वा**—मनु-बृहस्पतिसंवाद-मोक्षवर्णन ४५८.

**अध्याय २०५ वा**—मनु-बृहस्पतींच्या संवादाचा अनुवाद—आत्मप्राप्तीचा उपाय ४६०.

**अध्याय २०६ वा**—मनु-बृहस्पतिसंवाद—ब्रह्मप्राप्तीचा उपाय ४६३.

**अध्याय २०७ वा**—सर्वभूतोत्पत्ति व लय करणाऱ्या विश्वव्यापक प्रभु नारायणाचें स्वरूप कथन करण्याविषयीं युधिष्ठिराची इच्छा ४६६; भीष्माकडून नारायण परमात्म्याचें प्रभुत्ववर्णन ४६६.

**अध्याय २०८ वा**—प्रजांचे अधिपति आणि प्राच्यादि दिशांचे ठायीं कोण कोण ऋषि आहेत, याचें भीष्माकडून कथन ४६९.

**अध्याय २०९ वा**—भीष्मकृत वराहावतारवर्णन ४७१.

**अध्याय २१० वा**—प्राचीन इतिहासरूपानें युधिष्ठिराला भीष्माकडून अध्यात्मयोगकथन ४७३.

**अध्याय २११ वा**—युधिष्ठिराला कर्मप्रवृत्तिकारणकथन ४७६.

**अध्याय २१२ वा**—प्रवृत्तिमार्गाचा त्याग व निवृत्तिमार्गाचा स्वीकार ४७७.

---

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर )



## दशम खंड



## १२ शांतिपर्व–( पुढें चालू



## राजधर्मपर्व १



### अध्याय ३२ वा

[ १ युधिष्ठिराला व्यासाचा उपदेश. २ प्रजापालन हाच राजाचा धर्म. ]

( १ ) **वैशंपायन**—नंतर राजा युधिष्ठिर शोक करीत स्वस्थ बसला असल्याचें पाहून तो धर्मतत्त्वज्ञ तपस्वी कृष्णद्वैपायन त्याला बोलला.

( २ ) **व्यास**—हे राजीवाक्षा, प्रजांचें पालन हाच राजांचा धर्म होय आणि नित्य धर्मानुसार वागणाऱ्या मनुष्यांना धर्म हाच प्रमाण आहे. म्हणून हे राजा, तूं पितृपितामहांपासून चालत आलेलें हें राजपद स्वीकार. तप हा ब्राह्मणांचा वेदानें ठरविलेला नित्याचा धर्म आहे आणि तोच ब्राह्मणांना सदैव प्रमाण आहे. अशा त्या धर्माचा क्षत्रिय हा संरक्षक आहे. जो स्वतः विषयोपभोगांत रत होऊन धर्माज्ञा मोडतो, त्या लोकयात्रेच्या आड येणाऱ्या मनुष्याला दंडाला धरून ताळ्यावर आणलें पाहिजे. जो कोणी, मग तो भृत्य असो, पुत्र असो,

तपस्वी असो, अथवा दुसरा कोणी असो, मोहाला वश होऊन प्रमाण गोष्टीला अप्रमाण समजतो, अशा पाप्याचा सर्व उपायांनीं निग्रह करावा किंवा प्रसंगविशेषीं वधहि करावा. त्याच्या उलट जो राजा वागतो, त्याला पातक लागतें. नाश पावणाऱ्या धर्माचें जो संरक्षण करीत नाहीं, तो धर्मघ्न होतो. तूं धर्मघातक लोकांचा त्यांच्या अनुयायांसह वध केला आहेस, त्यांत हे पांडवा, तुला शोक करण्यासारखें काय आहे? धर्माला अनुसरून वागणाऱ्या राजानें दुष्टांना मारावें, साधुजनांना दान द्यावें आणि प्रजांचें रक्षण करावें.

युधिष्ठिर—हे तपोधना, तूं जें सांगत आहेस, त्याविषयीं मला मुळींच शंका नाहीं. हे सर्वधर्मज्ञश्रेष्ठा, तुला संपूर्ण धर्माचें ज्ञान आहे. हे ब्रह्मन्, माझ्या हातून राज्यलोभानें अनेक अवध्य पुरुषांचा वध झाला आहे आणि तीं कर्में मला भाजून काढून शुष्क करीत आहेत.

व्यास—हे भारता, कोणत्याहि गोष्टीचा कर्ता ईश्वर किंवा मनुष्य असतो किंवा त्या गोष्टी स्वभावधर्मानेंहि घडून येत असतात. मनुष्यांना मिळणारें फल पूर्वकर्मजन्यहि असतें. हे भरतकुलोत्पन्ना, ईश्वराच्या प्रेरणेनें मनुष्य जें कांहीं बरेंवाईट कर्म करितो, त्याचें फल ईश्वराकडेच जात असतें. ज्याप्रमाणें एखाद्या मनुष्यानें वनामध्यें कुऱ्हाडीनें वृक्ष तोडिला असतां त्याचें पाप तोडणाराला लागतें, कुऱ्हाडीला लागत नसतें, तसाच हा प्रकार आहे. अथवा ती कुऱ्हाड घेऊन वृक्ष तोडल्याचें पाप कुऱ्हाड करणाऱ्याकडे जावें, पण तसें होत नाहीं. हे कौंतेया, दुसऱ्यानें केलेल्या कर्माचें फल आपणांला मिळणें इष्ट नाहीं, म्हणून ईश्वरप्रेरित होऊन केलेल्या शत्रुवधाचा सर्व भार तूं ईश्वरावर टाकून स्वस्थ रहा. आतां बऱ्यावाईट कर्मांचा कर्ता पुरुष आहे, ईश्वराकडे त्याचा संबंध पोंचत नसेल तर हें तुझ्या हातून शुभच कर्म झालें आहे. कुऱ्हाड करणाऱ्याला ज्याप्रमाणें त्या छेदनक्रियेचें पातक लागत नाहीं, त्याप्रमाणें दैवयोगानुसार घडणाऱ्या कर्माचें फल मनुष्याकडे येत नाहीं. दैवयोग कोणालाहि चुकवितां येत नाहीं. दैवानेंच ही हननक्रिया घडली, असें तूं निश्चित मानत असशील, तर अशुभ गोष्ट कधीं घडली नाहीं व घडावयाचीहि नाहीं. आतां लोकांच्या पापपुण्यांची उपपत्ति लावावयाची असल्यास राजानें सर्वदा आपला दंड सज्ज ठेवूनच राहिलें पाहिजे. तथापि हे भारता, लोकांमध्यें राहून राज्य करीत असतां शुभाशुभ कर्मांचीं बरींवाईट फळें आपणांस भोगावीं लागतात,

असें तुला वाटत असेल तर ज्या पापकर्मांनें तुला अशुभप्राप्तीची भीति वाटत असेल, तें पापकर्म टाकून दे. हे राजशार्दूला, असा शोक करीत बसूं नकोस! हे भारता, स्वधर्मांत दोष असले तरी त्याकरितां आत्मत्याग करणें तुला शोभत नाहीं. त्या त्या कर्मांकरितां शास्त्रीय प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. तीं शरीरधारी मनुष्य करूं शकेल. देहत्याग करणाऱ्याच्या हातून कधींहि होणार नाहींत. हे राजा, तूं जीवंत असलास, तरच तीं प्रायश्चित्तें करूं शकशील. प्रायश्चित्तें न करितां तुला मृत्यु आला, तर तुला भयंकर संताप मात्र होईल. १२. १. ३२.

---

## अध्याय ३३ वा.

[ १ शोक करणाऱ्या युधिष्ठिराला देवासुरसंग्रामवृत्तांत कथन करून व्यास अश्वमेध करण्याविषयीं उपदेश करितात. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, राज्यलोभानें मीं पुत्र, पौत्र, भ्राते, पितर, श्वशुर, गुरु, मातुल, पितामह, महात्मे क्षत्रिय, संबंधी सुहृद, मित्र, भगिनीपुत्र, ज्ञातिजन आणि अनेक देशांतून आलेले पुष्कळ राजे, यांचा एकट्यानें वध करविला आहे. हे तपोधना, त्या सोमपान करणाऱ्या धार्मिक भूपतींचा वध करून मला कोणती गति मिळणार, हा विचार वरचेवर मनांत येऊन मला अत्यंत संताप होत आहे. हे पितामहा, ही पृथ्वी त्या संपत्तिमान् नृपतिश्रेष्ठांनीं विहीन झालेली पाहून, तसेंच आपले ज्ञातिजनांचा घोर वध आणि शेंकडो शूर पुरुष आणि कोट्यवधि इतर जन यांचा नाश झालेला पाहून माझें मन अत्यंत संतप्त होऊन गेलें आहे. ज्यांचे पुत्र, पति आणि बंधु मारले गेले आहेत, अशा श्रेष्ठ स्त्रियांची अवस्था आज काय होईल? आपला भयंकर नाश करणाऱ्या आम्हां पांडवांना आणि आमचे साहाय्यक यादवांना निंदून त्या कृश व दीन स्त्रिया भूतलावर पडून राहतील! हे द्विजश्रेष्ठा, आपले वडील, बंधु, पति आणि पुत्र हे न दिसल्यामुळें त्या सर्व स्त्रिया वत्सलतेनें प्राणत्याग करून यमलोकीं जातील आणि मग धर्म हा अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें आम्हांला स्त्रीवधाचें पातक लागेल. याप्रमाणें सुहृदांचा वध करून ज्याअर्थीं हें मोठें पातक आम्हांला जडलें आहे, त्याअर्थीं आम्ही नरकांत अधोमुख लोंबत राहूं. म्हणून हे सत्तमा, उग्र तपश्चर्येच्या योगानें मी या शरीराचा त्याग करणार आहें. आतां हे पितामहा

कोणत्या आश्रमामध्यें असल्या प्रकारच्या पातकाचा निरास होण्याचें सामर्थ्य आहे, तें मला सांग.

वैशंपायन—हें युधिष्ठिराचें भाषण श्रवण करून व विचार करून व्यास युधिष्ठिराला बोलला—

व्यास—हे राजा, क्षात्रधर्माचा विचार करून तूं दुःख करीत बसूं नकोस. हे क्षत्रियश्रेष्ठा, हे सर्व क्षत्रिय स्वधर्मानेंच वध पावले आहेत. पृथ्वीवरील सर्व वैभव व महायश मिळविण्याकरितां हे दुसऱ्यांचा प्राण घेण्याला प्रवृत्त झाले होते. ते कालयोगानें निधन पावले आहेत. त्यांना तूं मारिलें नाहींस, भीमानें मारिलें नाहीं, अर्जुनानें मारिलें नाहीं किंवा नकुल-सहदेवांनींहि मारिलें नाहीं. त्यांची पाळी आली असतां कालानेंच त्यांना नेलें आहे. ज्याला माता नाहीं, पिता नाहीं किंवा कोणी अनुग्राह्यहि नाहीं, अशा सर्व कर्मांच्या साक्षिभूत कालानेंच त्यांचें हरण केलें आहे. हे भरतश्रेष्ठा, युद्ध केवळ निमित्तमात्र असून प्राण्यांनीं प्राण्यांचा वध करणें हेंच त्याचें ईश्वरी स्वरूप होय. काल हा कर्मसूत्रांनीं बद्ध असून शुभाशुभ कर्मांचा साक्षी आहे. त्याला कर्मानुसार फल द्यावें लागतें. हे महाबाहो, ज्यांच्या योगानें तुझे शत्रु नाश पावले, त्या त्यांच्या आत्मविनाशक कर्मांचा विचार कर. त्याप्रमाणें तूं आपलें नित्याचें व्रतपालन करीत आला आहेस हेंहि लक्ष्यांत घे. दैवानेंच हें कर्म तुजकडून करविलें आहे. ज्याप्रमाणें सुतारानें केलेलें यंत्र चालविणारा जसें चालवील तसें चालतें, त्याचप्रमाणें कालप्रेरित कर्माला अनुसरून हें जगत् चाललें आहे. ज्याप्रमाणें मनुष्याच्या उत्पत्तीला तसेंच विनाशाला कांहीं कारण लागत नसतें, तीं संचितानुरूप घडून येतात, त्याचप्रमाणें शोक व हर्ष हे व्यर्थ आहेत. आतां तुझ्या अंतःकरणास जें हें दुःख होत आहे, त्यासाठीं प्रायश्चित्त सांगितलें आहे, तें कर.

हे पार्था, आम्हीं ऐकिलें आहे कीं पूर्वीं एकदां असुर आणि देव यांमध्यें युद्ध झालें होतें. असुर हे वडील बंधु असून देव हे कनिष्ठ बंधु होते. त्या दोघांमध्यें संपत्तीसंबंधानें बराच विरोध होता. त्यामुळें तें युद्ध बत्तीस हजार वर्षें चाललें. त्या युद्धामध्यें देवांनीं सर्व पृथ्वी रक्तमय केली आणि दैत्यांचा वध केला. अशा रीतीनें देवांनीं स्वर्ग मिळविला. त्यावेळीं शालावृक म्हणून त्रैलोक्यांत प्रसिद्ध असलेले, वेदपारंगत, अठ्यायेशीं हजार ब्राह्मण दर्पमोहित

होऊन दैत्यांच्या साहाय्यार्थ त्यांना जाऊन मिळाले. त्यांचाहि देवांनीं संहार केला. त्या दैत्यांचा वध जसा देवांनीं केला, तसाच धर्माचा उच्छेद करणाऱ्या अधर्मप्रवर्तकांचा संहार केला पाहिजे. एकाचा वध केल्यानें जर सर्व कुलाचें स्वास्थ्य होत असेल, अगर एका कुलाचा घात करून सबंध राष्ट्र सुखी होत असेल, तर असें केल्यानें तें धर्माला बाधक होत नाहीं. हे नराधिपा, कधीं कधीं धर्म अधर्मरूप होत असतो व अधर्म धर्मरूप होतो. त्याचा विचार ज्ञानवान् मनुष्यानें केला पाहिजे. हे पांडवा, तुला श्रुतींचें चांगलें ज्ञान आहे. म्हणून तूं आपल्या चित्ताचें समाधान करून घे. हे भारता, पूर्वीं देवांनीं ज्या मार्गाचा अंगीकार केला होता, तोच मार्ग तूं स्वीकारिला आहेस. हे पांडवश्रेष्ठा, तुझ्या-सारखे लोक नरकाला कधींहि जाणार नाहींत. हे परंतपा, तूं आपल्या बंधूंचें आणि इतर सुहृदांचें समाधान कर. जो सदासर्वदा पापाचरण करीत असतो, व तें करीत असतां ज्याच्या अंतःकरणाला कांहींहि लज्जा वाटत नसते, त्याच्या ठिकाणीं तें पाप पूर्णत्वास पोंचलें आहे, असें समजावें. त्या पापाला प्रायश्चित्त नाहीं व तें कधींहि कमी होत नाहीं.

हे राजा, तूं निर्मल व पवित्र कुलांत जन्म पावला आहेस. तुझ्याकडून घडलेलें पाप दुसऱ्याच्या दोषाकडून तुला लागलें आहे व तें केल्याबद्दल तुला पश्चात्तापहि होत आहे. या पापाला अश्वमेध यज्ञ करणें हें प्रायश्चित्त सांगितलें आहे. तें तूं कर म्हणजे पापविमुक्त होशील. शत्रूंला मारल्यावर भगवान् इंद्रानें मरुतांसह एकएक असे शंभर यज्ञ केले व त्यामुळेंच तो शतक्रतु झाला. त्याचे सर्व पातकांचा नाश झाला, त्यानें स्वर्ग मिळविला व सुखोत्पादक लोक संपादन केले आणि आतां मरुद्गणांनीं वेष्टित तो इंद्र सर्व दिशा प्रकाशित करीत स्वर्गलोकामध्यें शोभत आहे. त्या शचीपतीचें स्वर्गामध्यें अप्सरा गौरव करीत असून देव आणि ऋषिहि त्याची उपासना करीत आहेत. हे अनघा, तूं ही पृथ्वी पराक्रमानें मिळविली आहे आणि पराक्रमानेंच तूं या सर्व राजांना जिंकिलें आहेस. हे राजा, तरी तूं आतां सुहृदांसह त्यांच्या पुरांकडे आणि राष्ट्रांकडे जा आणि त्यांच्या बंधूंना, पुत्रांना आणि नातवांना त्यांच्या त्यांच्या गादीवर अभिषेक कर, मग ते गर्भस्थ असोत किंवा बाल असोत. सर्व प्रजेचें रंजन कर आणि पृथ्वीचें उत्तम प्रकारें पालन कर! ज्यांना पुत्र नाहीं असें आढळून येईल, तेथें त्यांच्या कन्यांना अभिषेक कर! असें केल्यानें स्त्रिया जात्याच सुखेच्छु असल्यामुळें त्या सहज शोकत्याग करतील. हे भारता, ह्याप्रमाणें

सर्व राष्ट्रांना आश्वासन दे आणि पूर्वी विजयी इंद्रानें जसा अश्वमेध केला, त्याप्रमाणें तूं यज्ञ कर ! हे क्षत्रियर्षभा, ते महात्मे क्षत्रिय अशोच्य आहेत. कारण, कृतांतबलमोहित होऊन ते आपल्याच कर्मांनीं नाश पावले आहेत. तूं क्षात्रधर्म उत्तम पाळला आहेस आणि त्यामुळें ही निष्कंटक पृथ्वी तुला प्राप्त झाली आहे. तरी हे कौंतेया, तूं स्वधर्माचें पालन कर, तोच तुला परलोकीं कल्याणकारक होईल. १२. १. ३३.

---

## अध्याय ३४ वा.

[ १ युधिष्ठिरप्रश्न. २ युधिष्ठिराला व्यासाकडून कार्याकार्यकथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, कोणतीं कर्मे केल्यानें मनुष्य प्रायश्चित्ताला योग्य होतो आणि कोणत्या कर्मांनीं त्याची पापापासून मुक्तता होते, तें मला सांग.

( २ ) **व्यास**—युधिष्ठिरा, विहितकर्मे न करणारा, निषिद्ध कर्मे आचरणारा आणि मिथ्याचरणानें वागणारा मनुष्य प्रायश्चित्तार्ह होतो. त्याचप्रमाणें सूर्योदय किंवा सूर्यास्त या वेळीं निजून राहणारा, सडलेल्या नखांचा, कृष्णवर्ण दंतांचा, कनिष्ठ बंधूचा विवाह आपल्या आधीं करणारा, ज्येष्ठाआधीं आपला विवाह करून घेणारा, ब्रह्महत्या करणारा, परनिंदक, मृत बंधूच्या भार्येशीं रममाण होणारा, वडील बहिणीआधीं धाकटीचा विवाह करणारा, नष्टव्रत, ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांपैकीं कोणाचाहि वध करणारा, असत्पात्रीं दान करणारा, गांवाचा नाश करणारा, मांसविक्रय करणारा, अग्नीचा त्याग करणारा, ब्रह्मज्ञान विकणारा, गुरुस्त्रीचा वध करणारा, निंद्य कुलांत जन्मलेला, वृथा पशुहिंसा करणारा, गृहाला आग लावणारा, असत्य मार्गानें चालणारा, गुरूचा उपरोध करणारा, प्रतिज्ञाभंग करणारा, या सर्वांची गणना पातक्यांमध्यें केली आहे. आतां लोक आणि वेद यांविरुद्ध असणारीं अकार्यें कोणतीं तीं सांगतों, ऐक.

स्वदेशाचा परित्याग, परधर्माचा आचार घेणें, अयाज्यांचें याजन, अभक्ष्यांचें भक्षण, शरण आलेल्यांचा त्याग, भृत्यांचें पोषण न करणें, रसविक्रय करणें, पशुपक्ष्यांचा वध करणें, सामर्थ्य असूनहि गर्भादानादि क्रिया न करणें, अवश्यदान न करणें, दक्षिणा न देणें, ब्राह्मणांचा अपमान करणें, हीं सर्व अकार्यें होत असें धर्मवेत्त्यांचें मत आहे. तसेंच पित्याशीं तंटा करणारा,

गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारा आणि योग्य कालीं धर्मपत्नीचा उपभोग न घेणारा हे सर्व अधार्मिक होत. याप्रमाणें जीं कर्मे केल्यानें आणि जीं न केल्यानें मनुष्य प्रायश्चित्ताला योग्य होतो, तीं मीं तुला सांगितलीं. आतां मनुष्यानें कोणत्या प्रसंगीं हीं कर्मे केलीं असतां त्याला पातक लागत नाहीं, तें सांगतों, ऐक. रणामध्यें शस्त्र हातांत घेऊन वध करण्याच्या इच्छेनें येणारा मनुष्य, मग तो वेदसंपन्न कां असेना, त्याचा वध केल्यानें ब्रह्महत्येचें पातक लागत नाहीं. हे कौंतेया, असा मंत्र वेदांमध्यें आहे आणि मी तुला वेदप्रमाण धर्मच सांगत आहें. अंगावर धांवून येणाऱ्या सदाचारहीन आततायी ब्राह्मणाचा वध केल्यानें ब्रह्महत्या घडत नाहीं. कारण त्याचा क्रोध दुसऱ्याच्या शरीरांत प्रवेश करून त्याजकडून त्याला मारवितो. जीव जाण्याचा प्रसंग आला असतां किंवा अज्ञानानें मद्यप्राशन झालें असतां तो प्रायश्चित्ताला पात्र होतो, असें धर्मज्ञ लोकांचें मत आहे.

कौंतेया, अभक्ष्यासंबंधी सर्व दोष प्रायश्चित्तानें नाहींसे होतात. गुर्वाज्ञेनें गुरुस्त्रीगमन करणाऱ्यास पातक लागत नाहीं. याचें उदाहरण उद्दालकानें आपल्या शिष्याकडून श्वेतकेतूची उत्पत्ति केली हें होय. विपत्तींत गुर्वाज्ञेनें चोरी करणें निषिद्ध होत नाहीं. मात्र मनुष्यानें असें करण्यास वरचेवर प्रवृत्त होऊं नये. तसेंच ब्राह्मणाशिवाय इतरांचें द्रव्यहरण करणारा दोषास्पद होत नाहीं. परंतु त्या द्रव्याचा उपयोग त्यानें स्वतःकरितां करावयाचा नाहीं. आपला किंवा दुसऱ्याचा प्राण वांचविण्यासाठीं, गुरुकार्यासाठीं, स्त्रियांसाठीं, किंवा विवाहकार्यांत असत्य बोलल्यास त्याचें पातक लागत नाहीं. स्वप्नामध्यें वीर्यपात झाल्यानें व्रतभंग होत नाहीं. प्रज्वलित अग्नीमध्यें आज्यहोम करणें हेंच असल्या पातकाचें प्रायश्चित्त आहे. ज्येष्ठ बंधु पतित अथवा संन्यस्त झाला असतां त्याच्या पूर्वी कनिष्ठ बंधूनें विवाह केला असतां दोष लागत नाहीं. स्त्रीनें स्वतः होऊन याचना केली असतां परदारागमन दोषास्पद होत नाहीं. यज्ञकृत्यावांचून पशूंची हिंसा स्वतः करूं नये अथवा दुसऱ्यांकडूनहि करवूं नये. त्यांची हिंसा न करतां त्यांवर दया करणें हें शास्त्रविहित आहे. अज्ञानानें अयोग्य ब्राह्मणाला दान दिलें असतां अथवा योग्य ब्राह्मणांला कांहींहि दिलें नसतां त्यांत पाप लागत नाहीं. दुराचारी स्त्रीचा त्याग करणें हें पापकारक होत नाहीं. असें केल्यानें तिची शुद्धि होण्याचा संभव असतो आणि त्यामुळें तिच्या पतीलाहि दोष लागत नाहीं. सोमाचें तत्त्व समजल्यावर त्याचा

विक्रय केल्यास तो दोषकारक होत नाहीं. असमर्थ सेवकाला काढून टाकल्यास त्यांत किमपिहि दोष नाहीं. पुढें धेनूंसाठीं गवत मिळावें ह्या हेतूनें वनदाह केल्यानें त्यांत पाप लागत नाहीं. जीं कृत्यें केल्यानें मनुष्यास पाप लागत नाहीं, तीं सर्व तुला सांगितलीं, आतां विस्तारपूर्वक प्रायश्चित्तें तुला सांगतों. १२. १. ३४.

---

## अध्याय ३५ वा.

[ १ व्यासाकडून युधिष्ठिराला पापांबद्दल प्रायश्चित्तकथन. ]

( १ ) व्यास—भारता, चांद्रायणादि तपानें, यज्ञादि कर्मांनें किंवा दानादिकांनीं मनुष्य पुनः पाप न करील, तर तो शुद्ध होतो. तसेंच ब्रह्मघातक्यानें एक वेळ हातांत करोटी घेऊन भिक्षा मागावी, आपलें काम आपण स्वतः करावें. खट्वांग दुसऱ्या हातांत घेऊन ब्रह्मचारी व्रतानें सर्वदा फिरत रहावें, कोणाची असूया करूं नये, जमिनीवर निजून रहावें, आपलें पाप सर्व लोकांस सांगत जावें. असें बारा वर्षेंपर्यंत केल्यानें तो आपल्या पापापासून मुक्त होतो; अथवा त्यानें आपल्या इच्छेनें ज्ञानवान् शस्त्रधारी लोकांचे हातून मरावें, प्रज्वलित अग्नीमध्यें खालीं डोकें करून तीन वेळ आपणाला फेंकून घ्यावें. कोणत्याहि एका वेदाचा जप करीत शंभर योजनें जावें. आपलें सर्व वित्त, जीवनाकरितां पुरेसें मिळविलेलें द्रव्य किंवा सर्व सामानासुद्धां आपलें घर विद्वान् ब्राह्मणाला द्यावें; असें केल्यानें तो पापमुक्त होतो. गोब्राह्मणांचें पालन केल्यानें मनुष्य ब्रह्महत्येच्या पापापासून निर्मुक्त होतो. सहा वर्षेंपर्यंत कृच्छ्र[1] विधीनें भोजन करणारा ब्रह्महत्येपासून मुक्त होतो. तसेंच प्रत्येक महिन्याला एकेक कृच्छ्र याप्रमाणें तीन वर्षें भोजन

---

१ कृच्छ्र–तीन दिवस सकाळीं व तीन दिवस सायंकाळीं भोजन करावें; नंतर तीन दिवस अयाचित वृत्तीनें जें मिळेल तें खावें व नंतर तीन दिवस उपवासी रहावें. याला कृच्छ्र म्हणतात. महिन्यांत एक कृच्छ्र करावयाचें म्हणजे सात दिवस सकाळीं जेवणें, सात दिवस सायंकाळीं जेवणें, सात दिवस अयाचित वृत्तीनें जें कांहीं मिळेल त्यावर रहाणें व सात दिवस उपवासांत काढणें. सातांच्या ठिकाणीं महिना योजून त्याच क्रमानें चालल्यास मासकृच्छ्र होतें.

करणारा ब्रह्महत्येपासून मुक्त होतो. एक वर्षपर्यंत मासकृच्छ्र करून भोजन करणारा पापापासून मुक्त होतो किंवा महिन्यानंतर फार थोडे दिवस उपवास केल्यानें व जलावर राहिल्यानें त्याचें पाप नाहींसें होतें. अश्वमेध केल्यानेंहि तो या पापापासून मुक्त होतो, यांत संशय नाहीं. अशाप्रकारें अवभृथ स्नान जे कोणी करितात, ते सर्व पापविनिर्मुक्त होतात असें श्रुतिवचन आहे. ब्राह्मणांसाठीं युद्धांत जो हत होतो, त्याला ब्रह्महत्येचें पाप लागत नाहीं. एक लक्ष गाई सत्पात्र ब्राह्मणास दान दिल्यानें ब्रह्महत्या करणारा पापापासून मुक्त होतो. जो कोणी पंचवीस हजार दूध देणाऱ्या कपिलांचें दान करितो, तो सर्व प्रकारच्या पापापासून मुक्त होतो. जो सहस्र दुभत्या व सवत्स गाई मरणकालीं साधु व दरिद्री ब्राह्मणांना दान देतो, तो पापापासून मुक्त होतो.

हे पृथ्वीपते, जो नियमशील ब्राह्मणांना शंभर कांबोज ( कंबुदेशांत उत्पन्न झालेले ) अश्व दान देतो, तो पापमुक्त होतो. हे भारता, जो कोणी एखाद्या ब्राह्मणाचे मनोरथ पुरवून तें सांगत फिरत नाहीं, तो पापरहित होतो. एकवार मद्य प्राशन केलेल्या मनुष्यानें विस्तवाप्रमाणें तापवून लाल केलेलें मद्य प्रायश्चित्तार्थ प्यावें, म्हणजे तो इहपरलोकीं शुद्ध होतो. पर्वताच्या कड्यावरून खालील निर्जल प्रदेशांत उडी टाकणारा, अग्निप्रवेश करणारा किंवा केदारासारख्या तीर्थांवर जाणारा मनुष्य सर्व पापापासून मुक्त होतो. मद्यपी ब्राह्मणानें बृहस्पतिसवनामक यज्ञ करावा, म्हणजे तो पुनः सभेंत जाण्याला पात्र होतो, असें श्रुति सांगते. हे राजा, एखादा सुरापान करून मत्सररहित होत्साता जो भूमिदान करितो व पुनः मद्यप्राशन करीत नाहीं, तो त्या पातकापासून मुक्त होऊन शुद्ध होतो. गुरुस्त्रीशीं जो गमन करितो, त्यानें तप्त झालेल्या शिळेला आलिंगन देऊन शयन करावें. तो देहत्याग केल्यानें सर्व अशुभ कर्मांपासून मुक्त होतो. स्त्रिया एक वर्षपर्यंत सर्व आहारविहार सोडून राहिल्यास पापविमुक्त होतात. जो एक महिनाभर जलप्राशनहि न करितां आपलें सर्वस्व दुसऱ्यास देतो, गुरूकरितां युद्धांत मरण पावतो, तो अशुभ कर्मांपासून मुक्त होतो. गुरूशीं असत्याचरणानें वागणारा आणि त्याला उपरोध करणारा मनुष्य जर त्याच्या मनाप्रमाणें वागूं लागला, तर त्या पापापासून मुक्त होतो.

ब्रह्मचर्यापासून भ्रष्ट झालेला मनुष्य सहा महिने गोचर्म धारण करून ब्रह्महत्येला सांगितलेलें व्रत आचरण करील, तर तो त्या पातकापासून निर्मुक्त

होतो. परस्त्रीचें हरण करणारा अथवा परद्रव्यापहरण करणारा मनुष्य एक संवत्सरपर्यंत व्रती राहिल्यास त्या पातकापासून मुक्त होतो. मात्र त्यानें जो पैसा घेतला असेल, तो प्रयत्नपूर्वक परत द्यावा. असें केल्यानें तो पापविमुक्त होतो. ज्या धाकट्या बंधूनें वडील भावाच्या आधीं विवाह केला असेल, त्यानें अथवा त्याच्या वडील भावानें द्वादशरात्रपर्यंत इंद्रियदमन करून व्रतनिष्ठ रहावें; असें केल्यानें तो शुद्ध होतो. त्या कनिष्ठ बंधूनें पितरांच्या उद्धाराकरितां द्वितीय विवाह करावा. त्यांत त्या पहिल्या स्त्रीला कांहीं दोष लागत नाहीं. चार महिने धारणापारणा व्रत केल्यानें स्त्रिया शुद्ध होतात, असें धर्मवेत्त्यांचें मत आहे. स्त्रियांनीं पाप केलें आहे, असा संशय येतांच ज्ञात्या पुरुषांनीं त्यांच्याशीं संबंध ठेवूं नये. जसें भांडें राखेनें स्वच्छ होतें, त्याप्रमाणें रजोदर्शनानें स्त्रिया शुद्ध होतात. शूद्रानें उष्टें केलेलें, गाईनें हुंगलेलें किंवा चूळ टाकून उष्टें झालेलें कांस्यपात्र पंचगव्य ( घृत, दुग्ध, दहीं, शेण व गोमय ), माती, उदक, भस्म, क्षार आणि वह्नि या दहा वस्तूंनीं शुद्ध होतें. सर्व चतुष्पादधर्म ब्राह्मणांना सांगितला असून तीनचतुर्थांश क्षत्रियांना, अर्धा वैश्यांना व एकचतुर्थांश शूद्रांना सांगितला आहे. त्यांच्या पापपुण्यांचें प्रमाणहि याच मानानें कमीअधिक समजावें. पशुपक्ष्यादिकांचा वध करून, तसेंच अनेक वृक्ष तोडून लागलेलें पाप तीन दिवस वायुभक्षण करून तें सांगत फिरल्यानें नाहींसें होतें.

हे राजा, अगम्य स्त्रीशीं संबंध ठेविला असतां सहा महिनेपर्यंत आर्द्रवस्त्र परिधान करून व राखेवर शयन करून रहावें. अशा रीतीनें सर्व अकार्यांना शास्त्र, रूढि आणि अनुभव यांच्या अनुरोधानें प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. मिताहार करून शुचि प्रदेशांत गायत्रीजप करीत रहावें, हिंसा करूं नये, विशेष बोलूं नये, राग-द्वेष–मानापमानशून्य होऊन रहावें, म्हणजे सर्व पातकांपासून मुक्ति मिळते. दिवसा उभें राहून रात्रीं आकाशाखालीं निजून रहावें व दिवसा तीनदां व रात्रौ तीनदां पाण्यांत सचैल स्नान करावें; व्रतस्थ राहून त्यानें स्त्रिया, शूद्र आणि पतित यांच्याशीं भाषण करूं नये. असें केल्यानें ब्राह्मण अज्ञानानें केलेल्या सर्व पातकांपासून शुद्ध होतो. पंचभूतांच्या साक्षीनें मनुष्याच्या हातून जें शुभाशुभ कर्म घडतें, त्याचें फल त्याला मरणोत्तर मिळतें. मनुष्याचें जें कर्म अधिक असतें, त्याप्रमाणें त्याचें त्याला फल मिळत असतें; म्हणून दानानें, तपानें आणि यज्ञादि कर्मांनीं सत्कृत्यांची वाढ करावी. अशुभ

कृत्यांचा अतिरेक झाला असतां त्याला तसेंच फल मिळतें. म्हणून सत्कर्में करावीं, पापकर्मांपासून दूर रहावें. सदोदित द्रव्यदान करावें; असें केल्यानें मनुष्य पापापासून मुक्त होतो. प्रत्येक पापाला अनुरूप असें प्रायश्चित्त सांगितलें आहे. महापातकाला मात्र प्रायश्चित्त सांगितलेलें नाहीं.

हे राजा, भक्ष्याभक्ष्य व वाच्यावाच्य हीं पातकें ज्ञानानें अथवा अज्ञानानें घडलीं असलीं तर त्यांबद्दल प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. ज्ञानपूर्वक झालेलीं पापें मोठीं समजलीं जातात व नकळत केलेलीं पापें लहान समजलीं जातात, त्यांबद्दल प्रायश्चित्त करावें. शास्त्रोक्त रीतीनें प्रायश्चित्त केल्यास पाप नाहींसें होतें. आस्तिक्यबुद्धीनें विश्वास धरणारालाच हा विधि सांगितलेला आहे. नास्तिक, अश्रद्धाळू, दंभयुक्त आणि द्वेष्टे अशा लोकांना प्रायश्चित्तविधि सांगितलेला नाहीं. हे धर्मश्रेष्ठा, शिष्टाचार हाहि एक धर्मशास्त्रांत सांगितला आहे. म्हणून हे नरश्रेष्ठा, इहपरलोकीं कल्याण व्हावें, अशी ज्याची इच्छा असेल, त्यानें त्याचें सेवन करावें. हे राजा, तूं प्राणरक्षणाकरितां क्षात्रधर्माला अनुसरून त्यांचा वध केला आहेस, म्हणून तुला तें पाप लागणार नाहीं. इतकें असूनहि जर तुझ्या चित्ताला कांहीं अस्वस्थता वाटत असेल तर प्रायश्चित्त कर. अनार्यांनीं स्वीकृत अशा शोकाचा आश्रय करून तूं आत्मत्याग करून घेऊं नकोस.

वैशंपायन—भगवान् व्यासानें असें सांगितल्यावर त्या धर्मराज युधिष्ठिरानें थोडा वेळ विचार केला आणि नंतर त्याला उत्तर दिलें. १२.१.३५.




---

## अध्याय ३६ वा.

[ १ व्यासाकडून युधिष्ठिराला भक्ष्याभक्ष्य व पात्रापात्रविचारकथन. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, भक्ष्य कोणतें, अभक्ष्य कोणतें, कोणतें दान प्रशस्त आहे, पात्र कोण, अपात्र कोण हें मला सांग.

व्यास—यासंबंधीं सिद्ध आणि प्रजापति मनु यांमधील पुरातन संवादरूपी इतिहास मी तुला सांगतों. पूर्वीं सृष्टीच्या आरंभीं व्रतनिष्ठ ऋषींनीं प्रजापति मनूकडे जाऊन त्याला धर्मविषयक प्रश्न केला. त्यांनीं विचारिलें, ‘ हे प्रजापते, अन्न कसें असावें, दान कोणत्या प्रकारचें असावें, सत्पात्र कोणाला म्हणावें, तप आणि अध्ययन कसें असावें, तसेंच कार्य कोणाला म्हणावें व अकार्य कोणाला म्हणावें, हें सर्व आम्हांला सांग. ’ तें त्यांचें भाषण ऐकून

स्वायंभुव मनु म्हणाला, “ मुनिहो, धर्माचें आचरण म्हणजे काय हें विस्तारानें व संक्षेपानें सांगतों. जेथें कोठें पातकाविषयीं कांहीं प्रायश्चित्त सांगितलें नसेल, त्या ठिकाणीं जप, होम, उपवास आणि आत्मज्ञान हेंच प्रायश्चित्त होय. ज्या ठिकाणीं पुष्कळ लोक जपादिकांत सर्वदा तत्पर असतात, असा नदीमय प्रदेश किंवा डोंगराळ जागा देखील पवित्र गणिल्या आहेत. ज्याला कांहीं प्रायश्चित्त सांगितलें नाहीं, तें करणाऱ्या मनुष्यानें अशा ठिकाणीं रहावें, सुवर्ण भक्षण करावें, तसेंच रत्नयुक्त जलांत स्नान करावें, देवस्थानाला जावें, आज्यप्राशन करावें, हीं कर्मे मनुष्याला सत्वर पावन करणारीं आहेत, यांत संशय नाहीं. सुज्ञ मनुष्यानें केव्हांहि गर्व धारण करूं नये. दीर्घायुष्याची त्याला इच्छा झाल्यास त्यानें त्रिरात्र ऊन पाण्यावर राहून तप्तकृच्छ्र करावें.

कोणीं न दिल्यास मागूं नये; दान, अध्ययन, तप, अहिंसा, सत्य, अक्रोध, क्षमा आणि यजन हीं धर्माचीं लक्षणें होत. हा धर्म कधीं कधीं देशकालानुरोधानें अधर्म होतो. दुसऱ्याला न विचारितां एखाद्या वस्तूचें ग्रहण, असत्य भाषण, हिंसा ह्याहि गोष्टी प्रसंगानुसार धर्म घडतात. ज्ञानी लोकांच्या मतें हे दोनीहि प्रकार धर्म आहेत व अधर्महि आहेत. लौकिक आणि वैदिक कर्मांचे प्रवृत्ति आणि अप्रवृत्ति असे दोन प्रकार आहेत. अप्रवृत्तीमुळें मोक्ष मिळतो, व कर्मांमुळें जन्ममृत्यूंची प्राप्ति होते, अशुभ कर्मांचें फल अशुभ व शुभ कर्मांचें फल शुभ जाणावें. तरी ह्या दोहोंचा शुभपणा किंवा अशुभपणा त्यांच्या बऱ्यावाईट परिणामावर अवलंबून असतो. देव, धर्म, जीव आणि उदरनिर्वाह यांकरितां आपल्या हातून अशुभ गोष्ट घडली तरी तिचें फल शुभच मिळतें. पुढें अशुभ परिणाम होणार असा संशय आला असतां अथवा बुद्धिपूर्वक अशुभ परिणामाची गोष्ट हातून घडल्यास त्याला प्रायश्चित्त सांगितलें आहे. क्रोध अथवा मोह यांनीं दुसऱ्याच्या मनाला क्लेश देणें किंवा त्याच्या मनाला प्रिय किंवा अप्रिय होईल, असें करणें ह्याला शास्त्रसिद्ध प्रायश्चित्त म्हटलें म्हणजे हविष्यान्नभक्षण, मंत्रजप, तीर्थाटन इत्यादि हें होय.

राजाच्या हातून राजदंड खालीं ठेविला गेला असतां त्यानें एक रात्र उपवास करावा, म्हणजे त्याची शुद्धि होते आणि त्याच्या उपाध्यायानें तीन दिवस उपोषण करावें. पुत्रादिकांच्या निधनानें शोक उत्पन्न होऊन आत्मवध करून घेण्याला सज्ज झालेला मनुष्य जर मरण पावला नाहीं, तर त्यानें त्रिरात्र

उपोषण करावें. जाति, देश आणि कुल यांचे धर्म ज्यांनीं सोडले आहेत, त्यांना प्रायश्चित्तच नाहीं. दहा वेदशास्त्रज्ञ आणि तीन धर्मशास्त्रज्ञ ब्राह्मण धर्माधर्मासंबंधीं संशय उत्पन्न झाला असतां जें सांगतील, तोच धर्म समजावा. बेल, मृत्तिका, क्षुद्र मुंग्या, भोंकरीचें फळ आणि विष हीं ब्राह्मणांनीं भक्षण करूं नयेत. तसेंच त्यांनीं खवले नसलेले मत्स्य, कांसवां-शिवाय इतर चतुष्पाद प्राणी, बेडूक, जलचर प्राणी, कोंबडे, हंस, गरुड, चक्रवाक, बदकें, बगळे, कावळे, पाणकावळे, गृध्र, ससाणे, घुबडें, आणि मांसभक्षक व दंष्ट्रा असलेले सर्व चतुष्पाद प्राणी आणि ज्यांना खालीं वर दांत आहेत व जे दाढांचे आहेत, असे सर्व प्राणी ब्राह्मणांना अभक्ष्य आहेत. ब्राह्मणांनीं मेंढीचें, गर्दभीचें, सांडेचें, प्रसूत झालेल्या धेनूचें, बायकांचें किंवा हरिणीचें दूध प्राशन करूं नये. त्यांनीं प्रेतान्न, सूतकान्न आणि आशौच व वृद्धि असलेल्या मनुष्याच्या हातचा कोणताहि पदार्थ दहा दिवसपर्यंत भक्षण करूं नये, प्रसूत झालेल्या गाईचें दूधहि दहा दिवस पिऊं नये.

राजाचें अन्न तेजहरण करितें व शूद्रान्न ब्रह्मतेज हरण करितें. सोनाराचें व पतिपुत्रविरहित स्त्रीच्या हातचें अन्न आयुष्य कमी करितें. व्याजबट्टा करणाऱ्या सावकाराचें अन्न विष्ठेसमान असून गणिकेच्या हातचें शुक्रासारखें-रेतासारखें-आहे. व्यभिचाराकडे दुर्लक्ष्य करणारे किंवा जे स्त्रीजित आहेत अशांच्या हातचें अन्न देखील शुक्रासमान आहे. यज्ञदीक्षा घेतलेले, कृपण, यज्ञिय द्रव्यें विकणारे, सुतार, चर्मकार, व्यभिचारिणी, रजक, वैद्य, ग्रामरक्षक, लोकनिंदित, नाटकी स्त्रियांचे जीवितावर आपला चरितार्थ चालविणारे, वडील बंधूच्या आधीं विवाह करणारे, स्तुतिपाठक आणि जुगारी लोक यांच्या हातचें अन्न खाऊं नये. डाव्या हातानें आणलेलें, वाळून गेलेलें, शिळें झालेलें, मद्ययुक्त, उच्छिष्ट, खाण्याला अयोग्य, राखून ठेवलेलें अन्न भक्षण करूं नये. पीठ, ऊंस, शाका, दुग्धपदार्थ, भाजलेले व दधियुक्त सक्तु पुष्कळ दिवस राहिल्यानें भक्षण करूं नयेत. पायस, खिचडी, मांस, वडे, हीं देवतोद्देशा-वांचून केलीं असल्यास प्राशन करूं नयेत अथवा भक्षण करूं नयेत. देव, ऋषि, मनुष्य, पितर आणि गृह्यदेवता यांचें पूजन करूनच मग गृहस्थाश्रमी मनुष्यानें भोजन करावें. अशा प्रकारें मनुष्यानें संन्याशी भिक्षूप्रमाणें आपल्या गृहामध्यें रहावें आणि आपल्या प्रिय भार्येसह धर्मांचें आचरण करावें. धार्मिकानें कीर्तीसाठीं किंवा भयासाठीं दान करूं नये. त्यानें उपकारकर्त्याला,

नृत्यगायनासक्ताला, थट्टेखोराला, उन्मत्ताला, वेड्याला, चोराला, निंदकाला, मुक्याला, पंडुरोग्याला, अंगहीनाला, खुजाला, दुर्जनाला, दुष्कुलीनाला, व्रतसंस्कारहीनाला, दान देऊं नये. श्रोत्रियावांचून वेदविद्यारहित ब्राह्मणाला दान देऊं नये. अयोग्य दान आणि अयोग्य प्रतिग्रह हीं दोन्ही देणाऱ्यास व घेणाऱ्यास अनर्थकारक आहेत.

ज्याप्रमाणें खदिराचा व पाषाणाचा आश्रय करून समुद्र तरून जाऊं इच्छिणारा त्यांबरोबरच बुडून जातो, त्याप्रमाणें अयोग्य रीतीनें दान करणारा व अयोग्य दान घेणारा हे दोघेहि पतन पावतात. ओलीं काष्ठें वर टाकिल्यानें जसा अग्नि पेट घेत नाहीं, त्याप्रमाणें तप, अध्ययन आणि सदाचरण यांविरहित मनुष्य दान घेण्याला अपात्र आहे. ज्याप्रमाणें कवटींतील पाणी अथवा श्वानचर्माच्या पिशवींतील दूध हीं आश्रयस्थानदोषानें अपवित्र समजलीं जातात, त्याप्रमाणें आचारहीन मनुष्य वेदाध्ययन करूनहि अपवित्र होय. मंत्ररहित तथापि समाधानवृत्तीनें राहणारा, अशास्त्रज्ञ तथापि इतरांचा मत्सर न करणारा व ब्रह्मचर्यादि व्रत न पालन करणारा अशालाहि निकृष्ट स्थितींत दयायुक्त होऊन दान करावें. तसेंच जे दीन, आर्त आणि व्याधिग्रस्त आहेत, अशा मनुष्यांनाहि दान द्यावें, परंतु तें हितकारक अथवा धर्माला अनुसरूनच होईल, असें समजूं नये. काष्ठाचा गज, चर्माचा हरिण आणि वेदहीन ब्राह्मण हे केवळ नामधारक होत. जसा स्त्रियांमध्यें षंढ, गाईच्या उपभोगाला गाय व पंखांवांचून पक्षी उपयोगास येत नाहीं, तसाच मंत्रहीन ब्राह्मण होय. ज्याप्रमाणें फोल ग्रामधान्य, निर्जल विहीर किंवा अग्निविरहित ठिकाणीं दिलेली आहुति निष्फल आहे, त्याप्रमाणें मूर्खाला दिलेलें दान व्यर्थ होय. देवतांच्या आणि पितरांच्या हव्यकव्यांचा मूर्ख हा विनाशक असल्यामुळें तो निवळ द्रव्याचा अपहार करणारा आहे. त्याला सद्गति प्राप्त होत नाहीं."

युधिष्ठिरा, पूर्वी घडलेला हा सर्व वृत्तांत तुला मीं संक्षेपानें सांगितला आहे. हे भरतर्षभा, हा ऐकण्याला फार मोठा आहे. १२. १. ३६.

---

## अध्याय ३७ वा.

[ १ भीष्माच्या तोंडून राजधर्म ऐकून घेण्याविषयीं व्यासानें सांगितल्यावरून कृष्णादिकांच्या आज्ञेनें धृतराष्ट्रादिकांसहवर्तमान धृतराष्ट्राचें हस्तिनापुराला गमन. ]

( १ ) युधिष्ठिर—हे भगवन् महामुने, राजधर्म आणि चातुर्वर्ण्यांचे सर्व धर्म समजून घेण्याची मला इच्छा आहे. हे द्विजश्रेष्ठा, आपत्कालीं नीति कशी ठेवावी आणि धर्ममार्गाचा अवलंब करून पृथ्वी कशी जिंकावी, हेंहि मला सांग. भक्ष्याभक्ष्यविचारासह तूं प्रसंगानुसार सांगितलेली प्रायश्चित्तकथा माझ्या मनांत आनंद उपजवीत आहे. धर्माचरण आणि राजकारण हीं नित्य परस्परविरुद्ध असल्यामुळें ह्यांचा विचार करीत असतां माझ्या मनाला मोह पडतो.

वैशंपायन—हे महाराजा, हें ऐकून वेदवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असा व्यास नारदाकडे पाहून म्हणाला, ' हे महाबाहो, धर्म जाणण्याची इच्छा असल्यास तूं त्या वृद्ध कुरुकुलपितामह भीष्माकडे जा. तो भागीरथीपुत्र तुझ्या सर्व धर्मविषयक शंकांचें निरसन करील. तो सर्वज्ञ असून सर्वधर्मवेत्ता आहे. ज्याला दिव्य देवी भागीरथीनें जन्म दिला आहे ज्याला इंद्रादिक देवांचें साक्षात् दर्शन घडलें आहे; ज्यानें बृहस्पतिप्रमुख सर्व देवर्षींची नित्य शुश्रूषा करून त्यांना संतुष्ट केलें आणि अशा प्रकारें त्यांजपासून जो राजनीति शिकला, शुक्राचार्य आणि देवगुरु बृहस्पति यांना जें शास्त्र व जो धर्म अवगत होता, त्या सर्वांचें ज्ञान ज्या कुरुकुलसत्तमानें संपादन केलें आहे, भृगुकुलोत्पन्न च्यवन आणि वसिष्ठ ऋषि यांजपासून ज्या व्रतशील महाबाहूनें सर्व वेद व त्यांच्या शाखा यांचें ज्ञान प्राप्त करून घेतलें आहे, ज्यानें पूर्वी ब्रह्मदेवाच्या ज्येष्ठ पुत्राकडे सर्व अध्यात्मशास्त्राचें अध्ययन केलें आहे, तसेंच ज्यानें मार्कंडेयमुखानें सर्व यतिधर्मांचें श्रवण केलें आहे, ज्या पुरुषश्रेष्ठानें परशुराम आणि इंद्र यांपासून सर्व अस्त्रांची प्राप्ति करून घेतली आहे, मनुष्यांमध्यें जन्म घेऊनहि ज्याचें मरण त्याचे इच्छेवरच अवलंबून आहे, ज्याला अपत्य नसूनहि सर्व लोकांमधील विख्यात लोकांची प्राप्ति झाली आहे, पुण्यवंत ब्रह्मर्षि हे ज्याचे सर्वदा सभासद असून अध्यात्मज्ञानांत ज्याला विदित नाहीं, असें कांहीं नाहीं, त्या धर्मज्ञाला सर्व सूक्ष्म धर्मतत्त्वें ठाऊक असल्यामुळें तीं तो तुला कथन करील.

तर तो धर्मवेत्ता प्राणत्याग करण्यापूर्वी तूं त्याजवळ जा. असें व्यासाचें भाषण ऐकून तो दीर्घप्रज्ञ आणि महामति युधिष्ठिर सत्यवतीसुत व्यासाला बोलला.

युधिष्ठिर—अंगावर रोमांच उभे करणारा, ज्ञातिजनांचा वध करून सर्व लोकांचा अपराधी ठरलेला व पृथ्वीचा विनाश करणारा मी असून त्या सरल-योधी भीष्माचा युद्धामध्यें कपटानें घात करवून त्याकडे आतां मीं कोणत्या हेतूनें जावें आणि त्याला प्रश्न तरी कसा करावा ?

वैशंपायन—नंतर चातुर्वर्ण्याचें हित करण्याच्या उद्देशानें महाबाहु यदुश्रेष्ठ श्रीकृष्ण पुनरपि त्या नृपतिश्रेष्ठ युधिष्ठिराला म्हणाला—

वासुदेव—हे नृपोत्तमा, असा सारखा शोक करीत बसणें तुला शोभत नाहीं. भगवान् व्यासांनीं सांगितल्याप्रमाणें तूं आतां कर. हे महाबाहो, ब्राह्मण आणि तुझे बंधु हे उन्हाळ्याचे शेवटीं पर्जन्याची प्रार्थना करणाऱ्या लोकांप्रमाणें तुझी आराधना करीत बसले आहेत. वध होऊन अवशिष्ट राहिलेले सर्व राजे आणि कुरुजांगलांमधील चतुर्वर्णांचे सर्व लोक येथें जमले आहेत, म्हणून त्या महात्म्या ब्राह्मणांच्या कल्याणाकरितां, आमच्यासारख्या सुहृदांचें आणि द्रौपदीचें हित करण्याकरितां आणि विशेषेंकरून अमिततेजस्वी व्यासांची तशी आज्ञा असल्यामुळें हे शत्रुतापना, तूं राज्यस्वीकार कर आणि सर्व जगताचें कल्याण कर.

वैशंपायन—कृष्णाचें अशा प्रकारचें भाषण ऐकून उदारात्मा युधिष्ठिर सर्व लोकांच्या हिताकरितां तयार झाला. हे जनमेजया, याप्रमाणें श्रीकृष्णानें, द्वैपायन व्यासानें, देवस्थानानें, अर्जुनानें आणि दुसऱ्या अनेकांनीं समजूत घातल्यावर आपलें दुःख व संताप यांचा त्याग करून युधिष्ठिर समाधान पावला. नंतर नक्षत्रांनीं वेष्टित चंद्राप्रमाणें सर्वलोकपरिवृत तो युधिष्ठिर धृतराष्ट्राला पुढें करून आपल्या नगराला निघाला. त्यापूर्वी त्यानें हजारों ब्राह्मण व देव यांचें पूजन केलें. मग गालिचे आणि कृष्णाजिनें यांनीं आच्छादित केलेल्या, मंत्रपूत, शुभलक्षणसंपन्न, शुभ्रवर्ण, सोळा बैलांच्या नवीन रथावर तो आरूढ झाला. युधिष्ठिर रथांत बसतांच स्तुतिपाठकांनीं स्तुति करण्यास प्रारंभ केला. भीमानें हातांत रश्मि धारण केले. अर्जुनानें लखलखित शुभ्र छत्र युधिष्ठिराच्या मस्तकावर धरिलें आणि चंद्रकिरणांप्रमाणें शोभणारीं चामरें आणि पंखे नकुल-सहदेवांनीं धारण केले. अशा रीतीनें अलंकारविभूषित

ते पांच बंधु रथांतून निघाले असतां एकत्रित झालेल्या पंचमहाभूतांप्रमाणें ते दिसूं लागले. हे राजा, युधिष्ठिराच्या मागून वेगवान् अश्व जुंपलेल्या शुभ्र रथांत बसून युयुत्सु चालला होता. त्याच्यामागून शैब्य आणि सुग्रीवनामक अश्व जोडलेल्या सुवर्णरथांत बसून श्रीकृष्ण सात्यकीसह चालला होता. हे भारता, धर्मराजाच्या पुढें पालखींत बसून धृतराष्ट्र व गांधारी जात होतीं. द्रौपदी, सर्व कौरवस्त्रिया आणि कुंती ह्या विदुराच्या मागून लहानमोठ्या वाहनांत बसून जात होत्या. त्यांच्या मागून गज आणि अश्व यांनीं अलंकृत असे रथ, पदाति आणि अश्व जात होते. सर्वांच्यापुढें वैतालिक, सूत आणि मागध स्तुति करीत चालले होते. अशा थाटांत राजा युधिष्ठिर हस्तिनापुरांत गेला. महाबाहु धर्मराजानें अशा प्रकारें हस्तिनापुरांत प्रवेश केला असतां पौरजनांची एकच गर्दी होऊन तो देखावा अप्रतिम दिसत होता. लोकांची भयंकर खेंचाखेंच होऊन एकसारखा कलकलाट चालला होता.

धर्मराज नगरांतून जात असतां पौरजनांनीं नगर आणि राजमार्ग शुभ्र माला व पताका यांच्या योगें अलंकृत केले होते. राजमार्गावरून सर्वत्र धूप पसरला होता. राजमंदिर सुगंधी द्रव्यें, नाना प्रकारचीं पुष्पें व माला यांनीं अलंकृत केलें होतें व नगरद्वारावर सर्वत्र जलपूर्ण कुंभ ठेवलेले असून पांढरीं शुभ्र पुष्पें राजमार्गांवर टाकून अपूर्व शोभा आणली होती. याप्रमाणें चारी बाजूंनीं स्तुतिपाठ चालले असतां त्या पांडुनंदन धर्मराजानें आप्तेष्टांसह त्या सुशोभित नगरामध्यें प्रवेश केला. १२. १. ३७.

---

## अध्याय ३८ वा.

[ १ युधिष्ठिराचा राजमंदिरीं प्रवेश. २ सभास्थानीं चार्वाक राक्षसाकडून पांडवांची निंदा. ३ ब्राह्मणांच्या हुंकारानें त्याचा नाश. ]

( १ ) **वैशंपायन**—अशा प्रकारें पांडवांच्या नगरप्रवेशकाळीं त्यांना पाहण्याच्या इच्छेनें हजारों पुरवासी लोक जमले होते. चंद्रोदयाच्या वेळीं ज्याप्रमाणें समुद्राला भरती येते, त्याप्रमाणें तो अलंकृत राजमार्ग सर्वत्र शोभत होता. हे भारता, राजमार्गावरील रत्नखचित मोठमोठीं गृहें स्त्रियांनीं भरून जाऊन तीं त्यांच्या भाराखालीं वांकूनच जात आहेत कीं काय, असें वाटत

होतें. त्या लज्जायुक्त स्त्रियांनीं धर्मराज, भीम, अर्जुन आणि नकुल-सहदेव यांची हळूहळू मंदस्वनांत स्तुति करण्याला प्रारंभ केला. त्या म्हणाल्या, 'हे कल्याणि द्रौपदि, तूं धन्य आहेस. महर्षींची सेवा करणाऱ्या गौतमीप्रमाणें तूं या पुरुषश्रेष्ठांची सेवा करीत आहेस. हे भामिनि, तुझीं कर्मे आणि व्रतें आतां सफल झालीं आहेत.' अशा प्रकारें त्या स्त्रियांनीं द्रौपदीची स्तुति केली. अशा वेळीं त्यांच्या त्या प्रशंसावचनांनीं, परस्परांशीं उच्चारलेल्या शब्दांनीं आणि प्रेमळ वाक्यांनीं सर्व नगर अगदीं गजबजून गेलें होतें.

याप्रमाणें तो अलंकृत राजमार्ग ओलांडून युधिष्ठिर राजवाड्याजवळ आला. तेथें सर्व पुरवासी आणि राष्ट्रवासी प्रजाजन एकत्र जमून कर्णसुखदायक स्तुति करीत युधिष्ठिराला म्हणाले, 'हे शत्रुसंहारका राजेंद्रा, तुझा जय झाला आहे, तूं धर्मानें आणि स्वसामर्थ्यानें पुनः राज्य मिळविलें आहेस, ही मोठ्या भाग्याची गोष्ट होय. हे महाराजा, स्वर्गांचें जसें इंद्र पालन करितो, त्याप्रमाणें तूं शंभर वर्षेपर्यंत आमचें पालन कर.' असे त्या ब्राह्मणांचे आशीर्वाद घेऊन आणि पौरजनांच्या मंगलप्रद वाक्यांनीं सत्कृत होऊन युधिष्ठिरानें श्रद्धा आणि विजय यांचें वसतिस्थानच कीं काय अशा त्या इंद्रभुवनासारख्या राजवाड्यांत प्रवेश केला आणि तो रथांतून खालीं उतरला. नंतर आंत जाऊन त्यानें देवतांचें दर्शन घेतलें आणि गंध, माल्यें आणि रत्नें इत्यादिकांनीं त्यांचें पूजन केलें. तेथून धर्मराज बाहेर पडतो, तों मंगलद्रव्यें हातांत घेऊन उभे राहिलेले ब्राह्मण त्याच्या नजरेस पडले. आशीर्वादोत्सुक ब्राह्मणांनीं वेष्टित तो युधिष्ठिर तारागणांनीं परिवृत विमल चंद्राप्रमाणें शोभत होता. त्यानें त्या ब्राह्मणांचें विधिवत् पूजन केलें. आणि गुरु, धौम्य आणि धृतराष्ट्र यांना बरोबर घेऊन 'तुम्हांला काय पाहिजे तें सांगा,' असें विचारून त्या ब्राह्मणांना पुष्पें, मोदक, रत्नें, पुष्कळ सुवर्ण, गाई व वस्त्रें इत्यादि देऊन त्यानें त्यांचा सत्कार केला.

हे भारता, नंतर पुण्याहवाचनाचा घोष होऊन त्यानें आकाश व्याप्त करून टाकिलें. त्या समयीं ब्राह्मणांच्या मुखांतून निघालेली हंसासारखी मंजुळ मंगल वाणी युधिष्ठिरानें ऐकिली. नंतर दुंदुभींचा निर्घोष व मनोरम शंखध्वनि होऊं लागले आणि त्यांबरोबरच ब्राह्मणांच्या तोंडचे जयशब्दहि कानीं पडूं लागले. कांहीं वेळानें तो विप्रांचा ध्वनि थांबला असतां ब्राह्मणरूपानें तेथें आलेला दुर्योधनमित्र चार्वाक राक्षस धीटपणें बोलूं लागला. त्यानें संन्याशाचा वेष

धारण केला असून गळ्यांत रुद्राक्षमाळा घातल्या होत्या. त्यानें शिखा धारण केली असून त्याच्या हातांत त्रिदंड होता. आशीर्वाद देण्याविषयीं उत्सुक झालेल्या त्या हजारों तपोनिष्ठ ब्राह्मणांमध्यें तो बसला होता. पांडवांचें वाईट व्हावें, ह्या हेतूनें त्या दुष्टानें तेथील ब्राह्मणांचा विचार न घेतां राजाला म्हटलें—

(२) चार्वाक—राजा, हे सर्व ब्राह्मण माझ्या मुखें तुला सांगत आहेत कीं ज्ञातीचा वध करणाऱ्या तुझ्यासारख्याचा धिक्कार असो. असा ज्ञातिसंहार केला असतां आतां तुला राज्य घेऊन काय करावयाचें आहे ? गुरूचा घात करून जगण्यापेक्षां मरण बरें !

असें त्या दुष्ट राक्षसाचें भाषण ऐकून ते ब्राह्मण व्यथित झाले व मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागले. कांहीं वेळपर्यंत ते सर्व ब्राह्मण आणि राजा युधिष्ठिर हे परम उद्विग्न व लज्जित होऊन स्वस्थ बसले. नंतर युधिष्ठिर म्हणाला, ‘ हे विप्रहो, मी नम्रपणें तुमची प्रार्थना करितों कीं माझ्यासारख्या दुःखग्रस्त मनुष्याचा धिक्कार करणें तुम्हांला योग्य नाहीं.’

वैशंपायन—राजा, हें ऐकून ते सर्व ब्राह्मण म्हणाले, ‘ आमचें असें म्हणणें मुळींच नाहीं. राजा, तुला विपुल वैभव प्राप्त होवो.’ नंतर त्या तपःशुद्ध वेदवेत्त्या ब्राह्मणांनीं ज्ञानचक्षूनें त्याला ओळखलें.

ब्राह्मण—हे धर्मनिष्ठा युधिष्ठिरा, हा दुर्योधनाचा मित्र चार्वाक नांवाचा ब्रह्मराक्षस आहे. भिक्षुरूप घेऊन हा त्याचें हित करूं पाहत आहे. हे शब्द आम्हीं उच्चारलेले नाहींत. तुला भीति बाळगण्याचें कारण नाहीं. हे राजा, तुझ्या सर्व बंधूंसह तुझें कल्याण होवो !

( ३ ) नंतर त्या सर्व पवित्र ब्राह्मणांनीं क्रोधाविष्ट होऊन त्या चार्वाकाची निर्भर्त्सना केली आणि आपल्या हुंकारानें त्यांनीं त्या पापी राक्षसाला जाळून टाकिलें ! त्या ब्रह्मवादी ऋषींच्या तेजानें दग्ध झालेला तो ब्रह्मराक्षस चार्वाक विजेनें जळून गेलेल्या वृक्षाप्रमाणें भूमीवर पडला ! मग राजानें पूजन केल्यावर त्या ब्राह्मणांनीं त्याचें अभिनंदन करून ते निघून गेले आणि राजा युधिष्ठिरहि आपल्या सुहृज्जनांसह आनंद पावला. १२.१.३८.

## अध्याय ३९ वा.

[ १ कृष्णाकडून युधिष्ठिराला चार्वाकाचें पूर्ववृत्तांतकथन. ]

( १ ) वैशंपायन—राजा युधिष्ठिर आपल्या बंधूंसहवर्तमान तेथें राहिला असतां सर्वद्रष्टा देवकीपुत्र वासुदेव त्याला म्हणाला.

वासुदेव—युधिष्ठिरा, ह्या लोकांमध्यें ब्राह्मण लोक मला सर्वदा पूजनीय आहेत. हे भूमीवर फिरणारे देव असून लौकर प्रसन्न होणारे, तसेंच वाणीरूप विषानें दग्ध करून टाकणारे आहेत. हे राजा, पूर्वी कृतयुगामध्यें चार्वाक नांवाच्या राक्षसानें बदरी आश्रमामध्यें पुष्कळ वर्षें तप केलें. तेव्हां ब्रह्मदेव त्याला फिरून फिरून वर देऊन संतुष्ट करीत असतां, आपणाला कोणत्याहि प्राण्यापासून अभय असावें, असा वर त्यानें मागितला. तेव्हां 'ब्राह्मणांचा अपमान केल्यास मात्र तुला भीति आहे, इतर कोणत्याहि प्राण्यापासून तुला भय नाहीं;' असा त्या जगत्पति ब्रह्मदेवानें उत्कृष्ट वर त्याला दिला. याप्रमाणें वरप्राप्ति होतांच तो अमितविक्रमी, पापी व अतिबलवान् राक्षस देवांना ताप देऊं लागला. तेव्हां सर्व देव मिळून ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्यांनीं त्या राक्षसाचा वध करण्याची त्याला विनंति केली. तेव्हां ब्रह्मदेव देवांना म्हणाला, 'याचा लवकरच संहार होईल, अशी व्यवस्था मीं आधींच करून ठेविली आहे. मनुष्यांमध्यें राजा दुर्योधन याचा मित्र होईल. त्याच्याशीं याचा स्नेह जडून हा ब्राह्मणांचा अपमान करील. त्यामुळें क्रुद्ध होऊन ते वाग्बलसंपन्न ब्राह्मण त्या दुष्टाला जाळून टाकतील आणि अशा रीतीनें याचा नाश होईल!'

हे भरतर्षभा, तो हा चार्वाक राक्षस ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें हत होऊन येथें पडला आहे. हे नृपतिश्रेष्ठा, तूं शोक करूं नकोस! हे पार्थिवा, तुझे ज्ञातिबांधव क्षात्रधर्मानें वध पावले आहेत. ते महात्मे क्षत्रियश्रेष्ठ वीर स्वर्गाला गेले आहेत. तरी तूं आतां आपलीं कार्यें कर, कष्टी होऊं नकोस, शत्रूंचा वध कर, प्रजेचें पालन कर आणि ब्राह्मणांचा मान कर! १२. १. ३९.

---

## अध्याय ४० वा.

[ १ कृष्णादिकांकडून युधिष्ठिराला राज्याभिषेक. ]

वैशंपायन—नंतर युधिष्ठिर राजा मनांतील शोक आणि संताप टाकून देऊन मोठ्या आनंदानें सुवर्णासनावर पूर्वाभिमुख बसला. त्याच्यासमोर सात्यकि आणि श्रीकृष्ण देदीप्यमान सुवर्णासनावर बसले. राजाच्या दोहों बाजूंला भीमार्जुन मृदु अशा रत्नजडित आसनांवर बसले. सुवर्णविभूषित हस्तिदंती शुभ्र सिंहासनावर कुंती नकुल-सहदेवांसह बसली. सुधर्मा, विदुर, धौम्य आणि धृतराष्ट्र हे अग्नीसमान देदीप्यमान अशा निरनिराळ्या आसनांवर बसले. युयुत्सु, संजय आणि यशस्विनी गांधारी युधिष्ठिराच्या अगदीं जवळ बसलीं होतीं. धर्मात्मा युधिष्ठिर तेथें बसून पांढरीं पुष्पें, सर्वतोभद्र वगैरे देवतापीठें, अक्षता, भूमि, सुवर्ण, रुपें आणि रत्नें यांना त्यानें हस्तस्पर्श केला. नंतर सर्व प्रजाजन धौम्य पुरोहिताला पुढें करून भूमि ( माती ), सोनें, नानाविध रत्नें, सर्वसाहित्ययुक्त अभिषेकपात्र, सुवर्णाचे, तांब्याचे, रुप्याचे आणि मातीचे जलपूर्ण कुंभ, फुलें, लाह्या, दर्भ, गाईचें दूध, शमीच्या, पिंपळाच्या व पळसाच्या समिधा, मध, तूप, उंबराची स्रुवा, सुवर्णविभूषित शंख, इत्यादि वस्तूंसह युधिष्ठिराजवळ आले. पुढें श्रीकृष्णाच्या अनुज्ञेनें धौम्य पुरोहितानें ईशान्य बाजूला विधिवत् वेदिका तयार करून तीवर मजबूत पादपीठ असलेल्या, शुभ्र वर्णाच्या, व्याघ्रचर्मानें आच्छादिलेल्या, अग्नीसमान कांतीच्या अशा सर्वतोभद्र आसनावर धर्मराज व द्रौपदी यांना बसविलें आणि ब्राह्मणांनीं मंत्रांनीं विधिपूर्वक अग्नींत हवन केलें. नंतर श्रीकृष्णानें उठून आपला पूज्य शंख हातांत घेतला आणि त्या पृथ्वीपति युधिष्ठिराला अभिषेक केला. मग राजर्षि धृतराष्ट्र आणि सर्व अमात्य यांनींहि कृष्णाच्या सांगण्यावरून त्याला अभिषेक केला. याप्रमाणें कृष्णाकडून पांचजन्य शंखानें अभिषिक्त होऊन तो बंधूंसह फारच शोभूं लागला. पणव, आनक आणि दुंदुभि वाजूं लागले आणि धर्मराजाला पुष्कळांनीं नजराणे केले. धर्मानेंहि धर्मबुद्धीनें त्यांचा स्वीकार करून उलट मोठमोठ्या दक्षिणा देऊन त्यांचें पूजन केलें. नंतर वेदाध्ययनरत आणि धृति-शीलसंपन्न ब्राह्मणांना हजारों निष्क देऊन त्यानें त्यांजकडून स्वस्तिवाचन करविलें. त्यामुळें संतुष्ट होऊन त्यांनीं धर्मराजाचा जयजयकार केला, त्याला शुभाशीर्वाद दिले आणि हंसाप्रमाणें मंजुल शब्दांनीं त्याची प्रशंसा केली.

ते म्हणाले, ' महाबाहो युधिष्ठिरा, तुझा जय झाला, ही मोठ्या आनंदाची गोष्ट झाली. हे पांडवा, आपल्या पराक्रमानें तूं स्वधर्माचें रक्षण केलेंस, हें मोठें सुदैव होय. तूं, गांडीवधारी अर्जुन, भीमसेन, नकुल-सहदेव असे सर्व या वीरसंहारक युद्धांतून शत्रूंला जिंकून पार पडलांत, हें तुमचें महद्भाग्य होय. हे भारता, आतां तूं सर्व उत्तरकार्यें करून टाक ! '

याप्रमाणें त्या ब्राह्मणांचें भाषण ऐकून आणि त्यांजकडून बहुमान पावून साधुशील धर्मराज युधिष्ठिरानें सुहृज्जनांसह त्या विशाल राज्याचा स्वीकार केला. १२. १. ४१.

---

## अध्याय ४१ वा.

[ १ युधिष्ठिरानें कार्याची वांटणी करून केलेली मंत्रियोजना. ]

( १ ) वैशंपायन—देशकालानुसार झालेलें तें प्रजेचें भाषण ऐकून युधिष्ठिर म्हणाला, ' ह्या ब्राह्मणश्रेष्ठांनीं येथें जमून आमच्या खऱ्या किंवा खोट्या गुणांची प्रशंसा केली, यामुळें आम्ही पांडव खरोखर धन्य झालों आहों. ह्या प्रशंसेनें तुमच्या अनुग्रहास आम्ही पात्र आहों, असें मला वाटतें. तुम्ही निर्मत्सर होऊन आम्हांला गुणसंपन्न म्हणत आहां, तरी आमचा चुलता धृतराष्ट्र हा आमचें परम दैवत आहे, असें मी समजतों. माझें प्रिय व्हावें, अशी तुमची इच्छा असल्यास तुम्हीं त्याच्या मर्जीप्रमाणें वागावें. एवढा मोठा ज्ञातिवध करून मी जो आज जीवंत राहिलों आहें, तो ह्याच्याचकरितां होय. याची निरलसपणें सर्वदा शुश्रूषा करणें माझें कर्तव्य आहे. जर तुमची आणि माझ्या सुहृदांची मजवर कृपा असेल, तर तुम्ही याच्याशीं पूर्वीप्रमाणें वागावें. माझा, तुमचा आणि सर्व जगताचा हा नाथ आहे. सर्व पृथ्वी आणि पांडव ह्याचे आहेत, हें माझें वचन तुम्हीं लक्ष्यांत ठेवावें.'

याप्रमाणें भाषण करून त्या कुरुनंदनानें सर्व पौरजनांस जाण्यास अनुज्ञा दिली. त्यानें यौवराज्यावर भीमसेनाची योजना केली. मसलत करणें, एखाद्या कार्याचा निर्णय देणें, संधि-विग्रहादि षड्गुणांचा विचार करणें ह्या गोष्टी त्यानें बुद्धिमान् विदुराकडे सोंपविल्या. कोणतें काम झालें आहे, तसेंच कोणतें न झालें हें पाहणें आणि जमा काय आणि खर्च किती यावर देखरेख करणें ह्या गोष्टी

त्यानें संजयाला सांगितल्या. सैन्याचें प्रमाण, त्याचें अन्न आणि वेतन, तसेंच त्याच्या कामाची पाहणी करणें या कार्यांवर त्यानें नकुलाला नेमिलें. परचक्राचा प्रतिकार आणि दुष्टांचा अवमर्द करण्याचें काम त्यानें अर्जुनाला दिलें. द्विजांकडे सोंपविलेलीं देवकार्यें आणि इतर कार्यें यांजवर नित्य नजर ठेवण्यास त्यानें पुरोहित श्रेष्ठ धौम्य मुनीला सांगितलें. समीप राहून सदोदित युधिष्ठिराचें संरक्षण करण्याची कामगिरी त्यानें सहदेवाला दिली. अशारीतीनें ज्या ज्या कामाला जे जे योग्य आढळून आले, त्यांची त्यांची त्या त्या कामावर त्यानें योजना केली. त्यानें महाबुद्धिमान् संजय, विदुर आणि युयुत्सु यांना सांगितलें कीं 'धृतराष्ट्र जें जें सांगेल, तें तें तुम्हीं अवधानपूर्वक ऐकावें आणि पौरजनांचीं सर्व कार्यें त्याच्याच अनुमतीनें योग्य प्रकारानें करावीं!' १२–१–४१.

---

## अध्याय ४२ वा.

[ १ युधिष्ठिराकडून ज्ञातिजनांचें और्ध्वदेहिक व पतिपुत्रविरहित अनाथ स्त्रियांचें प्रतिपालन. ]

( १ ) वैशंपायन—नंतर त्या उदारधी राजा युधिष्ठिरानें आपल्या ज्ञातीपैकीं ज्यांचा युद्धांत वध झाला होता, त्या सर्वांचीं निरनिराळीं श्राद्धें करविलीं. त्यानें आपल्या पुत्रांचें और्ध्वदेहिक सर्व प्रकारचें अन्न, धेनु, विपुल धन, मूल्यवान् रत्नें देऊन केलें. त्यानें द्रौपदीला बरोबर घेऊन द्रोण, महात्मा कर्ण, धृष्टद्युम्न, अभिमन्यु, घटोत्कच राक्षस, विराटप्रभृति उपकारी सुहृज्जन, द्रुपद, द्रौपदीपुत्र यांच्या उत्तरक्रिया केल्या आणि प्रत्येकाच्या उद्देशानें हजारों धन, रत्नें, गाई आणि वस्त्रें देऊन ब्राह्मणांना, संतुष्ट केलें. त्याचप्रमाणें ज्यांना कोणीहि आप्तेष्ट नव्हता, अशा प्रत्येकाकरितां त्यानें वेगवेगळीं श्राद्धें करविलीं आणि त्यांच्या नांवानें सभागृहें, पाणपोई आणि तलाव बांधिले. इतर आप्तेष्टांचेंहि और्ध्वदेहिक करवून तो त्यांच्या ऋणांतून मुक्त झाला व लोकांच्याहि अपवादांतून सुटून तो धर्मानें प्रजापालन करूं लागला. अशारीतीनें तो कृतकृत्य झाला. युधिष्ठिरानें धृतराष्ट्र, गांधारी, विदुर आणि सर्व कौरव, तसेंच आदरणीय सेवक यांचा पूर्वींप्रमाणेंच मान ठेविला. ज्यांचे पति आणि पुत्र यांचा युद्धांत वध झाला होता, त्या स्त्रियांचा बहुमान करून

युधिष्ठिरानें मोठ्या ममतेनें त्यांचें पालन केलें. तो दयाशील राजा दीन, अंध आणि कंगाल यांना गृह, वस्त्रें आणि भोजन देऊन सर्वदा आपली कृपा दाखवीत असे. याप्रमाणें सर्व पृथ्वी जिंकून व शत्रूंच्या ऋणांतून मुक्त होऊन तो निःसपत्न राजा युधिष्ठिर सुखानें नांदूं लागला. १२. १. ४२.

---

## अध्याय ४३ वा.

[ १ युधिष्ठिरकृत कृष्णस्तवन. ]

( १ ) वैशंपायन—याप्रमाणें राज्याभिषेक होऊन राज्यप्राप्ति झाली असतां त्या महाप्राज्ञ व पवित्र युधिष्ठिरानें हात जोडले आणि कमलनेत्र श्रीकृष्णाला तो म्हणाला, " हे कृष्णा, तुझ्या प्रसादानें, नीतिमत्तेनें, बलानें, बुद्धीनें आणि पराक्रमानें हें पितृ-पितामहपरंपरेनें प्राप्त होणारें राज्य मला पुनः मिळालें. हे पुंडरीकाक्षा, हे शत्रुनाशका श्रीकृष्णा, तुला पुनः पुनः नमस्कार असो. तुला पवित्र ब्राह्मण अद्वितीय पुरुष आणि यादवांचा अधिपति म्हणतात. ते नानाप्रकारच्या नांवांनीं तुझी स्तुति करितात. हे विश्वकर्मन्, हे विश्वात्मन्, हे विश्वसंभवा, हे विष्णो, हे जिष्णो, हे हरे, हे कृष्णा, हे वैकुंठा, हे पुरुषोत्तमा, तुला नमस्कार असो. तूं पूर्वी सात वेळां अदितीच्या उदरांत गर्भरूपानें राहिला आहेस. आणि अदितीचीं जीं पृश्निप्रभृति रूपांतरें झालीं, त्यांत देखील परशुराम, दाशरथि राम, इत्यादि स्वरूपांनीं तूंच वसत होतास. कृतादि तीन युगांमध्यें तूं अवतार धारण केलेस, त्यामुळें तुला त्रियुग म्हणतात. तुला पुण्यकीर्ति हृषीकेश, यज्ञेश्वर, हंस इत्यादि नांवांनीं ओळखतात. त्रिनेत्र शंभु तो तूं असून प्रभु दामोदरहि तूंच आहेस; वराह, अग्नि, सूर्य, धर्म, विष्णु, परसैन्याला न भिणारा, आणि सर्व शरीरांतर्गत जीवहि तूंच आहेस; तुझा पादन्यास विशाल आहे; तूं वरिष्ठ, उग्र सेनापति, अमर व अन्नप्रद आहेस; तूं देवसेनानी असून अच्युत व शत्रुविध्वंसक आहेस; तूं ब्राह्मणादि रूपें तशींच संकीर्ण वर्णरूपेंहि धारण करणारा आहेस; यतिरूप ग्रहण करणारा तूं आहेस; तसेंच यज्ञादि कृष्णधर्महि तूंच आहेस; इंद्रदर्पहंता हरिहरस्वरूपी, सागररूपी, निर्गुण, कर्मयोग्य दिग्रूपी, सूर्यचंद्राग्निप्रभावान्, स्वर्गावरून अवतीर्ण झालेला तूंच आहेस; तूं सम्राट्स्वरूपी, विराट्स्वरूपी व परब्रह्मस्वरूपी असून देवाधिपतिहि आहेस; तूं संसाराचें उत्पत्तिस्थान असून प्रभुत्वसंपन्न, सत्तारूप, अशरीर, कृष्ण आणि

अग्निरूपी तूंच आहेस; तूं यज्ञाचें उत्तम फल देणारा असून अश्विनीकुमारांचा पिता सूर्य आहेस; तुला कपिल, वामन, यज्ञ, ध्रुव, गरुड आणि यज्ञसेन म्हणतात. तूं शिखंडी, नहुष, महेश्वर असून पुनर्वसु नक्षत्रहि तूंच आहेस; तूं अत्यंत पिंगल वर्णाचा असून तुला सुवर्ण, यज्ञ, सुषेण, दुंदुभि, कालचक्ररूप, लक्ष्मीचें निवासस्थान, जल, पुष्पधारी, ऋभु, विभु, सर्वसूक्ष्म, सच्चरित म्हणत असतात. समुद्र, ब्रह्मदेव, पवित्र तेज आणि तेजोवेत्ताहि तूंच आहेस.

हे केशवा, तुला हिरण्यगर्भ, स्वाहा, स्वाधा असेंहि म्हणतात. हे कृष्णा, ह्या जगताची उत्पत्ति आणि लय करणारा तूंच आहेस. हें सर्व विश्व प्रथमतः तूंच निर्माण करितोस. हे विश्वयोने, हें विश्व सर्वदा तुलाच वश आहे. हे शार्ङ्गचक्रधरा, हे खड्गपाणे, तुला माझा नमस्कार असो."

वैशंपायन—अशाप्रकारें धर्मराजानें कृष्णाची सभेमध्यें स्तुति केली असतां तो कमलनयन श्रीकृष्ण संतुष्ट झाला आणि त्या यादवश्रेष्ठानें गोड शब्दांनीं युधिष्ठिराचें अभिनंदन केलें. १२. १. ४३.

---

## अध्याय ४४ वा.

[ १ युधिष्ठिराज्ञेनें भीमादिकांचा दुर्योधनमंदिरांत निवास. ]

( १ ) वैशंपायन—नंतर राजा युधिष्ठिरानें आपल्या सर्व मंत्रिजनांस निरोप दिला आणि ते सर्व आपापल्या गृहीं गेले. नंतर युधिष्ठिरानें भीमाचें, अर्जुनाचें आणि नकुल-सहदेवांचें सांत्वन करण्याच्या उद्देशानें म्हटलें, 'शत्रूंच्या विविध शस्त्रांनीं या महासंग्रामामध्यें तुमचीं शरीरें विद्ध झाल्यामुळें आणि शोक व संताप यांमुळें तुम्ही तप्त झाल्यामुळें अत्यंत श्रांत झालां आहां. माझ्यासाठीं अरण्यामध्यें तुम्हांला एखाद्या चांडालाप्रमाणें दुःखांत दिवस काढावे लागले. तेव्हां आतां या जयाचा तुम्ही सुखानें उपभोग घ्या. तुम्ही यथेच्छ विश्रांति घेतल्यावर उद्यां आपण पुनः एकत्र मिळूं.'

नंतर धृतराष्ट्राच्या अनुज्ञेनें युधिष्ठिरानें प्रासादांनीं सुशोभित, नाना प्रकारच्या रत्नांनीं परिपूर्ण, दास-दासीजनांनीं भरलेलें असें दुर्योधनाचें मंदिर भीमसेनाला निवासार्थ दिलें. [illegible] दुःशासनाच्या मंदिराच्या

स्वीकार केला. तें दुर्योधनाच्या मंदिराच्या तोडीचें, सुवर्णमय तोरणानें विभूषित, सभोंवतीं रांगेनें प्रासाद असलेलें, दास-दासी आणि धन-धान्यादिकांनीं परिपूर्ण असें होतें. दुःशासनाच्या मंदिराहूनहि उच्च प्रतीचा, कुबेरभवनासमान शोभणारा, रत्न-सुवर्णविभूषित असा दुर्मर्षणाचा वाडा युधिष्ठिरानें महावनांत कष्ट पावलेल्या नकुलाला दिला आणि सर्वदा आपलें प्रिय करण्यांत तत्पर अशा सहदेवाला कनकविभूषित सर्वोत्कृष्ट दुर्मुखाचा वाडा दिला. तो वाडा प्राप्त झाल्यामुळें कैलासप्राप्तीनें संतुष्ट होणाऱ्या कुबेराप्रमाणें सहदेव आनंदित झाला.

हे जयमेजया, नंतर युयुत्सु, विदुर, संजय, सुधर्मा आणि धौम्य हे आपापल्या गृहीं गेले आणि गिरिगुहेंत प्रवेश करणाऱ्या व्याघ्राप्रमाणें श्रीकृष्ण सात्यकीला बरोबर घेऊन अर्जुनाच्या मंदिरांत प्रविष्ट झाला. तेथें त्यांनीं उत्तम प्रकारचीं खाद्य-पेयें सेवन केलीं आणि सुखानें शयन केलें. नंतर जागृत होऊन पुनः ते युधिष्ठिराकडे गेले. १२. १. ४४.

---

## अध्याय ४५ वा.

[ १ जनमेजयाचा प्रश्न. २ राज्यप्राप्ति झाल्यावर युधिष्ठिरानें काय काय केलें तें वैशंपायन सांगतो. ३ युधिष्ठिराचें कृष्णाकडे गमन व कुशलप्रश्नपूर्वक त्यानें केलेली कृष्णस्तुति. ]

( १ ) जनमेजय—हे विप्रा, राज्यप्राप्ति झाल्यावर त्या महाबाहु युधिष्ठिरानें ज्या दुसऱ्या कांहीं गोष्टी केल्या असतील, त्याहि मला सांग. तसेंच हे ऋषे, त्रैलोक्याचा श्रेष्ठ गुरु जो वीर श्रीकृष्ण त्यानेंहि जें कांहीं केलें असेल, तें सर्व मला सांग !

( २ ) वैशंपायन—हे अनघा राजेंद्रा, श्रीकृष्णाला पुढें करून पांडवांनीं जें कांहीं केलें, तें सर्व मी तुला आतां सांगतों, श्रवण कर. हे महाराजा, राज्यपद प्राप्त झाल्यावर धर्मराजानें चारी वर्णांतील लोकांना योग्य रीतीनें त्यांच्या त्यांच्या कार्यांत ठेविलें. त्यानें हजारों महात्म्या स्नातक ब्राह्मणांना प्रत्येकीं हजार निष्क देवविले. तसेंच त्यानें आपल्यावर अवलंबून राहणारे सेवक, आश्रित, अतिथि, दीन आणि तार्किक लोक यांना देखील त्यांच्या इच्छेनुसार द्रव्य

देऊन तृप्त केलें. धौम्य पुरोहिताला त्यानें हजारों धेनु, द्रव्य, सोनें, रुपें आणि नानाविध वस्त्रें दिलीं. कृपाचार्यांचा त्यानें आपल्या गुरूप्रमाणें मान ठेविला. त्या व्रतनिष्ठ राजानें विदुराचा बहुमान केला; तसेंच त्या दानशूरानें खाद्यें, अन्न, पान, विविध वस्त्रें, शयनासनें इत्यादि देऊन सर्व अतिथींचा सत्कार केला. अशा प्रकारें मिळालेल्या संपत्तीचा विनिमय योग्य रीतीनें करून त्या युधिष्ठिरानें युयुत्सु आणि धृतराष्ट्र यांचें मानपूर्वक गौरव केलें आणि धृतराष्ट्र, गांधारी आणि विदुर यांच्या विचारानें युधिष्ठिर राज्यकारभार करीत सुखांत राहिला.

( ३ ) हे भरतर्षभा, याप्रमाणें नगरांत सर्वत्र सुखशांति करून युधिष्ठिर हात जोडून श्रीकृष्णाकडे गेला. नंतर मेरुपर्वतावरील नील अंबुदाप्रमाणें मणि-कांचनांनीं सुशोभित पर्यंकावर बसलेल्या श्रीकृष्णाचें त्यानें दर्शन घेतलें. त्याचें दीप्तिमंत शरीर दिव्य आभरणांनीं विभूषित असून त्यानें पीतवर्ण रेशमी वस्त्र परिधान केलें होतें. त्यामुळें तें सुवर्णवेष्टित इंद्रनील मण्याप्रमाणें शोभत होतें. त्याच्या उरःस्थलावर कौस्तुभमणि विराजत होता, त्यामुळें उदयास येणाऱ्या सूर्यामुळें शोभणाऱ्या उदयाचलाप्रमाणें तो दिसत होता. वस्तुतः तिन्ही लोकांमध्यें त्याला उपमा देण्यासारखें कांहींहि नव्हतें.

त्यावर देहधारी विष्णूकडे जाऊन युधिष्ठिर स्मितपूर्वक त्याला म्हणाला, ‘ हे ज्ञानिश्रेष्ठ श्रीकृष्णा, तुझी रात्र सुखांत गेली ना ? हे अच्युता, तुझीं सर्व इंद्रियें प्रसन्न आहेत ना ? त्याचप्रमाणें तुझी बुद्धि स्थिर आहे ना ? भगवन्, तुझ्या प्रसादानें आम्हांला जय व उत्तम प्रकारचें यश मिळालें असून आम्ही धर्मच्युत झालों नाहीं. ’

अशाप्रकारें शत्रुनाशन धर्मराज बोलत असतां श्रीकृष्ण कांहींएक बोलला नाहीं. तो ध्यानमग्न होऊन बसला होता. १२. १. ४५.



## अध्याय ४६ वा.

[ १ भीष्माकडे जाऊन चार विद्या, चार आश्रम आणि सर्व राजधर्म समजून घेण्याविषयीं युधिष्ठिराला कृष्णाचें प्रोत्साहन. २ युधिष्ठिराच्या प्रार्थनेवरून भीष्माकडे जाण्याचा निश्चय करून आपला रथ जोडण्याविषयीं श्रीकृष्णाची दारुकाला आज्ञा. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे अमितविक्रमा, तूं हें ध्यान करीत बसला आहेस, हें पाहून मला फार आश्चर्य वाटतें. हे लोकपरायणा, ह्या त्रैलोक्याचें कुशल आहे ना? हे पुरुषर्षभा, जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ति यांपलीकडच्या चवथ्या ध्यानमार्गांचा अवलंब करून तूं या देहत्रयांतून निघून जात आहेस, हें पाहून मला मोठा विस्मय वाटत आहे. आपल्या शरीरांतील पांच प्राणवायूंचा निरोध करून सर्व प्रसन्न इंद्रियें तूं मनामध्यें लीन केलीं आहेस. तसेंच वाणी आणि मन यांना तूं बुद्धीमध्यें नेऊन ठेविलें आहेस आणि शब्दादि गुणांनीं युक्त सर्व श्रोत्रादि इंद्रियांचा लय तूं आत्म्याच्या ठिकाणीं केला आहेस. तुझ्या शरीरावरील केंस हालत नाहींत. तुझी बुद्धि आणि मन हीं स्थिर झालीं आहेत. हे माधवा, लांकडाच्या खांबाप्रमाणें, भिंतीप्रमाणें किंवा शिळेप्रमाणें तूं अगदीं निश्चेष्ट दिसत आहेस. हे देवा, ह्याचें कारण ऐकण्यास जर मी पात्र असेन, तसेंच यांत जर कांहीं गूढ रहस्य नसेल, तर हात जोडून मी प्रार्थना करितों कीं, याचें कारण मला सांगून माझा संशय दूर कर. हे पुरुषोत्तमा, कर्ता, विकर्ता तूंच असून विनाशी व अविनाशीहि तूंच आहेस. तुला आदि नाहीं किंवा अंतहि नाहीं. तूं आदिपुरुष आहेस, म्हणून तुला शरण आलेल्या ह्या भक्ताला तुझ्या ध्यानाचें कारण सांग. नंतर मन, बुद्धि आणि इंद्रियें यांना आपापल्या स्थानावर आणून व किंचित् हास्य करून भगवान् वासुदेव बोलला.

**वासुदेव**—बाणशय्येवर पडलेला पुरुषश्रेष्ठ भीष्म शांत होणाऱ्या यज्ञिय अग्नीप्रमाणें माझें चिंतन करीत आहे. त्यामुळें माझें मन त्याजकडे लागलें आहे. वज्राच्या निर्घोषाप्रमाणें ज्याचा प्रत्यंचाध्वनि देवराज इंद्रालाहि सहन होत नाहीं; ज्यानें समस्त राजमंडळाला पराजित करून तीन कन्या हरण केल्या; ज्याच्याशीं तेवीस रात्र युद्ध करूनहि परशुरामाला टिकाव धरतां आला नाहीं, भागीरथीनें ज्याला गर्भविधीनें पोटांत धारण केलें, ज्याचें शिक्षण

वसिष्ठाकडे झालें; ज्या बुद्धिमंताला दिव्य अस्त्रें व साङ्ग वेद यांचें ज्ञान आहे; जो सर्व विद्यांना आदरभूत अशा परशुरामाचा प्रिय शिष्य आहे; ज्याला भूत, भविष्य आणि वर्तमान या तिन्ही कालांचें ज्ञान आहे; जो धर्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आहे; जो सर्व इंद्रियसमूहाला एकत्र करून व बुद्धीनें मनाचें संयमन करून मला शरण आला आहे, त्याजकडे माझें मन लागलें आहे. तो महात्मा भीष्म निधन पावला असतां चंद्र मावळल्यावर रात्रीची जशी अंधकारमय स्थिति होते, तशी पृथ्वीची होणार आहे. म्हणून हे युधिष्ठिरा, तूं त्या भीष्माकडे जा आणि तुझ्या मनांत जें विचारावयाचें असेल, तें त्याला विचार. हे पृथ्वीपते, तूं त्याला चार विद्या, चार यज्ञ, चार आश्रम आणि सर्व राजधर्म ह्यांविषयीं विचार. त्या कौरवधुरंधर भीष्माचा नाश झाला असतां त्याच्याबरोबर सर्व ज्ञानाचाहि लोप होईल. म्हणूनच त्याच्याकडे जाण्याविषयीं मी तुला सांगत आहें.

तें श्रीकृष्णाचें सत्य व उत्तम भाषण ऐकून युधिष्ठिराचा कंठ दाटून आला आणि तो कृष्णाला म्हणाला, ' हे माधवा, भीष्माच्या प्रभावाविषयीं तूं जें बोललास, तें बरोबर आहे, यांत मला कांहीं संशय वाटत नाहीं. भीष्माचें महाभाग्य आणि प्रभाव हीं मीं ब्राह्मणांच्या तोंडून ऐकिलीं आहेत. हे यादवनंदना, तूं लोकांचा निर्माणकर्ता असून तूंहि तेंच सांगत आहेस. हे माधवा, मजवर अनुग्रह करण्याची तुझी इच्छा असल्यास तुलाच पुढें करून आपण भीष्माकडे जाऊं या. सूर्यानें अयन बदललें म्हणजे तो भीष्म परलोकाला जाईल. म्हणून त्याला तुझें दर्शन होणें योग्य आहे. तूं क्षर व अक्षर असा आदिदेव असल्यामुळें तुझें दर्शन हा एक त्याला मोठा लाभच होणारा आहे. कारण तूं ब्रह्ममय निधि आहेस.

( २ ) वैशंपायन—धर्मराजाचें असें भाषण ऐकून कृष्णानें जवळच असलेल्या सात्यकीला आपला रथ तयार करण्याविषयीं सांगितलें. त्यावर दारुकानें रथ तयार असल्याचें कृष्णाला कळविलें. त्या रथाचा प्रत्येक भाग सुवर्णानें विभूषित केलेला असून त्यावर मरकत, चंद्रकांत आणि सूर्यकांत मण्यांचें काम केलेलें होतें. त्याचीं चक्रें सुवर्णाचीं असून प्रभा सूर्यकिरणांप्रमाणें होती. त्याची गति अत्यंत शीघ्र असून त्याच्या मध्यभागीं नानाप्रकारचीं रत्नें जडवून तो सुशोभित केला होता. नवोदित सूर्याप्रमाणें तो झळकत असून त्याच्या ध्वजावर आश्चर्य-

कारक गरुड होता. त्यासभोंवतीं पताका शोभत होत्या. त्याला सुग्रीव-शैब्य-प्रभृति उत्कृष्ट मनोवेगवान् अश्व जोडले होते व त्यांचे अंगांवर सुवर्णाचे अलंकार घातले होते. १२.१.४६.

---

## अध्याय ४७ वा.

[ १ जनमेजयाचा प्रश्न. २ वैशंपायनाकडून जनमेजयाला भीष्मकृत कृष्णस्तवराजाचा अनुवाद. ३ भीष्माच्या शरीरत्यागाचें कथन. ]

( १ ) जनमेजय—शरशय्येवर पडलेल्या त्या पांडवांच्या पितामहानें शरीराचा त्याग कसा केला आणि त्यानें कोणत्या योगाचा अवलंब केला ?

( २ ) वैशंपायन—हे राजा, शुचिर्भूत होऊन एकाग्र चित्तानें त्या महात्म्या भीष्मानें देहत्याग कसा केला, तो वृत्तांत ऐक. सूर्य उत्तरायणाकडे वळतांच भीष्मानें समाधि लावून परमात्म्यामध्यें आपलें अंतःकरण लीन केलें. प्रसार पावणाऱ्या किरणांनीं युक्त सूर्याप्रमाणें शेंकडो बाणांनीं व्याप्त आणि मोठमोठ्या ब्राह्मणांनीं वेष्टित झालेला भीष्म तेजानें अधिकच शोभूं लागला. वेदवेत्ता व्यास, सुरर्षि नारद, देवस्थान, वात्स्य, अश्मक, सुमंत, जैमिनि, महात्मा पैल, शांडिल्य, देवल, बुद्धिमान् मैत्रेय, असित, वसिष्ठ, महात्मा कौशिक, हारित, लोमश, ज्ञानी आत्रेय, बृहस्पति, शुक्र, महामुनि च्यवन, सनत्कुमार, कपिल, वाल्मीकि, तुंबुरु, कुरु, मौद्गल्य, भार्गवराम, महर्षि तृणबिंदु, पिप्पलाद, वायु, संवर्त, पुलह, कच, कश्यप, पुलस्त्य, क्रतु, दक्ष, पराशर, मरुचि, अंगिरा, काश्य, गौतम, गालव मुनि, धौम्य, विभांड, मांडव्य, धौम्र, कृष्णानुभौतिक, उलूक, महामुनि विप्रश्रेष्ठ मार्कंडेय, भास्करि, पूरण, परम धार्मिक सूत, हे तसेंच श्रद्धा, इंद्रियदमन आणि सन्मान यांनीं युक्त अशा दुसऱ्या अनेक महाभाग महात्म्या मुनिगणांनीं भीष्माला वेढून टाकिलें होतें. यावेळीं भीष्म ग्रहांनीं वेष्टित चंद्राप्रमाणें शोभत होता. तो शरासनावर पडलेला पुरुषश्रेष्ठ शुचिव्रत भीष्म कायावाचामनेंकरून हात जोडून श्रीकृष्णाचें एकाग्रतेनें ध्यान करीत होता आणि त्यानें आपल्या आनंदसूचक व गंभीर स्वरानें त्या योगेश्वर, पद्मनाभ, व्यापक, विजयी, जगत्प्रभु मधुसूदनाची स्तुति केली.

भीष्म—श्रीकृष्णाचें आराधन करण्याच्या इच्छेनें ज्या वाणीनें मी बोलणार आहें, त्या संक्षिप्त आणि विस्तृत अशा दोनी प्रकारच्या वाणीनें तो पुरुषोत्तम संतुष्ट होवो. त्या निर्दोष, शुद्धस्वरूप, सर्वांहून श्रेष्ठ, तत्पदानें वाच्य अशा प्रजाधिपति परमात्म्याला मी देहबुद्धि टाकून सर्वभावें शरण जातों. ज्या अनाद्यंत, परब्रह्माचें ज्ञान देव आणि ऋषि यांनाहि नसून ज्याला सर्वांचें पालन करणारा भगवान् जलशायी विष्णु एकटाच जाणतो व त्या नारायणाच्याच कृपेनें सर्व ऋषिगण, सिद्ध, मोठमोठे सर्प, देव आणि देवर्षि तो परमात्मा श्रेष्ठ व अविनाशी आहे असें जाणतात. देव, दानव, गंधर्व, राक्षस आणि सर्प यांनाहि हा भगवान् कोण व कोठें असतो, हें समजत नाहीं. सूत्रामध्यें गोंवलेलीं रत्नें ज्याप्रमाणें त्याच्याच ठिकाणीं राहतात, त्याप्रमाणें सत्त्वादि गुणांपासून उत्पन्न होऊन तीं भूतें त्या परमेशाच्या ठिकाणीं वास्तव्य करितात आणि त्याच्यांतच लीन होतात. बळकट दोऱ्यामध्यें गोंवलेल्या पुष्पमालेप्रमाणें खरें, खोटें, इत्यादि द्वंद्वांनीं गुंफिलेलें हें जगत्, ज्याचें अंग विश्व आहे, अशा त्या विश्वकर्म्याच्या ठिकाणीं नित्य राहतें. अनंत शीर्षें, अनंत चरण, अनंत नयन, अनंत बाहु, अनंत मुकुट यांनीं आणि अनंत वदनांनीं उज्ज्वल दिसणाऱ्या व विश्वाला मुख्य आधारभूत अशा त्या नारायण देवाला सूक्ष्माहून सूक्ष्म, स्थूलाहून स्थूल, मोठ्याहून मोठा आणि श्रेष्ठाहून श्रेष्ठ असें म्हणतात. मंत्र, त्यांचें विवरण करणारीं ब्राह्मणवाक्यें, कर्मकांड आणि ज्ञानकांड, तसेच अबाधित असे श्रेष्ठ सामवेद यांमध्यें सत्यकर्मा म्हणून त्याची स्तुति केली आहे. ब्रह्म, जीव, मन व अहंकार या चार तत्त्वांनीं वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध हीं चार नांवें धारण करून बुद्धीनें प्रकट होणाऱ्या वैष्णव भक्तांचा अधिपति अशा त्या देवाचें परम दिव्य व गुह्य नांवांनीं लोक अर्चन करितात. ज्याच्याकरितां नेहमीं आचरिलेलें तप त्याच्या शरीरामध्यें जाऊन राहतें. जो सर्वांचा आत्मा, जो सर्ववेत्ता, जो सर्वस्वरूपी, जो सर्वगामी आणि जो सर्वांचा उत्पादक आहे. ज्याप्रमाणें अरणी (यज्ञांतील लांकूड) देदीप्यमान अग्नि उत्पन्न करिते, त्याप्रमाणें गोब्राह्मणपालनासाठीं ज्या देवाला देवकी देवीनें वसुदेवापासून आपल्या उदरीं जन्म दिला. अनन्यभक्त निरिच्छ व पापमुक्त होऊन मोक्षासाठीं आपल्या स्वतःचाच यज्ञ करून ज्या गोविंदाला परमात्म्याला आपल्याच ठिकाणीं पाहतो. ज्याचीं कर्में वायु आणि इंद्र यांहूनहि श्रेष्ठ आहेत, ज्याचें तेज सूर्य आणि अग्नि यांहूनहि अधिक असून जो बुद्धि आणि इंद्रियें यांच्या पलीकडचा आहे, अशा त्या प्रजापतीला मी शरण जातों.

पुराणकालीं ज्याला पुरुष म्हणतात, युगारंभकालीं ज्याला ब्रह्म अशी संज्ञा आहे आणि क्षयकालीं ज्याला संकर्षण नांवानें ओळखतात, त्या सेव्य परमात्म्याची मी उपासना करितों. एक असून अनेक रूपांनीं अवतीर्ण झालेल्या आणि सर्व कामना परिपूर्ण करणाऱ्या त्या अधोक्षजाचें अनन्यभावानें कर्मनिष्ठ भक्त यजन करितात. ज्याला जगताचा कोश म्हणत असून त्यामध्येंच सर्व प्रजा राहिल्या आहेत. जलाच्या आधारानें आपल्या क्रिया करणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें हे सर्व लोक ज्याच्या आश्रयानें आपापलीं सर्व कार्यें करीत आहेत. जो सत्यस्वरूपी, एकाक्षर ब्रह्म असून सत् आणि असत् यांच्या पलीकडचा आहे. आदि, मध्य आणि अंत यांविरहित अशा त्या परमात्म्याला देव आणि ऋषि सुद्धां जाणत नाहींत. सुरासुर, गंधर्व, सिद्ध, ऋषि, महासर्प हे दुःखावरील मोठें औषध या भावनेनें त्या अनाद्यनंत, स्वयंभू, सनातन अवितर्क्य आणि अविज्ञेय अशा हरिनारायण प्रभूचें सर्वदा पवित्रतेनें अर्चन करितात. ज्याला विश्वाचा कर्ता, जगांतील सर्व वस्तूंचा स्वामी, जगताचा अध्यक्ष, अविनाशी, परब्रह्म असें म्हणतात.

जो अद्वितीय, दैत्यविनाशक व सुवर्णासमान वर्णाचा परमात्मा अदितीच्या पोटीं गर्भरूपानें द्वादश स्वरूपांनीं अवतीर्ण झाला, त्या सूर्यरूप परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो शुक्लपक्षांत देवांना आणि कृष्णपक्षांत पितरांना आपल्या अमृतानें तृप्त करितो, आणि जो नक्षत्रांचा राजा आहे, अशा त्या चंद्रात्मक परमात्म्याला माझा नमस्कार असो. ज्याचें मुख अग्नि आहे, असे देव सकल जगताचें धारण करितात. प्रथमतः हवि प्राशन करणाऱ्या त्या होमरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. ज्या घोर अज्ञानाच्या पलीकडे असणाऱ्या अतितेजस्वी पुरुषाला—जगद्व्यापक परमात्म्याला—जाणिल्यानें मृत्यु तरून जातां येतो, त्या ज्ञेयस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. ब्राह्मणसमूह ‘ बृहदुक्थ ’ म्हणण्याचे वेळीं आणि मोठ्या यज्ञांत अग्निनिचयप्रसंगीं ज्याला गातात, त्या वेदस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो ऋग्यजुःसामरूप आहे, जो पांच प्रकारच्या होमद्रव्यांच्या ( धणे, दधियुक्त सातु, जल, भाजलेलें पीठ आणि दूध ) स्वरूपानें असतो आणि ज्याचें गायत्र्यादि छंदांनीं स्तवन केलें जातें, त्या यज्ञरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो.

‘ आश्रावय ’ व ‘ अस्तु औषट् ’ या चार चार अक्षरांनीं ‘ यज ’ या दोन अक्षरांनीं, ‘ ये यजामहे ’ या पांच वर्णांनीं आणि पुनः ‘ वषट् ’ या दोन

वर्णांनीं मिळून सतरा अक्षरांनीं ज्याला हवन केलें जातें, त्या होमस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो यजुनामक वेदपुरुष असून गायत्र्यादि छंद हे ज्याचीं अंगें आहेत; ऋक्, यजु आणि साम ही वेदत्रयी ज्याचें मस्तक आणि रथंतर नांवाचें बृहत्साम हें ज्याचें प्रीतिवाक्य आहे, त्या स्तोत्रात्मक परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो ज्ञानवान् विश्वस्रष्ट्या मुनींच्या हजार वर्षें चाललेल्या यज्ञसत्रामध्यें सुवर्णपंख असलेल्या हंसपक्ष्याच्या रूपानें प्रकट झाला, त्या गरुडरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. पदसमूह हेच ज्याचे अवयव, संधि हेच ज्याचे सांधे आणि स्वर-व्यंजनें हींच ज्याचीं भूषणें, ज्याला नित्य अक्षर म्हणतात, त्या वाक्स्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. यज्ञांग असून ज्यानें वराहाचें रूप धारण करून त्रैलोक्याच्या हिताकरितां पृथ्वीचा उद्धार केला, त्या पृथ्वीस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो योगाचा आश्रय करून सहस्र फणांनीं युक्त अशा नागविभूषित पर्यंकावर शयन करितो, त्या योगनिद्रास्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो मोक्षप्राप्तीला कारणभूत अशा धर्मार्थसाधनानें सज्जनांना तरून जाण्याला सेतु तयार करितो, त्या सत्यस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. वेगवेगळ्या धर्मांचें आचरण करणारे व वेगवेगळ्या धर्मफलाची इच्छा करणारे, ज्याची निरनिराळ्या धर्मांनीं पूजा करितात, त्या धर्मस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो.

ज्यापासून सर्वदेही काममय होतात व जो सर्व भूतांना उन्मत्त करून सोडतो, त्या कामस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. स्थूल शरीरांत जीवरूपानें असणाऱ्या ज्या क्षेत्रज्ञाला–परमात्म्याला–मोठमोठे ऋषि शोधीत असतात, त्या क्षेत्रस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. नेहमीं जो आत्मा स्वस्वरूपामध्यें राहत असतांहि जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थांमध्यें पंचमहाभूतें व अकरा भूतें मिळून सोळा गुणांनीं युक्त असून सतरावा आहे असें सांख्य ( ज्ञानी ) लोक समजतात, त्या सांख्यस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. निद्रेचा त्याग करणारे, प्राणांचा जय करणारे, शांत, दांत, जितेंद्रिय योगी आत्मस्थितींत राहून एकाग्र मनानें ज्याला तेजःस्वरूपांत पाहतात, त्या योगस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. पाप व पुण्य यांचा नाश होऊन पुनर्जन्माची भीति नाहींशी झाल्यामुळें शांत संन्याशी ज्या ठिकाणीं जातात, त्या मोक्षरूपी परमात्म्याला माझा

नमस्कार असो. जो हजार युगांच्या शेवटीं ज्वालामय अग्नीच्या योगानें सर्व भूतांना क्षोभवितो, त्या घोरस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. सर्व भूतांचें भक्षण करून व अखिल जगत् जलमय करून जो एकटाच बालरूपानें शयन करितो, त्या मायास्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. ज्या कमलनेत्र अजन्माच्या नाभीपासून कमल उत्पन्न होऊन त्याच्या आधारावर हें सकळ विश्व राहिलें आहे, त्या कमलस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. सहस्र शीर्षें असणाऱ्या व अमित शरीरें धारण करणाऱ्या, चतुरःसमुद्रांसारख्या मोठमोठ्या इच्छांना जिंकून राहणाऱ्या त्या योगनिद्रास्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. ज्याच्या केंसांमध्यें मेघ असून सर्व अंगसंधींमध्यें नद्या आणि उदरामध्यें चार समुद्र आहेत, त्या तोयस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. ज्याच्यापासून उत्पत्ति, लय, इत्यादि सर्व क्रिया घडून येतात, तशाच ज्याच्या ठिकाणीं त्या लय पावतात, त्या हेतुस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो रात्रीच्या वेळीं जागा राहून दिवसाहि कार्योद्युक्त झालेला असतो व इष्टानिष्टांना जो साक्षीभूत असतो, त्या इष्टस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो.

कोणत्याहि कार्यांत कुंठित न होणाऱ्या व धर्मकार्यांत सर्वदा उद्युक्त असणाऱ्या त्या कार्यात्मक वैकुंठस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. धर्माचें अतिक्रमण केल्यानें ज्यांनीं आपलें वैभव गमाविलें, अशा क्षत्रियांना क्रोधाविष्ट होऊन ज्यानें एकवीस वेळां मारिलें, त्या क्रोधस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो आपले ( प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान असे ) पांच विभाग करून सर्व भूतांना आपापलीं कर्में करण्यास लावितो, त्या वायुस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. युगायुगाच्या ठायीं जो मास, ऋतु, अयन आणि वर्ष यांच्या स्वरूपानें पुनः पुनः प्रकट होऊन सृष्टि आणि प्रलय करितो, त्या कालस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. ब्राह्मण हे ज्याचें मुख, क्षत्रिय हे ज्याचे बाहू, वैश्य हे मांड्या व उदर, आणि शूद्र हे ज्याच्या पायांच्या ठिकाणीं आहेत, त्या वर्णस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. अग्नि हें ज्याचें मुख, स्वर्ग हें ज्याचें मस्तक, आकाश ही ज्याची नाभि, पृथ्वी हे ज्याचे पाय, सूर्य हा ज्याचा डोळा आणि दिशा हे ज्याचे कर्ण त्या लोकस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो काळाच्या तसाच यज्ञाच्याहि पलीकडचा असून श्रेष्ठाहूनहि श्रेष्ठ आहे, ज्याला आदि नसून जो विश्वाचा आदि आहे, त्या

विश्वात्मक परमात्म्याला माझा नमस्कार असो. विषयांमध्यें आसक्त होऊन जे लोक आपल्या रागद्वेषादि गुणांच्या योगानें ज्याला विषयसंरक्षक म्हणतात, त्या गोप्तृस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. अन्नपानरूपी सर्पणानें युक्त होऊन व रस व बळ यांची वृद्धि करून तो सर्व प्राण्यांना जीवंत ठेवितो, त्या प्राणस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो प्राण्यांच्या रक्षणासाठीं चतुर्विध अन्नें ( भक्ष्य, भोज्य, लेह्य व पेय ) व शरीरांत राहून अग्निस्वरूपानें त्यांचें पचन करितो, त्या पाकस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. ज्याचे पिंगट डोळे व जटा हें रूप, दाढा व नखें हीं ज्याचीं आयुधें असें असूनहि दानवेंद्र हिरण्यकशिपूचा नाश ज्यानें केला, त्या दृप्तस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. ज्याला वस्तुतः देव, गंधर्व, दैत्य आणि दानवहि जाणूं शकत नाहींत, त्या सूक्ष्मरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो श्रीमान् शेषरूपी भगवान् प्रभु पृथ्वीच्या तळाशीं राहून सर्व जगत् धारण करितो, त्या वीर्यस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. सृष्टीच्या संरक्षणासाठीं जो स्नेहपाशबंधनांनीं भूतमात्राला मोह पाडितो, त्या मोहस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. आत्मज्ञान पंचभूतांमध्येंच केवळ आहे, असें समजून त्या ज्ञानाच्या योगानें मुमुक्षु ज्याला जाणतात, त्या ज्ञानस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. ज्याचें शरीर दुर्ज्ञेय आहे, ज्याची बुद्धि व चक्षु चोहोंकडे आहेत व जो अप्रमेय आहे, त्या दिव्यस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो.

सर्वदा जटा व दंडधारण करणाऱ्या, तुंदिल शरीर असलेल्या व कमंडलूरूप तूणीर घेऊन फिरणाऱ्या त्या ब्रह्मस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. शूल धारण करणारा, देवांचा अधिपति, त्रिनेत्र, महात्मा, भस्मचर्चित, ऊर्ध्वमुखलिंग असलेला, अशा त्या रुद्रस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. ज्याचे मस्तकीं अर्धचंद्र आहे, ज्यानें सर्परूपी यज्ञोपवीत घातलें आहे, हातांत ज्यानें पिनाक व शूल धारण केलीं आहेत, त्या उग्रस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. जो सर्व भूतांच्या हृदयांमध्यें असून त्यांच्या उत्पत्तीला व नाशालाहि कारण आहे; ज्याला क्रोध, लोभ, मोह हीं नाहींत, त्या शांतस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो. ज्याच्या ठिकाणीं सर्व विश्व आहे, ज्याच्यापासून सर्वांची उत्पत्ति झाली आहे, जो सर्व कांहीं असून सर्वत्र आहे, त्या सर्वस्वरूपी परमात्म्याला माझा नमस्कार असो.

हे विश्वकर्मन्, हे विश्वात्मन्, हे नित्यमुक्त, हे विश्वसंभव, पंचभूतांच्या पलीकडे असणाऱ्या तुला नमस्कार असो. तिन्ही लोकांमध्यें, तसेंच त्यांच्या पलीकडे, तसेंच सर्व दिशांच्या ठायीं तूं आहेस, तूं सर्वमय निधि आहेस, तुला नमस्कार असो. लोकांची उत्पत्ति आणि नाश यांस कारणभूत तुला नमस्कार असो. कारण हे हृषीकेशा, तूंच एक अजिंक्य असा उत्पादक व संहारक आहेस. वर्तमानादि तीनहि कालीं तुझें दिव्यस्वरूप पाहण्याचा मला मुळींच संभव नाहीं. तुझें सनातन स्वरूप मात्र मला दिसत आहे. तूं आपल्या मस्तकानें आकाश, पायांनीं पृथ्वी देवी, पराक्रमानें तीनहि लोक व्यापिले आहेस; असा तूं सनातन पुरुष आहेस. दिशा हे तुझे बाहु, रवि हा चक्षु आणि शुक्र हें तुझें वीर्य आहे. अमिततेजस्वी वायूचे सात मार्ग ( आवहप्रवहप्रभृति ) हेहि तूं निरुद्ध करून टाकिले आहेस. जे जंवसाच्या पुष्पाप्रमाणें कांतिमान् पीतांबरधारी गोविंदाला—कृष्णाला—प्रणाम करितात, त्यांना भय नाहीं. कृष्णाला एकदां प्रणाम केल्याचें श्रेय दहा अश्वमेधांत अवभृथस्नान केल्याइतकें आहे. दशाश्वमेध करणाऱ्याला पुनर्जन्माची प्राप्ति होत असते. कृष्णाला प्रणाम करणाऱ्याला फिरून जन्म होत नाहीं.

ज्याप्रमाणें मंत्रहुत आज्य अग्नींत प्रविष्ट होतें, त्याप्रमाणें जे कृष्णव्रती रात्रौ आणि दिवसा उठल्यावर श्रीकृष्णाचें स्मरण करितात, ते कृष्णस्वरूपी होऊन कृष्णामध्येंच प्रविष्ट होतात. नरकत्रासापासून संरक्षण करण्यासाठीं शरीरासभोंवतीं रक्षामंडळ करणाऱ्या व संसारनदींत तरून जाणाऱ्या नौकेप्रमाणें असणाऱ्या विष्णूला नमस्कार असो. गोब्राह्मणांचें हित करणाऱ्या त्या विष्णुरूपी देवाला नमस्कार असो. जगताचें हित करणाऱ्या त्या कृष्णाला—गोविंदाला-नमस्कार असो. प्राणरूप अरण्याची शिदोरी आणि संसारदुःखाचें प्रशमन करणारें औषध 'हरि' हें अक्षरद्वय असून तें दुःख आणि शोक यांचेपासून रक्षण करणारें आहे. ज्याअर्थीं सत्य हें विष्णुमय आहे, ज्याअर्थीं जगत् हें विष्णुमय आहे आणि ज्याअर्थीं सर्व विष्णुमय आहे, त्याअर्थीं माझ्या पातकाचा नाश होवो. हे कमलनेत्रा, उत्तम गतीची प्राप्ति व्हावी, अशी इच्छा करून तुला शरण आलेल्या भक्ताला काय श्रेयस्कर आहे, याचें चिंतन तूंच कर. याप्रमाणें विद्या आणि तप यांच्या उत्पत्तीचें स्थान अशा या स्वयंभू विष्णूची मीं स्तुति केली आहे. तरी या माझ्या वाग्यज्ञानें अर्चित तो जनार्दन देव मजवर प्रसन्न होवो. नारायण—श्रीकृष्ण—हाच परब्रह्म असून श्रेष्ठ तप हें देखील

नारायणच आहे. नारायण हाच श्रेष्ठ देव असून सर्व कांहीं नारायणात्मकच आहे.

( ३ ) वैशंपायन—इतकें बोलून भीष्मानें आपलें मन एकाग्र केलें आणि 'नमः' असें म्हणून त्यानें त्याकालीं श्रीकृष्णाला प्रणाम केला. भीष्माची भक्ति योगदृष्टीनें कळून येतांच श्रीकृष्णानें त्याला त्रैलोक्यदर्शनाचें दिव्य ज्ञान दिलें आणि तेथून गमन केलें. तो 'नमः' शब्द शांत झाला असतां त्या सर्व ब्रह्मनिष्ठ ऋषींचा कंठ दाटून आला आणि ते वाणीनें महाज्ञानवान् भीष्माची स्तुति करूं लागले. त्या ब्राह्मणश्रेष्ठांनीं पुरुषोत्तम केशवाची स्तुति केली आणि नंतर ते हळूहळू भीष्माची पुनःपुनः प्रशंसा करूं लागले. भीष्माचा भक्तियोग जाणून श्रीकृष्ण आनंदानें एकदम उठला आणि रथांत जाऊन बसला. श्रीकृष्ण आणि सात्यकि हे दोघे एका रथांत बसून गेले आणि दुसऱ्यांतून युधिष्ठिर आणि अर्जुन हे उभयतां गेले. कृप, युयुत्सु आणि सारथि शत्रुतापन संजय तसेच भीमसेन व नकुल-सहदेव हे वेगळ्या रथानें गेले. याप्रमाणें त्या नगराकार रथांवर आरोहण करून ते पुरुषश्रेष्ठ आपल्या रथांच्या प्रचंड नेमिघोषानें पृथ्वीला कांपवीत निघून गेले. नंतर मार्गांमध्यें ब्राह्मणवर्यांनीं त्या पुरुषसत्तम भीष्माच्या स्तवनावर उच्चारलेलीं वाक्यें त्या प्रसन्नमन श्रीकृष्णानें ऐकिलीं आणि त्या केशिदैत्यप्रणाशकानें आनंदित अंतः-करणानें हात जोडून प्रणाम करणाऱ्या त्या जनांचें अभिनंदन केलें. १२.१.४७.

---

## अध्याय ४८ वा.

[ १ कृष्ण-युधिष्ठिरादिकांचें कुरुक्षेत्राला गमन. २ परशुरामचरित्र कथन करण्याविषयीं श्रीकृष्णाला युधिष्ठिराची प्रार्थना. ]

( १ ) वैशंपायन—नंतर श्रीकृष्ण, राजा युधिष्ठिर, इतर चार पांडव आणि कृपाचार्यप्रभृति सर्व पताका आणि ध्वज यांनीं सुशोभित केलेल्या नगराकार रथांमध्यें बसून शीघ्रगामी अश्वांच्या योगानें सत्वर कुरुक्षेत्राला आले. ते कुरुक्षेत्रांत उतरतात, तों तेथें महारथि क्षत्रियांनीं देह ठेवले असून सर्वत्र केश, मज्जा आणि अस्थि यांच्या पर्वतप्राय राशि पडल्या होत्या; जिकडे-तिकडे नरमस्तकांच्या शुभ्र कवट्या शंखांप्रमाणें दिसत होत्या, हजारों चिता,

कवचें आणि शस्त्रें ठिकठिकाणीं अवलोकनांत येत होतीं, उपभोग घेऊन टाकलेलें असें जणुं काय मृत्यूचें मद्यपानगृह, भूतें आणि राक्षससमुदायांनीं सेवन केलेलें, असें तें कुरुक्षेत्र पहात पहात ते महारथी तेथून निघून गेले. तेथून जात असतां यादवांना आनंद देणारा श्रीकृष्ण युधिष्ठिराला जामदग्न्य परशुरामाचा पराक्रम सांगूं लागला.

कृष्ण—पार्था, हे पहा येथून दूर पांच रामह्रद आहेत. ह्यांमध्यें क्षत्रियांच्या रक्तानें परशुरामानें आपल्या पितरांस तर्पण केलें. एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केल्यावर येथें त्यानें त्या कर्माचा शेवट केला.

युधिष्ठिर—पूर्वी एकवीस वेळां परशुरामानें पृथ्वी निःक्षत्रिय केली असें तूं म्हणतोस, परंतु त्यासंबंधीं मला संशय वाटत आहे. हे यदुपुंगवा, त्यानें क्षत्रबीजच नाहींसें केल्यावर पुनः क्षत्रियांची उत्पत्ति कशी झाली ? त्या परशुरामानें सर्व क्षत्रियांचा नाश केला, तर त्यांची वृद्धि पुनः कशी झाली ? त्या परशुरामानें मोठें रथयुद्ध करून कोट्यवधि क्षत्रियांचा वध केला. त्यामुळें ही भूमि क्षत्रियप्रेतांनीं व्याप्त झाली आहे. हे यदुशार्दूला, ह्या कुरुक्षेत्रावर त्या परशुरामानें क्षत्रियांचा उच्छेद करण्याचें कारण तरी काय ? गरुडध्वजा, हा माझा संशय तूं दूर कर. हे इंद्रानुजा, वेद देखील तुजपेक्षां श्रेष्ठ नाहींत.

वैशंपायन—नंतर त्या गदाग्रज श्रीकृष्णानें ही पृथ्वी क्षत्रियांनीं व्याप्त कशी होऊन गेली, या गोष्टीचा सर्व वृत्तांत यथातथ रीतीनें त्या अप्रतिम सामर्थ्यवान् युधिष्ठिराला सांगितला. १२. १. ४८.

---

## अध्याय ४९ वा.

[ १ कृष्णाकडून युधिष्ठिराला परशुरामचरित्रकथन. ]

( १ ) वासुदेव—हे कौंतेया, परशुरामाचा प्रभाव, त्याचा जन्म, त्याचप्रमाणें राजवंशामध्यें उत्पन्न झालेले कोट्यवधि क्षत्रिय त्यानें कसे मारले, हा सर्व वृत्तांत महर्षींच्या तोंडून मीं जसा ऐकिला आहे, तसा तुला सांगतों, ऐक. जह्नूचा पुत्र अज नांवाचा होता. त्याचा पुत्र बलाकाश्व असून त्याला कुशिक म्हणून एक धर्मज्ञ मुलगा होता. त्या इंद्रतुल्य कुशिकानें पृथ्वीवर तिन्ही लोकांचें आधिपत्य चालविणारा असा अजिंक्य पुत्र आपणास प्राप्त व्हावा, या

इच्छेनें उत्तम प्रकारचें तप केलें. त्याचें तें परम तप पाहून व पुत्रोत्पादन करण्याचें त्याचें सामर्थ्य लक्षांत आणून इंद्रानें त्याच्याच पोटीं जन्म घेतला. त्याचें नांव गाधि म्हणून ठेवण्यांत आलें. पुढें त्या गाधीला सत्यवती नांवाची एक मुलगी झाली. तिला गाधीनें भृगुपुत्र ऋचीकाला दिलें. सत्यवतीच्या सच्छीलानें संतुष्ट होऊन ऋचीकानें तिला व गाधीला पुत्र व्हावे, या इच्छेनें दोन चरू तयार केले आणि बायकोला बोलावून म्हटलें, 'हा तूं खा, व ह्या दुसऱ्याचा उपयोग तुझ्या मातेला करूं दे. म्हणजे तिला मोठा दीप्तिमान् असा क्षत्रियश्रेष्ठ पुरुष पुत्र होईल. तो क्षत्रियांना अजिंक्य होऊन त्यांचा संहार करणारा होईल. तुलाहि धृतिमान्, शांतशील आणि तपोनिष्ठ असा द्विजश्रेष्ठ पुत्र होईल!'

असें आपल्या स्त्रीला सांगून तो तपोनिष्ठ भृगुपुत्र ऋचीक अरण्यामध्यें निघून गेला. इतक्यांत तीर्थयात्रेच्या उद्देशानें गाधि राजा स्त्रीसह ऋचीकाच्या आश्रमाला आला. त्यावेळीं कार्यव्यग्र सत्यवती ते दोन चरू घेऊन आईजवळ आली आणि मोठ्या आनंदानें आपल्या पतीचें वाक्य तिनें तिला सांगितलें. नंतर तिच्या मातेनें चुकून आपला चरु सत्यवतीला दिला आणि तिचा आपण भक्षण केला. नंतर क्षत्रियांतकारक व उग्रदर्शन गर्भ सत्यवतीला राहून त्यामुळें तिचें शरीर अधिक सतेज दिसूं लागलें. त्यावेळीं आपल्या देवस्त्रीसमान स्त्रीला व तिच्या गर्भांत असणाऱ्या द्विजाकडे ध्यानयोगानें पाहून ऋचीक तिला म्हणाला, 'चरूंचा विपर्यास करून तुझ्या मातेनें तुला फशीं पाडिलें. आतां तुला क्रूरकर्मा व तापट पुत्र होईल व तुझ्या आईला ब्रह्मस्वरूपी व तपोनिष्ठ पुत्र होईल. तुझ्यासाठीं तयार केलेल्या चरूमध्यें मीं सर्व विश्वरूपी ब्रह्म ठेविलें होतें आणि सर्व क्षत्रियवीर्य तुझ्या आईला अर्पण केलें होतें. आतां तुजकडून असा विपर्यास झाल्यामुळें ती गोष्ट तशी घडणार नाहीं. तुझ्या मातेला ब्राह्मणपुत्र आणि तुला क्षत्रियपुत्र होईल.' सत्यवतीला तिच्या पतीनें असें सांगितलें असतां तिनें पतीला साष्टांग नमस्कार केला आणि कांपत कांपत म्हणाली, 'प्रभो, मला ब्राह्मणापसद पुत्र होईल, असें आपणाला म्हणणें शोभत नाहीं.'

ऋचीक—हे कल्याणि, तुझ्याप्रमाणें माझ्या मनांतहि ही गोष्ट कधीं आली नव्हती. परंतु चरूंचा व्यत्यास झाल्यामुळें तुला उग्रकर्मा पुत्र होणार आहे.

सत्यवती—हे मुने, आपण इच्छा केली असतां लोकहि निर्माण करण्याची आपली शक्ति आहे. मग पुत्राची ती कथा काय? हे प्रभो, मला शमपर आणि सरलमार्गी असा पुत्र आपण द्यावा.

ऋचीक—यापूर्वी मी थट्टेंत सुद्धां कधीं खोटें बोललों नाहीं. मग अग्नि सिद्ध करून मंत्रांनीं चरु सिद्ध करण्यासंबंधांत तें खोटें कसें होणार? हे कल्याणि, ही गोष्ट मला पूर्वींच समजली होती आणि तपोबलानें मीं जाणलीहि होती कीं तुझ्या पित्याचें सर्व कुल ब्राह्मणमय होऊन जाईल.

सत्यवती—हे प्रभो, तर मग तशा प्रकारचा नातू होऊं दे, परंतु मला अगदीं शमपर असाच मुलगा झाला पाहिजे.

ऋचीक—माझ्या मताप्रमाणें पुत्र आणि नातू यांमध्यें कांहीं विशेष नाहीं. म्हणून हे कल्याणि, तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच घडून येईल.

श्रीकृष्ण—नंतर सत्यवतीनें तपोनिष्ठ, शांत आणि व्रतनिष्ठ अशा भृगुकुलोत्पन्न जमदग्नीला जन्म दिला आणि कुशिकनंदन गाधीनें ब्राह्मणतुल्य अशा विश्वामित्राला जन्म दिला. याप्रमाणें ऋचीकाला तपोनिधि जमदग्नीची प्राप्ति झाल्यावर त्या जमदग्नीला सर्व विद्येंत पारंगत, धनुर्वेदांत कुशल, क्षत्रियांचा अंत करणारा, प्रदीप्त अग्निच कीं काय, असा उग्र परशुराम झाला. गंधमादन पर्वतावर शंकराला प्रसन्न करून त्यानें त्यापासून सर्व प्रकारचीं अस्त्रें आणि अतितेजस्वी असा एक परशु मागितला. त्या अकुंठ धारेच्या आणि प्रज्वलित अग्नीप्रमाणें तेजस्वी परशूच्या योगानें सर्व लोकांत त्याच्या तोडीचा असा कोणी पुरुष राहिला नाहीं. ह्याच सुमारास कृतवीर्याचा पुत्र हैहयदेशाचा अधिपति, बलवान् आणि तेजस्वी असा अर्जुन नांवाचा एक क्षत्रिय होता. त्या राजाला दत्तात्रेयाच्या प्रसादानें सहस्र बाहूंची प्राप्ति झाली असून तो महातेजस्वी चक्रवर्ती झाला होता. त्या परमधर्मवेत्त्यानें अश्वमेध यज्ञ करून त्यामध्यें आपल्या बाहूंच्या व अस्त्रांच्या सामर्थ्यानें सर्व सप्तद्वीपें व पर्वत यांसह सर्व पृथ्वी जिंकून ती ब्राह्मणांना दिली. कौंतेया, त्या वेळीं अग्नि तृष्णाकुल होऊन त्यानें त्या राजाकडे भिक्षा मागितली. तेव्हां त्या सहस्रबाहु अर्जुनानें त्याला ग्राम, पुरें, राष्ट्रें आणि वाडे यांची भिक्षा दिली. तेव्हां कार्तवीर्याच्या प्रभावानें पर्वत, वनस्पति इत्यादि सर्व त्या अग्नीनें जाळून भस्म

केलीं. इतकेंच नव्हे, तर वायूमुळें क्षुब्ध होऊन त्या अग्नीनें अर्जुनाच्या साहाय्यानें आंत कोणी नसलेला असा वसिष्ठ ऋषीचा रम्य आश्रमहि दग्ध केला. तो पाहून वसिष्ठ क्रोधाविष्ट झाला आणि त्यानें अर्जुनाला शाप दिला कीं, 'हे अर्जुना, ज्या अर्थीं तूं ह्या माझ्या वनाला देखील जाळून टाकिलें आहेस, त्या अर्थीं रणांत परशुराम तुझे बाहू छेदून टाकील.' हैहयाधिपति अर्जुन तेजस्वी, बलवान्, नित्य शमपर, ब्राह्मणभक्त, शरणागतांचें रक्षण करणारा, दाता आणि शूर असल्यामुळें त्यानें त्या वसिष्ठशापाकडे मुळीं लक्षच दिलें नाहीं.

पुढें त्या अर्जुनाचे बलसंपन्न, सदैव गर्विष्ठ आणि क्रूर पुत्र, या शापामुळेंच पित्याच्या मरणाला निमित्त झाले. त्यांनीं अर्जुनाला नकळत जमदग्नीच्या धेनूचें वांसरूं धरून आणिलें. त्याकरितां परशुराम आणि कार्यवीर्य यांमध्यें मोठें युद्ध होऊन त्यांत कोपाविष्ट परशुरामानें अर्जुनाचे बाहू छेदून टाकिले आणि त्याच्या मुलांच्या अंतःपुरामध्यें फिरत असणाऱ्या त्या गोवत्सास आपल्या आश्रमाकडे घेऊन गेले. पुढें एकदां परशुराम हा समिधा आणि दर्भ आणण्याकरितां आश्रमाबाहेर गेला असतां अर्जुनाचे सर्व अप्रबुद्ध मुलगे एकत्र मिळून त्या महात्म्या जमदग्नीच्या आश्रमांत गेले आणि त्यांनीं बाणाग्रांनीं जमदग्नीचें शीर्ष धडापासून वेगळें केलें. असा पित्याचा झालेला वध सहन न होऊन परशुराम अत्यंत क्रोधसंपन्न झाला आणि त्यानें 'मी पृथ्वी निःक्षत्रिय करीन' अशी प्रतिज्ञा करून हातीं शस्त्र घेतलें व त्या वीर्यवंत भृगुवर्यानें पराक्रम गाजवून कार्तवीर्याचे पुत्र आणि पौत्र या सर्वांचा नाश केला. क्रोधास पेटलेल्या परशुरामानें हजारों हैहयवंशीयांचा वध करून त्यांच्या रक्ताच्या कर्दमानें सर्व पृथ्वी भरून काढिली. याप्रमाणें त्या तेजस्वी परशुरामानें पृथ्वी निःक्षत्रिय केली असतां त्याच्या मनाला फार वाईट वाटलें आणि तो वनाला निघून गेला.

अशीं एक हजार वर्षें लोटलीं असतां जात्याच तापट अशा त्या परशुरामाला पुनः कोप येण्याला कारण झालें. विश्वामित्राचा नातू, रैभ्याचा पुत्र महातपस्वी परावसु जनसमूहासमोर परशुरामाला तिरस्कारपूर्वक बोलला, 'हे रामा, ययाति स्वर्गांतून खालीं पडत असतां चाललेल्या यज्ञांत जमलेले प्रतर्दनप्रभृति सज्जन लोक क्षत्रिय नव्हेत काय? रामा, तुझी प्रतिज्ञा खोटी झाली;

आहे, तूं लोकांपुढें उगीच खोटी फुशारकी मिरवितोस. क्षत्रियवीरांच्या भीतीनें तूं पर्वताचा आश्रय केला आहेस. जी पृथ्वी निःक्षत्रिय केल्याचें तूं सांगत आहेस, ती सर्वत्र क्षत्रियांनीं व्याप्त झालेली दिसत आहे !'

याप्रमाणें परावसूचें भाषण ऐकतांच त्या धर्मपर परशुरामानें पुनः शस्त्र हातीं घेतलें आणि ज्या शेंकडो क्षत्रियांना त्यानें पूर्वीं सोडून दिलें होतें व विस्तार होऊन जे पृथ्वीपति झाले होते, त्यांचा आणि त्यांच्या बालकांचाहि त्यानें तत्काळ वध केला. त्यावेळीं जे गर्भस्थ होते, त्या क्षत्रियांनीं पुनः पृथ्वी भरून गेली, हें पाहून जो जो क्षत्रिय स्त्रीला गर्भ राहील, त्याचा त्याचा वध परशुरामानें केला. तेव्हां कांहीं क्षत्रिय स्त्रियांनीं आपल्या बालकांचें त्याच्यापासून रक्षण केलें. अशा रीतीनें परशुरामानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली आणि अश्वमेध यज्ञाच्या शेवटीं कश्यपाला ती दक्षिणा म्हणून दिली. क्षत्रिय अवशिष्ट रहावेत या उद्देशानें कश्यपमुनि हातांत स्रुवा घेऊन परशुरामाकडे बोट करून म्हणाला, ' हे महामुने, तूं दक्षिण समुद्राच्या तीरावर जा, ह्या माझ्या राज्यांत आतां तूं मुळींच राहतां कामा नये.' इतक्यांत समुद्रानें परशुरामासाठीं शूर्पारक नांवाचा एक देश आपल्या दुसऱ्या तीरावर निर्माण केला आणि परशुरामहि तेथें राहण्यास गेला.

इकडे प्रतिग्रह म्हणून घेतलेली ती भूमि कश्यपानें ब्राह्मणांच्या स्वाधीन केली आणि तोहि वनाला निघून गेला. हे भरतर्षभा, पुढें पृथ्वीला कोणीच त्राता न राहिल्यामुळें वैश्य आणि शूद्र हे बलवत्तर होऊन सर्वत्र स्वैर संचार करून श्रेष्ठ ब्राह्मणांच्या स्त्रियांशींहि संबंध ठेवूं लागले आणि बलवान् दुर्बलांना पीडूं लागले. ब्राह्मणांकडे कोणत्याच प्रकारचें प्रभुत्व राहिलें नाहीं. याप्रमाणें कांहीं काळपर्यंत झालेल्या विपर्यासानें पृथ्वीला त्रास पोंचून आपणाला कोणी धर्मरक्षक राहिला नाहीं, हें लक्षांत आणून ती कंटाळली आणि रसातळाला जाऊं लागली. तें पाहून कश्यपमुनीनें आपल्या ऊरूनें ( मांडीनें ) तिला धरून ठेविलें. यामुळें पृथ्वीला उर्वी असें नांव पडलें. त्यावेळीं कश्यपाला प्रसन्न करून पृथ्वी देवीनें आपलें रक्षण करण्यासाठीं क्षत्रिय राजाची मागणी केली.

पृथ्वी—हे मुने, हैहयकुळामध्यें उत्पन्न झालेले कित्येक क्षत्रियश्रेष्ठ मीं स्त्रियांमध्यें गुप्तपणें संरक्षण करून ठेविले होते, त्यांनीं माझें संरक्षण करावें किंवा ऋक्षवान् पर्वतावर पौरवाचा वंशज व विदूरथाचा पुत्र, आस्वलांनीं

वाढविलेला आहे त्यानें करावें. त्याचप्रमाणें परशुरामानें मोठ्या दयाळूपणानें रक्षण केलेला सौदास्याचा वंशज आहे. तो क्षत्रिय असून शूद्राप्रमाणें सर्व कामें करीत असल्यामुळें त्याला 'सर्वकर्मा' असें नांव पडलें आहे. त्यानें माझें संरक्षण करावें; अथवा हे मुने, वनांत गाईंमध्यें वाढलेला महातेजस्वी गोपति-नामक शिबिपुत्र आहे, त्यानें माझें रक्षण केलें तरी चालेल. तसाच प्रतर्दनाचा पुत्र वत्स नांवाचा गोठणीवर वांसरांमध्यें वाढलेला आहे, त्यानें माझें संरक्षण करावें. दधिवाहनाचा नातू व दिविरथाचा पुत्र याला गौतममुनींनीं गंगेच्या तीरावर गुप्तपणें रक्षण करून ठेवलें आहे. तसाच भाग्यवान् बृहद्रथ ह्याला वानरांनीं गृध्रकूट पर्वतावर संरक्षण करून ठेविलें आहे. शिवाय इंद्रतुल्य वीर्य-शाली मरुत्ताच्या वंशांत झालेल्या क्षत्रियपुत्रांना समुद्रानें राखून ठेविलें आहे. हे क्षत्रियकुमार त्या त्या ठिकाणीं प्रसिद्ध असून ते शिल्पकार, सुवर्णकार इत्यादि जातींच्या आश्रयानें राहिले आहेत. हे जर माझें रक्षण करूं शकतील, तर मी फिरून निश्चल होईन. रामानें ह्यांच्या पितृपितामहांचा मजकरितां वध केला आहे. त्यांची भरपाई करून मला त्यांच्या ऋणांतून मुक्त झालें पाहिजे. भलत्या कोणी दुर्वर्तनी मनुष्यानें माझें रक्षण करावें अशी माझी इच्छा नाहीं. सांप्रत विद्यमान असलेल्या क्षत्रियांनींच माझें रक्षण केल्यास मी राहीन, तर ही गोष्ट सत्वर कर.

श्रीकृष्ण—नंतर पृथ्वीनें सांगितलेल्या त्या सर्व वीर्यसंपन्न क्षत्रियांना आणवून कश्यपानें त्यांना राज्याभिषेक केला. पुढें त्यांना पुत्र आणि पौत्रहि होऊन त्यांचे वंश पृथ्वीवर नांदत आहेत. हे पांडवा, तूं विचारलेली पूर्वीची हकीकत मीं सांगितली तशी आहे.

वैशंपायन—याप्रमाणें त्या धर्मनिष्ठ युधिष्ठिराशीं बोलत बोलत यादव-श्रेष्ठ भगवान् श्रीकृष्ण सूर्याप्रमाणें आपल्या तेजानें सर्व दिशा प्रकाशित करीत रथमार्गें सत्वर निघून गेला. १२.१.४९.

## अध्याय ५० वा.

[ १. कृष्णकृत भीष्मप्रशंसा. २ युधिष्ठिराला धर्मोपदेश करण्याविषयीं भीष्माला कृष्णाकडून प्रेरणा. ]

( १ ) वैशंपायन—परशुरामाचें तें कृत्य श्रवण करून युधिष्ठिराला मोठा विस्मय वाटला आणि तो श्रीकृष्णाला म्हणाला, ‘ क्रोधामुळें पृथ्वी निःक्षत्रिय करून टाकणाऱ्या महात्म्या परशुरामाचा इंद्राप्रमाणें पराक्रम किती म्हणून सांगावा ? त्यानें आपल्या कोपानें निखिल पृथ्वी निःक्षत्रिय करून टाकिली आहे. त्याच्या भीतीनें ह्या क्षत्रियकुलधुरंधरांचें गाई, समुद्र, माकडें, अस्वलें आणि वानर ह्यांनीं रक्षण केलें आहे. खरोखरच हा मृत्युलोक मोठा धन्य होय आणि तेथील लोकहि तसेच भाग्यवंत समजले पाहिजेत. कारण, हे अच्युता, त्या ठिकाणीं असलें न्याय्य कृत्य आणि तेंहि द्विजश्रेष्ठांकडून घडलें आहे. ’

याप्रमाणें बोलत बोलत श्रीकृष्ण आणि युधिष्ठिर जेथें भीष्म शरशय्येवर पडला होता, त्या ठिकाणीं आले. तेथें स्वतःच्याच तेजानें व्याप्त झालेल्या, सायंकालच्या सूर्याप्रमाणें शोभणाऱ्या व बाणशय्येवर पडून राहणाऱ्या भीष्माचें दर्शन त्यांना घडलें. इंद्राची सेवा जशी देव करितात, त्याप्रमाणें त्या ओघवती नदीच्या तीरप्रदेशावर मुनिजन त्याची शुश्रूषा करीत बसले होते. भीष्माला दुरूनच पाहून श्रीकृष्ण, युधिष्ठिर, इतर पांडव आणि सात्यकिप्रभृति मंडळी वाहनांतून उतरली. त्यावेळीं आपल्या चंचल मनाचें संयमन करून व सर्व इंद्रियांची एकाग्रता करून ते सर्व त्या महर्षींजवळ गेले. नंतर श्रीकृष्ण, सात्यकि, धर्मराज वगैरे सर्व पांडवांनीं त्या व्यासादि ऋषींना वंदन केलें आणि भीष्माजवळ येऊन ते त्यासभोंवतीं बसले. त्यावेळीं शांत होणाऱ्या अग्नीप्रमाणें त्या भीष्माला पाहून श्रीकृष्णाच्या मनाला वाईट वाटलें आणि तो म्हणाला—

श्रीकृष्ण—भीष्मा, तुझीं सर्व इंद्रियें पूर्वींप्रमाणें प्रसन्न आहेत ना ? हे वक्तृश्रेष्ठा, तुझी बुद्धि व्याकुल झाली नाहीं ना ? शरप्रहारांच्या योगानें तुझ्या शरीराला पीडा होत नाहीं ना ? खरोखर मानसिक दुःखापेक्षां शारीरिक दुःख बलवत्तर आहे. धर्मनिष्ठ शंतनु पित्याच्या वरदानानें हे प्रभो, तूं इच्छामरणी झाला आहेस. माझ्याहि नशिबीं ही गोष्ट नाहीं. अत्यंत सूक्ष्म कांटाहि शरीराला बोंचला असतां सारखा त्रास देतो, मग तुझ्या देहाला सर्वत्र बाणांनीं

व्याप्त केलें आहे, त्यांचें दुःख किती म्हणून विचारावें ? मीं तुला कांहीं सांगावें अशी आवश्यकता नाहीं. हे भरतकुलोत्पन्ना, प्राण्यांची उत्पत्ति आणि नाश ह्यांविषयीं देवांनाहि उपदेश करण्याचें सामर्थ्य तुझ्या अंगीं आहे. हे पुरुषश्रेष्ठा, तूं ज्ञानवृद्ध असल्यामुळें भूत, भविष्य आणि वर्तमान ह्या तिन्ही कालांचें ज्ञान तुला आहे. हे महाप्राज्ञा, तुला प्राणिमात्राचा लय आणि धर्मांचा फलोदय यांचेंहि ज्ञान आहे. कारण तूं धर्मनिधिच आहेस. तूं ह्या विशाल राज्यावर अधिष्ठित असतां आणि तुझीं इंद्रियें अव्यंग व शरीर पुष्ट असतां हजारों स्त्रियांनीं परिवृत असूनहि तूं ऊर्ध्वरेता राहिला आहेस !

भीष्मा, तपानें मृत्यूस दूर झुगारून बाणशय्येवर पडून राहण्याचें सामर्थ्य सत्यधर्मिष्ठ, महावीर्यसंपन्न, शूर व धर्मैकरत अशा तुझ्याखेरीज दुसऱ्या कोणाच्या अंगीं असल्याचें आम्हीं ऐकिलें नाहीं. तुझ्यासारखा सत्य, नय, दान, यज्ञक्रिया, धनुर्विद्या, वेद, नीति आणि प्रजापालन, यांत सर्वदा तत्पर राहून दयाशील, शुचि, दांत आणि सर्वभूतहितरत कोणीहि महारथ आजवर झाल्याचें आम्हीं ऐकिलें नाहीं. तूं देव, गंधर्व, असुर, यक्ष, राक्षस या सर्वांना एकरथानें जिंकण्याला समर्थ आहेस, यांत संशय नाहीं. महाबाहो भीष्मा, तूं अष्ट वसूंच्या अंशांपासून निर्माण झाला आहेस, म्हणून ब्राह्मण लोक तुला नववा वसु म्हणतात. तरी तूं गुणांनीं त्या सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहेस. हे पुरुषसत्तमा, तूं आपल्या सामर्थ्यानें देवांमध्यें देखील प्रसिद्ध आहेस, हें मला ठाऊक आहे. हे मनुष्यश्रेष्ठा, मनुष्यांमध्यें तुझ्यासारखा मीं कधीं पाहिला नाहीं किंवा ऐकिलाहि नाहीं. पृथ्वीवर तुझ्या तोडीचा मनुष्य क्वचितच मिळेल. तूं आपल्या गुणांनीं देवांहूनहि अधिक आहेस. आपल्या तपःसामर्थ्यानें तूं चराचर विश्व निर्माण करण्याविषयीं समर्थ आहेस, मग स्वतःसाठीं आपल्या उत्तम गुणांनीं तूं उत्कृष्ट लोक मिळविले असल्यास त्यांत आश्चर्य तें काय ?

( २ ) आतां हे भीष्मा, ज्ञातीच्या संहारामुळें संतप्त झालेल्या या युधिष्ठिराचा शोक तूं दूर कर. हे भारता, चार वर्ण, चार आश्रम, चार वेद, यज्ञादि प्रकरणें, तसेंच सांख्य व योगशास्त्र यांमध्यें सांगितलेले सर्व सनातन धर्म तुला ठाऊक आहेत. चातुर्वर्ण्यास विहित धर्म कोणता, अविहित कोणता, त्यांचा स्पष्ट अर्थ आणि प्रतिलोमक्रमानें निर्माण झालेले संकर जातींचे धर्म

या सर्वांचें तुला ज्ञान आहे. देश, जाति आणि काल ह्यांचें धर्मलक्षण तुला अवगत आहे. वेदांनीं सांगितलेला व वशिष्ठांनीं कथन केलेला धर्महि तुला ठाऊक आहे. इतिहासपुराणांचीहि तुला पूर्णपणें माहिती आहे. तसेंच सर्व धर्मशास्त्र तुझ्या अंतःकरणांत उभें आहे. हे पुरुषश्रेष्ठा, ह्या लोकामध्यें ज्या कांहीं संशयात्मक गोष्टी आहेत, त्यांचें निर्मूलन करण्यास तुझ्यावांचून दुसरा कोणी पुरुष समर्थ नाहीं. म्हणून हे नरेंद्रा, या पांडुपुत्राच्या मनांत उत्पन्न झालेला शोक तूं आपल्या बुद्धीनें दूर कर. कारण, तुझ्यासारखे विशाल बुद्धीचे लोक मोहांत पडलेल्या मनुष्यांचें समाधान करण्यासाठींच निर्माण झालेले आहेत. १२.१.५०.

---

## अध्याय ५१ वा.

[ १ भीष्माकडून स्तुतिपूर्वक कृष्णाची श्रेयःप्रार्थना. २ धर्मविषयक गोष्टींनीं युधिष्ठिराचें समाधान करण्याविषयीं कृष्णाकडून भीष्माला प्रेरणा. ]

( १ ) **वैशंपायन**—त्या ज्ञानसंपन्न श्रीकृष्णाचें भाषण ऐकून भीष्मानें आपलें मुख किंचित् वर केलें आणि हात जोडून तो बोलला.

**भीष्म**—हे भगवन् कृष्णा, तुला नमस्कार असो. लोकांची उत्पत्ति आणि लय करणारा तूं आहेस. हे हृषीकेशा, तूं कर्ता तसा संहर्ताहि आहेस. तुझा पराजय होणें कधींहि शक्य नाहीं. हे विश्वकर्मन्, हे विश्वात्मन्, हे विश्वाच्या उत्पत्तिस्थाना, तुला नमस्कार असो. हे मोक्षस्वरूपा, हे पंचभूतांच्या पलीकडे असणाऱ्या, तुला नमस्कार असो. त्रैलोक्यांत वास करणाऱ्या, तुला नमस्कार असो. हे त्रैलोक्याच्या पलीकडे राहणाऱ्या, तुलाहि माझा नमस्कार असो. हे योगेश्वरा, तुला नमस्कार असो. तूं सर्वांचें आधारस्थान आहेस. हे पुरुषसत्तमा, मजसंबंधीं तूं जें बोललास, त्यावरून वर्तमान, भूत आणि भविष्य या तीन कालांतील तुझ्या दिव्य स्वरूपाचें ज्ञान मला झालें आहे. तुझ्या सनातन स्वरूपाविषयींहि ज्ञान मला झालें आहे. अमिततेजस्वी वायूचे सातहि मार्ग तूं निरुद्ध करून टाकिले आहेस. तुझ्या मस्तकानें स्वर्ग व्यापिला असून पायांनीं पृथ्वी व्यापिली आहे. दिशा हे तुझे भुज असून रवि हा तुझा डोळा आहे. तुझ्या वीर्यामध्यें शुक्राची वस्ती आहे. जंवसाच्या पुष्पाप्रमाणें नील असलेलें, पीत वस्त्र धारण

करणारें, कधींहि नाश न पावणारें असें तुझें स्वरूप विद्युद्युक्त मेघाप्रमाणें आहे, असें आम्हांला वाटतें. हे कमलनेत्र सुरोत्तमा, इष्ट गतीची प्राप्ति व्हावी, अशी इच्छा धरून तुला शरण आलेल्या मज भक्ताला कोणती गोष्ट श्रेयस्कर आहे, याचें तूं चिंतन कर.

(२) वासुदेव—हे पुरुषश्रेष्ठा राजा, तुझी माझ्या ठिकाणीं दृढ भक्ति जडल्यामुळें माझें दिव्य स्वरूप मीं तुला दाखविलें आहे. हे राजेंद्रा, जो अभक्त आहे, जो भक्त असूनहि सरळ वागणारा नाहीं, जो दमनशील नाहीं, त्याला मी माझें स्वरूप कधींहि दाखवीत नाहीं. नेहमीं सरळ भावानें वागून तूं माझी भक्ति केली आहेस. पवित्रतेनें मनोनिग्रह, तप, सत्य, दान यांमध्यें सर्वदा रत असल्यामुळें मला पाहण्याला तूं समर्थ झाला आहेस. हे पार्थिवा, तुला आपल्या तपाच्या योगानें जेथून मनुष्य कधीं फिरून संसारांत येऊं शकत नाहीं, असे लोक प्राप्त झाले आहेत. हे भीष्मा, आतां तुझ्या आयुष्याचे छप्पन्न दिवस शिल्लक राहिले आहेत. पुढें तुझ्या शुभकर्मांचें फल मिळवून तूं आपला देह ठेवून जाशील. प्रज्वलित अग्नीप्रमाणें हे देव आणि वसु विमानांत बसून सूर्य उत्तरायणाला जाण्याची वाट पाहत आहेत. कालानुक्रमानें सूर्य उत्तरायणांत गेल्यावर ज्याची प्राप्ति झाली असतां विद्वान् मनुष्याला पुनर्जन्माची प्राप्ति होत नाहीं, अशा लोकाला तूं जाशील. तूं गेल्यावर हें सर्व जगत् ज्ञानाला मुकेल. म्हणून हे सर्व तुझ्याकडून धर्म समजून घेण्याकरितां येथें आले आहेत. ज्ञातिजनांच्या शोकानें मोह पावून ज्याचें ज्ञान नष्ट झालें आहे, अशा ह्या सत्यप्रतिज्ञ धर्मराजाला धर्म, अर्थ आणि समाधि यांसंबंधीं सत्य तत्त्व सांगून त्याचा शोक दूर कर! १२. १. ५१.

---




## अध्याय ५२ वा.

[१ शरवैक्लव्यामुळें धर्मविषयक गोष्टींचें कथन करण्याविषयीं आपण असमर्थ असल्याचें भीष्म सांगतो. २ कृष्णाकडून भीष्माला शरीरदार्ढ्यादिप्रदान. ३ सायंकाळीं युधिष्ठिरादिकांचें आपल्या मंदिरीं गमन.]

(१) वैशंपायन—श्रीकृष्णाचें धर्मयुक्त व हितकर भाषण श्रवण करून शंतनुपुत्र भीष्मानें हात जोडून म्हटलें, "हे लोकनायका, हे महाबाहो, हे

कल्याणरूपा, हे अच्युता ( अविनाशी ) नारायणा, तुझें भाषण ऐकून माझें मन आनंदानें प्रफुल्लित झालें आहे. हे वाक्पते, तुझ्याजवळ मीं काय बोलावें तेंच मला समजत नाहीं. कारण वाणीला विषयभूत म्हणून जें कांहीं आहे, तें सर्व तुझ्याच वाणीमध्यें आहे. ह्या लोकांमध्यें जें कांहीं केलें गेलें आहे किंवा जें कांहीं कर्तव्य म्हणून करावयाचें आहे, तें सर्व हे देवा, तुझ्याचपासून निर्माण होत असतें. जो स्वर्गांत इंद्राच्या पुढें देवलोकींच्या कथा सांगूं शकेल, तोच धर्मार्थकाममोक्षांसंबंधीं तुजसमोर बोलूं शकेल. हे मधुसूदना, शरप्रहारांमुळें माझें मन व्यथित झालें आहे. माझीं सर्व गात्रें गळून गेल्यासारखीं झालीं आहेत. माझी बुद्धि प्रसन्न नाहीं. हे गोविंदा, हे बाण विष किंवा अग्नि यांप्रमाणें मला पीडा देत असल्यामुळें मला बोलण्यालाहि शक्ति नाहीं. माझें बल मला सोडून चाललें आहे; तसेंच माझे प्राणहि सत्वर जाऊं पाहात आहेत. माझ्या मर्मांच्या ठिकाणीं मला पीडा होत आहे. माझें चित्त भ्रमण पावत आहे. दौर्बल्यामुळें माझी वाणी क्षीण झाली आहे. तेव्हां बोलण्याचें सामर्थ्य माझ्यामध्यें कोठून असणार ?

हे दाशार्हकुलवर्धना, मजवर कृपा कर आणि मी कांहीं बोलत नाहीं, याची मला क्षमा कर. हे अच्युता, प्रत्यक्ष बृहस्पति जरी बोलूं लागला, तरी तो तुझ्यापुढें टिकणार नाहीं. दिशा, आकाश आणि पृथ्वी हीं देखील मला ओळखतां येत नाहींत. हे मधुसूदना, मी केवळ तुझ्याच वीर्यानें जीव धरून आहें. धर्माला हितकारक असें जें कांहीं सांगावयाचें असेल, तें आतां तूंच त्याला सत्वर सांग. कारण तूंच सर्व शास्त्रांचें शास्त्र आहेस. सर्व लोकांचा कर्ता तूं कृष्ण जवळ असतां गुरूच्या पुढें शिष्याप्रमाणें माझ्यासारख्यानें कसें बोलण्यास धजावें ?

( २ ) वासुदेव—महावीर्यशाली, अतिबलसंपन्न, स्थिरबुद्धि, सर्वार्थदृष्टि अशा कौरवकुलधुरीणाला साजेल, असेंच हें भाषण आहे. हे गांगेया, बाणप्रहारांनीं तुला होणाऱ्या वेदनांसंबंधीं तूं जें कांहीं मला म्हणालास, त्याकरितां तुला मी वर देतों, तो घे. हे भीष्मा, तुला केव्हांहि ग्लानि वाटणार नाहीं व मूर्च्छाहि कधीं येणार नाहीं. अंगाचा दाह होणार नाहीं व कोणत्याहि प्रकारची वेदना होणार नाहीं. तुला क्षुधा व तृषा यांपासून कधीं पीडा होणार नाहीं. हे अनघा, सर्व प्रकारचें ज्ञान तुझ्या अंतःकरणांत स्फुरण पावेल. तुझी

बुद्धि कोठेंहि कुंठित होणार नाहीं. हे भीष्मा, तुझें मन मेघमुक्त झालेल्या चंद्राप्रमाणें रजतमांपासून वियुक्त होऊन सदैव सत्त्वगुणाचाच आश्रय करून राहील. धर्मविषयक जी जी गोष्ट तुझ्या मनांत येईल, त्याचा अर्थ उत्तम रीतीनें तुझ्या लक्ष्यांत येईल. हे नृपश्रेष्ठा, तुला दिव्यदृष्टि प्राप्त होईल. तिच्या योगानें ह्या चतुर्विध भूतसमुदायाचें ज्ञान तुला बरोबर होईल. भीष्मा, ज्ञानदृष्टि तुला प्राप्त होतांच स्वच्छ पाण्यांत दिसणाऱ्या माशाप्रमाणें सर्व प्रजा संसारांत निमग्न झाल्याचें तुला स्पष्ट दिसून येईल.

( ३ ) वैशंपायन—नंतर व्यासादि सर्व महर्षींनीं ऋक्, यजु आणि साम या तीन वेदांतील मंत्र म्हणून कृष्णाचें पूजन केलें. इतक्यां ज्या ठिकाणीं श्रीकृष्ण, गांगेय आणि पांडव बसले होते, त्या ठिकाणीं आकाशांतून सर्व ऋतूंमध्यें उत्पन्न होणाऱ्या दिव्य पुष्पांची वृष्टि झाली. वाद्यें वाजूं लागलीं आणि अप्सरांचे समुदाय गाऊं लागले. त्याकालीं अहित आणि अनिष्ट असें कांहींहि दिसेनासें झालें. पवित्र, सुखकर आणि गंधवह वायु वाहूं लागला. सर्व दिशा प्रशांत होऊन पशुपक्षी हे शांतपणें शब्द करूं लागले. इतक्यांत सहस्रकिरण सूर्य पश्चिमेला जाऊन तेथें अस्ताचलावरील अरण्य जणुंकाय दग्ध करून टाकीत आहे, असें दिसलें. त्यावेळीं सर्व महर्षींनीं उठून श्रीकृष्ण, भीष्म आणि राजा युधिष्ठिर यांचा निरोप घेतला. नंतर पांडवांसह श्रीकृष्ण, संजय, सात्यकि आणि शारद्वत कृपाचार्य यांनीं त्यांना प्रणाम केला. याप्रमाणें त्यांकडून बहुमान पावून ते ऋषि ‘ उद्यां परत भेटूं ’ असें म्हणून आपापल्या स्थानीं गेले. इकडे भीष्माचा निरोप घेऊन व त्याला प्रदक्षिणा करून श्रीकृष्ण व पांडव आपापल्या रथावर आरूढ झाले. नंतर मदोन्मत्त गज, शीघ्रगामी अश्व व चापधर पदाति यांसह ऋक्षवान् पर्वताजवळ आल्यावर त्याच्या पुढील व मागील प्रदेशांतून वाहणाऱ्या नर्मदा नदीप्रमाणें ती सर्व सेना रथापुढून व मागून चालूं लागली. इतक्यांत सूर्यानें रस ओढून घेतल्यामुळें शुष्क झालेल्या ओषधींना त्यांच्या गुणांची प्राप्ति करून देणारा व त्या सर्व सेनेला आनंदविणारा भगवान् निशाकर चंद्र उदय पावला. अशा रीतीनें ते अमरावतीप्रमाणें शोभादायक हस्तिनापुरामध्यें गेले. तेथें यादवश्रेष्ठ श्रीकृष्ण आणि पांडव श्रांत झालेले सिंह जसे गुहांत प्रविष्ट होतात, त्याप्रमाणें आपापल्या मंदिरांत शिरले. १२. १. ५२.

---

## अध्याय ५३ वा.

[ १ दुसरे दिवशीं प्रभातकालीं कृष्ण-युधिष्ठिरादिकांचें धर्मश्रवणार्थ भीष्माकडे गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—नंतर श्रीकृष्ण आपल्या भवनांत जाऊन शय्येवर निजला आणि रात्र अर्धा प्रहर राहिली असतां जागा झाला. त्यानें ध्यान-मार्गाचा अवलंब करून व सर्व इंद्रियांचा लय लावून सनातन ब्रह्माचें चिंतन केलें. त्यानंतर स्तुतिपाठ आणि पुराणें यांचें पूर्ण ज्ञान असलेल्या सुशिक्षित भाटांनीं आपल्या सुस्वर कंठांनीं त्या प्रजाधिपति कृष्णाची स्तुति करण्यास प्रारंभ केला, गवई गायन करूं लागले, तर कित्येक हातांनीं टाळया वाजवून त्याचें स्तुतिगान करूं लागले. अशाप्रकारें शंख, मृदंग, पणव, वेणू ( मुरली ) यांच्या अत्यंत मनोहर आवाजानें त्या मंदिरांत सर्वत्र आनंद नांदत होता.

इकडे युधिष्ठिराच्याहि मंदिरांत गीतवाद्यादिकांचा मंगल नाद सुरू होता. नंतर श्रीकृष्णानें उठून स्नान केलें आणि हात जोडून गुह्य जप केला. मग तो अग्नीजवळ येऊन उभा राहिला. पुढें चारी वेदांत निष्णात अशा हजारों ब्राह्मणांना प्रत्येकीं एक हजार गाई देऊन त्यांजकडून त्यानें मंत्र म्हणविले. त्यानंतर मंगल वस्तूंना स्पर्श करून त्यानें स्वच्छ आरशामध्यें आपलें स्वरूप पाहिल्यावर तो सात्यकीला म्हणाला, ' हे सात्यके, राजवाड्यांत जाऊन भीष्माकडे जाण्यास राजा युधिष्ठिराची तयारी आहे किंवा नाहीं हें पाहून ये.'

कृष्णाचें भाषण ऐकून सात्यकि युधिष्ठिराकडे त्वरित गेला आणि त्याला म्हणाला, ' हे राजा, श्रीकृष्णाचा रथ सज्ज आहे आणि श्रीकृष्ण भीष्माकडे जावयाला तयार असून तुम्ही वाट पाहत आहे. तर तुझ्या मनांत असेल तसें कर ! ' याप्रमाणें सात्यकीचें भाषण झाल्यावर युधिष्ठिर अर्जुनाला म्हणाला—

**युधिष्ठिर**—हे अर्जुना, माझा रथ जोड. आज सैनिकांनीं भीष्माकडे येऊं नये. आम्हीच केवळ तेथें जाऊं. त्या धर्मनिष्ठ भीष्माला त्रास देणें बरोबर नाहीं. हे धनंजया, पुढें असणाऱ्या लोकांनाहि ' तुम्ही येऊं नका, ' म्हणून सांग. आजपासून भीष्माचें भाषण अत्यंत गुह्य होणार आहे. म्हणून हे अर्जुना, सामान्य लोकांनीं तेथें येऊं नये, अशी माझी इच्छा आहे.

**वैशंपायन**—युधिष्ठिराचें भाषण लक्षांत घेऊन अर्जुनानें रथ तयार असल्याचें त्याला सांगितलें आणि पंचभूतांसारखे ते पांच पांडव कृष्णाच्या मंदि-

राकडे जावयास निघाले. पांडव आपणाकडे येत आहेत, हें पाहून कृष्णहि सात्यकीसह रथारूढ झाला. नंतर परस्परांनीं नमस्कारादि करून आणि 'रात्र सुखाची गेली ना,' इत्यादि कुशलप्रश्न विचारून त्वरित गतीनें मेघाप्रमाणें गंभीर आवाजाच्या रथांतून ते भीष्माकडे गेले. श्रीकृष्णाच्या बलाहक, मेघपुष्प, शैब्य आणि सुग्रीव या चार अश्वांस दारुक हांकीत होता. दारुक हांकीत असलेले ते वेगवान् चार अश्व जणुंकाय आकाशाचा ग्रास करीत आणि खुराग्रांनीं पृथ्वीला उखळीत जाऊं लागले. अशा रीतीनें धर्माचें वसतिस्थान अशा त्या कुरुक्षेत्रामध्यें पोंचल्यावर ज्या ठिकाणीं भीष्म शरशय्येवर पडून राहिला होता, तेथें ते आले. त्या ठिकाणीं देवगणवेष्टित ब्रह्मदेव जसा शोभतो, त्याप्रमाणें ब्रह्मर्षींनीं परिवृत भीष्म बाणशय्येवर पडलेला त्यांनीं पाहिला. त्यानंतर रथांतून उतरून श्रीकृष्ण, युधिष्ठिर, भीम, अर्जुन, नकुल-सहदेव आणि सात्यकि यांनीं आपले उजवे हात वर करून ऋषींचें पूजन केलें. त्यावेळीं नक्षत्रांनीं वेष्टित चंद्राप्रमाणें कृष्णादिकांनीं युक्त युधिष्ठिर इंद्रानें ब्रह्मदेवाजवळ जावें, तसा भीष्माकडे गेला. आकाशांतून जणुंकाय खालीं उतरलेल्या सूर्याप्रमाणें शरशय्येवर पडून राहिलेल्या त्या महाबाहु भीष्माला पाहतांच धर्माचें शरीर भयानें कांपूं लागलें. १२. १. ५३.

---

## अध्याय ५४ वा.

[ १ जनमेजयप्रश्न. २ भीष्माला धर्मविषयक प्रश्न करण्याविषयीं नारदाची सूचना. ३ कृष्णाचें कुशलप्रश्नपूर्वक भीष्माला धर्मकथन करण्याविषयीं प्रोत्साहन. ]

( १ ) **जनमेजय**—हे महामुने, तो धर्मात्मा, वीर्यशाली, सत्यपरायण, जितात्मा, महाभाग शंतनुपुत्र भीष्म शरशय्येवर पडला असतां त्याच्या जवळ पांडवांनीं जाऊन कशा प्रकारच्या गोष्टी केल्या, तें सर्व मला सांग.

( २ ) **वैशंपायन**—हे राजा, कौरवांचा पितामह भीष्म हा शरशय्येवर पडला असतां त्याच्याजवळ नारदप्रभृति ऋषि आणि सिद्ध, तसेच मृत्यूच्या हातून सुटलेले युधिष्ठिरादिक राजे, धृतराष्ट्र, कृष्ण, भीमार्जुन आणि नकुल-सहदेव गेले. त्याकडे गेल्यावर जणुं आकाशांतील सूर्यच कीं काय अशा त्या भीष्माला पाहून ते शोक करूं लागले. तेव्हां दिव्यदृष्टि नारदमुनि क्षणभर विचार करून पांडवांना आणि तेथें जमलेल्या इतर राजांना उद्देशून बोलला,

‘ तुम्ही या भीष्माला कांहीं विचारावें, हें योग्य आहे. हा भीष्म सूर्याप्रमाणें अस्ताला चालला आहे ! ह्याचा निधनकाल समीप ठेपला आहे. ह्याला चातुर्वर्ण्याच्या सर्व धर्मांचें ज्ञान आहे. देहत्याग होतांच या वृद्धाला उत्तम लोकांची प्राप्ति होणार आहे. तरी तुमच्या मनांत जे कांहीं संशय असतील, ते सर्व विचारून घ्या.’

याप्रमाणें नारदानें सांगितलें असतां ते राजे भीष्माकडे गेले; परंतु त्याला प्रश्न करण्याचें धैर्य त्यांपैकीं एकालाहि होईना. ते परस्परांकडे पाहत राहिले. तें पाहून पांडुपुत्र युधिष्ठिर कृष्णाकडे पाहून त्याला बोलला, ‘ हे देवकीपुत्रा कृष्णा, तुझ्यावांचून दुसरा कोणी भीष्माला प्रश्न करण्याविषयीं समर्थ नाहीं. म्हणून हे मधुसूदना, तूंच प्रथमतः त्याला प्रश्न कर. आम्हां सर्वांमध्यें तुलाच उत्तम प्रकारचें धर्मज्ञान आहे.’ असें धर्मानें सांगतांच भगवान् श्रीकृष्ण भीष्माजवळ गेला आणि त्याशीं बोलूं लागला.

श्रीकृष्ण—हे राजसत्तमा, ही तुझी रात्र सुखांत गेली ना ? तुझी बुद्धि स्थिर आहे ना ? हे अनघा, सर्वप्रकारच्या ज्ञानाचें स्फुरण तुझ्या अंतःकरणांत होत आहे ना ? तुझें हृदय ग्लान होत नाहीं ना ? तुझें मन आज व्याकुल होत नाहीं ना ?

भीष्म—हे कृष्णा, माझा दाह, मोह, श्रम, थकवा, ग्लानि आणि वेदना हीं सर्व तुझ्या कृपेमुळें नष्ट झालीं आहेत. आणि हातांतील फळाप्रमाणें मला भूत, भविष्य आणि वर्तमान ह्या तीनहि काळांचें उत्तम ज्ञान होऊं लागलें आहे. हे अच्युता, तुझ्या वरदानामुळें वेद व वेदांत यांत सांगितलेले सर्व धर्म मला अवगत आहेत. शिष्टांनीं सांगितलेला धर्म माझ्या हृदयांत जागृत आहे. हे जनार्दना, देश, जाती आणि कुल यांचे धर्महि मला ठाऊक आहेत. गृहस्थाश्रमादि चारहि आश्रमधर्मांत जें कांहीं सांगितलें आहे, तें सर्व माझ्या हृदयांत आहे. हे केशवा, सकल राजधर्मांचें ज्ञान मला आहे व जेथें जें बोलावयाचें तेंच मी बोलेन. तुझ्या ध्यानाच्या योगानें मी जणुंकाय तरुणच झालों आहें. हे जनार्दना, तुझ्या प्रसादानें सर्व श्रेयस्कर गोष्टींचा उपदेश करण्याविषयीं मी समर्थ झालों आहें. परंतु त्या कल्याणप्रद गोष्टी तूंच युधिष्ठिराला कां सांगत नाहींस ? तुझ्या मनांत काय आहे, तें जर मला शीघ्र सांगशील, तर उत्तम होईल.

( ३ ) वासुदेव—हे कौरवा, सर्व प्रकारच्या यशाचें व कल्याणाचें मी कारण आहें. सर्व सदसदात्मक भावांची उत्पत्ति माझ्याचपासून होत असते. चंद्राचे किरण शीतल जाहेत, म्हणून कोणीं सांगितल्यास त्याचें आश्चर्य कोण बरें करणार? तसेंच सर्व प्रकारच्या यशानें परिपूर्ण अशा मजविषयीं तरी कोण आश्चर्य करणार? कोणी नाहीं. परंतु हे भीष्मा, तुझें थोर यश वृद्धिंगत व्हावें, ह्या हेतूनेंच मीं तुला ही विशाल बुद्धि दिली आहे. हे पृथ्वीपते, जोंपर्यंत ही पृथ्वी स्थिर राहील, तोंपर्यंत तुझी अक्षय कीर्ति लोकांमध्यें राहील. तसेंच हे भीष्मा, तुला प्रश्न करणाऱ्या या युधिष्ठिराला तूं जें कांहीं सांगशील, तें सर्व वेदवाक्याप्रमाणें वसुधातलावर स्थिर होऊन राहील. जो कोणी तुझें हें म्हणणें प्रमाण मानून आपलें मन परमात्म्याच्या ठिकाणीं जडवील, त्याला मरणोत्तर सर्व पुण्यफलाचा अनुभव येईल. हे भीष्मा, तुझें यश वाढावें, याच कारणामुळें मीं तुला ही दिव्यबुद्धि दिली आहे. या लोकीं पुरुषाचें सच्चरित जोंपर्यंत ऐकूं येईल, तोंपर्यंत त्याची कीर्ति त्रैलोक्यांत अक्षय राहील हें निश्चित आहे. हे भारता, युद्धांत मृत्युमुखांतून अवशिष्ट राहिलेले राजे धर्मविषयक प्रश्न तुला विचारण्याच्या इच्छेनें येथें येऊन तुझ्या सभोंवतीं बसले आहेत. यास्तव त्यांना तूं धर्माचें कथन कर.

भीष्मा, तूं वयानें वृद्ध असून वेदवेत्ता व आचारसंपन्न आहेस. तूं सर्वदा राजधर्म आणि इतरहि धर्म यांमध्यें निष्णात आहेस. जन्मापासून तुझ्या हातून कोणत्याहि प्रकारचें पातक घडल्याचें कोणाच्याहि पाहण्यांत नाहीं. यासाठीं पित्यानें पुत्रास उपदेश करावा, त्याप्रमाणें यांना तूं नीतीचा उपदेश कर. तूं सर्व धर्मांत निष्णात आहेस, असें सर्व राजांना विदित आहे, म्हणून धर्मश्रवणाच्या इच्छेनें येथें जमलेल्या सर्व लोकांना तूं धर्म अवश्य सांगितला पाहिजे. विचारलें असतां विद्वानानें दुसऱ्याला सांगावें, हा त्याचा धर्म आहे. न सांगितल्यास तो मोठा दोष आहे. हे भारता, तुझे पुत्रपौत्र मोठ्या जिज्ञासेनें सनातन धर्माविषयीं तुला विचारीत आहेत. तर तें सर्व तूं त्यांना कथन कर. १२.१.५४.

---

## अध्याय ५५ वा.

[ १ युधिष्ठिरानेंच आपणाला प्रश्न करावे, अशी भीष्म इच्छा प्रदर्शित करितो. २ कृष्ण भीष्माला धर्माच्या भीतीचें कारण सांगतो. ३ भीष्माचें युधिष्ठिराला आश्वासन. ]

(१) वैशंपायन—नंतर महातेजस्वी कौरवनंदन भीष्म म्हणाला, "हे श्रीकृष्णा, माझी वाणी आणि मन हीं आतां तुझ्या प्रसादानें स्थिर झाल्यामुळें मी धर्मकथन करीन. हे केशवा, तूं सर्व भूतांचा शाश्वत आत्मा आहेस. धर्मात्म्या युधिष्ठिरानें केवळ मला धर्मप्रश्न विचारावे, म्हणजे मला आनंद होईल. मी त्याला सर्व धर्मांचें कथन करीन. जो महात्मा राजश्रेष्ठ जन्माला येतांच सर्व ऋषींना मोठा आनंद झाला; कीर्तिसंपन्न आणि धर्मनिष्ठ कुरूंमध्यें ज्याच्यासारखा दुसरा कोणी आजवर झाला नाहीं; धृति, दम, ब्रह्मचर्य, क्षमा, धर्म, बल आणि तेज हीं ज्याच्या ठिकाणीं सर्वदा वसत असतात; जो संबंधी, भृत्यजन आणि आश्रित यांचा सर्वदा सत्कार करून त्यांना गौरवितो; ज्याच्या ठिकाणीं सत्य, दान, तप, शौर्य, शांति, दक्षता आणि स्थिरता हीं वास करितात; जो कोणत्याहि इच्छेनें, भीतीमुळें किंवा धनप्राप्त्यर्थ अधर्म करीत नाहीं; जो सर्वदा सत्यनिष्ठ, क्षमावान् आणि ज्ञानयुक्त असून सज्जनांना दान करीत असतो; ज्याला सर्वदा अतिथि प्रिय असतात, अशा त्या यज्ञशील, अध्ययनरत, धर्मनिष्ठ, सहनशील, आणि धर्मरहस्य जाणणाऱ्या धर्मराज युधिष्ठिरानें मला निपुणतेनें प्रश्न विचारावा."

(२) वासुदेव—हा धर्मराज आपल्या हातून अनेक लोकांचा–पूज्य, मान्य, भक्त, गुरु, संबंधी, बांधव इत्यादिकांचा–वध झाल्याकारणानें भयानें व लज्जेनें तुजकडे येत नाहीं.

(३) भीष्म—कृष्णा, ज्याप्रमाणें दान, अध्ययन आणि तप हा ब्राह्मणांचा धर्म आहे, तसाच युद्धामध्यें देहपात करणें हा क्षत्रियांचा धर्म आहे. असन्मार्गानें जाणारे, मग ते पिते, पितामह, भ्राते, गुरु, संबंधी का असेनात, त्यांचा युद्धांत वध करणें हा धर्मच होय. हे केशवा, आचाराचा भंग करणाऱ्या लुब्ध व पापी गुरूंचा देखील समरांत वध करणारा क्षत्रिय हा धर्मवेत्ताच होय. ज्याला लोभामुळें सनातन धर्म समजत नाहीं, त्याचा संग्रामामध्यें वध करणारा क्षत्रिय धर्मवेत्ता होय. जो युद्धामध्यें पृथ्वीला रक्तरूपी जलानें,

केशरूपी तृणांनीं, गजरूपी पर्वतांनीं आणि ध्वजरूपी वृक्षांनीं आच्छादित करितो, तोच क्षत्रिय खरा धर्मवेत्ता होय. कोणीं आव्हान केलें असतां क्षत्रिय बंधूंनीं युद्धाला सज्ज झालें पाहिजे. युद्ध हें धर्म, स्वर्ग आणि लौकिक कीर्ति देणारें आहे, असें मनूचें म्हणणें आहे.

वैशंपायन—असें भीष्मानें सांगितलें असतां धर्मपुत्र युधिष्ठिरानें नम्रपणें भीष्माच्या दृष्टीसमोर जाऊन त्याचे पाय दृढ धरिले. भीष्मानेंहि युधिष्ठिराचें अभिनंदन करून त्याचे मस्तकाचें अवघ्राण केलें आणि त्याला 'बस' म्हणून सांगितलें. नंतर सर्वधनुर्धरश्रेष्ठ भीष्म धर्माला म्हणाला, 'हे कुरुसत्तमा, तूं मला निःशंकपणें प्रश्न कर, भिऊं नकोस.' १२.१.५५.

---

## अध्याय ५६ वा.

[ १ युधिष्ठिरप्रश्न. २ भीष्माकडून युधिष्ठिराला राजधर्मकथन. ]

( १ ) वैशंपायन—श्रीकृष्णाला प्रणाम करून, भीष्म पितामहाला वंदन करून आणि सर्व गुरुजनांचें अनुमोदन घेऊन युधिष्ठिरानें प्रश्न केला.

युधिष्ठिर—हे पार्थिवा, धर्मवेत्ते लोक ज्याला परमधर्म समजतात, तो राजधर्म मला मोठ्या भारासारखा वाटत आहे. तेव्हां त्या राजधर्माची माहिती तूं सांग. राजधर्म हाच सर्व लोकांना मोठा आधार आहे. हे कौरवा, ह्या राजधर्मामध्यें धर्म, अर्थ आणि काम हे तिन्ही पुरुषार्थ येत असून मोक्षधर्माचाहि त्यामध्यें समावेश होत आहे. अश्वाला ज्याप्रमाणें रश्मि, गजाला ज्याप्रमाणें अंकुश, त्याचप्रमाणें राजधर्म हा लोकांना आवरण्याचें साधन आहे. ह्या राजर्षिसेवित धर्माप्रमाणें आपण न चालल्यास लोकसंस्था मोडून सर्वत्र घोंटाळा उडून राहील. ज्याप्रमाणें सूर्य उगवून सर्व अमंगल तमाचा नाश करितो, त्याप्रमाणें राजधर्म हा पृथ्वीवर अशुभ गतीला दूर घालविणारा आहे. यास्तव हे पितामहा, तूं मला प्रथम राजधर्म कथन कर. श्रेष्ठ असें धर्मज्ञान तुझ्याकडूनच आम्हां सर्वांना मिळालें पाहिजे. तुझ्या ज्ञानाची महती श्रीकृष्णाला देखील मान्य आहे.

( २ ) भीष्म—त्या परम श्रेष्ठ धर्माला, जगदुत्पादक श्रीकृष्णाला आणि ब्राह्मणांना नमस्कार करून मी शाश्वत धर्म म्हणजे काय तें सांगतों. हे युधिष्ठिरा,

मी जे राजधर्म तुला सांगत आहें ते, व दुसरें जें कांहीं तुला विचारावयाचें असेल, तें सर्व लक्ष्यपूर्वक श्रवण कर. हे कुरुश्रेष्ठा, प्रजेच्या रंजनाकरितां सर्वांआधीं राजानें देव आणि ब्राह्मण यांच्यांशीं यथाशास्त्र वर्तन ठेवावें. देव आणि ब्राह्मण यांच्या अर्चनानें मनुष्य धर्मांच्या ऋणांतून मुक्त होऊन लोकादरास पात्र होतो. हे युधिष्ठिरा, तूं सर्वदा उद्यमशील रहावें. उद्यमावांचून राजांना दैव कधीं फलदायक होत नसतें. दैव आणि उद्योग ह्यांची सिद्धीला सारखीच जरूरी आहे. तरी उद्योग हाच श्रेष्ठ आहे. आळशी लोक दैवावर हवाला ठेवून मोकळे होऊन जातात. तुझ्या हातून एखादी गोष्ट सिद्धीस न गेल्यास संताप करीत बसूं नकोस. उद्योगच करीत रहावें, ही राजांची परम नीति आहे.

हे राजेंद्रा, सत्यासारखें सिद्धिदायक दुसरें साधन राजांना नाहीं. राजा सत्यरत असला, तरच तो इहलोकीं व परलोकीं सुखांत नांदतो. सत्य हें ऋषींचेंहि श्रेष्ठ प्रकारचें द्रव्य आहे. तसेंच राजांनाहि सत्यावांचून विश्वास उत्पन्न करणारें दुसरें साधन नाहीं. गुणवान्, शीलवान्, दमनशील, दयाळू, धर्मनिष्ठ, जितेंद्रिय, प्रसन्नमुख आणि उदार राजा कधींहि संपत्तीपासून च्युत होत नाहीं. हे कुरुनंदना, सर्व कर्मांमध्यें सरळपणानें वागत जावें. आपलीं छिद्रें झांकून ठेवणें, दुसऱ्याचीं छिद्रें शोधून काढणें आणि मंत्रगुप्ति—आपल्या मसलती दुसऱ्याला समजूं न देणें—ह्या तीन गोष्टींत मात्र नीतिदृष्ट्या सरळपणा राखणें उपयोगी नाहीं. राजा मृदु असला म्हणजे सर्वांकडून त्याचा अपमान होतो. तसाच तो कडक असल्यास लोक त्याला कंटाळतात. म्हणून तूं दोहोंचाहि आश्रय कर. ब्राह्मणांना तूं शिक्षा करूं नकोस. ब्राह्मण हे ह्या लोकांतील परब्रह्मच होत. स्वधर्मासंबंधीं मनूचे दोन श्लोक आहेत, तूं ते आपल्या अंतःकरणांत सदैव ठेवून तसें वागत जा. ‘ पाण्यापासून अग्नि, ब्राह्मणापासून क्षत्रिय आणि पाषाणापासून लोखंड यांची उत्पत्ति आहे. ह्या तिघांचेंहि तेज जरी सर्वगामी आहे, तरी तें त्यांच्या उत्पत्तिस्थानावर चालत नाहीं. यास्तव अग्नीनें जलावर, लोहानें पाषाणावर प्रहार केला, तसेंच क्षत्रियानें ब्राह्मणाचा द्वेष केला तर, त्यांत त्या अग्निप्रभृति तिघांचाच नाश व्हावयाचा. म्हणून ब्राह्मणांना सर्वदा मान द्यावा. त्या ब्राह्मणश्रेष्ठांचा मान ठेविला असतां ते वेदरूपी आणि यज्ञरूपी ब्रह्माचें संरक्षण करितात.’

हे नरव्याघ्रा, जे लोक जयविघातक असतील, त्यांचे हात बांधून त्यांचा निग्रह करणें आवश्यक आहे. पूर्वीं उशना महर्षीनें दोन श्लोक सांगितले



—नंतर सर्वधनुर्धरश्रेष्ठ भीष्म धर्माला म्हणाला, 'हे कुरुसत्तमा, आतां तूं मला निःशंकपणें प्रश्न कर, भिऊं नकोस !' [ पृष्ठ ५५

आहेत. ते तूं लक्ष्यपूर्वक ऐक. ‘समरांत शस्त्र उगारून आपल्यावर धांवून येणारा, मग तो वेदपारंगत असला तरी धर्मसंरक्षक राजानें आपल्या स्वधर्माला जागून त्याचें अवश्य निवारण करावें. धर्माचा लोप होत असतां जो त्याचें रक्षण करतो, तोच खरा धर्मवेत्ता होय. तो कधींहि धर्मविनाशक होत नाहीं. कारण क्रोधानेंच क्रोधाचा उपशम होत असतो.’ हे नरश्रेष्ठा, असें जरी आहे, तरी ब्राह्मणांचें संरक्षण केलें पाहिजे. ते अपराधी असल्याचें आढळून आल्यास त्यांस दुसऱ्या देशांत नेऊन सोडावें. त्यांच्यावर कसलाहि आरोप आला, तरी त्यांना पीडा देऊं नये. ब्रह्महत्या, गुरुस्त्रीगमन, भ्रूणहत्या आणि राजद्रोह यांसारखे अपराध त्यांच्या हातून झाल्यास त्यांस हद्दपार करावें. शारीरिक शिक्षा त्यांस देणें कधींहि इष्ट नाहीं. असें केल्यानें ब्राह्मणांवर भक्ति ठेवणारे लोकहि आपणांवर प्रेम करतील.

हे महाराजा, पुरुषसंचयासारखा दुसरा कोणताहि कोश राजाला श्रेष्ठ नाहीं. शास्त्रांमध्यें जे सहा दुर्ग सांगितले आहेत, त्यांमध्यें नरदुर्ग हा दुर्भेद्य म्हणून सांगितला आहे. यास्तव शहाण्या मनुष्यानें चारहि वर्णांवर दया करावी. धर्मात्मा आणि सत्यवक्ता राजाच प्रजेचें रंजन करूं शकतो. असें आहे तरी हे पुरुषश्रेष्ठा, तूं सर्वदा क्षमाशील असूं नये. सहनशील गजाप्रमाणें राजा जर सर्वदा मृदु असेल, तर तो अधर्म होईल. हे राजा, बार्हस्पत्य शास्त्रामध्यें ह्याविषयीं एक श्लोक सांगितला आहे. तो मी तुला सांगतों, ऐक. ‘राजा सर्वदा क्षमा करूं लागला असतां नीच लोक देखील त्याचा अपमान करितात आणि गजमस्तकावर चढून बसणाऱ्या महाताप्रमाणें ते राजमस्तकावर बसण्याची इच्छा करितात.’ म्हणून राजानें अत्यंत तीक्ष्ण किंवा अतिमृदुहि केव्हां असूं नये. त्यानें वसंत ऋतूंतील सूर्य जसा अतिउष्ण नसतो, किंवा अतिशीतहि नसतो, तसें असावें. हे महाराजा, प्रत्यक्ष, अनुमानानें, उदाहरणानें आणि शास्त्रानें आपला कोण आणि परकी कोण, ह्याची परीक्षा त्यानें घेत जावी. तूं सर्व प्रकारच्या व्यसनांपासून अलिप्त रहा. त्यांचा सर्वस्वीं तिरस्कार करणेंहि इष्ट नाहीं; तथापि त्यांत आसक्त होऊन राहूं नकोस. सर्वथा व्यसनासक्त राजा सर्वांच्या अनादरास पात्र होतो. अतिद्वेषी राजाहि तसाच लोकांच्या उद्वेगास कारण होतो.

हे महाराजा, राजानें सर्वदा गर्भिणीसारखें असावें. ज्याप्रमाणें गर्भवती स्त्री आपल्या आवडीच्या सर्व वस्तूंकडे दुर्लक्ष करून गर्भाला हितकारक तेंच

करिते, त्याप्रमाणें धर्मानें वागणाऱ्या राजानें आपल्या सुखाच्या गोष्टी बाजूला ठेवून प्रजेचें हित करीत असावें. हे पांडवा, त्यानें कधींहि धैर्य सोडूं नये. धैर्यवान् आणि न्यायानें शिक्षा देणाऱ्या राजाला कोणाचीहि भीति नसते. राजानें आपल्या नोकरांशीं कधींहि थट्टामस्करी करूं नये. असें करण्यांत काय दोष आहेत, ते सांगतों ऐक. अतिस्नेह ठेवल्यानें सेवक लोक धन्याचाहि अपमान करितात, मर्यादा सोडून वागतात आणि त्याच्या आज्ञेचें उल्लंघन करितात. एखाद्या कामाला पाठविलें असतां शंका काढितात. गुह्य गोष्टी फोडितात, मागूं नये तें मागतात, राजाकरितां राखून ठेवलेले भक्ष्य पदार्थ स्वतः खातात. राजावर संतापतात आणि त्याच्याशीं वरचढपणें वागतात. लांच खाऊन अथवा फसवून त्याच्या कार्यामध्यें अनेक अडचणी आणतात. खोटीं आज्ञापत्रें काढून देशांत सर्वत्र अंदाधुंदी करितात. स्त्रियांवर रक्षणार्थ ठेवलेल्या नोकरांशीं स्नेह करितात. राजासारखा पोशाख करितात. राजासन्निध वमन करितात, थुंकतात आणि निर्लज्जपणें त्याच्यासारखें बोलून दाखवितात.

राजा मृदु असला म्हणजे त्याला न जुमानतां त्याच्या अश्वांवर, गजांवर आणि त्याच्या आवडीच्या रथांवर मोठ्या आनंदानें बसतात. ‘ राजा, हें तुला दुष्कर आहे, हें तुझें कृत्य वाईट आहे,’ म्हणून त्याला भरसभेमध्यें बोलतात. तो रागावला असतां हंसतात, त्यानें आदर केला असतां आनंदित होत नाहींत, तर परस्परांमध्येंच हंसत राहतात. राजाच्या गुप्त गोष्टी उघडकीस आणतात आणि त्याचें दुष्कृत्य प्रसिद्ध करितात. त्याचे कार्यांत अवज्ञा दाखवितात. त्याचे अलंकार, भोजन, स्नान आणि गंधादि अनुलेपन या गोष्टींत त्याची हेळणा करितात व तो ऐकत असतांहि त्याच्यापुढें निर्भयपणें वागतात. आपल्या अधिकाराची निंदा करून ते त्याचा त्याग करितात. ते आपणाला मिळणाऱ्या वेतनानें संतोष पावत नाहींत, तर राजाला देण्याच्या द्रव्याचेंहि हरण करितात. कळसूत्री पक्ष्याप्रमाणें ते त्या पराधीन राजाशीं खेळतात आणि राजा आपल्या वचनांत आहे, असें सर्वांना भासवितात. युधिष्ठिरा, राजा विनोदशील व मृदु असला म्हणजे अशा प्रकारचे दोष घडतात. १२.१.५६.

---

## अध्याय ५७ वा.

[ १ भीष्माकडून युधिष्ठिराला राजधर्मकथन. ]

( १ ) भीष्म—युधिष्ठिरा, राजानें सर्वदा उद्योगरत असावें. त्यानें स्त्रियांप्रमाणें उद्योगावांचून कधींहि राहूं नये. हे राजा, ह्यासंबंधीं भगवान् शुक्राचार्यांचा एक श्लोक आहे, तो मी तुला सांगतों, लक्ष्यपूर्वक ऐक. 'बिळामध्यें निजून राहणाऱ्याला ज्याप्रमाणें सर्प खाऊन टाकितो, त्याप्रमाणें शत्रूला विरोध न करणारा राजा व प्रवास न करणारा ब्राह्मण ह्या दोघांना पृथ्वी गिळून टाकिते.' हें लक्ष्यांत ठेऊन ज्यांच्याशीं सख्य करणें जरूर असेल, त्यांच्याशीं सख्य करावें व जे विरोध करणारे आहेत, त्यांच्याशीं विरोध करावा. सप्त गुणांनीं[1] ( प्रकृतींनीं ) युक्त असणाऱ्या राजाच्या विरुद्ध जो वागतो, मग तो गुरु असो किंवा मित्र असो, त्याचा राजानें वध करावा. पूर्वी मरुत्त राजानें एक श्लोक म्हटला आहे, तो असा आहे कीं, 'गर्विष्ठ, कार्याकार्य न जाणणारा आणि उन्मार्गगामी असा गुरु देखील शाश्वत दंडाला पात्र आहे.'

बुद्धिमान् बाहुपुत्र सगर ह्यानें आपल्या असमंजनामक वडील पुत्राला तो पुरवासी बालकांना नेऊन नदींत बुडवीत असल्यामुळें निर्भर्त्सना करून हद्दपार केलें. उद्दालक ऋषीनेंहि आपल्या महातपस्वी श्वेतकेतुनामक पुत्राचा त्यानें ब्राह्मणांशीं अयोग्य वर्तन केल्यामुळें त्याग केला. राजांचा सनातन धर्म म्हटला म्हणजे लोकरंजन, सत्यपालन आणि व्यवहारांत सरळपणा हा होय. परवित्ताचा कधींहि अपहार करूं नये व द्यावयाचा पैसा वेळींच द्यावा. पराक्रमी, सत्यवक्ता व क्षमाशील राजा आपल्या मार्गापासून कधींहि ढळत नाहीं. मनोनिग्रही, जितक्रोध, शास्त्रीय सिद्धांतांत निश्चयी आणि जो धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांमध्यें सर्वदा आसक्त असून पहिल्या तीन गोष्टींत ( धर्मार्थकामांत ) आपला मंत्र गुप्त ठेवितो असाच मनुष्य राजा होण्यास पात्र आहे. मंत्राची परिस्फुटता होणें यासारखें राजाला दुसरें कोणतेंच संकट नाहीं.

राजानें चारी वर्णांच्या धर्मांचें रक्षण केलें पाहिजे. धर्मसंकर होऊं न देणें हा राजांचा सनातन धर्म आहे. राजानें कोणावरहि विश्वास ठेवूं नये. त्यानें

१ सप्तप्रकृति—स्वाम्यमात्य-सुहृत्-कोश-चार-दुर्ग-बलानि च-अमरकोश.

अतिविश्वास कोणावरहि ठेवतां नये. संधि, विग्रह, यान, आसन, संश्रय आणि द्वैधीभाव ह्या सहा राजगुणांच्या गुणावगुणांसंबंधानें त्यानें सर्वदा काळजीपूर्वक विचार करावा. शत्रूंचीं छिद्रें पाहणारा, धार्मिक कार्यांमध्यें सर्वदा दक्ष असणारा, हेरांची योजना करून शत्रूंचे व्यवहार जाणणारा, द्रव्यादिकांच्या दानानें शत्रूंचा भेद करणारा, द्रव्योपार्जन करणारा, लोकनियमनानें आणि धनसंचयानें यम-कुबेरांसमान असणारा राजा स्तुतीस पात्र होतो. राजानें आपल्याकडील व शत्रूकडील अमात्य, राष्ट्र, दुर्ग, कोश आणि दंड ( शासन ) यांची स्थिति अवलोकन करावी. या पांच गोष्टींत सारखेपणा किंवा कमी-अधिकपणा ह्यांवर त्यानें आपली सूक्ष्मदृष्टि ठेवावी. आपल्याकडे या पांच गोष्टींसंबंधानें अधिकपणा दिसून आल्यास आपली वृद्धि व कमीपणा आढळून आल्यास आपला क्षय त्यानें ओळखावा. ज्यांना पोषणार्थ कांहीं मिळत नाहीं, त्यांना अवश्य द्यावें व ज्यांना मिळत आहे, त्यांना तें योग्य रीतीनें मिळतें किंवा नाहीं ह्यावर त्यानें देखरेख ठेवावी. त्यानें सर्वदा प्रसन्न व हास्यमुख असावें, वृद्धांची सेवा करावी, आळस व लोभ यांचा त्याग करावा. त्यानें सत्पुरुषांच्या वर्तनाकडे दृष्टि लावावी व सर्वदा संतुष्ट वृत्ति ठेवून प्रसन्नमुख असावें. साधुपुरुषांकडून त्यानें कधींहि द्रव्यग्रहण करूं नये. असभ्यांकडून द्रव्य घेऊन त्याचा विनियोग सज्जनांकडे करावा. त्यानें द्रव्याचें हरण करावें, त्याबरोबर दानहि करावें. त्यानें आत्मसंयमन करावें; सर्व प्रकारचीं साधनें संग्रहीं ठेवावीं; योग्य कालीं दान करावें; भोग भोगावे आणि शुद्धाचरणी असावें.

विभवसंपन्न राजानें शूर, भक्त, शत्रूला वश न होणारे, कुलीन, निरोगी, शिष्ट, शिष्टसंबंधी, मानी, दुसऱ्यांचा अवमान न करणारे, विद्वान्, लौकिक व्यवहारवेत्ते, परलोकविचार करणारे, धर्मासक्त, पर्वतासमान अचल वृत्तीचे साधुपुरुष आपल्याला सहाय म्हणून जवळ बाळगावे. छत्र आणि आज्ञा या दोन गोष्टींखेरीज त्यांच्यांशीं त्यानें सारखेपणानें वागावें. त्यानें त्यांच्यांशीं समक्ष व परोक्ष सारखेंच वागावें. अशा रीतीनें त्याचें आचरण असल्यास त्याला खेद करण्याचें कारण कधींहि होत नाहीं. सर्वांविषयीं संशयी, सर्वापहार करणारा, वांकड्या मार्गानें जाणारा असा लोभी राजा स्वजनांकडूनच बंधनांत पडतो. शुद्धचरित लोकांचें मन आपल्याकडे ओढून घेणारा राजा शत्रूनें कितीहि ग्रासून टाकिलें, तरी न पडतां अखेर विजयी होतो. क्रोध न करणारा, निर्व्यसनी, सौम्य शासन करणारा, जितेंद्रिय व हिमाचलाप्रमाणें अचल राजा

प्रजाजनांना विश्वास्य होतो. प्राज्ञ, दानशील, शत्रूंचीं छिद्रें शोधून काढण्यांत दक्ष, सर्व वर्णांतील लोकांना वाटेल तेव्हां भेटणारा, नीति व अनीति बरोबर जाणणारा, कोणतेंहि काम शीघ्र करणारा, क्रोध जिंकिलेला, शीघ्र कृपा करणारा, थोर मनाचा, कोप न करणारा, उद्योगशील, आरंभिलेलीं कामें शेवटास नेणारा, प्रौढी न मिरविणारा, तोच सर्व राजांमध्यें श्रेष्ठ होय.

ज्याच्या राज्यांत प्रजेला आपण पितृगृहींच राहत असल्याचें वाटून जी निर्भय असते, ज्याच्या लोकांस आपली संपत्ति लपवून ठेवण्याची आवश्यकता वाटत नाहीं व नीति कोणती आणि अनीति कोणती ह्यांचें बरोबर ज्ञान असतें, तोच उत्तम राजा होय. ज्याची प्रजा स्वधर्मनिरत असून जी देहाचीहि पर्वा न करितां सर्वदा कर्तव्यासक्त असते, जिचें पालन यथान्याय होतें, जी वश्य, सुविनीत, राजाज्ञा पाळणारी, कधींहि तंटाबखेडा न करणारी आणि जिला दान करण्याची आवड असते, तोच राजा उत्कृष्ट होय. ज्याच्या राज्यांत दंभ, कपट, माया आणि मत्सर हीं नांवाला देखील नसतात, त्याच्याच हातीं सनातन धर्म असतो. जो ज्ञानाला मान देतो, परहिताला आवश्यक अशा शास्त्रार्थांमध्यें सर्वदा रत असतो, साधुजनांच्या मार्गानें जातो आणि तसाच जो दानशील असतो, तोच राज्याला पात्र होतो. ज्याचे हेर आणि गुप्त विचार सर्वदा चालत असूनहि शत्रूला, त्यांच्या गुप्तपणामुळें कळून येत नाहींत, तोच राजा राज्य करण्यास पात्र होय. पूर्वीं कोणा राजास रामचरित सांगत असतां महात्म्या भार्गवानें एक श्लोक म्हटला होता. तो हा कीं, 'प्रथमतः राजा मिळविला पाहिजे, त्यानंतर स्त्री आणि तदनंतर धन. जेथें राजाच नाहीं, तेथें कोठची स्त्री व कोठचें धन!' म्हणून ज्यांना राज्याची इच्छा आहे, त्यांनीं प्रथमतः प्रजारक्षणाची व्यवस्था केली पाहिजे. राज्य शाश्वत टिकण्यास प्रजारक्षण हेंच कारण होय. ह्यावांचून दुसरा सनातन धर्म नाहीं. प्राचेतस मुनीनें राजधर्माविषयीं दोन श्लोक म्हटलेले आहेत. हे राजेंद्रा, ते सावधान ऐक. 'ज्याप्रमाणें पाण्यांत फुटक्या नावेचा त्याग करणें आवश्यक आहे, त्याप्रमाणें अप्रवक्ता आचार्य, अध्ययनहीन ऋत्विज, रक्षण न करणारा राजा, अप्रियभाषिणी स्त्री, गांवांत राहण्याची इच्छा करणारा गोपाळ आणि वनांत राहूं इच्छिणारा नापित या सहांचा त्याग करावा.' १२.१.५७.

---

## अध्याय ५८ वा.

[ १ भीष्माकडून युधिष्ठिराला राजधर्मकथन. २ संध्याकाळीं कृष्णादिकांचें आपापल्या स्थानीं गमन. ]

**( १ ) भीष्म—धार्मिकश्रेष्ठा युधिष्ठिरा, हें तुला मीं राजधर्मांतील नवनीत ( सार ) सांगितलें आहे. भगवान् बृहस्पतीनें न्याय्य राजधर्माचीच प्रशंसा केली आहे. महातपस्वी विशालाक्ष शुक्राचार्य, प्राचेतस मनु, भगवान् भारद्वाज आणि मुनि गौरशिर हे राजशास्त्रप्रणेते, तसेंच ब्रह्मवादी ब्राह्मण हे प्रजापालन हाच मुख्य धर्म म्हणून त्याची प्रशंसा करीत असतात. आतां ह्या धर्माचीं साधनें सांगतों, तीं तूं ऐक. गुप्त व प्रकट हेर ठेवणें, त्यांना योग्य काळीं दान देणें, भलत्याच युक्तीनें कर न घेणें, सज्जनांचा सहवास करणें, शौर्य, दक्षता, सत्य, प्रजाहित, वांकड्या किंवा सरळ मार्गानें शत्रुपक्षांत फूट पाडणें, जीर्ण किंवा पडक्या मंदिरांची दुरुस्ती करणें, कालानुसार शारीरिक किंवा आर्थिक शिक्षा करणें, सत्पुरुषांचा त्याग न करणें, कुलीनांचा सत्कार करणें, संग्राह्य सामुग्री संग्रहीं ठेवणें, बुद्धिमान् लोक जवळ बाळगणें, सैनिकांना आनंदांत ठेवणें, प्रजाजनांवर देखरेख ठेवणें, कोणत्याहि कार्यांत न कंटाळणें, कोशवृद्धि करणें, पुररक्षण करणें, कोणावर विश्वास न ठेवणें, पौरसमूहांमध्यें भेद करणें, शत्रु, मध्यस्थ आणि मित्र यांच्यावर नजर ठेवणें, सेवक शत्रूला वश आहेत किंवा नाहींत, ह्यासंबंधीं त्यांवर देखरेख करणें, स्वतः पुरवासी जनांची पाहणी करणें, सर्वांवर अविश्वास ठेवणें, शत्रूलाहि आश्वासन देत राहणें, नीतिमार्गानुसार वागणें, निरंतर उद्योगरत असणें, शत्रूंचा कधींहि अवमान न करणें आणि दुर्जनांची संगति टाळणें हीं प्रजापालनाचीं मुख्य साधनें आहेत. राजानें सर्वदा उद्योगशील असावें, असें बृहस्पतीचें म्हणणें आहे. त्यांतच राजधर्माचें मूळ आहे. ते श्लोक आतां मी सांगतों, ते श्रवण कर.**

**" उद्योगानेंच अमृतप्राप्ति झाली, उद्योगानेंच असुरांचा वध झाला आणि उद्योगामुळेंच महेंद्रानें स्वर्गांत व इहलोकीं श्रेष्ठपणा मिळविला. उद्योगशील मनुष्य केवळ तोंडानें पांडित्य करणारावर सरशी मिळवितो. असले वाक्पंडित उद्योगी मनुष्याला रमवून त्याची शुश्रूषा करितात. उत्साहहीन राजा बुद्धिमान् असला तरी निर्विष सर्पाप्रमाणें शत्रूच्या अपमानास पात्र होतो. शत्रु दुर्बळ असला तरी बलवानानें त्याला तुच्छ समजून राहूं नये. अग्नि अल्प असला**

तरी जाळून टाकितो किंवा विष अगदीं थोडें असलें, तरी मारून टाकितें. चतुरंग सैन्यापैकीं एकानेंच युक्त असणारा शत्रु दुर्गांचा आश्रय करून राहिल्यास अतिसमृद्ध राजाच्या सर्व देशाला तापदायक होतो."

राजानें गुप्त संभाषण, शत्रुजयाकरितां केलेला लोकसंग्रह, अंतःकरणांतील कपट, कारणानें करावे लागलेले वाईट बेत, हातून घडलेलें पापकर्म ह्या सर्व दोषांबद्दल सरळपणाचें अवलंबन करावें. लोकरंजनार्थ धार्मिक कृत्यें करावीत. राज्य क्रूर मनुष्यांना चालवितां येण्यासारखें नाहीं. तसेंच तें अत्यंत कष्टमय असल्याकारणानें त्याचा भार मृदु मनुष्यालाहि सहन होणारा नाहीं. सर्वांना आमिषासारखें वाटणारें राज्य नेहमीं सरळपणानेंच चालवितां येण्यासारखें आहे. म्हणून राजानें सदैव मिश्रवृत्ति धारण करून वागावें. प्रजेच्या रक्षणार्थ, जरी त्याला विपत्ति भोगाव्या लागल्या तरी त्या योगानें त्याच्या हातून मोठा धर्मच घडल्यासारखें होतें. राजे अशाच प्रकारचे असावेत. तुला राजधर्मांतील अल्पभाग सांगितला आहे. यांत तुला कांहीं शंका असल्यास विचार.

(२) वैशंपायन—नंतर भगवान् व्यास, देवस्थान, अश्म, वासुदेव, कृप, सात्यकि, संजय हे आनंदभरित होऊन त्यांनीं 'ठीक, ठीक' म्हणून त्या नरव्याघ्र धार्मिकश्रेष्ठ भीष्माची स्तुति केली. तेव्हां त्या कुरुश्रेष्ठ युधिष्ठिरानें दीन होऊन व डोळ्यांत आंसवें आणून भीष्माच्या चरणाला स्पर्श करीत म्हटलें, 'हे पितामहा, मी उद्यां ह्याच वेळीं माझी शंका विचारीन; सूर्य आतां पृथ्वींतील रसाचें शोषण करून अस्ताला चालला आहे.'

तदनंतर श्रीकृष्ण, कृप, आणि युधिष्ठिरादि सर्वांनीं भीष्माला प्रदक्षिणा घातली आणि ते मोठ्या आनंदानें रथारूढ झाले. पुढें त्या व्रतशीलांनीं दृषद्वती नदीमध्यें स्नान केलें, आचमन करून जपजाप्यादि मंगल कृत्यें केलीं, यथाविधि संध्योपासना संपविली आणि मग ते सर्व हस्तिनापुरास गेले. १२.१.५८.

---

## अध्याय ५९ वा.

[ १ 'राजा' ही पदवी कशी उत्पन्न झाली तें सांगण्याविषयीं धर्माचा प्रश्न. २ भीष्माकडून युधिष्ठिराला राजोत्पत्ति व राजधर्माचें कथन. ]

( १ ) **वैशंपायन**—नंतर प्रातःकाळीं उठून प्रातराह्निक कर्में उरकल्यानंतर मोठमोठ्या नगराएवढ्या रथांत बसून ते पांडव आणि यादव कुरुक्षेत्राकडे निघाले. कुरुक्षेत्राला पोंचल्यानंतर, त्या सर्वांनीं सर्व रथ्यांमध्यें श्रेष्ठ असा जो भीष्माचार्य त्याचेजवळ जाऊन त्याला त्याचें कुशल विचारिलें व व्यासप्रभृति जे ऋषी तेथें होते, त्यांनाहि वंदन केलें. व्यासादि ऋषींनीं या सर्वांचें अभिनंदन केल्यावर पांडव व यादव भीष्माचार्यांचे भोंवतीं कडें घालून बसले. नंतर महातेजस्वी अशा राजा धर्मराज युधिष्ठिरानें भीष्माचें यथाविधि पूजन केलें व हात जोडून तो त्याला म्हणाला.

**धर्म**—हे भरतश्रेष्ठ राजन्, 'राजा' म्हणून जी पदवी जगांत उपयोगांत आणिली जाते, ती उत्पन्न कशी झाली, तें हे परंतपा, मला सांग. हात, दंड, कंठ इत्यादि शरीरावयव; बुद्धि, इंद्रियें; सुखदुःखांच्या भावना; पाठ, पोट, तोंड इत्यादि शरीराचे भाग; अस्थि, मज्जा, शुक्र, मांस, रक्त इत्यादि गोष्टी; तसेंच निश्वास व उच्छ्वास आणि सर्व शरीराला व्यापून रहाणारा प्राणवायु; या सर्व बाबतींत इतर माणसांसारखाच असलेला–इतर माणसांप्रमाणेंच जन्म-मरणांच्या बंधनांनीं बांधलेला–असा एकच मनुष्य अत्यंत बुद्धिमान् आणि शूर म्हणून गाजलेल्या इतर अनेक मनुष्यांवर कशी सत्ता चालवितो? ज्या पृथ्वीवर शूर, वीर आणि आर्य असे लोक रहातात, त्या पृथ्वीचें पालन हा एकटा करतो व लोकांनीं प्रसन्न रहावें अशी अपेक्षा करितो हें कसें? याच्या एकट्याच्या प्रसन्नतेवर प्रजेचें सुख अवलंबून असतें व हा दुःखी असला म्हणजे प्रजाहि व्याकुल होते असा सिद्धांत आहे. तर हे भरतश्रेष्ठा, हें कसें तें मला सविस्तर सांग. हे वक्तृत्वांत श्रेष्ठ असलेल्या भरतश्रेष्ठा, यांतील तत्त्व काय तें मला कथन कर. तुझ्या सारख्याच्या तोंडून तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. राजा म्हणवून घेणाऱ्या एका व्यक्तीच्या पायीं सर्व जग देवाप्रमाणें नम्र होतें याचें कारण, हे राजन्, खरोखर अल्प असूं शकणार नाहीं.

( २ ) **भीष्म**—हे नरश्रेष्ठा, पूर्वी कृतयुगामध्यें राज्याची उत्पत्ति कशी झाली तें सर्व मी तुला सांगतों, एकाग्र मनानें ऐक. पूर्वीच्या काळांत राजा,

राज्य, शिक्षा यांपैकीं कांहींच नव्हतें व कोणाला शिक्षाहि करावी लागत नव्हती. प्रजा धर्मानेंच–आईप्रमाणें वात्सल्यानेंहि नव्हे किंवा नोकराप्रमाणें वेतन घेऊनहि नव्हे–एकमेकांचें रक्षण करीत. याप्रमाणें कांहीं काल चालल्या-नंतर–लोक अशा तऱ्हेनें धर्मानें परस्परांचें संरक्षण करीत असतांना–त्यांच्या श्रमामुळें त्यांच्या चित्तांत विकल्प आला. हे नरश्रेष्ठा, ते लोक याप्रमाणें मोहवश होतांच त्यांचें ज्ञान नष्ट झालें व ज्ञानाबरोबरच त्यांच्या धर्माचाहि लोप झाला. ज्ञान नष्ट झाल्यामुळें मोहाच्या आधीन झालेलीं हीं माणसें, हे भरतश्रेष्ठा, लोभाला बळी पडलीं व ज्या गोष्टी त्यांना आजपर्यंत मिळाल्या नव्हत्या, त्यांच्या प्राप्तीबद्दल चिंता करूं लागलीं. त्यामुळें त्यांच्यामध्यें लोभाबरोबर काम ही एक दुसरी भावना उत्पन्न झाली. हे लोक कामाच्या आहारीं गेल्याबरोबर त्यांच्या मनांत आसक्तीचा विकार उत्पन्न झाला आणि लोलुपता उत्पन्न होतांच, हे युधिष्ठिरा, त्यांना कार्य कोणचें व अकार्य कोणचें याचें भान राहिलें नाहीं. जावें कोठें, जाऊं नये कोठें, बोलावें काय व बोलूं नये काय याची शुद्धि त्यांना उरली नाहीं व खाण्यापिण्यांत ताळ राहिला नाहीं. दोष कोणचा, अदोष कोणचा, याचें भान उडाल्यामुळें अभक्ष्य, अवाच्य, दुष्ट वगैरे कोणत्याच गोष्टीचा त्याग त्यांनीं केला नाहीं. अशाप्रकारें मनुष्यांतील माणुसकीचा लोप होऊं लागल्यानंतर वेदविद्येचा अर्थातच नाश होऊं लागला.

वेदविद्येबरोबरच वेदप्रणीत धर्म जो यज्ञ त्याचाहि नाश होऊं लागला. वेदविद्या व तत्प्रणीत यज्ञधर्म यांचा अशाप्रकारें ऱ्हास होऊं लागतांच देव-लोकांत देवांना त्रास होऊं लागला आणि हे भरतश्रेष्ठा, संत्रस्त झालेले ते सर्व देव ब्रह्मदेवाला शरण गेले. ब्रह्मदेवाला आपल्या स्तुतीनें प्रसन्न करून दुःखा-वेगानें व्याकुळ झालेले ते सर्व देव त्या लोकपितामह देवाला हात जोडून म्हणाले, " हे पितामहा, मृत्युलोकांत लोभ, मोह इत्यादिकांचें प्राबल्य फार झाल्यामुळें त्या लोकींची सनातन वेदविद्या लुप्तप्राय झाली आहे, म्हणून आम्हांला मोठें भय पडलें आहे. मर्त्यलोकींची वेदविद्या नष्ट झाल्यामुळें तिच्या-बरोबरच यज्ञरूप धर्महि संपला आहे आणि हा यज्ञधर्म संपल्यामुळें, हे त्रिभु-वनेश्वरा, आम्ही देव व मर्त्यलोकींचे मानव हे सारख्याच योग्यतेचे झालों आहों. आम्हीं पावसाचा वर्षाव खालीं पृथ्वीवर करावा व मनुष्यांनीं हविर्द्रव्यांच्या धूमज्वालांचा वर्षाव वर स्वर्गावर करावा, अशी नित्याची रीत होती. पण,

मर्त्यलोकींच्या मनुष्यांच्या क्रिया थांबल्यामुळें आम्ही संकटांत पडलों आहों. तेव्हां, हे पितामहा, आपल्या प्रभावानेंच निर्माण झालेलें हें यज्ञचक्र नष्ट न होतां आमचें कल्याण होईल, असा एकादा आमच्या निःश्रेयसाचा उपाय शोधून तो आम्हांला सांग."

ब्रह्मदेव—देवश्रेष्ठहो, तुम्ही कशाचेंहि भय बाळगूं नका. मी तुमच्या कल्याणाचा मार्ग शोधून काढतों. तुम्ही निश्चिंत असा. असें म्हणून ब्रह्मदेवानें स्वतःच्या बुद्धिसामर्थ्यानें एक लक्ष अध्यायांचा एक ग्रंथ निर्माण केला व त्यांत धर्म, अर्थ व काम या तिन्ही अर्थांचें सविस्तर वर्णन करून या तिहींच्या गटाला त्रिवर्ग असें नांव दिलें. या तीन पुरुषार्थांखेरीज चौथा पुरुषार्थ जो मोक्ष त्याचें निराळें वर्णन दिलें आहे. याचे गुण व वर्ग निराळे असून सत्त्व, रज व तम हा मोक्षाचा त्रिवर्ग होय. स्थान—आहे त्या स्थितींत रहाणें, वृद्धि—वाढणें, आणि क्षय हा दंडापासून उत्पन्न होणारा त्रिवर्ग होय. चित्त, देशकाल, नाना प्रकारचीं साधनें, कृत्य, मित्र व कारण हा नीतिजन्य षड्वर्ग होय. वेदविद्या, ज्ञानकांड, लोकयात्रेच्या व्यवहाराचें, शेतकी, व्यापार, इत्यादिकांचें ज्ञान ( वार्ता ), तसेंच प्रजारक्षणाचें ज्ञान, इत्यादि नाना प्रकारच्या विद्यांचें त्यांत वर्णन आहे. अमात्यांनीं आपला रहस्यभेद करून आपल्यावर उलटूं नये, म्हणून त्यांच्या पासून स्वतःचें रक्षण कसें करावें, गुप्त हेर कसे ठेवावे, राजपुत्र कसा असावा, हेरांनीं नाना प्रकारचे वेष कसे घ्यावे, युक्त्या कोणत्या योजाव्या, याचेंहि यथास्थित वर्णन त्यांत आहे. तसेंच, साम, दाम, दंड व भेद या चारी उपायांबरोबरच पांचवा उपेक्षा हा उपायहि त्यांत दिला असून या सर्वांचा विस्तृत ऊहापोह तेथें आहे. नाना प्रकारचीं खलबतें कशीं करावीं, शत्रुपक्षांत फूट उत्पन्न करण्यासाठीं काय करावें, मसलतींमध्यें भ्रम कोठें उत्पन्न होतो, मंत्राच्या सिद्धीचें व असिद्धीचें फल काय, हें सर्व या ग्रंथांत विवेचिलें आहे. हीन, मध्यम व उत्तम अशा तीन प्रकारचा संधि यांत सांगितला आहे व शत्रूला भिऊन त्याच्याशीं तडजोड करणें हा हीन संधि, सत्कारानें केलेला संधि हा मध्यम संधि व द्रव्य घेऊन सिद्ध केलेला संधि हा उत्तम संधि होय, असें तेथें म्हटलें आहे.

शत्रूवर स्वारी करण्याचे चार काळ ( स्वतःचा मित्रलाभ व धनसंचय आणि शत्रूचा मित्रनाश आणि धनहानि होईल असे ), विस्तृत त्रिवर्ग ( धर्म, अर्थ आणि काम एतद्विषयक ), न्यायविजय, अर्थविजय ( द्रव्य देऊन

मिळविलेला विजय) आणि आसुरविजय (कपटानें मिळविलेला विजय) यांचें वर्णन त्यांत आलें आहे. अमात्य, राष्ट्र, दुर्ग, बल आणि कोश या पंचविध वर्गांचीं उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ लक्षणें त्यांत सांगितलीं आहेत, प्रकट आणि गुप्त अशा दोनी प्रकारच्या सैन्यांचेंहि वर्णन त्यांत आलें आहे. त्यांपैकीं प्रकट सैन्य आठ प्रकारचें असून गुप्त सैन्याचे अनेक प्रकार सांगितले आहेत. रथ, गज, अश्व, पदाति, वेठीस लावलेले लोक, नौका, हेर आणि उपदेशक हीं प्रकट सैन्याचीं आठ अंगें वर्णिलीं आहेत. जंगम आणि स्थावर यांपासून, तसेंच चूर्णापासून होणाऱ्या विषासंबंधीं विचार त्यांत आला आहे. वस्त्रें, अन्न, जारणमारणादि उपाय आणि शत्रु, मित्र व उदासीन लोक यांचेंहि वर्णन त्यांत आलेलें आहे. सर्व मार्गगुण, यामल ऋषींनीं सांगितलेलीं चौऱ्यायशीं प्रकारचीं भूमिवर्लें, हीं या ग्रंथांत आलीं असून, मंत्रयंत्रादिकांनीं आत्मरक्षण कसें करावें, तसेंच, रथ वगैरे स्वतः तयार करविलेल्या गोष्टींवर नजर कशी ठेवावी, सैन्य, गज, अश्व, रथ, इत्यादिकांची रचना कशी असावी, यांचें बल वाढविण्यास काय उपाय योजावे, नाना प्रकारचे चक्रव्यूह, क्रौंचव्यूह, गरुडव्यूह इत्यादि व्यूह कसे रचावे आणि नानाप्रकारचें युद्धकौशल्य कसें असतें, याचेंहि वर्णन यांत आहे. ग्रहयुद्धासारखे व धूमकेतूंच्या उदयासारखे उत्पात, तसेंच नक्षत्रें गळून पडणें, धरणीकंप होणें यांसारखे निःपात, चांगल्या प्रकारचें युद्ध, यांचेंहि यथास्थित वर्णन या ग्रंथांत आहे. आपल्याला हितकारक अशी माघार घेण्याची वेळ कोणती, शस्त्रास्त्रें कशीं वापरावीं, त्यांना धार कशी द्यावी, सैन्याला आनंदित ठेवण्याचे प्रकार कोणते, पीडादायक व आपत्ति उत्पन्न करणारा काल कोणता, पायदळाबद्दलचें उत्तम ज्ञान कसें असावें, गमनाची व आगमनाची वार्ता अभिमंत्रित अशा दुंदुभींच्या नादानें कशी प्रकट करावी व ओळखावी, पताकादि व मंत्रादि अशा दोन्ही प्रकारच्या साधनांनीं शत्रूच्या पक्षाला मोहित कसें करावें, चोरांच्या द्वारानें व रानांत रहाणाऱ्या रानटी लोकांच्या साहाय्यानें शत्रूला त्रास कसा द्यावा, याचेंहि वर्णन या ग्रंथांत आहे.

घरें जाळणाऱ्या, विषप्रयोग करणाऱ्या, प्रतिबिंबें घेण्याच्या कलेची माहिती असणाऱ्या लोकांच्या साहाय्यानें, तसेंच मुख्य मुख्य पुढाऱ्यांचा भेद करून, दाणापाणी बंद करून, गजांना पिसाळवून, नाना प्रकारच्या रोगांचा फैलाव होईल असें करून, आपल्यावर ज्याचा विश्वास असेल अशा माण-

साला अधिकच खूष करून व त्याचा आपल्यावरचा विश्वास वाढवून, शत्रूच्या राष्ट्रास मोहांत कसें पाडावें, हें या ग्रंथांत सांगितलें आहे. सात अंगांनीं युक्त असलेल्या राज्याची वृद्धि कशानें होते, ऱ्हास कशानें होतो, तें राज्य आहे त्या स्थितींतच कसें राहूं शकतें, दूतांच्या सामर्थ्यानें स्वतःच्या राष्ट्राची वृद्धि कशी करावी, शत्रु कोण, मध्यस्थ कोण व मित्र कोण हें कसें ओळखावें, आपल्या-पेक्षां बलिष्ठ अशा शत्रूवर हल्ला कसा करावा, किंवा त्याच्या हल्ल्याचा प्रतिकार कसा करावा, याचेंहि वर्णन त्यांत आहे. अत्यंत सूक्ष्म असा राजव्यवहार व राष्ट्रां-तील दुष्टांचें उच्चाटन, हीं कशीं करावीं, राष्ट्रांतील लोकांचें बल वाढविण्यासाठीं व्यायामशाळा वगैरे कशा असाव्या, आयुष्याची वृद्धि करणाऱ्या व्यायामाचे प्रयोग कसे असावे, द्रव्याचा त्याग व संग्रह कसा करावा, ज्यांचें उदरभरण नीट होत नाहीं, अशांना हात कसा द्यावा, ज्यांचें भरणपोषण आपण करतों, त्यांच्यावर नजर कशी ठेवावी, योग्य काळीं द्रव्याचें दान कसें करावें, व्यसनांतील आसक्तीपासून अलिप्त कसें असावें, या सर्वांचें वर्णन या ग्रंथांत आहे.

राजाचे गुण कोणते, सेनापतीचे गुण कोणते, त्रिवर्गांचीं कारणें कोणतीं, त्यांतील गुण व दोष कोणते, आपल्यावर अवलंबून असणाऱ्या सेवकांना वेतन किती व कसें द्यावयाचें, नानाप्रकारचे दुराचार कोणते यांची माहिती त्यांत आहे. कोणावरहि अतिविश्वास न टाकतां सर्वांठायीं सावधपण कसें राखावें, आपल्या हातून प्रमाद होऊं न देण्याविषयीं कसें जपावें, जें आप-ल्याला मिळालें नाहीं, तें मिळविण्याचा प्रयत्न कसा करावा, जें मिळालें असेल तें जतन कसें करावें, आपण संचय करून वाढविलेल्या द्रव्याचा विनियोग कसा करावा, योग्य पात्रापात्रविचार करून कसें द्यावें, याचा विचार त्यांत आहे. योग्य पात्र पाहून दान देणें हा दानाचा सर्वोत्कृष्ट प्रकार; यज्ञांत द्रव्य खर्चणें हा दुसरा प्रकार; काम्य गोष्टींत खर्च करणें हा तिसरा प्रकार; संकटांतून मुक्त होण्यासाठीं द्रव्य खर्चणें, हा चौथा प्रकार; असे द्रव्याच्या विनियोगाचे चार प्रकार त्यांत आहेत.

हे कुरुश्रेष्ठा, काम व क्रोध यांच्यापासून उत्पन्न होणारीं अतिशय उग्र अशीं दहा व्यसनें कोणतीं, त्यांचें वर्णन या ग्रंथांत आहे. मृगया, द्यूत, मद्य-पान व अगम्यगमन हीं चार कामापासून उत्पन्न होणारीं व्यसनें होत असें हे भरतश्रेष्ठा, त्यांत सांगितलें आहे. वाक्पारुष्य म्हणजे कठोर भाषण,

उग्रपणा धारण करणें, अमानुष शिक्षा करणें, स्वतःच्या देहाला निष्कारण दंडविणें, त्यागानें व अविचारानें पैसा उधळणें हीं सहा क्रोधज व्यसनें होत. यांचेंहि वर्णन या ग्रंथांत ब्रह्मदेवानें यथास्थित केलें आहे. नाना प्रकारचीं यंत्रें व त्यांच्या उपयोगाचे प्रकार, शत्रूवर हल्ला कसा चढवावा, त्याचा हल्ला कसा परतवावा, ध्वजाचा नाश कसा करावा, चैत्य ( देवमंदिरें ) व वृक्ष यांचा नाश कसा करावा, शत्रूंच्या सैन्याला वेढा कसा द्यावा, अपस्कर ( चाकांखेरीज रथाचा वरचा भाग ) कसा करावा, कवचादि अंगावर परिधान करण्याच्या गोष्टी कशा निर्माण कराव्या, याबद्दलचे विविध प्रकारचे उपाय या ग्रंथांत आहेत. पणव, आनक, शंख, भेरी इत्यादि वाद्यें व सहा[1] प्रकारचीं द्रव्यें कशीं मिळवावीं, मिळविलेल्यांचें रक्षण कसें करावें, सज्जनांचा सत्कार कसा करावा, विद्वानांचा ऐक्यभाव कसा जोडावा, दानविधि, होमविधि, यांचा काल कसा जाणावा, त्यांच्या प्रकारांचें ज्ञान कसें करून घ्यावें, सोनें वगैरे मंगल वस्तूंचा स्पर्श, शरीर अलंकारांनीं भूषविणें, आहाराची योजना, या गोष्टी कशा कराव्या, नित्य आस्तिक्यबुद्धि कशी ठेवावी, एकट्यानेंच उद्योगास कसा हात घालावा, वाणी सत्य व मधुर कशी असावी, समाजाच्या उत्सवप्रसंगीं ध्वजारोपणादिक क्रिया कशा असाव्या, सर्व विषयांतील निरनिराळ्या प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष क्रिया कशा असतात, सेवकांचें वेतन वगैरे गोष्टींवर नजर कशी असावी, या सर्व प्रकारांचें वर्णन या ग्रंथांत आहे.

ब्राह्मण हा अदण्ड्य कसा, त्याला शिक्षा लावण्याचा प्रसंगच आला तर तो युक्तीनें कसा करावा, तसेंच आपल्यावर अवलंबून असलेल्या माणसांमुळें व त्यांच्या गुणांनींच आपल्या ऐश्वर्याचा उद्भव कसा होतो, प्रजेचें रक्षण व राष्ट्राचें वर्धन आपण कसें करावें, यांचें वर्णन या ग्रंथांत आहे. बारा प्रकारच्या राजांचें जें मंडल, ( मध्यें विजिगीषु, त्याच्या सभोंवतीं चारी दिशांस चार शत्रु, त्यांच्या पलीकडे चार मित्र व त्यांच्याहि पलीकडे चार उदासीन, अशा ) त्याचा विचार कसा करावा, बाहत्तर प्रकारचे शरीरसंस्कार कसे असतात, देश, जाति व कुल यांचे धर्म कसे असतात, यांचेंहि सविस्तर वर्णन या ग्रंथांत ब्रह्मदेवांनीं केलेलें आहे. हे भूरिदक्षिण राजा, धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारी प्रकारच्या पुरुषार्थांचें वर्णन यांत आहे. सामदामदंडादि उपाय,

---

१ रत्नें, पशु, पृथ्वी, वस्त्र, दासदासी आणि सुवर्ण हीं सहा प्रकारचीं द्रव्यें. ‘ मणयः, पशवः, पृथ्वी, वासो, दास्यादि, कांचनम् ’ इति षट् द्रव्याणि ।

अर्थांचें चिंतन करण्याचे प्रकार व द्रव्योपार्जनाचे मार्ग, यांचाहि विचार यांत आला असून खजिन्याची वृद्धि करणारे, शेतीसारखे मूलभूत उद्योग, वशीकरण कर्म व ऐंद्रजालिक प्रयोग यांचाहि ऊहापोह येथें झालेला आहे. ज्यांचे पाणी स्थिर रहात नाहीं, अशा जलप्रवाहांचा निरोध कसा करावा (दूषण-निरोध) याचेंहि विवेचन तेथें आहे. हे राजशार्दूला, ज्या ज्या उपायांनीं प्रजा आर्यमार्गापासून ढळणार नाहीं, त्या त्या सर्व उपायांचें वर्णन या नीतिशास्त्रांत आहे.

अशा प्रकारचें हें शुभ नीतिशास्त्र निर्माण करून, आनंदित होत्साता ब्रह्मदेव त्या इंद्राधिष्ठित देवांना म्हणाला कीं, "लोकांमध्यें धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गाची स्थापना करून, त्यांच्यावर उपकार करावे, त्यांचें कल्याण करावें, या हेतूनें मीं आपल्या बुद्धीच्या प्रभावानें सकल सारस्वताचें जणूं नवनीतच असें हें शास्त्र निर्माण केलें आहे. दंडानें युक्त असें हें नीतिशास्त्र लोकांचें रक्षण करण्यास समर्थ असून लोकांचें नियमन करीत करीत तें त्यांच्यामध्यें प्रसार पावेल. हें शास्त्र व दंड हीं परस्परांचीं पोषक असल्यानें या शास्त्राला 'दंडनीति' असें नांव मिळेल व याचा प्रसार त्रैलोक्यांत होईल. संधि, यान, परिगृह्यासन, द्वैधीभाव, अन्यनृपाश्रय व विगृह्यासन हे जे षड्गुण त्यांचें सारसर्वस्व या दंडनीतींत आलें असून धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारी पुरुषार्थांचें वर्णन यांत आहे. म्हणून त्या दंडनीतीला महात्मे लोक श्रेष्ठ मानतील." ब्रह्मदेवानें निर्माण केलेलें हें शास्त्र उमापति जो विशालाक्ष बहुरूपी श्रीशंकर त्यानें ग्रहण केलें. पुढें प्रजांच्या आयुष्याचा ऱ्हास झाला, एक लक्ष अध्यायांच्या शास्त्राचें अध्ययन त्यांच्यानें होणार नाहीं, असें जाणून, ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या एक लक्ष अध्यायांच्या त्या शास्त्राचा भगवान् शंकरांनीं दहा हजार अध्यायांत संक्षेप केला. हें दहा हजार अध्यायांचें शंकरप्रणीत नीतिशास्त्र त्याच्या विशालाक्ष या नांवावरून वैशालाक्ष या नांवानें प्रसिद्ध झालें. हें वैशालाक्ष शास्त्र शंकरापासून इंद्रानें ग्रहण केलें. भगवान् पुरंदरानें याहि शास्त्राचा पांच हजार अध्यायांत संक्षेप केला व हें पांच हजार अध्यायांचें संक्षिप्त शास्त्र बाहुदंतक या नांवानें प्रसिद्ध आहे. या इंद्राच्या शास्त्राचा संक्षेप तीन हजार अध्यायांत बृहस्पतीनें केला. बृहस्पतीच्या या शास्त्राला बार्हस्पत्य अशी संज्ञा आहे. या बार्हस्पत्य शास्त्राचाहि, अत्यंत बुद्धिमान् योगाचार्य, महायशस्वी असा जो शुक्राचार्य त्यानें एक हजार अध्यायांत संक्षेप केला.

अशाप्रकारें, हे भरतश्रेष्ठा, कालानुरोधानें मनुष्यांच्या आयुष्याच्या व बुद्धीच्या ऱ्हासाचा विचार करून ब्रह्मदेवाचें एक लक्ष अध्यायांचें शास्त्र महर्षींनीं उत्तरोत्तर संक्षिप्त स्वरूपांत आणलें आहे.

एकदां सर्व देव मिळून प्रजापति भगवान् जो विष्णु त्याजकडे गेले व त्याला म्हणाले ‘ मनुष्यांमध्यें अग्रपूजेचा मान तुझ्या मतें कोणाला द्यावा ? सर्वश्रेष्ठ म्हणवून घेण्याची योग्यता मनुष्यलोकांत तुझ्या दृष्टीनें कोणाची आहे, तें आम्हांला सांग ! ’

तेव्हां आपल्या मनाशींच कांहीं वेळ विचार करून भगवान् नारायण प्रभूनें स्वतःच्या तेजापासून विरजा नांवाचा एक मानसपुत्र निर्माण केला. पण त्या महाभागाला पृथ्वीचें राज्य आवडेना. हे पांडवा, त्याच्या मनाचा कल त्या राज्याचा त्याग करण्याकडेच होऊं लागला. त्या विरजाला कीर्तिमान् नांवाचा एक मुलगा होता. त्याचीहि प्रवृत्ति पंच विषयांकडे वळेना. त्याला कर्दम नांवाचा एक मुलगा झाला, तोहि पण तपश्चर्येच्या मार्गाकडेच वळला व त्यानें फार मोठें तप केलें. प्रजापति कर्दमाचा मुलगा अनंग हा अत्यंत सज्जन, राजनीतिशास्त्रांत अत्यंत प्रवीण व प्रजाहितदक्ष असा होता. अनंगाचा मुलगा अतिबल हा मोठा नीतिमान् होता व त्यानें मात्र पृथ्वीच्या राज्याचा स्वीकार केला; पण, पुढें तो इंद्रियांच्या आहारीं पडला. हे राजा, त्रैलोक्यांत प्रख्यात असलेली मृत्यूची मानसकन्या जी सुनीथा तिच्या पोटीं त्याला वेन नांवाचा मुलगा झाला. हा वेन राजा प्रजांचा द्रोह करणारा व विषयी असा निघाल्यामुळें वेदविद्येंत पारंगत असलेल्या ऋषींनीं मंत्रयुक्त अशा दर्भांनीं त्याला ठार मारिलें व मंत्रबलानें त्याच्या उजव्या मांडीचें त्यांनीं मंथन केलें. तेव्हां त्यांतून दग्ध झालेल्या एकाद्या झाडाच्या काळ्याकुट्ट खोडाप्रमाणें दिसणारा, लाल डोळे असलेला, कृष्णवर्ण केंसांचा असा एक विद्रूप व खुजा पुरुष निर्माण झाला. त्याला त्या ब्रह्मवादी ऋषींनीं ‘ निषीद ’ म्हणजे ‘ बैस ’ अशी आज्ञा केली. या पुरुषापासून पर्वतांच्या दऱ्याखोऱ्यांतून व रानांतून रहाणाऱ्या निषादांची उत्पत्ति झाली व विंध्यपर्वताचा आश्रय करून रहाणारे शेंकडों हजारों म्लेंच्छहि यापासूनच निर्माण झाले.

हे राजा, नंतर त्या ब्रह्मवादी ऋषींनीं त्या वेनराजाच्या उजव्या हाताचें मंथन केलें. त्यांतून मात्र इंद्राप्रमाणें रूपवान् असा पुत्र निर्माण झाला. त्यानें

अंगावर कवच धारण केलेलें असून, त्याच्या कमरेस तलवार होती व धनुष्य-बाणहि त्यानें धारण केलेले होते. तो वेद व वेदांगें यांच्यामध्यें पारंगत असून धनुर्विद्याहि त्याला चांगली अवगत होती. हे राजा, सगळ्या दंडनीतीनें त्याचा आश्रय केला होता असें म्हटलें तरी चालेल. हा वेनपुत्र त्या महर्षींना हात जोडून म्हणाला ' महाराज, धर्मार्थांचें सूक्ष्म ज्ञान करून देणारी अत्यंत तीक्ष्ण बुद्धि माझ्या ठायीं उत्पन्न झाली आहे. हिचा विनियोग मी कोठें करूं, तें मला सविस्तर सांगा. धर्म, अर्थ, काम, मोक्ष या पुरुषार्थांपैकीं कोणत्याहि पुरुषार्थाचें जें कार्य आपण मला सांगाल तें मी करीन, त्याबद्दल शंका घेण्याचें मुळींच कारण नाहीं.' तेव्हां त्याला सर्व देव व ते सर्व ऋषि म्हणाले, " हे महाभागा, ज्या ठिकाणीं धर्माचें वास्तव्य निश्चयानें आहे, असें दिसेल, ती गोष्ट तूं निःशंकपणानें कर. प्रिय व अप्रिय या दोन्हींचा त्याग करून तूं सर्व प्राण्यांकडे समदृष्टीनें पहा. काम, क्रोध, लोभ व मान या सर्व गोष्टी तूं टाकून दे. या मृत्युलोकांत जो कोणी मनुष्य धर्मापासून च्युत झालेला तुला दिसेल, त्याचें तूं आपल्या बाहूंनीं नियमन कर व शाश्वत धर्मावर सारखी दृष्टि ठेव. तूं आतां अशी प्रतिज्ञा कर कीं, या पृथ्वीवरील ब्रह्मतेजाचें मी कायावाचामनानें पालन करीन. दण्डनीतिशास्त्रानें जो नित्य-धर्म मला सांगितला असेल, त्याचें मी निःशंकपणें आचरण करीन. मी स्वच्छंद होऊन कधींहि वागणार नाहीं. मी ब्राह्मणांना शिक्षा करणार नाहीं व संकराच्या संकटापासून लोकांचें रक्षण करीन, अशीहि तुला प्रतिज्ञा केली पाहिजे."

नंतर तो वैन्य त्या ऋषींना म्हणाला, ' लोकांमध्यें श्रेष्ठ असलेले महा-तपस्वी ब्राह्मण मला सर्वथा वंद्य आहेत.' तेव्हां त्या ब्रह्मवादी ऋषींनीं त्याला ' तथास्तु ' असा आशीर्वाद दिला. हे राजा, वेदविद्येचें केवळ आगरच असा जो शुक्र तो या राजाचा पुरोहित झाला. वालखिल्य ऋषि त्याचे मंत्री झाले. सारस्वत्य नांवाचे देवगणहि त्याचे मंत्री झाले. भगवान् गर्गांनीं त्याच्या ज्योतिषाचें काम संभाळलें. हा पुरुष भगवान् विष्णूपासून आठवा होय, अशी समजूत लोकांत प्रचलित आहे. हे राजन्, याच्यापूर्वीं सूत, मागध नांवाचे स्तुतिपाठक उत्पन्न झालेले होते. या प्रतापी वेनपुत्र पृथुराजानें त्यांपैकीं सूताला अनूप या देशाचें व मागधाला मगध देशाचें राज्य दिलें.

पूर्वीं या पृथ्वीवर खांचखळगे फार होते, यास्तव पृथ्वीवर यानें सपाटी केली असें आमच्या ऐकण्यांत आहे. मन्वंतरामन्वंतराचे ठिकाणीं

पृथ्वीची निर्मिति नेहमींच विषमस्वरूपांत होते. वेनपुत्र पृथुराजानें आपल्या धनुष्याच्या टोंकानें भोंवतालचे दगड उचलले व त्यापासून पर्वत निर्माण झाले. या पृथुराजाला भगवान् विष्णु, इंद्रपुरोग सर्व देव, ऋषि आणि प्रजेचें पालन करणारे राजे व ब्राह्मण या सर्वांनीं अभिषेक केला. या पृथुराजाचा साक्षात् पृथ्वीनें रत्नांनीं सत्कार केला. नदीपति जो समुद्र, पर्वतश्रेष्ठ हिमालय व देवेंद्र यांनीं, हे युधिष्ठिरा, त्या पृथुराजाला द्रव्य दिलें. सोन्याचा पर्वत जो मेरु त्यानें या पृथुराजाला सोनें दिलें. यक्षराक्षसांचा राजा नरवाहन यानें धर्म, अर्थ व काम यांमध्यें प्रवीण असलेल्या त्या राजाला धन दिलें. हे पंडुपुत्रा, त्या वेनपुत्र पृथुराजानें मनांत आणतांच अश्व, रथ, गज आणि कोट्यवधि सैनिक निर्माण झाले. त्याच्या राज्यांत वार्धक्य, दुष्काळ, रोगराई इत्यादिकांची पीडा नव्हती. पृथुराजाच्या राज्यांत सर्पांचें, चोरांचें भय नव्हतें व त्याच्या धाकामुळें लोक आपसांतहि तंटे करीत नसत. हा समुद्रमार्गानें जाऊं लागला म्हणजे पाणी निश्चळ होई, पर्वत याला वाट देत व याच्या ध्वजाचा भंग कधींहि होत नसे. या राजानें पृथ्वींतून सतरा प्रकारचीं पिकें काढिलीं व यक्ष, राक्षस व नाग यांपैकीं, ज्यांना ज्यांना जें जें हवें होतें तें तें त्याला दिलें. या महात्म्या राजानें हा सर्व लोक धर्मप्रवण केला व सर्व प्रजांचें रंजन केलें म्हणून याला राजा म्हणतात. ब्राह्मणांचें क्षतापासून ( संकटापासून ) त्राण केल्यामुळें याला क्षत्रिय संज्ञा मिळाली. स्वभावतःच विस्तृत असलेल्या या पृथ्वीला पृथुराजाच्या नांवावरूनच पृथ्वी हें नांव मिळालें. पुराणपुरुष भगवान् विष्णु यानें स्वतः या पृथुराजाची राज्यावर स्थापना केली व हे युधिष्ठिरा, तुझ्या आज्ञेबाहेर कोणीहि लोक जाणार नाहींत, असा त्याला विष्णूनें आशीर्वाद दिला. भगवान् विष्णूनें तपःसामर्थ्यानें त्या राजाच्या शरीरांत प्रवेश केला म्हणून, हे राजा, मृत्युलोकच्या राजांला सर्व जग देवासारखें मानून त्यांला नमस्कार करितें.

हे राजा, दंडनीतीच्या नियमानुसार प्रजेचें पालन करणें हें राजाचें कर्तव्य होय. हेरांच्या दृष्टीवर विश्वास ठेवून—सर्वस्वीं त्यांच्यावर अवलंबून राहून—कोणींहि प्रजाधर्षण करूं नये. राजेंद्रा, शुभ कर्माचें फल केव्हांहि शुभच मिळतें. चित्त व इतर गोष्टी यांनीं आपल्यासारखाच असलेला जो राजा, त्याच्या ताब्यांत प्रजा राहते, त्याचें कारण एक दैव व दुसरें त्याच्या अंगचे गुण हें होय. असो. त्यावेळीं विष्णूच्या ललाटापासून एक सोन्याचें कमळ

निर्माण झालें. या कमळांतून श्री निर्माण होऊन ती धीमान् धर्माची पत्नी झाली. तिच्यापासून अर्थनामक पुत्र झाला. नंतर हे पंडुपुत्रा, धर्म, अर्थ व लक्ष्मी यांची स्थापना राज्यामध्यें झाली. स्वर्गलोकींचे पुण्यभोग भोगून संपले म्हणजे क्षीण झालेला पुरुष पृथ्वीवर राजा होतो, तो दंडनीतिशास्त्रांत पारंगत होतो व त्याच्यामध्यें विष्णुमय तेजाचा प्रादुर्भाव होतो. विष्णुमय तेजाचें अधिष्ठान त्याचे ठिकाणीं होतांच तो विचारसंपन्न बनतो व त्याला प्रतिष्ठा प्राप्त होते. देवांनींच त्याची स्थापना त्या राज्यावर केलेली असल्यामुळें त्याच्या आज्ञेबाहेर कोणीच जाऊं शकत नाहीं. सर्व जग याच्या एकट्याच्या आधीन होऊन रहातें व त्याच्यावर सत्ता कोणाचीच चालत नाहीं. हे राजा, शुभकर्माचें फल नेहमीं शुभच मिळतें. शरीरेंद्रियें वगैरे बाबतींत इतर माणसांसारखाच असलेला जो हा राजा, त्याच्या ताब्यांत सगळे लोक रहातात, याचें कारण त्याचें शुभ कर्म हेंच होय. राजाच्या सौम्य अशा मुखाकडे ज्याची ज्याची म्हणून नजर जाते, तो प्रत्येक जण त्याचा अंकित होतो व राजा हा अत्यंत शुभलक्षणी, अर्थसंपन्न व रूपसंपन्न आहे अशीच त्याची भावना होते; व राजाची दंडनीति यामुळेंच महत्त्वाची ठरते. या दंडनीतीचीं अत्यंत स्पष्ट अशीं लक्षणें, ज्यांच्यामुळें हा राज्यकारभार व्यवस्थित चालतो असे न्यायाचे अनेक नियम, पुराणांचा उद्भव, महर्षींची व तीर्थांची उत्पत्ति, नक्षत्रांचा संभव व विस्तार, हीं सर्व या शास्त्रांत दिलेलीं आहेत.

हे युधिष्ठिरा, ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास या चारी आश्रमांचें व त्यांच्या कर्मांचें, चारी प्रकारच्या यज्ञांचें, तसेंच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारी वर्णांचें व चारी प्रकारच्या विद्यांचें वर्णन या ब्रह्मदेवप्रणीत शास्त्रांत आहे. नानाप्रकारचे इतिहास, चारी वेद, सांग न्यायशास्त्र, या सर्वांचें विवरण यांत आहे. तपाचें स्वरूप कसें, ज्ञान म्हणजे काय, सत्य व असत्य यांच्यापलीकडचा धर्म कसा असतो, वृद्धांची सेवा कशी करावी, दान कसें द्यावें, त्याचें शुद्ध स्वरूप काय, शुचिता कशाला म्हणतात, कोणत्याहि उद्योगांत धडाडी ( उत्थान ) कशी दाखवावी, सर्व भूतानुकंपा म्हणजे काय, या सर्वांचें व पृथ्वीवर आणि पातालांत सर्व ठिकाणीं असलेल्या यच्चयावत् गोष्टींचें विस्तृत वर्णन या ब्रह्मदेवप्रणीत नीतिशास्त्रांत आहे. यांत हे पंडुपुत्रा, काडी-मात्र संशय नाहीं. हे राजेंद्रा, देव आणि नरदेव यांना शहाणे लोक या पृथ्वीवर एकाच स्वरूपाचे मानतात तें या शास्त्रामुळेंच होय. हे भरतश्रेष्ठा युधिष्ठिरा,

राजांना महत्त्व कां प्राप्त झालें, राजा ही पदवी कोणीं उत्पन्न केली हा भाग मीं तुला साकल्यानें सांगितला. आतां, तुला काय पाहिजे तें विचार. १२.१.५९.

---

## अध्याय ६० वा.

[ १ युधिष्ठिरप्रश्न. २. भीष्माकडून युधिष्ठिराला चातुर्वर्ण्यधर्मकथन. ]

(१) **वैशंपायन**—नंतर पुन्हां एकदां पितामह गंगानंदन जो भीष्माचार्य त्याला वंदन करून आणि हात जोडून युधिष्ठिर नम्रपणानें म्हणाला "हे भरतश्रेष्ठा, सर्व वर्णांचे धर्म कोणते, चारी वर्णांपैकीं प्रत्येकाचे निरनिराळे धर्म कोणते, चारी आश्रमांचे धर्म कोणते, राजधर्म कोणते, राष्ट्राचें सामर्थ्य कशानें वाढतें, राजा वीर्यसंपन्न कसा होतो, प्रजा बलवती कशानें होते, नोकरचाकर कार्यक्षम कसे रहातात, हें सर्व मला सांग. तसेंच कोश, दंड, किल्ले, मित्रवर्ग, अमात्य, ऋत्विज, पुरोहित व आचार्य हे कोणत्या प्रकारचे असावे व कोणत्या प्रकारचे स्थितींत राजानें त्यांचा त्याग करावा, एकादें संकट आल्यास राजानें कोणावर विश्वास टाकावा व कोणत्या तऱ्हेच्या लोकांपासून आपलें रक्षण करण्यास नेहमीं जपावें, हें सर्व, हे पितामहा, मला सांग."

(२) **भीष्म**—महासामर्थ्यवान् अशा धर्माला नमस्कार असो. श्रीकृष्णाचें व ब्रह्मदेवाचें वंदनपूर्वक स्मरण करून व ब्राह्मणांना अभिवादन करून हे युधिष्ठिरा, मी तुला शाश्वत धर्म सांगतों, ऐक. अक्रोध, खरें बोलणें, आपण जें मिळवितों तें आपल्यासकट सर्वांकरितां आहे, आपल्या एकट्याकरितां नव्हे अशी भावना ठेवणें, क्षमाशीलवृत्ति असणें, स्वस्त्रीच्याच ठिकाणीं प्रजोत्पादन करणें, शुचिर्भूतपणा, सरळपणा, कोणाचाहि द्रोह न करणें व नोकरचाकरांचें पोषण करणें हे नऊ धर्म सर्व वर्णांना सारखे आहेत. आतां जो धर्म केवळ ब्राह्मणांनींच आचरावयाचा आहे, त्याचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक. हे राजा, दम हाच ब्राह्मणांचा पुरातन धर्म होय, असें लोक सांगतात. ब्राह्मणांनीं स्वाध्यायाभ्यसन केलें म्हणजे तेवढ्यानेंच त्यांचें इतिकर्तव्य संपलें. स्वतःच्या कर्मांचे ठिकाणीं विरत असणाऱ्या, शांत, विकर्में न करणाऱ्या, प्रज्ञानानें तृप्त असणाऱ्या ब्राह्मणाला यदृच्छया द्रव्य मिळालें, तर त्यानें विवाह करून प्रजोत्पादन करावें, दान द्यावें, यज्ञादि कर्में करावीं व मिळविलेल्या

द्रव्याचा इतरांच्या सहवर्तमान उपभोग घ्यावा, असें शहाण्या लोकांनीं सांगितलें आहे. ब्राह्मणाचें प्रत्यक्ष कार्य स्वाध्यायाभ्यसन एवढेंच आहे व तेवढें केल्यानें त्याचें कर्तव्य संपतें. मग तो इतर कांहीं करो वा न करो. एवढें कर्म करणाराला उच्च प्रतीचा ब्राह्मण म्हणतात. राजा, क्षत्रियांचा धर्म कसा असतो, तें ऐक.

राजानें नेहमीं दान द्यावें; याचना करूं नये; यज्ञ स्वतः करावा, दुसऱ्यांकडून करवूं नये; अध्ययन स्वतः करावें, दुसऱ्याकडून करवूं नये; प्रजांचें रक्षण करावें; तस्करादिकांचा बंदोबस्त करण्यांत तत्पर रहावें; समरभूमीवर पराक्रम करावा; हा क्षत्रियांचा धर्म होय. जे नानाप्रकारच्या यज्ञांनीं देवांना संतुष्ट करितात, अध्ययन करतात व युद्धामध्यें विजय मिळवितात, त्यांना पुण्यलोकाची प्राप्ति होते व ते सर्वश्रेष्ठ मानले जातात. समरांगणावर उभा राहिल्यानंतर अंगावर व्रण न घेतां जो माघारा फिरतो, त्या क्षत्रियाचें तें कर्म ज्ञाते लोक प्रशस्त मानीत नाहींत. क्षत्रिय बांधवांकरितां मुख्यतः हा मार्ग आंखून दिलेला आहे. दस्यूंना हांकून लावणें याच्या परता श्रेष्ठ धर्म क्षत्रियांना नाहीं. दान दण, अध्ययन करणें आणि यज्ञादि कर्मे करणें यानेंच राजांचें कल्याण होतें. म्हणून, धर्मार्जनाची इच्छा असणाऱ्या राजानें विशेषतः युद्ध करावें. सर्व प्रजांना आपापल्या धर्मप्रमाणें वागावयास लावून शमप्रधान सर्व कर्मे धर्मानेंच करून घ्यावीं. प्रजेचें पालन करणें हा क्षत्रियाचा–राजाचा–धर्म होय व तेवढ्यानें त्याचें इतिकर्तव्य संपतें. मग तो इतर कांहीं करो वा न करो. ब्राह्मणांची देवता जशी मित्र–सूर्य, तशी क्षत्रियांची देवता इंद्र ही होय. ब्राह्मण-क्षत्रियांचे धर्म सांगितल्यानंतर, हे युधिष्ठिरा, आतां तुला वैश्यांचा धर्म सांगतों तो ऐक.

दान, अध्ययन, शुचिमार्गानें द्रव्यार्जन करणें, हा वैश्यधर्म होय. या जगांत वैश्यानें सर्व पशूंचें पालन पित्याप्रमाणें करावें. याखेरीज–म्हणजे हें न करतां–तो जें जें इतर कर्म करील तें तें त्याच्या हातून घडणारें विकर्मच होय. पशूंचें रक्षण केल्यानें वैश्याला अत्यंत मोठें असें सुख मिळतें. ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न केली त्यावेळीं सर्व पशू वैश्यांच्या ताब्यांत दिले व ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्या स्वाधीन सर्व प्रजा केल्या. आतां, वैश्यानें आपली उपजीविका कशावर करावी व त्याची वृत्ति काय, तें सांगतों ऐक.

सहा गाईंचें संरक्षण करणाऱ्या वैश्यानें एका गाईच्या दुधाचा उपयोग करावा. जो वैश्य शंभर गाईंचें पालन करील, त्यानें त्यांतून एक गाय व एक बैल ही आपली वृत्ति म्हणून समजावी. धंदा करून जो नफा होईल, त्याचा सातवा हिस्सा, पशूंच्या शिंगांचा व खुरांचा व्यवहार केल्यास त्यांतील नफ्याचा एक षोडशांश हिस्सा, सर्व पीक व सर्व धान्यें यांच्या व्यापारांतहि नफ्याचा सातवा हिस्सा हीच आपली वार्षिक वृत्ति असें वैश्यानें समजावें व त्यावर आपली उपजीविका करावी. 'मीं पशूंचें रक्षण करणार नाहीं' असला विचारहि वैश्यानें मनांत आणूं नये. पशूंचें रक्षण करण्याची इच्छा वैश्य धरीत असतांना दुसऱ्या कोणीं पशूंचें रक्षण करूं नये.

हे युधिष्ठिरा, आतां मी तुला शूद्राचे धर्म सांगतों, ऐक. प्रजापति ब्रह्मदेवानें शूद्राला त्रैवर्णिकांचा सेवक म्हणून निर्माण केलें आहे. म्हणून, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तीन वर्णांची सेवा करणें हाच शूद्राचा परम धर्म ठरतो. त्रैवर्णिकांची सेवा केल्यानेंच शूद्राला परम सुख प्राप्त होतें, म्हणून त्यानें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तिन्ही वर्णांची यथाक्रम सेवा करावी. शूद्रानें धनसंचय केव्हांहि करूं नये. कारण, पापी माणसाच्या हातीं धन लागलें म्हणजे तो मोठमोठ्यांनाहि आपल्या कह्यांत ठेवतो. द्रव्यलोभानें मोठीं माणसें त्यांच्या आहारीं जाऊं लागलीं म्हणजे त्यांच्या हातून हीन कर्में घडण्याचा संभव असतो; म्हणून शूद्रानें धनसंचय करूं नये. शूद्राची वृत्ति धार्मिक असेल, द्रव्यसंचयाच्या जोरावर इतरांकडून अधर्माचरण सक्तीनें करविण्याइतका तो दुष्ट नसेल, तर त्या शूद्रानें राजाच्या अनुज्ञेनें धनसंचय करावा. शूद्राचा धर्म सांगितल्यावर आतां त्याच्या उपजीविकेचीं साधनें सांगतों, तीं ऐक.

हे युधिष्ठिरा, शूद्राचें पालनपोषण त्रैवर्णिकांनीं करावयाचें असतें. छत्र, शिरोवेष्टन, वाळ्याचे पडदे, पंखे, पादत्राणें वगैरे वस्तू जुन्या झाल्या म्हणजे त्या त्रैवर्णिकांनीं शूद्राला द्याव्या. या जीर्ण झालेल्या वस्तु द्विजांनीं–त्रैवर्णिकांनीं-कधींहि धारण करूं नयेत. कारण, तें शूद्राच्या हक्काचें धन असून तें त्यालाच मिळालें पाहिजे. सेवा करण्याच्या उद्देशानें द्विजादि त्रैवर्णिकांपैकीं ज्या कोणाकडे शूद्र जाईल, त्यानें त्याच्या भरणपोषणाची तजवीज केली पाहिजे, असें धर्मवेत्ते लोक सांगतात. आपल्या शूद्र सेवकांपैकीं कोणी अनपत्य मेला, तर त्याला उद्देशून मालकानें पिंड द्यावा. वृद्ध व दुर्बल अशांचें रक्षण करावें व सेवकानेंहि

आपल्या मालकाला कसल्याहि संकटांत टाकूं नये. कांहीं आपत्तींनीं धन्याचा द्रव्यनाश झाला, तर त्याची विशेष प्रकारें काळजी घेऊन त्याचें पोषण आपणच करावें. शूद्राच्या मिळकतीवर त्याची सत्ता नसून त्यानें आपली मिळकत धन्याला द्यावयाची असते. त्याचें धन त्याच्या मालकाकडे परस्पर जावयाचें असतें.

त्रैवर्णिकांना यज्ञाचा अधिकार सांगितला, तसाच तो शूद्रालाहि आहे. परंतु, शूद्रानें करावयाचा यज्ञ हा अमंगळ असतो. स्वाहाकार, वषट्कार व वैदिक मंत्रांचा उच्चार यांचा अधिकार मात्र शूद्राला नाहीं. म्हणून शूद्रानें व्रतदीक्षा न घेतां अमंत्रक विधीनें पाकयज्ञ स्वतःच करावे. या यज्ञाची दक्षिणा–पूर्णपात्र–दोनशें छप्पन्न मुठी धान्य ही सांगितली आहे. पैजवननामक एका शूद्रानें ऐंद्राग्नाचा अमंत्रक विधि करून एक लक्ष पूर्णपात्रें दक्षिणा दिली होती, असें आमच्या ऐकिवांत आहे. हे युधिष्ठिरा, आतां कदाचित् तूं यावर अशी शंका घेशील कीं शूद्राला जर यज्ञाचा अधिकार नाहीं, तर अमंत्रक कां होईना, यज्ञविधान करण्याचा अधिकार शूद्राला कोठून आला? तर त्याचें उत्तर हे महाभागा, असें आहे कीं त्रैवर्णिक जे जे यज्ञ करतात, त्या त्या यज्ञांचें फळ त्रैवर्णिकांबरोबर शूद्रांनाहि मिळतें; कारण, ते त्यांचीच सेवा करीत असतात. तेव्हां त्रैवर्णिकांनीं केलेले यज्ञ हेच परंपरेनें शूद्रांचेहि यज्ञ ठरतात. पैजवन शूद्रानें दिलेली दक्षिणा असल्याच यज्ञांत दिलेली होती. असो.

सर्व यज्ञांमध्यें श्रद्धायज्ञ हा श्रेष्ठ होय. यज्ञकर्में करणारांचें श्रद्धा हें अत्यंत पवित्र असें दैवत होय. ब्राह्मणहि पण आपापल्या परीनें परस्परांचें श्रेष्ठ दैवतच आहेत. ब्राह्मणांनीं निरनिराळ्या प्रकारच्या कामना मनांत धरून आजवर अनेक यज्ञ केले आहेत. ब्राह्मणांपासून तिन्ही वर्णांची उत्पत्ति असल्यामुळें ब्राह्मणांच्या यज्ञाचा अधिकार ( अमंत्रक ) शूद्रालाहि आहे, हेंच ओघानें ठरतें. देवांचेहि जे देव, मनुष्यांना जसे देव पूज्य, तसे देवांनाहि पूज्य असे जे ब्राह्मण, ते जें तुला सांगतील, तें तुझ्या हिताचेंच असलें पाहिजे. सारांश, शूद्रांसकट चारी वर्णांतील लोक जे जे यज्ञ करतात, ते ते काम्य नसून स्वाभाविक

---

१ 'अष्टमुष्टि भवेत् किंचित् किंचिदष्टौ तु पुष्कलम्। पुष्कलानि तु चत्वारि पूर्णपात्रं प्रचक्षते.'

स्वरूपाचे असतात. ऋग्वेद, यजुर्वेद व सामदेव या तिन्ही वेदांचें ज्ञान असलेला ब्राह्मण हा नित्य देवाप्रमाणें पूज्य होय. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेदाचेंहि ज्ञान नसलेला शूद्र हा त्रैवर्णिकांचा दास असून सूर्य ही जशी ब्राह्मणाची देवता, इंद्र ही जशी क्षत्रियाची देवता, त्याप्रमाणें शूद्राची देवता प्रजापति ही होय. देवतांना उद्देशून मानसयज्ञ करण्याचा अधिकार ब्राह्मणादि शूद्रांना-सर्व वर्णांना-आहे. या यज्ञांतील भागाची देव व इतर जन इच्छा करीत नाहींत असें नाहीं. उलट श्रद्धेच्या उत्कटतेचा भाग यांत जास्तच असल्यानें सर्व लोक याच्या यज्ञांत भाग घेऊं इच्छितात. म्हणून हा श्रद्धायज्ञ सर्व वर्णांना विहित असा मानला आहे. ब्राह्मण हें तिन्ही वर्णांचें असाधारण दैवत आहे. म्हणून हे इतर वर्णांना उद्देशून यज्ञ करीत नाहींत, असें होत नाहीं. या इतर वर्णांसाठीं करावयाच्या यज्ञांतील अग्नि लौकिक स्वरूपाचा–निकृष्ट–असतो व तोहि वैश्यगृहांतूनच आणला जातो. तेव्हां, ब्राह्मण हा सर्व वर्णांचा यज्ञकर्ता होय. अशाप्रकारें यज्ञाशीं संबंध आल्यामुळें सर्व वर्ण चांगलेच ठरतात. ब्राह्मणाला चारी वर्णांतील कन्यांशीं विवाह करण्याची अनुज्ञा असल्यामुळें त्या त्या वर्णांत ब्राह्मणसंतती ही असतेच. तेव्हां सर्व वर्णांत ज्ञातिसाम्यहि आलेंच. ज्याप्रमाणें सर्व वाग्व्यवहाराचें मूळ रूप अकार हेंच असून स्वरभेदानें निरनिराळ्या रूपांनीं प्रकट झाल्यामुळें ऋक्, यजुः, साम अशीं निरनिराळीं रूपें वाणीला प्राप्त होतात, त्याप्रमाणें इतर वर्णत्रय हाहि विस्तार ब्राह्मणाचाच होय.

हे भरतश्रेष्ठा, याविषयींची एक गाथा ( यज्ञस्तुतिरूप श्लोक ) वैखानस मुनींना यज्ञ करण्याची इच्छा उत्पन्न झाली, त्यावेळीं विष्णूंनीं गाइली म्हणून प्राचीन इतिहासवेत्ते लोक सांगतात. ती गाथा अशी–सूर्योदय झाल्यावर किंवा सूर्योदयापूर्वीं मनुष्यानें जितेंद्रिय होऊन श्रद्धायुक्त अंतःकरणानें अग्नीमध्यें हवन करावें. श्रद्धेचें बल फार मोठें आहे. विधि चुकल्यामुळें यज्ञकुंडांत आहुति जरी कशी तरी पडली, तरी तोहि एक प्रकारचा यज्ञच; विधीप्रमाणें अग्नींत आहुति बरोबर पडली तर तो सर्वोत्कृष्ट यज्ञ होय. यज्ञाचीं रूपें अनेक प्रकारचीं असून त्याचीं कर्मविधानें व फलेंहि अनेक स्वरूपाचीं आहेत. पक्क्या ज्ञानाच्या योगानें ज्याचीं मतें निश्चित झालेलीं आहेत व म्हणून जो हीं अनेक यज्ञरूपें जाणतो असा श्रद्धायुक्त द्विजच यज्ञ करण्याला अधिकारी होय. चोर असो, क्षुल्लक पापें करणारा इसम असो, किंवा अतिशय पापी असा मनुष्य असो, त्याला जर यज्ञ करण्याची इच्छा झाली, तर त्याला साधुच

म्हणतात. ऋषिजन त्याला चांगला म्हणून उत्तम प्रकारें स्तुति करतात, ह्यांत संशय नाहीं. तेव्हां या सर्वांचा निष्कर्ष एवढाच कीं चारी वर्णांनीं सर्वदा यज्ञ करावा. या तिन्ही लोकांत यज्ञापरतें श्रेष्ठ कांहीं नाहीं. म्हणून पुरुषानें निर्मत्सरपणानें श्रद्धेचें पवित्र कवच धारण करून, यथाशक्ति व इच्छेस येईल त्याप्रमाणें यज्ञ करावा, असें शहाणीं माणसें सांगतात. १२.१.६०.

---

## अध्याय ६१ वा.

[ १. युधिष्ठिराला आश्रमचतुष्टयाचें धर्मकथन. ]

( १ ) भीष्म—हे सत्यपराक्रमी, महाबाहो युधिष्ठिरा, चारहि आश्रमांचीं नांवें व कर्में मी तुला सांगतों, तीं ऐक. ज्यांत भिक्षावृत्तीनें रहावयाचें असतें तो वानप्रस्थाश्रम, गृहस्थाश्रम आणि ब्रह्मचर्याश्रम हे तीन व ब्राह्मणांनींच आचरावयाचा असा चौथा संन्यासाश्रम हे चार आश्रम होत. जटाधारणसंस्कार, उपनयनसंस्कार, वेदाध्ययन, अग्न्याधानादिक कर्मांनीं गार्हस्थ धर्माचें आचरण, इत्यादि गोष्टींचें आचरण करून मग, पत्नीसहित अथवा एकट्यानेंच इंद्रियनिरोध करून व मनःसंयम करून मनुष्यानें वानप्रस्थाश्रम घ्यावा. वानप्रस्थाश्रम घेतल्यानंतर त्या ठिकाणीं आरण्यक शास्त्रांचें यथाविधि अध्ययन करावें. नंतर मनःसंयमनानें उर्ध्वरेतस् झाल्यानंतर प्रव्रजन करावें. असें प्रव्रजन करणारा मनुष्य अक्षर परब्रह्माशीं तद्रूप होतो.

हे राजा, ऊर्ध्वरेत्या मुनींचीं हींच कर्में होत व ब्राह्मणानें विचारीपणानें हींच कर्में प्रथम करावीं. हे युधिष्ठिरा, ब्रह्मचर्याचें पालन यथाविधि व यावत्कालपर्यंत केल्यानंतर एकाद्या ब्राह्मणाला मोक्षप्राप्तीच्या इच्छेनें एकदम संन्यास घ्यावासा वाटला तर गार्हस्थ धर्म बाजूला ठेवून संन्यास घ्यावयास त्याला अधिकार आहे. ज्या ठिकाणीं सूर्यास्त होईल, तेथें शयन करावें; कोणत्याहि प्रकारची इच्छा मनांत धरूं नये; घर करून राहूं नये; यदृच्छया ज्या वेळेस जें मिळेल त्यावर उपजीविका करावी; दांतवृत्तीनें इंद्रियदमन करावें, हा मुनीचा धर्म होय. कसलीहि वासना नसलेला, सर्वांशीं समभावानें वागणारा, भोगांचा त्याग केलेला, विकाररहित असा विप्र कल्याणकारक अशा संन्यासाश्रमाची प्राप्ति झाल्यामुळें, ब्रह्मपदाला जाऊन पोंचतो. तसेंच वेदांचें अध्ययन केल्यावर यज्ञादि सर्व कर्में करून प्रजोत्पादन

करून, सर्व सुखांचा उपभोग घेत घेत, मुनिधर्माला संमत असलेल्या दुश्चर अशा गृहस्थाश्रमाचें पालन शुद्ध अंतःकरणानें करणारा मनुष्यहि मोक्षपदाला जातो. या गृहस्थाश्रमाचें आचरण करणाऱ्या मनुष्यानें, स्वस्त्रीच्या योगानें संतुष्ट असावें, ऋतुकालीं स्वस्त्रीशीं गमन करून इतर कालांत ब्रह्मचर्य पाळणारा, वेळ पडल्यास नियोगधर्माचें अवलंबन करणारा, आपमतलबी, व धूर्तपणा अंगीं नसलेला, ज्याच्या वर्तनांत कुटिलपणा नाहीं, जो मित आहार करणारा, देवाविषयीं भक्ति असलेला, दुसऱ्यांनीं आपल्यावर केलेल्या उपकारांची आठवण ठेवणारा, खरें व मृदु बोलणारा, ज्याच्या अंगीं दुष्टपणा नाहीं, जो क्षमाशील, दांत, गुरु व शास्त्र यांच्या आज्ञा मानणारा, हव्यकव्यादि यज्ञकर्मांचे ठिकाणीं सावधान असणारा, ब्राह्मणांना सतत अन्नदान देणारा, कोणाचाहि मत्सर न धरणारा, सर्व वर्णांना दान देणारा, वैतान नांवाचें श्रौतकर्म–यज्ञ–नित्य करणारा, असा असावयास पाहिजे.

हे युधिष्ठिरा, या संबंधांत प्रभावशाली महर्षींनीं, तपस्तेजाच्या सामर्थ्यानें स्फुरलेलें, अत्यंत गहन अर्थ असलेलें, असें एक नारायणगीत सांगितलें आहे, तें मी तुला आतां सांगतों, ऐक. ‘ खरें बोलणें, सरळपणानें वागणें, धर्माचें व अर्थाचें अर्जन करणें–या पुरुषार्थांचें साधन करणें, आणि स्वस्त्रीशीं विहितकालींच रत होणें, या गोष्टींचें आचरण करून गृहस्थानें इहपरलोकीं सुख मिळवावयाचें असतें. गार्हस्थधर्माचें आचरण करणाऱ्या मनुष्यानें बायकोचें व मुलांचें पोषण करणें, वेदांचें अध्ययन करणें, हीं कर्में करावयाचीं असतात. यांनींच हा आश्रम परमश्रेष्ठ होतो,’ असें महर्षींनीं सांगितलें आहे. हे युधिष्ठिरा, अशा प्रकारें जो ब्राह्मण यज्ञशील राहूनहि या गृहस्थाश्रमाचें यथाविधि अवलंबन करतो व गृहस्थाच्या शुद्ध वृत्तीनें–म्हणजे, न्याय्य मार्गानें जें द्रव्य मिळेल, तेवढ्यावर उपजीविका करून–जो रहातो, त्याला स्वर्गाचें विशुद्ध सुख मिळतें. अशा गृहस्थाला देहपातानंतर परलोकीं किंवा तो मनःसंयमी–समाहित–असेल तर याच लोकीं नुसत्या देहाभिमानाच्या त्यागानें, त्याच्या वासनांचा क्षय न होतां त्या सर्व कालीं सर्व स्थलीं अनंतस्वरूपांत त्याला प्राप्त होतात. त्यानें मनांत धरलेल्या इच्छांचें अनंत व अक्षय्य फल त्याला मिळतें. हे युधिष्ठिरा, ब्रह्मचाऱ्यानें स्मरण करतांना, जप करतांना, देवतांचें पूजन करतांना, नेहमीं एकटेंच असावें, एकाच आचार्यांचें उपासन करावें, शरीरावर मलपंक धारण करावा. त्यानें नेहमीं व्रतस्थ; नेहमीं दीक्षित; नेहमीं इंद्रियें आपल्या

आहारीं ठेवून वेदाचे अध्ययनांत श्रौतकर्में करीत रहावें. गुरुपाशीं अध्ययन करणें, नेहमीं त्याला नमस्कार करणें, सेहाहि प्रकारच्या कर्मांपासून अलिप्त राहून त्यांचे ठिकाणीं प्रवृत्त न होणें, निग्रह किंवा अनुग्रह यांच्या योगानें कोणावरहि अधिकार न गाजविणें, आपला द्वेष करणारांशीं कोणताहि संसर्ग न ठेवणें, हा हे युधिष्ठिरा, ब्रह्मचाऱ्याचा धर्म होय. १२.१.६१.

---

## अध्याय ६२ वा.

[ १. युधिष्ठिराला भीष्माकडून ब्राह्मणधर्मांचें कथन. ]

( १ ) युधिष्ठिर—पथ्यकर व सुखकारक, उन्नतीच्या मार्गाला नेणारे, ज्यामध्यें हिंस्रपणा नाहीं व माझ्यासारख्यांना सुखावह असे धर्मप्रकार, हे पितामहा, मला सांग.

भीष्म—हे राजा, ब्राह्मणाला चारी आश्रमांचा अधिकार आहे. इतर तिन्ही वर्णांना हा अधिकार नाहीं. हे महाभागा, राजाला सर्वतोपरि योग्य अशीं, स्वर्गप्राप्तिकारक अनेक कर्में सांगितलीं आहेत. तुझ्या प्रश्नांच्या उत्तरांत या सर्वांचा समावेश केला नाहीं. क्षात्रधर्मांमध्यें सर्व गोष्टी यथाविधि सांगितल्या आहेत. जो मनुष्य ब्राह्मण असून क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांच्या कर्मांचें आचरण करितो, त्या मंदबुद्धि ब्राह्मणाचा या लोकीं उपहास होतो व परलोकीं त्याला नरकप्राप्ति होते. सेवक, कुत्रे, लांडगे व पशु यांना ज्या तऱ्हेनें लोक लेखतात, त्याच तऱ्हेनें अशीं विकर्में करणाऱ्या माणसालाहि लेखतात. हे पांडवा, षट्कर्मांमध्यें ज्याची प्रवृत्ति उत्तम आहे, चारी आश्रमांमध्यें हीं कर्में करणाऱ्या, सर्व धर्मांनीं युक्त असलेल्या, चापल्यरहित, इंद्रियें स्वस्वाधीन ठेवणाऱ्या, तपाचे ठिकाणीं नेहमीं रत रहाणाऱ्या, मनांत कोणतीहि आशा न बाळगणाऱ्या, वदान्य व विशुद्ध ब्राह्मणाला अक्षय लोकांची प्राप्ति होते. कोणतेंहि कर्म करतांना, मनुष्य ज्याला उद्देशून, जशा प्रकारचें, ज्या साधनांनीं व ज्या ठिकाणीं जें कर्म करितो, तें ठिकाण, तीं साधनें, ते प्रकार व तें उद्दिष्ट हीं सर्व त्याला चांगलींच–गुणयुक्त–अशींच वाटतात. व्यापारधंदा, शेती, सावकारी, मृगयेच्या योगानें उपजीवन करणें, या सर्व गोष्टींबरोबरच हे राजेंद्रा, अत्यंत विस्तृत अशा वेदार्थांचें माहात्म्य तुला कळून

---

१ प्राणायामः, प्रत्याहारः, ध्यानं, धारणा, तर्कः, समाधिः—

येईल. कालाच्या प्रेरणेनें, निरनिराळ्या कालांवरून उचित वा अनुचित ठरणारीं अशीं उत्तम, मध्यम व अधम कर्मे मनुष्य अगतिक होऊन करीत असतो. याप्रमाणें जन्मांतरींच्या संचिताच्या प्रेरणेनें प्रकृति नेईल तिकडे वहात जाऊन भलीं-वाईट कर्मे मनुष्य जरी करीत असला तरी, प्राचीन कर्मांचा–जन्मांतरींच्या कर्मांचा–देहपाताबरोबर लय होत असतो, शुभाशुभ फलांची प्राप्ति करून देणारीं या जन्मांतील जीं कर्मे आहेत, त्यांच्यापैकीं अभीष्ट कर्मे करण्याला जीव प्रवृत्त होतो. म्हणून विधिनिषेध हे सार्थ ठरतात. सर्व बाजूंनीं इहजन्मीं करण्याचीं–पुढल्या सुखासाठीं तयारी म्हणून करण्याचीं–जीं कर्मे आहेत, त्यांच्या बाबतींत मनुष्य स्वतंत्र असल्यानें विधि व निषेध यांच्यावर वैयर्थ्यापत्ति येत नाहीं. १२.१.६२.

---

## अध्याय ६३ वा.

[ १. ब्राह्मणांनीं कोणत्या धर्माचा त्याग करावा, त्याचें कथन. २. क्षत्रियादि धर्मांचें कथन व राजधर्मप्रशंसा. ]

भीष्म—धनुष्याला दोरी चढविणें, शत्रूचा निःपात करणें, शेतकी, व्यापार, पशुपालन व अर्थप्राप्ति यांसाठीं दुसऱ्याची सेवा करणें, हीं ब्राह्मणाला अत्यंत निषिद्ध अशीं कर्मे होत. हे राजा, ब्राह्मणवर्णाच्या गृहस्थाश्रम्यानें मोक्ष-प्राप्तीसाठीं वेदाध्ययन व षट्कर्मे करावीं. या षट्कर्मांचें आचरण केल्यानंतर ब्राह्मण गृहस्थाश्रम्याला वानप्रस्थाश्रम विहित म्हणून सांगितला आहे. वानप्रस्थ असतांना यानें राजसेवा, शेतकीवर उपजीविका करणें व व्यापारधंदा, आचारामधील वांकडेपणा, अगम्यगमन–परस्त्रीसंबंध, व्याजबट्ट्याचा धंदा इत्यादि सर्व गोष्टी वर्ज्य केल्या पाहिजेत. हे राजा, धर्माचा त्याग करणारा, शीलानें वाईट असणारा, शूद्र स्त्रीशीं संबंध ठेवणारा, चहाडखोर, नृत्यावर उपजीविका करणारा, राजाची सेवा करणारा, सारांश असलीं विकर्मे करणारा ब्राह्मणब्रुव–ब्रह्मबंधु हा शूद्रच होय. हा वेदाध्ययन करीत असो वा नसो, याला, हे राजा, शूद्रासमान मानून शूद्राप्रमाणेंच–पंक्तीच्या बाहेर–खाऊं घालावें. राजा, अशा वर्तनाचे सर्व ब्राह्मण शूद्रासारखेच होत, त्यांना कोणत्याहि देव-कार्याला घेऊं नये. ज्या ब्राह्मणानें आपली मर्यादा टाकिली, ज्याची वागणूक अपवित्र झाली, वृत्ति क्रूर बनली, आचार हिंसात्मक होऊं लागला, ज्याची

धर्मकार्याकडील प्रवृत्ति सुटली, त्याला हव्यकव्यांत भाग देऊं नये व इतर कोणतेंहि दान असल्या ब्राह्मणाला देणें अयोग्य आहे. म्हणून, इंद्रियदमन, आचरणांतील पावित्र्य आणि सरळपणा हा ब्राह्मणाचा धर्म होय आणि तोच त्याला विहित म्हणून सांगितलेला आहे.

हे राजा, ब्रह्मदेवानें चारी आश्रमांचा आचार पूर्वी ब्राह्मणांकरितां निर्माण केला, हें तुला सांगितलेंच आहे. ज्यानें इंद्रियदमन केलें; यज्ञांतील सोमरसाचें जो पान करितो; जो आर्यशीलाचा आहे; ज्याची वृत्ति दयाशील असून मनांत कोणतीहि वासना जो धरीत नाहीं; ज्यानें सर्वत्र क्षांति धारण केली आहे; जो आचाराचा सरळ; कोमल वृत्तीचा; सुष्ठ मनाचा, तोच ब्राह्मण या पदवीला पात्र होय. इतर मनुष्य हा ब्राह्मण नव्हे; तो पापकर्मा होय. हे राजन्, धर्माची इच्छा धरणारे सर्व लोक सुद्धां शूद्राचा किंवा वैश्याचा किंवा राजपुत्राचा आश्रय करतात. म्हणून हे लोक शांति व धर्म यांच्या ठिकाणीं आसक्त नाहींत, असें पाहून भगवान् विष्णूला ते प्रिय होत नसतात. हे राजा, पृथ्वीतलावर सर्व लोकांत हा चातुर्वर्ण्यधर्म व चतुराश्रमधर्म चालला नाहीं तर वेदविद्येचें अध्ययन नाहींसें होईल. सर्व यज्ञकर्मे थांबतील; सर्व लोकांचीं कर्में बंद पडतील व जो तो आपापला आश्रमधर्म व वर्णधर्म टाकून देईल. तेव्हां हे पांडवा, त्रैवर्णिकांनीं आपापल्या आश्रमधर्मांचें सेवन करावें, अशी ज्याला इच्छा आहे, त्याला चतुर्वर्णांच्या धर्मासंबंधींची जी जी माहिती असणें अवश्य आहे, ती ती माहिती मी तुला सांगतों, ऐक. परमार्थविचार समजून घेण्याची इच्छा असणारा, ज्यानें स्वतःच्या वर्णधर्मांचें आचरण यथाविधि केलें आहे, ज्यानें प्रजोत्पादन यथाशास्त्र केलें आहे अशा शूद्रानें राजाची अनुज्ञा मिळाल्यानंतर सर्व आश्रमधर्मांचें आचरण करावें. कारण, असा शूद्र आचारनिष्ठ असल्यास त्रैवर्णिकांसारखाच होय. पण, शमदमादि धर्मांनीं युक्त नसलेल्या शूद्रास हे चारी आश्रमधर्म विहित नाहींत.

अशाप्रकारें वानप्रस्थाश्रम घेणाऱ्या शूद्राला, वैश्याला व राजपुत्रालाहि भैक्ष्यचर्य विहित म्हणून सांगितलें आहे. वर्णधर्मांचें व्यवस्थित तऱ्हेनें पालन केल्यावर व वृद्धावस्थेंत राजाची यथायोग्य सेवा केल्यानंतर त्याची परवानगी घेऊन मग वैश्यानें संन्यासाश्रम स्वीकार करावा. धर्मानें सांगितल्याप्रमाणें वेदांचें यथाशास्त्र अध्ययन केल्यावर तसेंच राजशास्त्रांचें शिक्षण झाल्यावर, राजानें गृहस्थाश्रम्याचीं प्रजोत्पादनादि कर्तव्यें संभाळावीं, यज्ञांत सोमरसाचें पान करून, सर्व प्रजांचें यथान्याय

पालन करून, धर्मांच्या विधीप्रमाणें राजसूय, अश्वमेध व असेच दुसरे मोठाले यज्ञ करावे. नाना ठिकाणच्या ब्राह्मणांना बोलावून, त्यांच्या विद्येप्रमाणें त्यांना यथाधिकार दक्षिणा द्याव्या व समरभूमीवर थोडाफार विजय मिळविल्यानंतर, राज्यावर प्रजेचें पालन करूं शकणाऱ्या स्वतःच्या पुत्राचें अधिष्ठापन करावें, किंवा (पुत्र समर्थ नसेल तर) दुसऱ्या अन्यगोत्राच्या क्षत्रियाची राज्यावर स्थापना करावी. पितृयज्ञानें पितरांचा संतोष केल्यावर, देवांना यज्ञांनीं व ऋषींना वेदाध्ययनानें संतुष्ट करावें. सारांश, देवऋण, ऋषिऋण व पितृऋण हें ऋणत्रय यथासांग फेडल्यानंतर, अंतकाल समीप आला असतांना जो संन्यासग्रहणाची इच्छा करितो त्याला, हे राजेंद्रा, मोक्षप्राप्ति होते. गृहस्थाश्रमाचा त्याग केल्यावर सुद्धां राजानें भिक्षावृत्तीचें अवलंबन केवळ वेदान्तश्रवणाच्या इच्छेनेंच करावें. पोट भरण्याकरितां दुसऱ्याची सेवा करून भिक्षावृत्तीचा अवलंब केव्हांहि करूं नये. हे भूरिदक्षिण युधिष्ठिरा, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या वर्णांना संन्यास ब्राह्मणांप्रमाणें आवश्यक नाहीं; तें त्यांचें नैष्ठिक कर्म नव्हे. या त्रैवर्णिकांनीं जो त्याग करावयाचा तो वर्णधर्मांत व्याघात आणणाऱ्या विक्षेपकारी कर्मांचा होय व हा त्याग चारी वर्णांना व चारी आश्रमांनाहि विहित आहे. मनुष्यलोकांत सर्वश्रेष्ठ असलेला, बाहुबलाच्या जोरावर अधिष्ठित झालेला, असा धर्म आचरण करणाऱ्या क्षत्रियांना श्रेष्ठ लोकांची प्राप्ति होते. राजधर्मापासूनच त्रैवर्णिकांचे इतर धर्म व त्यांचे उपधर्म उत्पन्न होतात, अशी श्रुति आहे.

(२) हे राजा, हत्तीच्या पावलामध्यें ज्याप्रमाणें इतर सर्व प्राण्यांचीं पावलें मावतात, त्याप्रमाणें राजधर्मामध्यें इतर सर्व धर्मांचा अंतर्भाव होतो. धर्मवेत्ते पुरुष असें सांगतात कीं, इतर तीन्ही वर्णांच्या धर्मांचीं फलें अल्प व थोडा काळ टिकणारीं असून क्षत्रियधर्माचें फळ पुष्कळ व अनंत काळपर्यंत टिकणारें आहे. सर्व धर्म हे राजधर्मप्रधान आहेत. कारण, त्रैवर्णिक (ब्राह्मण, वैश्य व शूद्र) हे पाल्य असून राजानें त्यांचें पालन करावयाचें असतें. सर्व प्रकारच्या त्यागाचा अंतर्भाव राजधर्मांत होतो आणि त्याग हाच सर्वश्रेष्ठ असा पुरातन, सनातन धर्म आहे, असें शहाणे पुरुष सांगतात. राजा, जगांतून दंडनीति नाश पावली तर वेदविद्या नाहींशी होईल. सर्व धर्मांचा ऱ्हास होऊन जाईल. सनातन क्षात्रधर्मांचा व राजधर्मांचा त्याग केल्यास सर्व आश्रमांचे सर्वच धर्म लुप्त होतील. राजधर्मांत सर्व त्याग येतो; राजधर्मांतच सर्व दीक्षा येतात; सर्व प्रका-

रच्या विद्या राजधर्मांत आहेत; सर्व लोक राजधर्मांतच अंतर्भूत होतात. ज्याप्रमाणें नीच लोकांनीं केलेला प्राणिवध, हा त्यांच्या धर्मांच्या व विद्येच्याहि आड येतो, त्याप्रमाणेंच हे राजा, राजधर्माला सोडून आचरिलेले इतर धर्महि आपापलीं फळें योग्य रीतीनें देऊं शकत नाहींत. १२.१.६३.

---

## अध्याय ६४ वा.

[ १ क्षात्रधर्मश्रेष्ठत्वकथन. २ इंद्र-मांधातृ-संवाद. ]

भीष्म—हे पांडवा, चारी आश्रमधर्म व यतिधर्म या लोकश्रेष्ठ व वेदश्रेष्ठ धर्मांचा अंतर्भाव राजधर्मांतच होतो. सर्व कर्में क्षात्रकर्मांच्या ठिकाणींच विलीन होतात. क्षात्रधर्म सुव्यवस्थित चालला तर हे राजा, सर्व जीवलोक निरिच्छ होतात; कारण, मग, त्यांना आपल्या वासना पूर्ण होतील कीं नाहीं, याचें भयच उरत नाहीं. अप्रत्यक्ष प्रकारांनीं अनेकविध फळ देणारा असा हा जो आश्रमधर्म त्याचें शाश्वत असें स्वरूप विरुद्ध भासणाऱ्या वेदवचनांवरून अप्रमाण ठरविण्याचा कित्येक लोक प्रयत्न करीत असतात. तर दुसऱ्या कांहीं लोकांचा, या अपार धर्मांचें स्वरूप साकल्यानें त्यांच्या डोळ्यांपुढें उभें न राहिल्यामुळें गोंधळ होतो व ठाम रीतीनें धर्मांचें स्वरूप कसें मांडावें, या बाबतींत ते हतप्रभ होतात. परंतु, क्षात्रधर्मांचें स्वरूप तसें नाहीं. क्षात्रधर्म हा प्रत्यक्ष प्रकट दिसणारा, पुष्कळ सुखाची प्राप्ति करून देणारा, स्वतःच्या प्रत्ययाला येणारा, ज्यांत कसलाहि छल—कपट—नाहीं असा, सर्व लोकांचें हित करणारा धर्म आहे. गृहस्थाश्रमाच्या ठिकाणीं तीन्ही आश्रमांचा अंतर्भाव होतो, तसाच नैष्ठिक ब्रह्मचारी व वानप्रस्थ यांचाहि अंतर्भाव त्यांतच होतो, असें पूर्वींच सांगितलें आहे. त्याचप्रमाणें हे राजेंद्रा, राजधर्मांतहि सर्व धर्मांचा अंतर्भाव होतो.

हे राजेंद्रा, पूर्वीं अनेक ठिकाणचे शूर शूर राजे दंडनीति म्हणजे काय तें समजून घेण्यासाठीं, सर्व प्राणिमात्रांचा शास्ता, आदिदेव, प्रभु, नारायण जो विष्णु त्याजकडे गेले व आपले आश्रमधर्म व दंडनीतीनें सांगितलेला धर्म यांची तुलना करून त्यांत श्रेष्ठ कोण, याबद्दल त्यांना निर्णय होईना, म्हणून ईश्वराच्या सिद्धांतवचनाची वाट पहात त्याची उपासना करूं लागले. ही हकीगत तुला सांगितलीच आहे. साध्य, देव, अष्टवसु, अश्विनीकुमार, एकादश

रुद्र व सर्व मरुद्गण हे सर्वजण पूर्वीं आदिदेव जो भगवान् विष्णु त्यानें उत्पन्न केलेले असून सर्व क्षात्रधर्माचेंच आचरण करणारे होते. याविषयीं धर्मांचा अर्थ निश्चित करून सांगणारी एक कथा मी तुला सांगतों, ती ऐक.

पूर्वींच्या काळीं दानवांनीं व्याप्त झाल्यामुळें हें सर्व विश्व एकदां निर्मर्याद होऊन गेलें. अशा वेळेला हे राजा, या पृथ्वीतलावर मांधाता नांवाचा एक शूर राजा होऊन गेला. हे भरतश्रेष्ठा, या राजानें आपल्याला भगवान् विष्णूचें दर्शन घडावें म्हणून, त्या आदिमध्यांतहीन प्रभूला पहावें, म्हणून एक यज्ञ केला व तो भगवान् विष्णूच्या पायांपाशीं डोक्यानें चालत गेला. तेव्हां भगवंतानें इंद्राचें रूप धारण करून त्याला दर्शन दिलें. इंद्राचें रूप धारण केलेल्या त्या भगवान् विष्णूला पाहतांच मांधात्यानें इतर राजांसहवर्तमान त्याचें पूजन केलें. नंतर हा मांधाता राजा व तो महात्मा इंद्र यांचा श्रीविष्णूच्या संबंधानें संवाद झाला, तो असाः—

(२) इंद्र—हे धार्मिकश्रेष्ठा, ज्याची माया अनंत आहे व ज्याचें मंत्रसामर्थ्यहि अमित आहे अशा त्या अप्रमेय, आदिदेव, पुरातन नारायणाचें दर्शन घेण्याची तुझी इच्छा आहे. त्याला भेटून तुला काय मिळवावयाचें आहे तें सांग. या विश्वरूप भगवंताचें दर्शन मलाहि होणें शक्य नाहीं किंवा साक्षात् ब्रह्मदेवालाहि ही गोष्ट शक्य नाहीं. तेव्हां तुझी दुसरी जी कांहीं इच्छा असेल ती पूर्ण करण्यास मी तयार आहें. तूं मर्त्यलोकींचा राजा आहेस, तुझ्या काय दुसऱ्या इच्छा असतील त्या सांग. हे राजा, तूं सत्यमार्गानें चालणारा, परम धार्मिक, जितेंद्रिय, शूर आणि देवांचा अत्यंत आवडता असा आहेस. तुझी बुद्धि, भक्ति व श्रद्धा हीं तीन्ही उत्तम आहेत. म्हणून तूं मागशील, ते वर मी तुला देईन.

मांधाता—भगवंता, आपल्यापुढें माथा नम्र करून एवढीच प्रार्थना आहे कीं, त्या आदिदेव भगवंताचें दर्शन मला घडावें. तुझ्या प्रसादानें तें निःसंशय घडेल. सर्व प्रकारच्या कामनांचा त्याग करून धर्माचरण करण्याच्या इच्छेनें लोकांनीं घालून दिलेल्या चांगल्या मार्गानें अरण्यांत जाण्याची माझी इच्छा आहे. क्षात्रधर्माचें मीं आजवर पुष्कळ प्रकारें अवलंबन केलें, स्वर्गसुख भोगलें, पृथ्वीवर स्वतःचें यशहि प्रस्थापित केलें; परंतु प्रत्यक्ष आदिदेव भगवान् जो विष्णु त्यापासून प्रवृत्त झालेला असा जो लोकश्रेष्ठ धर्म त्याचें आचरण कसें करावें, हें ज्ञान मला अजून झालें नाहीं.

इंद्र—ज्यांच्या जवळ सैन्यबल नाहीं, असे धर्मपर लोक दुसऱ्यांना परागतीला नेऊं शकत नाहींत; इतकेंच नव्हे, तर ते स्वतःहि त्या गतीला जाऊं शकत नाहींत. परमेश्वरानें प्रथम क्षात्रधर्म निर्माण केला व बाकीचे धर्म त्याचे अंगभूत म्हणून निर्माण झाले. देवानें नश्वर असे अनंत धर्म निर्माण केले आहेत, पण ते क्षात्रधर्मापासून वेगळे आहेत, त्यांमध्यें विशेष कांहीं आहे, असें नाहीं. या धर्मांत सर्व धर्मांचा अंतर्भाव झालेला आहे, म्हणून क्षात्रधर्म सर्वश्रेष्ठ होय, असें म्हणतात. अतिशय तेजस्वी असे ऋषि व देव पूर्वीं संत्रस्त झाले असतांना शत्रूचें निर्दाळण करून भगवान् विष्णूनें क्षात्रधर्माच्या आचरणानेंच त्यांची मुक्तता केली. त्यावेळेस जर भगवंतानें आपल्या अपार सामर्थ्यानें सर्व शत्रूंचा व राक्षसांचा निःपात केला नसता, तर आज ब्राह्मण वगैरे वर्ण, हा लोकादिकर्ता देव, हा धर्म, हा आर्यधर्महि शेष राहिला नसता. आदिदेव नारायणानें या पृथ्वीला व असुरांना जर जिंकलें नसतें, तर ब्राह्मणादि चारी वर्ण व चारी आश्रमांचे धर्म ब्राह्मण्याचा विनाश होऊन कधींच नष्ट झाले असते. शाश्वत शाश्वत म्हणून म्हटल्या जाणाऱ्या या धर्माचा आजवर शेंकडो वेळां नाश झाला आहे व तितक्या वेळां क्षात्रधर्मानेंच त्यांचा पुनरुद्धार केला आहे. प्रत्येक युगायुगाचे ठायीं आदिधर्मांची प्रवृत्ति झाली आहे. म्हणूनच क्षात्रधर्माला सर्वश्रेष्ठ धर्म असें म्हणतात. स्वार्थत्याग, सर्वा भूतीं दयाशील वृत्ति, सर्व लोकांच्या स्वभावाचें ज्ञान, त्यांचें पालन व उद्धार करण्याची शक्ति, खिन्न व पीडित झालेल्यांचा दुःखपरिहार, हीं राजाच्या क्षात्रधर्माचीं मुख्य लक्षणें होत. निर्मर्याद रीतीनें वागणारे, कामक्रोधांच्या आहारीं जाऊन अनाचारानें वागणारे लोक पाप करीत नाहींत, तें राजाच्या भीतीमुळें होय आणि म्हणून सर्व धर्मांचें ज्ञान असलेले आचारसंपन्न शिष्टलोक या क्षात्रधर्मालाच चांगला धर्म असें म्हणतात. राजांनीं राजधर्मानें पुत्राप्रमाणें पालन केलेली प्रजा या पृथ्वीतलावर सुखानें नांदते यांत संशय नाहीं. या क्षात्रधर्माला सर्व श्रेष्ठ मानतात. सर्व धर्मांत श्रेष्ठ, सर्व लोकांत उत्कृष्ट, अत्यंत पुरातन, शाश्वत व सर्वतोमुख आणि अक्षराची प्राप्ति करून देणारा, असा हा क्षात्रधर्म आहे. १२.१.६४.

---

## अध्याय ६५ वा.

[ १ इंद्रानें मांधात्याला सांगितलेल्या राजधर्माचें भीष्म युधिष्ठिराला कथन करितो. ]

(१) इंद्र—अशा प्रकारचें सामर्थ्य असणारा, सर्व धर्मांचा ज्यांत समावेश होतो असा, हा क्षात्रधर्मच सर्व धर्मांत श्रेष्ठ आहे. लोकहितांत दक्ष असणाऱ्या तुमच्या सारख्या उदार महात्म्यांनीं याचेंच आचरण करावें. तें तुम्हीं न केलें तर प्रजांची उत्पत्ति व वाढ खुंटेल. सर्व प्राण्यांबद्दल दयाशील असणाऱ्या राजानें भूसंस्कार म्हणजे जमिनीची मशागत झाली आहे कीं नाहीं तें पहाणें; राजसंस्काराला योग्य अशा तऱ्हेचे राजसूय, अश्वमेधादि यज्ञ करणें, भिक्षावृत्तीचा स्वीकार केव्हांहि न करणें, प्रजेचें यथान्याय पालन करणें व समरभूमीवर देहत्याग करणें हाच आपला श्रेष्ठ धर्म मानला पाहिजे. मुनिजन त्याग हा परमश्रेष्ठ धर्म होय असें मानतात. सर्व वस्तूंत आवडतें असें ज शरीर त्या शरीराचा समरभूमीवर त्याग करणारे राजे लोक राजधर्मांत असूनहि सर्व श्रेष्ठ अशा त्यागधर्माचेंच आचरण प्रत्यक्ष करतात. पुष्कळ विद्या संपादन करून, गुरूची शुश्रूषा करून व परस्परांचा संग्रामांत संहार करून स्वबल वाढविणें हा क्षत्रियांचा धर्म होय म्हणून मुनिजन सांगतात. धर्माचरणानें वागण्याची इच्छा धरणाऱ्या क्षत्रियानें ब्रह्मचर्यानें असावें व या धर्माचें पालन करावें. रोजच्या व्यवहारांतील संवयीमुळें ज्या ज्या सामान्य वस्तूंबद्दल आवड उत्पन्न झाली असेल किंवा ज्या वस्तूचा तिटकारा आला असेल, ती ती आवड अगर तिटकारा यांचा यत्नानें त्याग करणें हा क्षत्रियाचा धर्म होय. यानें नाना प्रकारच्या योगांनीं, नियमांनीं व पुरुषार्थप्रकारांनीं चातुर्वर्ण्याची स्थापना करून त्याचें पालन करावयाचें असतें. सर्व धर्मांनीं युक्त असा हा क्षात्रधर्मच सर्व प्रकारच्या उद्योगांनीं युक्त असल्यामुळें श्रेष्ठ होय.

जे जे वर्ण आपापल्या धर्मांचें आचरण करीत नाहींत व एवढेंच करून न रहातां त्या त्या धर्मांचें स्वरूप विपर्यस्त करून लोकांपुढें मांडतात, ते लोक निर्मर्याद, नेहमीं अर्थलोभांत बुडालेले असे असून त्यांना शहाणे लोक मनुष्यरूपी पशूच समजतात. असल्या मनुष्यरूपी पशूंनाहि जो आपल्या दंडनीतीनें सरळ मार्गानें वागावयास लावतो, नीतीच्या मार्गाला लावतो, तो क्षत्रियधर्म संन्यासापेक्षां केव्हांहि श्रेष्ठच होय. तिन्ही वेदांचें अध्ययन केलेल्या ब्राह्मणांना जीं यज्ञादिक कर्में सांगितलीं आहेत व ज्या ज्या आश्रमांचें आचरण त्यांना विहित म्हणून सांगितलें आहे, त्या त्या आश्रमधर्मांचा अवलंब

त्यांनीं करावा, हें ब्राह्मणाचें श्रेष्ठ कर्तव्य होय. याहून इतर कर्में ब्राह्मण करतांना दिसेल, तर तो शूद्रवत् समजून त्याचा वध करावा. हे राजा, चारी आश्रमधर्म व वेदधर्म हे ब्राह्मणांनींच पालन करावयाचे असून ते त्यांच्याकरितां सांगितले आहेत; इतरांनीं त्यांचा अवलंब करूं नये. इतर प्रकारांनीं वागणाऱ्या ब्राह्मणाला योग्य ती वृत्ति प्राप्त होत नाहीं. कारण, कर्मानेंच धर्म वाढतो. म्हणून अन्य धर्माचें आचरण करणारा ब्राह्मण व अधर्मानें वागणारा मनुष्य हे दोघे सारखेच होत. विकर्में करणाऱ्या ब्राह्मणाला सन्मान मिळत नाहीं. स्वतःचें कर्म योग्य तऱ्हेनें न करणाऱ्या ब्राह्मणावर कोणीहि विश्वास ठेवीत नाहीं. इतर तीन्ही वर्णांच्या ठिकाणीं लीन असलेले हे जे धर्म आहेत, ते प्रकट करून त्या त्या वर्णांना त्यांचें आचरण करावयास लावणें हा क्षत्रियांचा परम श्रेष्ठ धर्म होय. म्हणून, राजधर्म हाच श्रेष्ठ आहे व इतर धर्म तसे नाहींत. पराक्रमप्रधान असा वीरांचा क्षात्रधर्मच मला संमत आहे.

मांधाता—यवन, किरात, गांधार, चीन, शबर, बर्बर, शक, तुषार, कंक, पल्हव, आंध्र, मद्र, पौंड्र, पुलिंद, रमठ आणि कांबोज इतक्या प्रकारचे लोक चोहोंकडे पृथ्वीभर पसरले आहेत. त्यांतच ब्राह्मणांपासून व क्षत्रियांपासून झालेली वैश्य व शूद्र संतति आहे. इतके सगळे निरनिराळ्या देशांत राहणारे लोक आपल्या धर्माचें आचरण कसें करतील व चोरी करून जगणाऱ्या लोकांचें नियंत्रण करून माझ्यासारख्यांनीं त्यांना मार्गाला कसें लावावें, तें आपल्याकडून ऐकावयाची माझी इच्छा आहे. तर, हे सुरेंद्रा, तें तूं मला सांग. हे सुरेश्वरा, आम्हां क्षत्रियांना आज तूं एक बंधुच भेटलास, असें मी समजतों.

इंद्र—सर्व दस्यूंनीं मातापितरांची सेवा करावी, आचार्य, गुरु तसेंच आश्रमवासी म्हणजे संन्यासी यांचीहि सेवा करावी. पृथ्वीचें पालन करणारे राजे लोक यांची सेवा करणेंहि दस्यूंना विहित आहे. वैदिक धर्मानें सांगितलेल्या क्रिया करणें हाहि त्यांचा धर्म होय. त्यांनीं पितृयज्ञ करावे, विहिरी खणाव्या, पाणपोया घालाव्या, यथाकाल ब्राह्मणांना दानें द्यावीं; अहिंसा, सत्य, अक्रोध, स्वतःच्या उपजीविकेचें साधन व दायभागाप्रमाणें मिळालेलें द्रव्य यांचें संरक्षण करणें; बायकामुलांचें भरणपोषण करणें; शुचिव्रतानें रहाणें; कोणाचाहि मत्सर न करणें; हा दस्यूंचा धर्म होय. कल्याणेच्छु दस्यूनें सर्व प्रकारच्या यज्ञांच्या दक्षिणा द्याव्या, मोठमोठाले पाकयज्ञ त्यानें करावे; हीं व अशा प्रका-

र्ची अनेक कर्मे सर्व लोकांकरितां म्हणून पूर्वी सांगितलीं आहेत तीं, हे राजा, त्यांनीं करावीं.

मांधाता—या पृथ्वीतलावर सर्व वर्णांमध्यें दस्युवृत्तीचे लोक आहेत. ते निरनिराळ्या आश्रमांत निरनिराळे वेष धारण करून राहिलेले दृष्टीस पडतात, हें कसें ?

इंद्र—दंडनीति नाहींशी झाल्यावर, राजधर्म दुर्बल झाला म्हणजे, राजाच्याच दुष्टपणामुळें, हे निष्पापा, पृथ्वीवरील प्राण्यांना मोह उत्पन्न होतो. हें कृतयुग संपतांच निरनिराळे वेष धारण करणारे, असंख्यात भिक्षु या पृथ्वीतलावर निर्माण होतील व आश्रमांच्या आचारांतहि अनेक विकल्प निर्माण होतील. काम व क्रोध यांच्या आधीन होऊन सनातन धर्मानें सांगितलेल्या मार्गानें लोक चालणार नाहींत व उन्मार्गवर्तन करतील. हे राजा, मोठे लोक दंडनीतीच्या योगानें ज्यावेळेला पापी पुरुषांचें निराकरण करतात, त्यावेळेला संतांच्यामुळें निर्माण झालेला परम पवित्र शाश्वत धर्म नष्ट होत नाहीं. सर्व लोकांचा गुरु असा जो राजा, त्याचा अपमान करणाऱ्यानें दिलेलें दान, केलेला यज्ञ व श्राद्धकर्म हीं कधींच फलद्रूप होत नाहींत. देवाची योग्यता असलेला, असा जो मनुष्यांचा सनातन अधिपति, त्याचा अवमान देवहि करीत नाहींत. तो राजा धर्मकाय असतो.

भीष्म—असें बोलून भगवान् विष्णु मरुद्गणांसह शाश्वत अशा विष्णुलोकाला निघून गेला. हे अनघा, असा हा क्षत्रियधर्म पूर्वीपासून उत्कृष्टपणें चालत आला असून कोणता शहाणा व बहुश्रुत मनुष्य त्याला तुच्छ समजेल ? अन्यायानें खरा मार्ग सोडून देऊन दुसऱ्या भलत्याच मार्गाला लागलेले लोक वाटेवरील अंध मनुष्याप्रमाणें मध्येंच नाश पावतात. म्हणून हे पुरुषव्याघ्रा, आदिकालापासून प्रचलित असलेल्या ह्या क्षात्रधर्माचेंच अनुकरण करून तूं वागत जा. १२.१.६५.

---

## अध्याय ६६ वा.

[ १ युधिष्ठिराला वर्णाश्रमधर्मकथन ]




(१) युधिष्ठिर—पितामहा, तूं पूर्वी सांगितलेले [illegible] मी ऐकिले. आतां तूं या वेगवेगळ्या आश्रमधर्मांचें फल काय आहे, ते विस्तारपूर्वक मला सांग.

भीष्म—हे युधिष्ठिरा, सर्व साधुसंमत धर्म मला जसे अवगत आहेत, तसे ते तुलाहि विदित आहेत. तथापि हे युधिष्ठिरा, तूं चारहि आश्रमांमध्यें सदाचरणी व धार्मिक लोकांना आचरण्यास योग्य अशीं कृत्यें कोणतीं म्हणून विचारीत आहेत, तरी तीं सर्व राजधर्मामध्येंच आहेत. राग व द्वेष सोडून देऊन व धर्मनीतीचा आश्रय करून सर्व भूतांचे ठिकाणीं समवृत्ति ठेवणें, तसेंच आपल्या संपत्तीचा कांहीं अंश देऊन नित्य पूज्य पुरुषांचें पूजन करणें हा राजाचा ब्रह्मचर्याश्रम होय. जो ज्ञानी असून दानशील असतो, जो निग्रह (शासन) आणि अनुग्रह (कृपा) करण्यांत दक्ष असतो, जो यथाशास्त्र आचरण करितो, जो धैर्यसंपन्न असतो, त्या राजाला गृहस्थाश्रमाचें फल मिळतें. युधिष्ठिरा, ज्ञाति, संबंधी आणि मित्रजन ह्यांचा दुःखावस्थेंतून उद्धार करणाऱ्या राजाला वैखानसाश्रमाचें फल मिळतें. लोकमुख्यांचा व धर्मचिह्नें धारण करणाऱ्या पुरुषश्रेष्ठांचा जो वारंवार सत्कार करितो, त्या राजाला हे कौंतेया, वानप्रस्थाश्रमाचें फल मिळतें. आह्निककृत्यें, पितृयज्ञ, भूतयज्ञ व मनुष्ययज्ञ करणाऱ्याला तसेंच आपल्या संपत्तीमध्यें सर्व प्राणी आणि अतिथि यांचाहि अंश आहे असें समजून जो राजा त्यांचें अर्चन करितो, जो देवयज्ञ करितो आणि हे सत्यविक्रमा, जो शिष्टजनांसाठीं शत्रूंच्या राष्ट्रांचा विध्वंस करण्यास सिद्ध होतो, त्या राजालाहि वानप्रस्थाश्रमाचें फल मिळतें. सर्व भूतांचें पालन व स्वराष्ट्रपरिपालन यांच्या योगानें राजाला संन्यासाश्रमाची गति मिळते. सर्वदा वेदाध्ययन करणें, क्षमाशील बनणें, आचार्यपूजन करणें, उपाध्यायाची शुश्रूषा करणें इत्यादिकांच्या योगानें राजाला संन्यासाश्रमाचें फल मिळतें. हे पुरुषश्रेष्ठा, प्रत्यहीं जप व देवपूजन केल्यानेंहि राजाला संन्यासाश्रमाचें फळ मिळतें. तसेंच मरण किंवा स्वराष्ट्ररक्षण या दोन गोष्टींच्या निश्चयानें जो प्राणांचीहि पैज लावून राहतो आणि सर्व भूतांचे ठिकाणीं जो सरळ भावानें वागतो, त्यालाहि संन्यासाश्रमाचें फळ मिळतें.

हे भारता, वानप्रस्थाश्रमी व वेदपठण केलेल्या ब्राह्मणांना विपुल धन देणाऱ्या राजाला वानप्रस्थाश्रमाचें फल मिळतें. हे भरतकुलोत्पन्ना, सर्व प्राणिवर्गांवर दया करणारा राजा असला म्हणजे त्याला सर्वहि आश्रमांचें फल मिळतें. त्याचप्रमाणें जो बाल आणि वृद्ध यांवर, ते कोणत्याहि अवस्थेंत असले तरी, दया दाखवितो, त्यालाहि सर्व आश्रमांचें फळ मिळतें. हे कुरूद्वहा, प्राण्यांवर बलात्कार होऊन ते शरण आले असतां त्यांचें संरक्षण कर-

णाऱ्या राजास गृहस्थाश्रमाचें फल मिळतें. तसेंच चराचर भूतांचें संरक्षण आणि त्यांचा योग्य मान केला असतांहि राजाला गृहस्थाश्रमाचें फल मिळतें. जो लहानमोठ्या बायकांना, भावांना, मुलांना आणि नातवांना आपल्या आज्ञेंत ठेवून त्यांवर कृपादृष्टि ठेवितो आणि पूज्य अशा साधु पुरुषांचें पालन करितो, त्याला गृहस्थाश्रमाचें फल मिळतें. त्याचप्रमाणें वेगवेगळया आश्रमांतील लोक ज्याच्या घरीं यथेच्छ भोजन करितात, त्यालाहि हे युधिष्ठिरा, गृहस्थाश्रमाचें फल मिळतें.

जो पुरुष ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या धर्माप्रमाणें यथार्थ रीतीनें वागतो, त्याला सर्व आश्रमांचें अविनाशी फल प्राप्त होतें. हे कौंतेया, ज्याच्यामध्यें असणाऱ्या सद्गुणांचा नाश केव्हांहि होत नसतो, तो नरश्रेष्ठ सर्वदा आश्रमामध्येंच आहे, असें समजावें. हे युधिष्ठिरा, जो स्थळाला, कालाला व वयाला मान देतो आणि देशधर्म व कुलधर्म यांचें पालन करितो, योग्य वेळीं प्रजांना द्रव्य व भूतांना बलि देतो व सत्पुरुषांचा मान ठेवितो, त्याला सर्व आश्रमवासांचें फल मिळतें. हे कौंतेया, राजा धर्मविहीन, मत्त, प्रमत्त इत्यादि दहा प्रकारच्या लोकांतील असला, तरी जो धर्माचरण करून वागतो, त्याला सर्व आश्रमांचें फल मिळतें. हे भारता, धर्मनिष्ठ लोक ज्याच्या आश्रयाखालीं राहून धर्म करितात, त्या राजाला त्यांच्या धर्माचा अंश मिळतो. हे पुरुषव्याघ्रा, जे राजे धर्मामध्यें आसक्त अशा धर्मनिष्ठांचें रक्षण करीत नाहींत, त्यांना त्यांचें पाप लागतें. हे युधिष्ठिरा, प्रजारक्षणाचे कामीं जे लोक राजाचे साहाय्यकर्ते होतात, त्या सर्वांना दुसऱ्यांनीं केलेल्या धर्माचा अंश मिळतो.

हे नरश्रेष्ठा, आम्हीं पत्करिलेला गृहस्थाश्रमच सर्व आश्रमांमध्यें अतिपवित्र व उत्तम आहे, असें म्हटलेलें आहे. जो मनुष्य आपल्याप्रमाणेंच सर्व भूतांच्या ठिकाणीं भाव ठेवितो, त्यांना योग्य शासन करितो, क्रोध जिंकितो, त्याला इहलोकीं व परलोकींहि सुख मिळतें. जिला शास्त्ररूपी दोरी आहे, दानरूपी वाऱ्यानें जी चालत असते, जिला सत्त्वगुणरूपी कर्णधारकाचें साहाय्य आहे, अशी राजधर्मरूपी नौका, राजाला संसारसागरांतून तारून येते. जेव्हां राजा सर्व कामनांपासून मुक्त होऊन सत्त्वगुणाचाच आश्रय करून राहतो, तेव्हां त्याला ब्रह्मपदाची प्राप्ति होते. हे युधिष्ठिरा, जो सर्वदा सुप्रसन्न असतो आणि अंतःकरणाचा निरोध करून प्रजापालन करितो, त्याला धर्मप्राप्ति होते. हे भारता, तूं वेदाध्ययनरत व सदाचरणशील ब्राह्मणांचें आणि सर्व लोकांचें

पालन कर. जे वनामध्यें आणि आश्रमांमध्यें राहून धर्माचरण करितात, त्यांहून शंभर पटीनें अधिक पुण्य प्रजापालनाच्या योगानें राजाला मिळतें.

हे पांडवश्रेष्ठा, तुला मीं अशाच प्रकारें विविध धर्मांचें कथन केलें. सर्वांआधीं तूं सनातन धर्मांचें आचरण कर. हे पांडुपुत्रा युधिष्ठिरा, तूं प्रजापालनासक्त होऊन सदैव रहा, म्हणजे तुला चार आश्रमांच्या व चारहि वर्णांच्या धर्मांची प्राप्ति होईल. १२.१.६६.

---

## अध्याय ६७ वा.

[ १ भीष्माकडून युधिष्ठिराला लोकांच्या सराजक व अराजक स्थितींचें गुणदोषनिरूपण. ]

( १ ) युधिष्ठिर–हे पितामहा, तूं मला चार आश्रम आणि चार वर्ण यांचे धर्म सांगितलेस. आतां राष्ट्राचें मुख्य कर्तव्य कोणतें तें मला कथन कर.

भीष्म—राष्ट्राचें पहिलें कर्तव्य म्हणजे राजाला अभिषेक करणें हें होय. कारण, राजरहित व बळरहित राष्ट्राचा शत्रु पराभव करून टाकितात. अराजक राष्ट्रामध्यें धर्म टिकत नाहीं. लोक परस्परांना खाऊन टाकितात. अशा अराजक स्थितीला धिक्कार असो! राजाचा स्वीकार करणें म्हणजे इंद्राचा स्वीकार करण्यासारखें आहे, असें श्रुतिवचन आहे. म्हणून कल्याणेच्छु मनुष्यानें इंद्राप्रमाणेंच राजाला मान द्यावा. अराजक राष्ट्रामध्यें कोणीं राहूं नये, असें श्रुति सांगते. अराजक राष्ट्रामध्यें दिलेलीं हविर्द्रव्यें अग्निहि धारण करीत नाहीं. कोणी बलवान् राज्येच्छु मनुष्य अराजक व निःसत्त्व राज्यावर चालून येईल, तर त्याला लोकांनीं सामोरें जाऊन त्याचें पूजन करावें, हाच उत्तम उपाय होय. राष्ट्राची अराजक स्थिति असणें याहून अधिक वाईट दुसरें कांहींहि नाहीं. तो राज्यार्थी पुरुष चांगल्या रीतीनें वागूं लागल्यास सर्वांचें कल्याण होईल. तसाच तो बलवान् जर क्रोधाविष्ट झाला, तर समग्र राष्ट्राचा विध्वंस करून टाकील. जी गाय सुखानें धार काढूं देत नाहीं, तिला अतिशय क्लेश भोगावे लागतात; परंतु जी गाय मुकाट्यानें धार काढूं देते, तिला कोणीहि त्रास देत नाहीं! जें काष्ठ न तापवितां वांकतें, त्याला तापविण्याची कोणी खटपट करीत नाहीं, परंतु जें आपण होऊन स्वतः वांकत नाहीं, त्याला वांकविणें लोकांना भाग पडतें.

हे वीरा, ह्या उदाहरणांवरून बलाढ्याशीं प्रत्येकानें नम्रपणानेंच वागावें. बलवानाला प्रणाम करणें म्हणजे इंद्रालाच प्रणाम करणें होय. म्हणून कल्याणेच्छु मनुष्यानें सर्वदा राजाची स्थापना केली पाहिजे. जेथें अराजक स्थिति आहे, तेथें धनापासून किंवा स्त्रीपासून देखील कांहीं सुखप्राप्ति होत नाहीं. अराजक देशामध्यें परवित्ताचें हरण करून दुष्ट मनुष्य आनंदांत राहतो. परंतु जेव्हां दुसरे लोक तें त्याचें द्रव्य हरण करितात, तेव्हां त्याला राजा हवासा वाटूं लागतो. अराजक स्थितींत पापी मनुष्यांना देखील सुख होत नसतें. एकाचें धन दुसरे दोघे हरण करितात व त्या दोघांचें द्रव्य इतर पुष्कळ हरून नेतात. जो कोणाचा दास नसतो, तो अराजक स्थितींत दास केला जातो आणि बलात्कारानें स्त्रियाहि हरण केल्या जातात. ह्याच कारणामुळें देवांनीं प्रजापालक उत्पन्न केले. ह्या लोकांवर जर शिक्षा करणारा राजा नसेल, तर पाण्यांतील मत्स्यांप्रमाणें बलवान् लोक दुर्बलांना तेव्हांच खाऊन टाकतील. पूर्वीं अराजक स्थिति असल्यामुळें अशा रीतीनें बऱ्याच लोकांचा नाश झाला होता. म्हणून आमच्या ऐकण्यांत असें आहे कीं त्या सर्वांनीं एकत्र जमून असा नियम केला कीं, 'आपल्यामध्यें जो कोणी निष्ठुर बोलणारा, कठोर शिक्षा करणारा, परस्त्रीशीं संबंध ठेवणारा आणि दुसऱ्याचें द्रव्य हरण करणारा असेल, त्याचा आपण त्याग करावा.' सर्व वर्णांचा विश्वास बसावा, म्हणून ते सर्व त्या नियमाप्रमाणें वागूं लागले, तरीहि त्यांना सुख झालें नाहीं. नंतर ते सर्व दुःखपीडित लोक एकत्र मिळून ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्याला म्हणाले, 'भगवन्, आम्हांला कोणी राजा नसल्यामुळें आमचा नाश होत आहे, म्हणून आम्हांला राजा दे. आम्ही सर्व त्याचें पूजन करूं आणि त्यानें आमचें पालन करावें.' तें ऐकून ब्रह्मदेवानें त्या कामावर मनूची योजना केली असतां मनूनें तें ब्रह्मदेवाचें म्हणणें मान्य केलें नाहीं.

मनु—मला पापकर्माचें फार भय वाटतें. आधीं राज्य करणें ही अत्यंत कठिण गोष्ट आहे आणि त्यांतहि मिथ्या मार्गानें जाणाऱ्या मनुष्यांवर तें चालविणें तर फारच कठिण आहे.

भीष्म—तें ऐकून ते लोक मनूला म्हणाले, "भिऊं नकोस; जो पाप करील त्याला तें लागेल. तुझ्या कोशाची वृद्धि व्हावी म्हणून आम्ही आमच्या पशूंपैकीं व पैशापैकीं पन्नासावा आणि धान्याचा दहावा भाग तुला अर्पण करूं. मुलीच्या विवाहप्रसंगीं कन्याधनासंबंधीं तंटा उत्पन्न झाला असतां त्याचा

निर्णय तूं करावास, म्हणून तुला एक सुंदर स्वरूपाची कन्या आम्ही अर्पण करूं. महेंद्राच्या मागेंपुढें ज्याप्रमाणें देवता असतात, त्याप्रमाणें आमच्यांतील प्रमुख लोक शस्त्रें व वाहनें यांसह तुझ्या मागेंपुढें राहून तुझें रक्षण करितील. अशा रीतीनें तुझें बल वाढून तूं शत्रूंला अजिंक्य व प्रतापवान् होशील आणि कुबेर ज्याप्रमाणें राक्षसांना सुखी ठेवितो, त्याप्रमाणें तुझ्यामुळें आम्ही सुखी होऊं. तूं राजा होऊन प्रजेचें उत्तम रीतीनें पालन केल्यामुळें प्रजाहि धर्माचरण करितील आणि त्या धर्माचा चवथा हिस्सा तुला मिळेल. सुखानें प्राप्त झालेल्या अशा मोठ्या धर्माच्या योगानें सुखी होऊन देवांचें रक्षण ज्याप्रमाणें इंद्र करितो, त्याप्रमाणें तूं आमचें सर्व प्रकारें रक्षण कर. प्रतापवान् सूर्याप्रमाणें तूं विजयप्राप्त्यर्थ बाहेर पड आणि शत्रूंचा गर्व नाहींसा कर आणि जय संपादन कर."

हें ऐकून तो महातेजस्वी मनु बरोबर मोठें सैन्य घेऊन राज्यार्थ निघाला. त्याचा मोठेपणा पाहून सर्व प्रजा, ज्याप्रमाणें देवता इंद्राला भिऊन वागतात, त्याप्रमाणें त्याच्या भीतीनें स्वधर्माकडे लक्ष्य देऊं लागल्या. वृष्टिमान् पर्जन्याप्रमाणें पृथ्वीवर सर्वत्र शांतता स्थापून त्यानें पापी लोकांना आपापल्या कर्माच्या ठिकाणीं आसक्त केलें. अशाप्रकारें पृथ्वीवर ज्या मनुष्यांना कल्याणाची इच्छा असेल, त्यांनीं प्रजाजनांचे कल्याणार्थ राजा करून ज्याप्रमाणें गुरूपुढें शिष्य नम्रपणानें नमतात, त्याप्रमाणें त्याच्यापुढें नम्र असावें आणि देव जसे इंद्राच्या सन्निध मोठ्या नम्रतेनें वागतात, त्याप्रमाणें राजाच्या निकटवर्ती असावें. ह्यालोकीं स्वजन ज्याचा मान राखतात, त्याचा इतरहि पुष्कळ आदर ठेवितात. स्वजनच जर अवमान करूं लागले, तर परकी लोकहि—शत्रू देखील—पराभव करितील. राजाचा शत्रूंनीं पराभव करणें हें सर्वांनाच दुःखदायक होतें. म्हणून छत्र, वाहनें, वस्त्रें, आभरणें, खाद्य-पेय पदार्थ, गृहें, आसनें, शय्या आणि इतरहि उपकरणें राजाला अर्पण करावीं. असें केल्यानें तो प्रजेचें रक्षण करूं लागून अजिंक्य होतो. राजानेंहि प्रजेशीं स्मितपूर्वक भाषण करावें. कोणी कांहीं विचारलें असतां त्याच्याशीं गोड बोलावें. त्यानें कृतज्ञ असावें, प्रजेवर त्याचें दृढ प्रेम असावें, त्यानें आपल्या संपत्तीचे दुसरेहि भागीदार आहेत अशी भावना ठेवावी, इंद्रियजयी असावें, तसेंच कोणी भेटीस आल्यास त्याच्याशीं मृद, गोड आणि सरळपणें बोलावें. १२.१.६७.

---

## अध्याय ६८ वा.

[ १ वसुमनानामक कोसलाधिपतीपुढें बृहस्पतीनें केलेल्या राजगुणवर्णनाचें भीष्माकडून युधिष्ठिराला कथन. ]

( १ ) युधिष्ठिर—हे भरतर्षभा, मनुष्यांचा अधिपति जो राजा त्याला ब्राह्मण लोक देवता म्हणतात, त्याचें कारण काय तें मला सांग.

भीष्म—हे भारता, यासंबंधीं वसुमना यानें बृहस्पतीस विचारिलें असतां त्यानें दिलेलें उत्तर पुरातन इतिहास म्हणून सांगत असतात. तें असें:—वसुमना नांवाच्या कोसलाधिपतीनें पूर्वी ज्ञानसंपन्न महर्षि बृहस्पतीला प्रश्न केला होता. तो विनयज्ञ राजा बृहस्पतीकडे गेला आणि अभिवादनपूर्वक यथाविधि प्रदक्षिणा घालून व नमस्कार करून लोकहिताच्या इच्छेनें त्या धर्मशील ऋषीला त्यानें राज्यविधीविषयीं प्रश्न केला.

वसुमना—प्राण्यांची वृद्धि कशामुळें होते? त्यांचा क्षय होण्याचें कारण काय? आणि त्यांनीं कोणाची आराधना केली असतां त्यांना अविनाशी सुखाची प्राप्ति होईल? असा त्या महातेजस्वी कोसलाधिपतीनें प्रश्न केला असतां महाप्राज्ञ बृहस्पतीनें त्याला समग्र राजसत्कार सांगितला.

बृहस्पति—हे महाप्राज्ञा, ह्या लोकांत धर्म हा राजामुळें चालत आहे, असें दिसून येतें. राजभयानेंच प्रजा एकमेकांना भक्षण करीत नाहींत. राजा हा मर्यादा सोडून वागणाऱ्या व परदारादिकांच्या ठिकाणीं आसक्त होऊन राहणाऱ्या सर्वांना धर्मानें शिक्षा करून वाटेवर आणून सोडतो आणि म्हणून तो राजा शोभतो. हे राजा, चंद्र-सूर्यांचा उदय न होईल, तर लोक गाढ अंधकारामध्यें बुडून जाऊन परस्परांना पाहूं शकणार नाहींत. अल्पोदकामधील मत्स्य किंवा हिंस्र प्राण्यांची भीति नसलेले पक्षी यथेच्छ विहार करून कांहीं काळ आनंदांत घालवितात व परस्परांचा संहार करून लवकरच आपणहि नष्ट होतात, त्याचप्रमाणें राजा नसल्यास प्रजेची दुर्दशा होईल. त्यांची स्थिति गुराखी नसल्यामुळें दुःखांत पडणाऱ्या पशूंप्रमाणें होईल. पालन करणारा राजा जर नसेल, तर बलवान् लोक दुर्बलांच्या संपत्तीचा अपहार करतील व त्यांनीं विरोध केल्यास त्यांचा संहार करतील. स्वतःची वस्तु सुद्धां आपली आहे, असें जगांत कोणाला म्हणतां येणार नाहीं. स्त्री, पुत्र, धन आणि संपत्ति हीं कांहींच राहणार नाहींत व

सर्वत्र एकच गोंधळ उडून राहील. राजा नसल्यास दुष्ट लोक दुसऱ्यांचीं वाहनें, वस्त्रें, अलंकार आणि विविध रत्नें बलात्कार करून हरण करतील. धर्माचरणी लोकांना नानाप्रकारचे शस्त्रप्रहार सोसावे लागतील आणि सर्वत्र अधर्म माजून राहील. माता, पिता, वृद्ध माणसें, आचार्य, अतिथि, गुरु या सर्वांना दुष्ट लोक त्रास देतील किंवा प्रसंगीं त्यांचा वधहि करतील.

प्रजारक्षक राजा नसल्यास धनवंतांला वध, बंधन, अनेक प्रकारचा क्लेश हीं प्रत्यहीं सोसावीं लागतील. कोणत्याहि वस्तूवर त्यांचें ममत्व राहणार नाहीं. त्यांना अकालीं मृत्यु येईल. सर्व लोकांना चोरट्यांच्या ताब्यांत राहावें लागेल व ते भयंकर नरकांत पडतील. व्यभिचारदोष राहणार नाहीं, कृषि आणि व्यापार हीं बुडतील, धर्माचा लोप होईल आणि वेदत्रय नाहींसें होईल. दक्षिणायुक्त यज्ञ चालणार नाहींत, यथाविधि विवाह होणार नाहींत, समाजाचें अस्तित्व राहणार नाहीं, धेनूंकडे वृषभ कामवासनेनें पाहणार नाहींत, गुरांची धार निघणें बंद होईल, गौळवाडे नाश पावतील, लोकांचीं मनें उद्विग्न होऊन सर्वत्र हाहाकार उडेल व अस्वास्थ्य होऊन राहील. सर्वांचा एका क्षणांत नाश होऊन जाईल, वर्षोवर्ष चालणारीं दक्षिणायुक्त यज्ञसत्रें निर्भयपणें चालणार नाहींत, विद्यावान्, शुद्ध, तपस्वी ब्राह्मण चार वेदांचें अध्ययन करणार नाहींत, ब्रह्महत्या करणाऱ्याच्या शासनकर्त्याचें अभिनंदन कोणी करणार नाहीं, द्रव्यापहार करणारे निर्धास्तपणें सर्वत्र फिरत राहतील, लोक दुसऱ्याच्या हातांतील वस्तु हिसकावून घेतील, सर्व मर्यादांचा भंग होईल, लोक भयव्याकुल होऊन इतस्ततः पळून जातील, अनयाची वाढ होऊन वर्णसंकर होईल आणि राष्ट्रामध्यें सर्वत्र दुर्भिक्ष्य माजेल.

रक्षण करणारा राजा असला म्हणजे लोक यथेच्छ गृहद्वारें उघडीं ठेवून झोंप घेतात. धर्मनिष्ठ राजा नसल्यास दुसऱ्यानें केलेली निंदा सहन करणें भाग पडतें व हात उगारला असतांहि त्याचा प्रतिकार करतां येत नाहीं. तोच जर रक्षणकर्ता राजा असेल, तर स्त्रियांना सर्व प्रकारचे अलंकार अंगावर घालून पुरुषांना बरोबर न घेतां निर्भयपणें फिरतां येतें. लोक धर्मानें वागत असतात. परस्परांना पीडा देत नाहींत. उलट एकमेकांवर अनुग्रह करितात. तीनहि वर्ण वेगवेगळे राहून एकाग्र मनानें वेदाध्ययन करितात. या जगताचें मूळ उप-जीविका हें असून तीन वेदांत सांगितलेल्या कर्मांच्या योगानें जगताचें धारण केलें जातें. जेव्हां राजा राज्याचें मोठें जूं मानेवर घेऊन प्रजेला योग्य मार्गानें

नेतो, त्यावेळीं लोक सुखांत असतात. राजाच जर नाहीं, तर कोणत्याहि प्राण्याचें अस्तित्व असूं शकणार नाहीं. राजाच्या अस्तित्वावरच प्रजेचें अस्तित्व अवलंबून असतें. अशा त्या राजाला मान देणार नाहीं, असा कोण आहे? जो राजाचें प्रिय आणि हित करण्याच्या उद्देशानें सर्व लोकांना भयावह असा त्याचा कार्यभाग आपल्या शिरावर घेतो त्यालाहि इह-परलोकसुखाची प्राप्ति होते. जो कोणी त्याचें वाईट व्हावें, अशी इच्छा मनांत आणील, त्याला इह-लोकीं दुःखप्राप्ति होऊन तो मरणोत्तरहि नरकाला जाईल.

राजा हा मनुष्य आहे, असें समजून त्याचा कधींहि अवमान करूं नये. नररूपानें राहणारी ही एक मोठी देवताच आहे. राजा हा काळाला अनुसरून अग्नि, सूर्य, काल, यम आणि कुबेर अशीं पांच रूपें धारण करितो. राजा जेव्हां जवळच्या पापी लोकांना आपल्या उग्र तेजानें दग्ध करून टाकितो, तेव्हां तो अग्निस्वरूपी समजावा. जेव्हां पृथ्वीतलावर हेरांच्या योगानें सर्वत्र संचार करून राजा सर्व प्राण्यांवर नजर ठेवितो आणि त्यांचें कल्याण करून परततो तेव्हां तो सूर्यस्वरूपी समजावा. जेव्हां राजा शेकडो पापी लोकांचा, त्यांचे पुत्र, पौत्र आणि बांधवजन यांसह क्रुद्ध होऊन संहार करितो, तेव्हां तो कालस्वरूपी-मृत्यु-समजावा. जेव्हां तो सर्व अधार्मिक लोकांना तीक्ष्ण शासन करून धार्मिकांवर अनुग्रह करितो, तेव्हां तो यमस्वरूपी होय असें समजावें. जेव्हां तो उपकारी लोकांवर द्रव्याची वृष्टि करून त्यांना संतुष्ट करितो, अपकारी लोकांचीं विविध रत्नें हरण करून नेतो, संपत्ति देऊन कोणाला श्रीमंत करितो व कोणाचें द्रव्य हरण करून त्याला दारिद्र्य आणितो, तेव्हां तो कुबेरस्वरूपी आहे, असें समजावें. ज्याच्या अंगांत काम करण्याची धमक असून ज्याला धर्माच्या योगानें परमात्मस्वरूप जाणण्याची इच्छा आहे, त्या हुशार मनुष्यानें राजासंबंधीं कधीं वाईट बोलूं नये. असें केल्यानें त्याला केव्हांहि सुखप्राप्ति होणार नाहीं, मग तो राजाचा पुत्र असो, बंधु असो, मित्र असो किंवा राजाच्या अगदीं बरोबरचा असो. वायूचें साहाय्य मिळून पेटणारा अग्नि हा दग्ध केलेल्या वस्तूंतील कांहीं तरी शेष ठेवील, परंतु राजा क्रुद्ध झाला असतां अन्यायी मनुष्याचें कांहीं शेष राहत नाहीं.

मनुष्यानें राजाच्या सर्व वस्तू संभाळाव्या. मृत्यूला जसे आपण भितों, त्याचप्रमाणें राजद्रव्यापहारापासून आपण दूर रहावें. राजद्रव्य हरण करणारे लोक पारध्यानें लावलेल्या जाळ्याला स्पर्श करणाऱ्या हरिणाप्रमाणें तत्काल

नाश पावतात. म्हणून शहाण्या मनुष्यानें आपल्या द्रव्याप्रमाणेंच राजधनाचें संरक्षण करावें. राजधनापहार करणारे लोक घोर, भयानक आणि आश्रयहीन अशा नरकांत चिरकालपर्यंत पडून राहतात. राजा, भोज, विराट्, सम्राट्, क्षत्रिय, भूपति, नृप अशा थोर शब्दांनीं ज्याची स्तुति केली जाते, तो कोणाला सन्मानप्रद होणार नाहीं? म्हणून जो कल्याणेच्छु, स्वस्थचित्त, जितात्मा, इंद्रियजयी, बुद्धिमान्, स्मरणशक्तिसंपन्न आणि दक्ष असेल, त्यानें राजाचा आश्रय अवश्य करावा. राजानेंहि कृतज्ञ, प्राज्ञ, थोर मनाच्या, भक्तिमान्, जितेंद्रिय, धर्मिष्ठ आणि नीतिमान् अशा मंत्र्याचा बहुमान करावा. त्यानें दृढ भक्तिमान्, ज्ञानसंपन्न, धर्मज्ञ, जितेंद्रिय, शूर, क्षुद्रपणाचीं कामें न करणारे व स्वावलंबी अशाच मनुष्यांना जवळ करावें. ज्ञानाच्या योगानें मनुष्य प्रगल्भ होतो व राजा ज्ञानसंपन्न मनुष्यालाहि क्षीण करितो. राजाची अवकृपा झाली असतां मनुष्याला सुखप्राप्ति कोठून होणार? राजाश्रय करणाऱ्याला राजा सुख देतो. राजा हा प्रजेचें थोर अंतःकरण, तोच त्यांची उत्तम गति, महाप्रतिष्ठा आणि उत्कृष्ट प्रकारचें सुखसाधन आहे. हे राजा, राजाचा आश्रय करणाऱ्यांना इह-परलोकांची प्राप्ति सुखानें होते. राजाहि आत्मनिग्रह, सत्य आणि सुहृद्भाव यांच्या योगानें पृथ्वीचें पालन करून आणि मोठमोठे यज्ञ करून महायशस्वी होतो आणि त्याला स्वर्गांमध्यें शाश्वत पदाची प्राप्ति होते.

भीष्म—याप्रमाणें बृहस्पतीनें सांगितलें असतां तो राजसत्तम कोसलाधिपति वीर प्रयत्नपूर्वक उत्तम प्रकारें प्रजापालन करूं लागला. १२.१.६८.

---

## अध्याय ६९ वा.

[ १ युधिष्ठिराचा प्रश्न. २. राजनीतिकथन. ]

(१) युधिष्ठिर—हे पितामहा, पार्थिवाचें विशेष तऱ्हेनें करण्यासारखें असें कोणतें कार्य आणखी शिल्लक राहिलें व त्यानें प्रजांचें रक्षण कसें करावें, शत्रू कसे जिंकावे तें तूं मला सांग. राजानें हेर कसे नेमावे, सर्व वर्णांचा विश्वास कसा संपादावा, नोकरचाकरांना कसें वश करून घ्यावें, बायका व मुलें यांना आपलेंसें कसें करावें, हें सर्व हे पितामहा, मला तूं सांग.

(२) भीष्म—हे महाराजा, सर्व राजे व त्यांचे प्रतिनिधि यांनीं कसें वागावें, तें सांगतों, ऐक. राजानें किंवा त्याच्या प्रतिनिधीनें सर्व गोष्टींच्या अगोदर एक गोष्ट केली पाहिजे. ती ही कीं त्यानें स्वतः आपलें मन आपल्या ताब्यांत ठेविलें पाहिजे. प्रथम मनोजय करून नंतर शत्रूंवर विजय मिळवावा. ज्याला स्वतःचें मन जिंकतां येत नाहीं तो शत्रूंना काय जिंकील? राजानें करावयाचा आत्मजय म्हणजे श्रोत्र, चक्षु, त्वक्, रसना व घ्राण यांचा जय होय. इंद्रियवृत्तींवर जय मिळविल्यानंतरच शत्रूंवर जय मिळवितां येणें शक्य होतें. हे कुरुनंदना, राजानें किल्ल्यांवर, गांवाच्या शिवेवर, गांवांतील बागांवर व मोठमोठ्या राष्ट्रांवर पहाऱ्यासाठीं अधिकारी नेमावे. राजानें नानाप्रकारच्या कारखान्यांत, गांवांत, खेड्यांत, अंतःपुरांत, तसेंच राजवाड्यांत सर्व ठिकाणीं पाळेगार नेमावे. राजानें हेर म्हणून नेमण्याचीं माणसें पारखून ठेवावीं. त्या माणसांना मूर्ख, आंधळे, बहिरे इत्यादिकांचे वेष द्यावे. या हेरांच्या कामासाठीं प्रसंगीं तहानभूक सहन करतील अशीं शहाणीं माणसें त्यानें निवडलीं पाहिजेत. आपले अमात्य, आपले विविध तऱ्हेचे मित्र, इतकेंच काय, पण हे राजा, आपले पुत्र यांच्यावर सुद्धां, सावधान चित्तानें हेरांची योजना करावी. गांवांतील प्रजाजनांत, भोंवताळच्या मांडलिक राजांत सुद्धां आपले हेर असावेत व ते असे असावे कीं त्यांनीं आपापसांतसुद्धां एकमेकांस ओळखूं नये—त्यांना एकांतांत सुद्धां एकमेकांची ओळख पटूं नये—इतक्या गुप्त तऱ्हेनें व चतुराईनें त्यांची योजना व्हावी.

बाजारच्या ठिकाणीं, खेळांच्या जागीं, मोठमोठ्या समाजांत, बैराग्यांच्या मेळ्यांत, बागांत, उद्यानांत, पंडितांच्या सभेंत, गांवांत, चावडीवर, अधिकाऱ्यांच्या घरांतून, परक्या लोकांचे हेर राजानें ओळखून काढावे. दुसऱ्यांचे हेर कोणते हें अगोदर ओळखून ठेविलेलें असलें म्हणजे तें हितावह होतें. आपण हीनबल झालों, असें आपलें आपणांस वाटूं लागतांच अमात्यांच्या सल्ल्यानें राजानें बलिष्ठांबरोबर तह करावा. आपण दुर्बल आहों असें जरी वाटत नसलें, तरी स्वतःचा कांहीं विशेष अर्थ साधावयाचा असेल, त्या वेळेस हे राजा, शत्रूबरोबर तत्काल तह करावा. प्रजेचें धर्मानें पालन करणाऱ्या राजानें गुणवान्, महोत्साही, धर्मज्ञ, सज्जन अशीं जीं जीं माणसें असतील, त्यांच्यांशीं अवश्य संधि करावा. आपला उच्छेद होऊं पहात आहे, अशी शंका येतांच राजानें पहिल्यानें आपले पूर्वीचे शत्रू म्हणजे ज्यांनीं मागें कधीं

आपणांस अपकार केला असेल, असे लोक काढून टाकण्याचा प्रयत्न करावा. लोक ज्यांचा द्वेष करीत असतील अशांचा उच्छेद त्यानें प्रथम करावा. आपल्या भोंवतालच्या राजांपैकीं जो आपल्यावर उपकार किंवा अपकार कांहींच करूं शकणार नाहीं व ज्याचा उच्छेद करून कांहीं लाभहि नाहीं, अशाची त्यानें नेहमीं उपेक्षा करावी. ज्या राजावर आपल्याला स्वारी करावीशी वाटेल तो राजा मित्रहीन, बांधवहीन, दुर्बल, अवधानरहित असूनहि दुसऱ्यावर हल्ला करण्याची इच्छा धरणारा असेल, तरच त्यावर राजानें चाल करावी. शाहणा, पुष्टबल, शूर अशा राजानें पूर्वींच सैन्याची सिद्धता ठेऊन व प्रजासंरक्षणाची व्यवस्था करून ठेऊन मग स्वारीस निघावें. जो अतिबलवान् राजा आपल्याला वश होणार नाहीं, त्याच्या संपत्तीचें हरण करूं इच्छिणाऱ्या दुर्बल राजानें निराळे उपाय योजावेत. शस्त्रें, अग्नि, विषप्रयोग, इत्यादिकांच्या साहाय्यानें त्याच्या राष्ट्राला त्रास द्यावा. त्या राजाचे जे कोणी मित्रगण असतील, अगर जे कोणी मंत्री असतील त्यांच्यांत व त्या राजांत भेद उत्पन्न करावा आणि वितुष्ट आणावें.

ज्याला राज्य टिकवावयाचें आहे, अशा राजानें युद्धाचा प्रसंग सहसा आणूं नये. साम, दान व भेद या तीन उपायांनींच अर्थप्राप्ति करून घ्यावी, असें बृहस्पतीनें सांगितलें आहे. साम, दान व भेद या उपायांनीं जो अर्थ मिळूं शकेल, तेवढ्यावरच शहाण्या राजानें संतुष्ट रहावें. राजानें प्रजांपासून कर घ्यावा; पण, तो घेतलेला उत्पन्नाचा सहावा हिस्सा प्रजेच्या रक्षणासाठीं म्हणून घ्यावा. मत्त, प्रमत्त इत्यादि दहा प्रकारच्या अपराध्यांपासून दंडाच्या रूपानें जें थोडें-फार द्रव्य वसूल होईल, तेंहि राजानें प्रजारक्षणाच्या कामीं खर्च करावें. प्रजेकडे राजानें पुत्र-पौत्रांच्या नात्यानें पहावें. परंतु, व्यवहार पुढें आला असतांना—कोणताहि वाद पुढें आला असतां—त्यांच्यांपैकीं कोणालाहि आपला समजूं नये; निःपक्षपातानें व्यवहाराला धरून जो न्याय दिसेल तो सांगावा. न्याय निवडण्याच्या कामीं राजानें सकल अर्थांची माहिती असलेल्या चतुर लोकांची योजना करावी. कारण, न्यायदानपद्धतीवरच राज्याची सुरक्षितता बरीचशी अवलंबून असते. सोन्याच्या खाणी, मिठागरें, धान्याच्या बाजारपेठा, नदी तरून जाण्यासाठीं ठेवलेल्या नावा, तसेंच गजसैन्य या ठिकाणीं राजानें आपले आप्त किंवा आपलें हित पाहणारे म्हणून ज्यांबद्दल आपणांस विश्वास वाटेल, अशा पुरुषांचीच अमात्य म्हणून योजना करावी. दंडाचें व्यवस्थित

तऱ्हेनें पालन करणाऱ्या राजाला पुण्यप्राप्ति होते. कारण, दंड यथान्याय रीतीनें धारण करणें व त्याचा समुचित उपयोग करणें, हाच राजाचा धर्म होय. राजानें वेदवेदांगांचा अभ्यास करावा; आपलें तपोबल वाढवावें; नित्य दान करून यज्ञकर्मांनीं देवसंतर्पण करावें. हे सर्व गुण राजाच्या ठिकाणीं स्थिर रूपानें असावयास पाहिजेत. राजाच्या व्यवहाराचा लोप झाला, तर त्याला स्वर्गप्राप्ति किंवा यश यांपैकीं कांहींहि मिळणार नाहीं.

एकाद्या आपल्यापेक्षां बलवान् राजाकडून आपल्याला त्रास होतो, असें वाटल्यास बुद्धिमान् राजानें किल्ल्याचा आश्रय करावा. आपलें रक्षण करण्याच्या कामीं मित्रांची योजना करावी व त्यांना संरक्षणकर्मांकडे प्रवृत्त करावें. शत्रूंमध्यें फूट पाडण्यासाठीं सामदामादि उपायांचा अवलंब करावा. गौळवाडे रस्त्यावर ठेवावे. गांवोगांवची वस्ती जरूर पडल्यास उठवावी व त्या सर्वांना नजीकच्या खेड्यांतून जागा द्यावी. आपल्यांतील धनिक व बलसंपन्न लोक असतील, त्यांना पुनः पुनः धीर देऊन आपल्या राज्यांतील गुप्त व बळकट बांधलेल्या किल्ल्यांत अगर गुप्त ठिकाणीं नेऊन ठेवावें. शत्रूच्या द्रव्याचा अपहार राजानें करावा. शत्रूच्या शहरांत प्रवेश करणें शक्य नसेल, तर आग लावून शत्रूच्या शहराचा नाश करावा. आपल्या माणसांच्या हातीं शत्रूंच्या शेतांतील पिकें जाळावीं, किंवा सैन्याकडून लुटवावीं. तरी, नदी तरून जाण्याचे सर्व मार्ग बंद करावे. तलावांचें पाणी फोडून लावावें व जेथें हें शक्य नसेल, तेथें तें विष-मिश्रित करून सोडावें. कोणतेंहि मित्रकार्य उपस्थित झालें, तरी तें बाजूला ठेवून राजानें ज्याच्या राज्यांतून आपल्यास सुलभपणानें शत्रूचा घात करतां येईल, अशाचाच आश्रय करून रहावें. किल्ल्याच्या भोंवतालीं असणाऱ्या क्षुद्र वृक्षांचीं मूळें तोडून टाकावीं. अश्वत्थ वृक्षाचीं मूळें मात्र तोडूं नयेत. मोठ्या मोठ्या वृक्षांच्या फांद्या तोडाव्या. अश्वत्थ वृक्षाचें मात्र पान देखील खालीं पडूं देऊं नये. किल्ल्याच्या तटावर कोण लोक कोठून येतात, त्यांच्यावर लक्ष ठेवण्यासाठीं निरनिराळ्या चौक्या ठेवाव्या व त्यांवर शूर लोकांचा पहारा असावा. तटावरच्या लोकांना बाहेरच्या गोष्टी दिसण्यासाठीं भिंतीला बारीक भोंकें ठेवावीं. प्रसंगवशात् या भोंकांतून गोळया झाडतां येतील, अशी व्यवस्था असावी. किल्ल्याच्या भोंवतालचा खंदक मासे, नक्र, इत्यादि-कांनीं परिपूर्ण असावा किंवा त्यांत जागोजाग शूल उभे केलेले असावे. नगरांतील लोकांना संकटकालीं बाहेर निघतां यावें एवढ्यासाठीं सूक्ष्म-

द्वारांची—गुप्त भुयारांची—योजना असावी व या द्वारांवर इतर ठिकाणां-प्रमाणेंच पहारा असावा. प्रत्येक दरवाज्यावर मोठमोठालीं अस्त्रें ठेवावीत व तोफा ठेवून तीं द्वारें आपल्या आधीन ठेवावीत. काष्ठें गोळा करावींत, विहिरी खोदवाव्या, पूर्वी लोकांनीं खणलेल्या विहिरींचें पाणी उपसून त्या स्वच्छ करवाव्या, घरांवर गवत वगैरे वाढलें असेल तर तें चिखलानें लिंपून घ्यावें व चैत्रमासांत आगीचें भय असतें म्हणून, तेव्हां गवत काढून टाकावें. अन्न वगैरे सुद्धां रात्रींच शिजवावें. अग्निहोत्रादि कर्मे सोडून दुसऱ्या कार्यासाठीं दिवसा अग्नि प्रज्वलित करूं नये. लोहाराचा कारखाना, किंवा बाळंतिणीची खोली या ठिकाणांतील अग्नि सुरक्षित झांकलेला असा असावा. घरांतील अग्निहि सुरक्षित असा असावा. दिवसा अग्नि प्रज्वलित करणाराला महादंडाचें–वधाचें–प्रायश्चित्त असावें व गांवांतील लोकांचें रक्षण करण्याच्या इच्छेनें तशी दवंडी पिटवावी. भिक्षा मागून खाणारे, गाडी हांकणारे चाक्रिक, षंढ, उन्मत्त, नानाप्रकारचीं सोंगें आणणारे यांना हे नरश्रेष्ठा, गांवाबाहेर घालवून द्यावें, नाहींतर त्यांच्यापासून आपल्याला पीडा होते. चवाठे, तीर्थे, सभा-स्थानें व लोकांचीं घरें, या ठिकाणीं त्या त्या ठिकाणांना योग्य होतील अशा वर्णांचे हेर ठेवावे. राजानें मोठेमोठे मार्ग आंखावे, योग्य ठिकाणीं पाणपोया घालाव्या, बाजारपेठा बसवाव्या; द्रव्यागारें, शस्त्रागारें, सैनिकांना रहाण्या-साठीं जागा, अश्वशाळा, गजशाळा, सैन्याची छावणीची जागा, खंदक, विसांव्याच्या जागा व या सर्व ठिकाणीं जाण्याचे मार्ग हीं कोणाच्याहि दृष्टीस पडणार नाहींत, इतकीं गुप्त असावींत.

शत्रूकडून त्रास होत आहे असें समजतांच राजानें अर्थसंचय करावा. तेल, चर्बी, मध, तूप, नानाप्रकारचीं औषधें, कोळसे, दर्भ, मुंज नांवाचें गवत, पळस, बाण, चित्रें काढणारे लोक, गवत, विष माखलेलीं शस्त्रें, या सर्वांचा संचय राजानें करावा. तसाच शक्ति, ऋष्टि, प्रास वगैरे नानाप्रकारचीं आयुधें, चिलखतें वगैरेंचाहि संग्रह राजानें अवश्य ठेवावा. सर्व प्रकारचीं मूळें, फळें, औषधें, चार प्रकारचे वैद्य, इत्यादिक राजाच्या संग्रहाला अवश्य असावेत. नट, नाचणारे, कुस्त्या खेळणारे, बहुरूपी, यांच्या संग्रहानें शहराला शोभा येते व लोकांचें मनो-रंजनहि होतें. आपले नोकर, अमात्य, प्रजाजन किंवा शेजारी राजा यांच्या-पैकीं कोणाचीहि आपणांस शंका आल्यास त्यांवर नजर ठेवावी व त्यांना आपले आधीन करून ठेवावें. आपलें कार्य झाल्यानंतर धनदानानें

किंवा ज्याच्या त्याच्या योग्यतेनुरूप योग्य प्रकारें सांत्वन करून त्यांचा सत्कार करावा. हे कुरुनंदना, शत्रूला त्रासवून सोडून किंवा ठार मारून आपलें कार्य तडीस नेल्यानेंच राजा कृतकार्य होत असतो व सर्वांच्या ऋणांतून तो मुक्त होतो.

हे राजा, पृथ्वीपतीनें सात गोष्टींचें मुख्यतः रक्षण करावयाचें असतें. त्या सात गोष्टी मी तुला सांगतों, ऐक. पहिली गोष्ट आत्मा, नंतर अमात्य, नंतर कोश, दंड, मित्र, नंतर प्रजा आणि राजधानी या त्या सात गोष्टी होत. या सात गोष्टी म्हणजेच राज्य व यांचेंच पालन राजानें प्रयत्नपूर्वक करावयाचें असतें. षाड्गुण्य, त्रिवर्ग व त्रिवर्गपरम यांचें स्वरूप यथातथ्य रीतीनें ज्याला कळलें, तो राजा पृथ्वीच्या राज्याचा उपभोग घेतो. शत्रूशीं संधि करून मार्ग काढणें हें संधानासन, स्वारी करणें हें यात्रासंधान, शत्रूशीं वैर करीत रहाणें हें विगृह्यासन, शत्रूला धाक दाखविण्याकरितां स्वारीची नुसती तयारी करून चाल न करणें हें संपरिगृह्यासन, परस्परांशीं संधि करणें हा द्वैधीभाव व दुसऱ्याचा आश्रय करून रहाणें–अन्यसंश्रय–हें षाड्गुण्य होय. आतां त्रिवर्ग कशाला म्हणतात तें सांगतों, ऐक. क्षय, वृद्धि व स्थान हा त्रिवर्ग आणि धर्म, अर्थ व काम हा परमत्रिवर्ग होय. योग्य काळीं राजानें यांचें सेवन करावें. या संबंधांत अंगिरा मुनीचे म्हणून दोन श्लोक सांगितलेले आहेत ते हे कुंतीपुत्रा, तुला सांगतों, ऐक. ‘सर्व कार्यें यथाविधि करून, पृथ्वीचें पालन यथान्याय करून, प्रजापालन व्यवस्थित करून राजाला परलोकीं सुखप्राप्ति होते. राजाची तपश्चर्या किंवा त्यानें केलेले यज्ञ यांचा त्याला कांहीं उपयोग होणारा नसून एकट्या प्रजापालनधर्माचें आचरण त्यानें केलें म्हणजे त्यांत सर्व धर्माचरणाचा समावेश झाला असें समजावें.’

युधिष्ठिर—हे पितामहा, राजा किंवा त्याची दंडनीति यांचा दोघांचा मिळून किंवा प्रत्येकाचा वेगवेगळा कोणाला कसा काय उपयोग होतो, तें तूं मला सविस्तर सांग.

भीष्म—हे महाभागा, पूर्वीच्या लोकांनीं आपल्या साभिप्राय शब्दांनीं सांगितलेलें दंडनीतीचें महाभाग्य मी तुला जसेंच्या तसें सांगतों, तें ऐक. हे राजा, पृथ्वीपालन करणाऱ्या राजानें दंडनीतीचा उपयोग विहित मार्गानें केला, तर ती चारी वर्णांना–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्रादिकांना–स्वधर्मानें वागण्यास प्रवृत्त करते व अधर्मापासून निवृत्त करते. चारी वर्णांतील मनुष्यें जेव्हां आपापलीं कर्में व्यवस्थित तऱ्हेनें करतात, मर्यादेचा अतिक्रम करीत

नाहींत, दंडनीतीच्या साहाय्यानें प्रजापालन विधिवत् होतांच प्रजा अकुतोभय होतात, त्यांना कोठूनच भय रहात नाहीं, तीन्ही वर्णांतील लोक स्वास्थ्य मिळविण्याचा प्रयत्न करतात, तेव्हांच मनुष्याला सर्व प्रकारच्या सुखाची प्राप्ति होते. राजाचें कारण काल कीं कालाचें कारण राजा—राजा वेळ येईल तसा वागतो, कीं कालाला आपल्यापुढें वांकवितो—असा संशय-शंका-मनांत आणूं नकोस. राजा कालाला आपल्यापुढें वांकवूं शकतो हें निभ्रांत समज. सर्व बाजूंनीं व सर्व तऱ्हांनीं राजा ज्यावेळीं दंडनीतीचा यथायोग्य अवलंब करतो, त्यावेळेस सृष्टिकृत कृतयुगाला आरंभ होतो. त्या कृतयुग नांवाच्या युगांत धर्माचरण प्रधान असून अधर्मांचें नांवहि कोठें सांपडत नाहीं. चारी वर्णांपैकीं कोणत्याच वर्णाचें मन अधर्माकडे धांव घेत नाहीं. प्रजेचा योगक्षेम या कृतयुगांत व्यवस्थित तऱ्हेनें चालतो, यांत संशय नाहीं. सर्व वैदिक कर्में गुणकारी होतात. सर्व ऋतु मनुष्यांना सुखावह होतात. रोगराई कोणाला होत नाहीं. मनुष्यांचे स्वर, वर्ण व अंतःकरण हीं नेहमीं प्रसन्न राहतात. त्यांना व्याधि कोणचीहि होत नाहीं. अल्पायु मनुष्य सहसा आढळत नाहीं. त्या काळांत विधवा स्त्री सांपडत नाहीं. कृपण मनुष्य दृष्टीलाहि पडत नाहीं. पृथ्वी नांगरल्यावांचून पीक देते. नानाप्रकारच्या ओषधि पुष्कळ पिकतात. साली, फळें, मूळें व पानें हीं सर्व कसदार असून गुणकारी असतात. हे राजा, कृतयुगांत अधर्मांचें नांवहि नसतें व सर्व धर्मानेंच वागतात. कृतयुगाचे म्हणून सांगितलेले हे धर्म आहेत. आतां त्रेतायुगाचे धर्म सांगतों, ऐक.

दंडनीतीचे नियम तीन चतुर्थांश हिश्शांनीं ज्यावेळेस राजा पाळतो व एक चतुर्थांश भागाकडे तो जेव्हां दुर्लक्ष करतो, त्यावेळेस त्रेतायुगाचा प्रारंभ होतो. त्यावेळेस पृथ्वीवरील कर्मांपैकीं तीन हिस्से कर्में शुभ तर एक हिस्सा अशुभ होतात. पृथ्वी नांगरली तरच पिक येतें व ओषधि, फल-मूलें वगैरे सर्व उत्पन्न होतात.

दंडनीतीच्या नियमांपैकीं अर्ध्या भागाचें राजा पालन करील व दुसऱ्या अर्ध्याकडे दुलक्ष करील, तर द्वापर युगाला प्रारंभ झाला असें समजावें. या कालांत पृथ्वीवरील कर्मांपैकीं अर्धीं कम अशुभ तर अर्धीं शुभ असतात. जमीन नांगरली गेली तरी सुद्धां अर्धें पीक येतें. आणि ज्यावेळेस दंडनीति सगळीच झुगारून देऊन राजाचें वर्तन होतें व प्रजेला तो अन्यायानें त्रास देऊं लागतो, त्यावेळेस कलियुगाची प्रवृत्ति होते.

कलियुगांत अधर्मच माजून राहतो व धर्माची प्रवृत्ति नाहींशी होते. चारी वर्णांतील मनुष्यांचें मन स्वधर्मापासून च्युत होतें. शूद्र लोक भिक्षावृत्तीनें उपजीविका करतात. ब्राह्मण सेवाधर्म पत्करतात. योगक्षेमाचा सर्व नाश होऊन वर्णसंकर होतो. वैदिक कर्मे विगुण म्हणजे विकृत होतात. कोणताहि ऋतु सुखाचा न जातां सर्वच ऋतूंत रोगराई पसरते. मनुष्यांचा आवाज, वर्ण व मन या सर्वांचा ऱ्हास होतो. सर्वत्र रोग उत्पन्न होतात. माणसें अल्पायुषी मरतात. स्त्रियांना वैधव्य येतें. प्रजा दुष्ट होते. कुठेंतरी पाऊस व कुठें तरी पीक अशी स्थिति होते. दंडनीतीच्या साहाय्यानें प्रजांचें यथायोग्य संरक्षण करावें, असें राजाला जेव्हां वाटत नाहीं, त्यावेळीं पृथ्वीवरील पिकांतील सर्व रस शुष्क होऊन जातात. सारांश, कृतयुग, त्रेतायुग, द्वापरयुग व कलियुग या चारी युगांचा कर्ता राजा होय. राजानें कृतयुग निर्माण केलें तर त्याला आत्यंतिक स्वर्गसुख मिळतें. राजानें आपल्या कालाचें त्रेतायुग केलें, तर आत्यंतिक स्वगसुख न मिळतां, अंशतः स्वर्गसुख मिळतें. राजानें आपल्या भोंवतीं द्वापरयुग निर्माण केल्यास स्वर्गसुखाची प्राप्तीहि यथाविभाग होते. पण राजा जर आपल्या भोंवतीं कलियुग निर्माण करील, तर त्याला आत्यंतिक पापाचीच प्राप्ति होईल व त्यामुळें तो राजा अनंत कालपर्यंत प्रजांचा तळतळाट घेत अकीर्ति व पाप यांनीं युक्त होऊन नरकांत पडतो. तेव्हां, शहाण्या क्षत्रियानें दंडनीतीच्या नियमांचें पालन करून जें आपल्याजवळ नाहीं, तें मिळविण्याचा प्रयत्न करावा व जें मिळालें असेल त्याचें रक्षण करावें. दंडनीतीचें यथान्याय पालन केल्यास ती लोकांना व्यवस्थित ठेवणारी व त्यांचा अभ्युदय करून देणारी अशीच ठरते. असली दंडनीति ही आईबापांसारखीच होय. हे भरतर्षभा, दंडनीतीच्या अस्तित्वावरच भूतमात्राचें अस्तित्व अवलंबून असतें. म्हणून हे कुरुश्रेष्ठा, राजानें दंडनीतिमान् असणें, हाच त्याचा परम धर्म होय. तेव्हां, प्रजांचें धर्मानें पालन कर हेंच माझें तुला सांगणें आहे. अशा रीतीनें प्रजापालन करीत राहिलास, तर तूं दुर्जय असा स्वर्गलोक जिंकशील, यांत किमपिहि शंका नाहीं. १२.१.६९.

## अध्याय ७० वा.

[ १ राजनीतीच्या छत्तीस प्रकारांचें वर्णन. ]

युधिष्ठिर—हे राजधर्माचारसंपन्न पितामहा भीष्माचार्य, राजा कोणत्या तऱ्हेनें वागला तर त्याला इहपरलोकीं सुखयुक्त फल उत्पन्न करणाऱ्या गोष्टी प्राप्त होतील, तें मला सांग.

भीष्माचार्य—हे राजा, या धर्माचरणाचे प्रकार छत्तीस आहेत व त्याचे गुणहि छत्तीस आहेत. या गुणांचें आचरण राजानें केलें तर त्याचें कल्याण होतें. कोणाशींहि कडूपणानें न वागतां धर्माचें आचरण करावें. परलोकींच्या सुखावर दृष्टि ठेवून नेहमीं स्नेहवृत्तीनें वागावें. कोणत्याहि प्रकारची कुटिल बुद्धि धारण न करतां अर्थार्जन करावें. धर्म व अर्थ यांच्यांशीं विरोध न येईल, अशा तऱ्हेनें विषयांचा उपभोग घ्यावा. दुबळेपणा न दाखवितां नेहमीं गोड बोलावें, स्वतःच्या पराक्रमाबद्दल बडबड न करतां शौर्याचीं कर्में हातांनीं करून दाखवावीं. अनार्य, दस्यु, यांच्यांशीं संधि करूं नये. आपल्या आप्तवर्गाशीं भांडूं नये. आपल्यावर ज्याची श्रद्धा नाहीं, अशाला हेर म्हणून पाठवूं नये. कोणालाहि त्रास न देतां आपलें कार्य करावें. दुष्टबुद्धीच्या माणसांजवळ अर्थाबद्दल भाषण करूं नये. स्वतःचे गुण आपल्या तोंडानें सांगूं नयेत. साधुपुरुषांकडून कोणतीहि वस्तु घेऊं नये. असज्जनांचा आश्रय करूं नये. चांगला शोध केल्यावांचून कोणालाहि शिक्षा लावूं नये. स्वतःची गुप्त मसलत कोणाला सां ' नये. लोभी माणसांना दान देऊं नये. आपल्यावर अपकार करणाऱ्यांवर विश्वास ठेवूं नये.

हे राजा, कोणाचाहि हेवादावा करूं नये. स्त्रियांचें संरक्षण करावें. नित्य शुचि असावें. अतिदयाशील असूं नये. अतिस्त्रीसेवन करूं नये. मिष्टान्न अहितकारक होईल, इतकें खाऊं नये. ताठा न धरतां माननीयांचा सन्मान करावा. कोणत्याहि प्रकारें कपटी वृत्ति न ठेवतां मोठ्या माणसांची सेवा करावी. दांभिकपणा सोडून देवपूजन करावें. अनिंदित अशा संपत्तीची इच्छा धरावी. संपत्तीचा उपयोग घ्यावा, पण तिजबद्दल आसक्ति ठेवूं नये. दक्षता बाळगावी. काळ ओळखून वागावें. सहानुभुति दाखवावी, पण, शत्रूला सोडण्याचें आश्वासन मात्र देऊं नये. अनुग्रह करतेवेळीं कोणाचेंहि वर्म काढूं नये. ( त्यानें केलेल्या अनुग्रहाची किंमत कमी होते. ) आपण कोणावर व कां प्रहार करतों, हें जाणल्यावांचून

कोणावरहि आकस्मिक प्रहार करूं नये. शत्रूला मारल्यानंतर त्याच्याबद्दल शोक करूं नये. कारणावांचून क्रोध दाखवूं नये. आपल्याला अपकार करणारांविषयीं मृदु भाव धरूं नये. हे युधिष्ठिरा, राज्यावर बसून व्यवस्थित कारभार करण्याची इच्छा असेल, तर याप्रमाणें वाग. याच्या उलट वागणाऱ्या राजाला अतिशय मोठीं संकटें प्राप्त होतात. आतांपर्यंत जे जे राजगुण म्हणून सांगितले, त्यांचें यथाविधि आचरण केल्यानें, हे राजा, ह्या लोकीं राजाला सुख मिळून स्वर्गलोकांतहि त्याला मान्यता मिळते.

वैशंपायन—शांतनव भीष्माचें हें वचन मुख्य मुख्य पांडवांनीं वेष्टित अशा युधिष्ठिरानें ऐकून त्यानें पितामह भीष्माचार्यांला नमस्कार केला आणि तो बुद्धिवान् धर्मराज त्याच्या सांगण्याप्रमाणें वागूं लागला. १२.१.७०.

---



## अध्याय ७१ वा.

[ १ युधिष्ठिराचा राजधर्मप्रश्न व त्यास भीष्माचें उत्तर. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, कोणत्या प्रकारानें प्रजांचें रक्षण केलें असतां राजाला कोणताहि मानसिक त्रास होत नाहीं व त्याच्या हातून धर्माचें उल्लंघन होत नाहीं, तें मला सांग.

भीष्म—हे राजा, मी तुला संक्षेपानेंच शाश्वत राजधर्म सांगतों, ते ऐक. विस्तारानें सांगावयाचें तर धर्म कधींच सांगून संपणार नाहीं. देवांच्या व्रतांत निमग्न असलेल्या धर्मनिष्ठ, विद्वान् व गुणवान् ब्राह्मणांची आपले घरीं पूजा करून तूं यजन करीत जा. त्यांना सामोरें जाऊन व त्यांचे पाय धरून, त्यांना अभिवादन करून, पुरोहितांच्या साहाय्यानें धर्मकार्यें व मंगलकार्यें करीत जा. अर्थसिद्धि व जयसिद्धि व्हावी, म्हणून ब्राह्मणांच्या तोंडचे आशीर्वाद नित्य घेत जा. आर्जवसंपन्न, धृतिमान् व बुद्धिमान् राजानें यथायोग्य रीतीनें कोणत्याहि गोष्टीचा स्वीकार करावा व कामक्रोधांचा त्याग करावा. जो राजा कामक्रोधांच्या आधीन होऊन राहतो, त्या बालिश राजाला धर्माची फलप्राप्ति होत नाहीं. कोणत्याहि कामावर मूर्ख व लोभी माणसाची योजना करूं नको. ज्यांना कसलाहि लोभ नाहीं, अशा बुद्धिसंपन्न माणसांचीच सर्व कार्यांत योजना करीत जा. मूर्ख माणसाच्या हातीं कारभार दिल्यानें, त्याला कामकाजाची माहिती नसल्यामुळें व तो कामक्रोधांच्या आधीन होत असल्यानें

इष्टफलप्राप्ति न होतां त्याच्या हातून प्रजेला मात्र क्लेश होतात. मर्यादित स्वरूपाचा पिकाचा सहावा हिस्सा, अपराधी मनुष्यांना दंड करून उत्पन्न झालेला पैसा व्यापाऱ्यांच्या तांड्यांचें रस्त्यावर संरक्षण केल्याबद्दल त्यांजकडून वेतनरूपानें उत्पन्न होणारें द्रव्य ( दस्तुरी ) येवढ्याचीच राजानें इच्छा धरावी. हे राजा, प्रजेकडून योग्य तेवढाच कारभार घेऊन, राष्ट्राचें विहित मार्गानें यथान्याय पालन करावें. कर घेऊन उरलेल्या उत्पन्नावर प्रजांचा योगक्षेम चालूं शकत नाहीं, असें दिसल्यास त्यांच्या संरक्षणाची व्यवस्था राजानें निरलसपणानें केली पाहिजे. आपलें यथायोग्य रीतीनें रक्षण करणाऱ्या, योग्य काळीं उणें पडेल तें देणाऱ्या, नित्य धर्मनिष्ठ व निरलस असणाऱ्या, रागद्वेषांनीं विमुक्त अशा राजावरच मनुष्यें प्रेम करतात.

हे राजा, लोभाला बळी पडून किंवा अधर्माचरणानें वागून धनप्राप्तीची आशा धरूं नको. जो शास्त्रविहित मार्गानें चालत नाहीं, त्याला धर्म व अर्थ हीं दोन्हींहि प्राप्त होत नाहींत व मिळालीं तरी कायमचीं टिकत नाहींत. केवळ अर्थाच्याच पाठीमागें लागलेल्या राजाला धर्मार्थप्राप्ति होत नसते व त्याचें सगळें द्रव्य अस्थानीं नाश पावतें. अशास्त्र अशा जुलमी करांनीं जो राजा लोभवश होऊन प्रजेला निष्कारण छळतो, तो आपल्या हातांनीं आपलाच नाश करून घेतो. गाईचें दूध काढण्याच्या इच्छेनें तिची कांस कापणाऱ्या मनुष्याला दूध जसें मिळत नाहीं, त्याप्रमाणें अयोग्य मार्गानें राष्ट्रावर जुलूम केल्यास त्याचें संवर्धन होत नाहीं. दूध देणाऱ्या गाईची व्यवस्थित रीतीनें शुश्रूषा केल्यास ज्याप्रमाणें मनुष्याला नित्य दूध मिळतें, त्याप्रमाणें योग्य रीतीनें राष्ट्राची जोपासना केल्यास राजाला त्याची फलप्राप्ति होते. पृथ्वीचें रक्षण व्यवस्थित तऱ्हेनें केल्यास राजाला धान्य व सोनें यांची प्राप्ति होते, व त्याचा स्वकीयांना व परकीयांनाहि उपयोग होतो. स्वतः तृप्त झाल्यानंतर आई जशी मुलाला दूध देते, तशी पृथ्वीची स्थिति आहे. हे युधिष्ठिरा, शास्त्रविहित उपायांनीं प्रजांचें रक्षण करून राजा आपल्या पदाचा उपयोग घेत राहील, तर त्यामुळें त्याची अतुल कोशवृद्धि नित्य होत जाईल.

हे राजा, तूं प्रजेशीं वागतांना नेहमीं माळ्यासारखा वाग. निखारे पसरणाऱ्या माणसासारखा वागूं नको. तसा वागलास तरच चिरकालपर्यंत राज्याचा उपभोग तुला घेतां येईल. परचक्रावर स्वारी करावी लागल्यामुळें तुझ्या कोशांतील धन नाहींसें झालें तर अब्राह्मणांच्या जवळ असलेलें धन तूं

सामोपचारानें घेण्याची इच्छा धर. पण ब्राह्मणाचें धन घेण्याची इच्छा तूं अंतकाळीं सुद्धां मनांत आणूं नकोस; मग इतर वेळची गोष्ट तर दूरच राहो. तुझ्या शक्तीप्रमाणें व त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांना तूं द्रव्य देत जा. त्यांना संतुष्ट राखून त्यांचें रक्षण करण्यानेंच तुला स्वर्गप्राप्ति होणारी आहे. अशाप्रकारें धर्मयुक्त अशी वागणूक ठेवून तूं प्रजेचें पालन करीत रहा. म्हणजे तुला अक्षय यश व शुभपरिणामी असें पुण्य यांची प्राप्ति होईल. अशा प्रकारें वागल्यानें हे राजा, तुला कोणतीहि मानसिक व्यथा होणार नाहीं. राजानें प्रजेचें रक्षण करणें हाच त्याचा परम धर्म होय. भूतमात्राचें संरक्षण करणें हाच अत्यंत श्रेष्ठ असा दयाधर्म होय. धर्मशास्त्र जाणणारीं माणसें यालाच परमश्रेष्ठ धर्म असें म्हणतात. जो राजा प्रजेचें रक्षण करतो, तो भूतमात्रावर दया करतो. प्रजांना संकटांतून न वांचविल्यामुळें एक दिवसांत राजाला जें पाप लागतें, त्याचा क्षय होण्यास सहस्र वर्षें लागतात. उलट, प्रजेचें रक्षण करण्यानें राजाला एक दिवसांत जेवढें पुण्य लाभतें त्याचें फळ त्याला स्वर्गांत दहा हजार वर्षें-पर्यंत मिळतें. चांगले मोठमोठे यज्ञ करून, उत्तम प्रकारचें अध्ययन करून मनुष्याला जी पुण्याई मोठ्या तपश्चर्येच्या योगानें प्राप्त होणारी आहे ती राजाला प्रजापालनधर्माच्या योगानें एका क्षणांत मिळते. म्हणून हे कौंतेया, या धर्माचें यथाविधि पालन कर. म्हणजे तुला पुण्याईची प्राप्ति होऊन कोणत्याहि मानसिक व्यथेचा त्रास होणार नाहीं व स्वर्गलोका-मध्यें अत्यंत श्रेष्ठ अशी संपत्ति तुला मिळेल. अशा तऱ्हेनें धर्माचें पालन राजा नसलेल्या राष्ट्रांत होऊं शकत नाहीं. म्हणून राजालाच धर्मफलप्राप्ति होते, इतरांना होत नाहीं. तेव्हां, हे धृतिमान् राजा, तुला प्राप्त झालेल्या राज्याचें धर्मानें पालन कर. यज्ञांतील सोमरसानें इंद्राला तृप्त करून आपल्या सुहृदांचे मनोरथ पूर्ण करून त्यांना संतुष्ट कर. १२.१.७१.

---

## अध्याय ७२ वा.

[ १ ब्राह्मणश्रेष्ठत्वपूर्वक चातुर्वर्ण्यधर्मकथन. ]

( १ ) **भीष्म**—जो याप्रमाणें संतांचें रक्षण करून दुष्टांचा परिहार करतो, त्यालाच राजानें राजपुरोहित करावें. याबद्दल, वायु व इलेचा पुत्र पुरूरवा यांचा संवाद झाल्याची कथा पुरातन लोक सांगतात. ती मी तुला सांगतों, ऐक.

पुरूरवा—ब्राह्मण कोठून उत्पन्न झाले व बाकीचे तीन्ही वर्ण कोठून उत्पन्न झाले व ब्राह्मणांना श्रेष्ठत्व कशामुळें आलें, हें सर्व तूं मला सांग.

वायु—हे राजश्रेष्ठा, ब्रह्मदेवाच्या मुखापासून ब्राह्मण निर्माण झाले. त्याच्या बाहूंपासून क्षत्रिय निर्माण झाले. मांड्यांपासून वैश्य झाले. हे भरतर्षभा, या तीन्ही वर्णांच्या सेवेसाठीं ब्रह्मदेवानें आपल्या पायांपासून चवथा शूद्रवर्ण निर्माण केला. ब्राह्मण हा जन्मतःच धर्मभांडाराच्या रक्षणासाठीं निर्माण झालेला आहे म्हणून हा सर्व भूतांत श्रेष्ठ व त्यांचा शास्ता असा समजला जातो. ब्राह्मणानंतर त्याच्या खालोखाल पृथ्वीचें संरक्षण करणारा दुसरा दंडधारक म्हणजे क्षत्रिय. याला ब्रह्मदेवानें प्रजांच्या संरक्षणासाठीं निर्माण केलें आहे. धन व धान्य यांच्या योगानें तीन्ही वर्णांचें पालन करणें याकरितां वैश्याचा जन्म आहे व चवथा शूद्र; या वर्णानें बाकीच्या तीन्ही वर्णांची सेवा करावयाची आहे. असा हा चारी आश्रमांबद्दलचा ब्रह्मदेवाचा दंडक आहे.

पुरूरवा—हे वायो, धनसंपत्तीसह ही सर्व पृथ्वी कोणाची ? क्षत्रियाची किंवा ब्राह्मणाची तें मला कथन कर.

वायु—या जगतीतलावर जें जें कांहीं आहे, तें तें सर्व ब्राह्मण हा सर्व वर्णांचा अग्रजन्मा म्हणून त्याचेंच आहे, असा धर्मकुशल लोकांचा निर्णय आहे. ब्राह्मण ज्या ज्या गोष्टींचा उपभोग घेतो, जें जें दुसऱ्याला देतो, तें तें सर्व त्याचेंच असतें. कारण, तो जन्मतः ज्येष्ठ व गुणतः श्रेष्ठ असल्यानें सर्व वर्णांचा गुरु आहे. नवरा मेल्यानंतर स्त्री ज्याप्रमाणें दिराला पति मानून रहाते, त्याप्रमाणें आपत्कालासाठीं दुसरा मार्गहि आहे. परंतु, मुख्य पक्ष म्हणजे आतां सांगितला हाच होय. स्वर्गरूप परमस्थान व स्वधर्म यांची आशा तुला असेल, हीं जर तुला हवीं असतील, तर हे ऐला, तूं जें जें कांहीं जिंकशील, तें तें व भूमि हीं ब्राह्मणाला दान दे. हा ब्राह्मण सदाचारी, विद्वान्, तपस्वी, धर्मानें वागणारा, स्वधर्माचरणांत संतुष्ट रहाणारा, वित्ताचा लोभ न धरणारा, असा असावा व सर्वप्रकारें परिपूर्ण अशा बुद्धिकौशल्यानें या ब्राह्मणानें राजाला मार्ग दाखवावा.

सत्कुलांत उत्पन्न झालेले, बुद्धिमान् विद्यासंपन्न असे ब्राह्मण नानाप्रकारच्या उपदेशपर भाषणांनीं राजाला योग्य धर्म आचरण्यास प्रवृत्त करतात. अशा ब्राह्मणांनीं जो धर्म आंखून दिला असेल त्याचें क्षत्रधर्माच्या ठिकाणीं रत राहून अनहंकारबुद्धीनें आचरण केल्यास तेवढ्यानेंच त्याला पुण्यप्राप्ति होते

व अखंड यशाचा लाभ होतो. या सर्व पुण्याईमध्यें राजपुरोहित व राजाचा आश्रय करून असलेल्या सर्व प्रजा अंशभागी असतात. राजानें उत्तम प्रकारें ज्यांचें रक्षण केलें आहे अशा सदाचारी, स्वधर्मनिष्ठ, अकुतोभय अशा प्रजा राष्ट्रामध्यें ज्या ज्या धर्मांचें आचरण करतात, त्या त्या धर्मांचा चौथा हिस्सा राजाला मिळतो. देव, मनुष्य, पितर, गंधर्व, उरग, राक्षस, इत्यादि सर्वांचें उपजीवन यज्ञावर आहे. पण राष्ट्र अराजक असल्यानें हें घडत नाहीं. देव, पितर वगैरे राजानें दिलेल्या वस्तूंवरच उपजीविका करितात. या धर्मांचें प्रतिष्ठान राजाचे ठिकाणींच आहे. उन्हाळ्याच्या दिवसांत मनुष्याला शीतळ छायेनें, गार पाण्यानें किंवा मंद वायूनें सुख मिळतें. थंडीच्या दिवसांत त्याला अग्नि, वस्त्रें व सूर्याचें ऊन यांपासून सुख मिळतें. शब्द, स्पर्श, रस, रूप, गंध, यांत त्याचें मन रममाण होतें व या विषयांचा उपभोग त्याला निर्धास्त मनानें घ्यावयास सांपडतो. हें सर्व आपलें रक्षण करणारा राजा आहे, या विश्वासावर होतें. या सर्वांचें श्रेय अभयदान देणाऱ्या राजालाच आहे. या जगांत प्राणदानासारखें दुसरें दान नाहीं. तेव्हां, राजा हा इंद्र, तोच यम, तोच धर्म होय. त्यानेंच हीं रूपें धारण केलेलीं असतात व त्याच्याच आधारावर हें सर्व प्रतिष्ठित झालेलें असतें. १२.१.७२.

---

## अध्याय ७३ वा.

[ १ पुरोहितलक्षणादिवर्णन. २ ऐलकश्यपसंवाद. ]

( १ ) भीष्म—धर्म व अर्थ हे दोन्ही पुरुषार्थ अति गहन व विशाल आहेत. म्हणून राजानें विद्वान् व बहुश्रुत असा राजपुरोहित निवडावा. ज्या राजांचा पुरोहित धर्मकुशल, विद्यासंपन्न असा असतो व जे राजेहि पण अशाच गुणांनीं युक्त असे असतात, तेथ प्रजांचें उत्तम संवर्धन होतें व देव, संतति व पितर यांचेंहि संरक्षण होतें. स्वधर्मरत, श्रद्धाळू, तपस्वी असे परस्परांना अनुरूप असणारे ब्राह्मण व क्षत्रिय हे परस्परांचे मित्र म्हणून ईश्वरानें निर्माण केले आहेत. या दोघांचा मान ठेवल्यानें प्रजा सुखी राहतील. यांचा अपमान केल्यास मात्र त्यांचा नाश होईल. कारण, ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या सहकार्यावरच चातुर्वर्ण्याचा गाडा चालावयाचा असतो, म्हणून तेच चातुर्वर्ण्याचें मूळ आहेत. हे युधिष्ठिरा, याविषयींचा एक प्राचीन इतिहास लोक

सांगतात, तो मी तुला सांगतों, ऐक. हा इतिहास ऐल व कश्यप यांच्या संवादाचा आहे.

(२) ऐल—ज्या वेळेस ब्राह्मण क्षत्रियांचा त्याग करतात किंवा क्षत्रिय ब्राह्मणांचा त्याग करतात, अशा वेळेस यांच्यापैकीं कोण बलवत्तर ठरतो, इतर वर्ण कोणाच्या भजनीं लागतात व कोणाच्या सामर्थ्यावर स्थिर राहूं शकतात, तें, कश्यपमुने, तूं मला सांग.

कश्यप—ज्या ठिकाणीं ब्राह्मण व क्षत्रिय यांचा विरोध येतो, त्या ठिकाणीं क्षत्रियाचें राज्य सामर्थ्यहीन होतें. तें मोडकळीला येऊन दस्यु लोक बलाढ्य होतात व राष्ट्राचा उपभोग घेतात. अशा तऱ्हेनें ब्रह्म-क्षत्रांच्या विरोधांत दस्यु प्रबल झाले म्हणजे राजाच्या कर्मांवरून त्याचा वर्ण कोणता हें सज्जन ओळखतात. अशा देशांत-म्हणजे ब्रह्म-क्षत्रांचा विरोध ज्या ठिकाणीं आहे अशा स्थळीं—विद्याविवृद्धि होत नाहीं, संतति वाढत नाहीं, मोठाल्या भांड्यांतून दधिमंथन होऊं शकत नाहीं, राजांना जयप्राप्ति होत नाहीं, राजांचीं मुलें—क्षत्रियांनीं ब्राह्मणांना टाकिल्यास—वेदाध्ययन करीनाशीं होतात. जे क्षत्रिय ब्राह्मणांचा विरोध करून त्यांचा त्याग करतात, त्यांच्या घरांत वित्तसंवर्धन होत नाहीं, अध्ययन व यज्ञादिकर्महि होत नाहीं. ब्राह्मणांचा त्याग करणारे क्षत्रिय दस्युरूप होतात व त्यांचा नाश होतो.

ब्राह्मण व क्षत्रिय हे परस्परांच्या रक्षणाकरितां नित्य संलग्नच असले पाहिजेत. क्षत्रियाचा आधार ब्राह्मण व ब्राह्मणाचा आधार क्षत्रिय असा हा अन्योन्य संबंध आहे. ब्राह्मण व क्षत्रिय नित्य परस्परांच्या आधारावर रहातील, तर जगांत त्यांना फार मोठी प्रतिष्ठा प्राप्त होईल. फार पुरातन कालापासून चालत आलेला हा मित्रभाव जर कांहीं कारणानें संपला तर सर्वच प्रमूढ होऊन जातात. अगाध महासागरांत ज्याप्रमाणें दुर्बल नौका परतीराला जाऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्म-क्षत्रियांच्या विरोधामुळें प्रजेची स्थिति होते. चारी वर्ण दिङ्मूढ होतात व प्रजांचा क्षय होण्यास सुरवात होते. ब्रह्मवृक्षाचें रक्षण यथायोग्य झाल्यास त्याच्यापासून सुख व सुवर्ण यांची प्राप्ति होऊं शकते. पण, तोच ब्रह्मवृक्ष संभाळला गेला नाहीं तर त्यांतून दुःख व पाप यांचीच निर्मिति होते. ब्रह्मचाऱ्याच्या हातून ज्या वेळेस वेदाध्ययन संपूर्ण होत नाहीं, वेदरक्षण करण्याची पाळी जेव्हां ब्राह्मणांवरच येते, त्यावेळेस देव त्या

ठिकाणीं क्वचित्च वृष्टि करितात. स्त्रीहत्या किंवा ब्रह्महत्या करून सुद्धां ज्याची सभेमध्यें प्रशंसा होते व राजाचें ज्याला भय वाटत नाहीं, असल्या माणसापासून क्षत्रियाला संकट प्राप्त होतें. हे ऐला, पापी लोकांच्या पापाचा संभार अतिशय झाला–हे लोक अतिशय पाप करूं लागले–म्हणजे संहारकर्त्री रुद्रदेवता उत्पन्न होते आणि मग ती साधु, असाधु, सर्वांचाच संहार करते.

ऐल—ही रुद्रदेवता कोठून उत्पन्न होते व ती कोणत्या स्वरूपाची असते? जगांत तर आपल्याला प्राणीच इतर प्राण्यांना मारतात, असें दिसून येतें. तेव्हां हे कश्यपा, ही रुद्रदेवता कोठून कशी जन्मास येते, हें तूं मला सांग.

कश्यप—हे ऐला, मनुष्यांच्या शरीरांत जो आत्मा असतो तो स्वतःच्या देहाचा व दुसऱ्याच्याहि देहाचा नाश करतो. रुद्रस्वरूप वाऱ्याच्या वावटळीप्रमाणें असतें व प्राण्यांचें स्वरूप मेघांसारखें असतें. वारा ज्याप्रमाणें मेघांना इकडून तिकडे उडवून लावतो, तसाच रुद्र ह्या प्राण्यांना अस्थिर करून सोडतो.

ऐल—पापपुण्याशीं ज्याचा कांहीं संबंध नाहीं, अशा पुरुषाला देखील पापाची झळ पापी पुरुषांइतकीच लागणार असेल—दंड आपला अधिकार दोघांवरहि सारखाच गाजविणार असेल—तर पाप करूं नये व पुण्यच करावें असा निर्बंध कां असावा? पुण्य कां करावें व पाप कां करूं नये, याला कारण काय?

कश्यप—मनुष्यानें प्रत्यक्ष पाप न केलें तरी पापी माणसांशीं संसर्ग ठेवल्यानें सुद्धां निष्पाप माणसाला पापी माणसाइतकाच दंड होतो. ओलें गवत वाळल्या गवताशेजारीं ठेवलें तर वाळलेल्याबरोबर ओलेंहि जळतें. म्हणून पापी माणसांशीं संसर्ग कधींहि ठेवूं नये.

ऐल—साधु व असाधु यांना पृथ्वीचा आधार सारखाच मिळतो. पापी व पुण्यवान् या दोघांनाहि सूर्याच्या उष्णतेचा फायदा तितकाच व वाऱ्यापासून होणारें सुखदुःख किंवा पाण्याच्या निर्मलतेचा उपयोग हींहि पापी व पुण्यवान् या दोघांना सारखींच असतात. मग पापी व पुण्यवान् मनुष्य यांच्यांत भेद तो काय?

**कश्यप**—हे राजपुत्रा, इहलोकीं जरी अशी स्थिति आहे, तरी परलोकांत ती तशी नाहीं. इहलोकीं पापाचरण करणारा माणूस व पुण्याचरण करणारा मनुष्य हे परलोकीं गेल्यावर फार मोठा फरक दिसून येतो. पुण्यवान् प्राण्याला मधुयुक्त, घृताचे दिवे असलेला, सुवर्णाप्रमाणें तेजस्वी, अमृताचा केवळ गाभाच, अशा लोकांची प्राप्ति होते. पुण्याचरण करणारा मनुष्य त्या ठिकाणीं निरतिशय आनंद पावतो. त्या ठिकाणीं मृत्यु, जरा व दुःख यांचा लवलेशहि नसतो. पापकर्में करणाऱ्या मनुष्याचे कपाळीं अत्यंत घोर असा अंधकारमय नरक लिहिलेला असतो. त्या ठिकाणीं त्याला नेहमीं दुःख व शोक होतो. अशा नरकांत पापी मनुष्याला आपल्या कर्मांचा झाडा देत पिचत पडावें लागतें, त्याला कोणी मानीत नाहीं. ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यांत नसता भेद कल्पून जर प्रजा त्या तऱ्हेनें वागूं लागतील, तर त्यांना दुःसह अशा दुःखाची प्राप्ति होईल. ही गोष्ट ध्यानांत घेऊन राजानें पुरोहित जो निवडावयाचा तो बहुश्रुत असाच निवडावा, एकांगी निवडूं नये. अशा तऱ्हेचा पुरोहित निवडल्यावर मगच आपल्याला अभिषेक करवावा; कारण, धर्माचा तसा विधि आहे. धर्मानें सर्व गोष्टींत श्रेष्ठ म्हणजे ब्राह्मण असें सांगितलें आहे. ब्राह्मणाची उत्पत्ति प्रथम झाली असें धर्मशास्त्रवेत्ते लोक म्हणतात. हा अग्रजन्मा असल्यानें जें जें या जगांत श्रेष्ठ त्याची प्राप्ति प्रथम याला झाली पाहिजे. तेव्हां, पुढें केलेल्या हातावर पडणारा घांस खाऊन रहाणारा ब्राह्मण हा सर्वमान्य व सर्वपूज्य होय. जें जें कांहीं श्रेष्ठ किंवा विशिष्ट असें असेल, तें तें सर्व ब्राह्मणाला प्रथम द्यावें, अशी धर्माची आज्ञा आहे. राजा कितीहि सामर्थ्यवान् असला तरी त्यानें हीच गोष्ट प्रथम केली पाहिजे. कारण, ब्राह्मण क्षत्रियांचें बल वाढवितात व क्षत्रियांमुळें ब्राह्मणांना तेज चढतें. म्हणून राजानें ब्राह्मणांचा सत्कार विशेष तऱ्हेनें करावा. १२.१.७३.

## अध्याय ७४ वा.

[ १ युधिष्ठिराला मुचकुंदचरित्रकथन. ]

( १ ) भीष्म—राष्ट्राचा योगक्षेम राजावर अवलंबून असतो व राजाचा योगक्षेम पुरोहिताच्या आधीन असतो. अनावृष्टि वगैरे आधिदैविक कारणांनीं उत्पन्न होणारें प्रजांचें दुःख ज्या ठिकाणीं ब्राह्मण हरण करतात व परचक्रादि आधिभौतिक दुःख बाहुबलाच्या जोरावर ज्या ठिकाणीं क्षत्रिय नाहींसें करतात, त्या राज्यांतील प्रजा सर्वदा सुख पावतात. या संबंधांत मुचकुंद राजा व कुबेर यांचा एक संवाद इतिहासवेत्ते सांगतात, तो असा—

एकदां मुचकुंद राजा सगळया पृथ्वीवर दिग्विजय करून स्वतःच्या बळाचा अजमास पाहण्यासाठीं अलकेचा अधिपति कुबेर याजकडे गेला. तें पाहून वैश्रवण कुबेरानें राक्षस निर्माण केले व त्या राक्षसांनीं मुचकुंदाचें सैन्य हवें तसें झोडपलें. हें होऊं लागल्याबरोबर मुचकुंद राजानें आपल्या विद्वान् पुरोहिताची निंदा करण्यास सुरवात केली. मग धर्मज्ञ वसिष्ठांनीं उग्र अशी तपश्चर्या करून राक्षसांचा नाश करून मुचकुंदाचा मार्ग मोकळा करून दिला. तेव्हां, वैश्रवण कुबेरानें मुचकुंदाला गांठलें व सैन्याचा वध होत असलेला पाहून तो त्याला म्हणाला, "तुझ्या पूर्वीं अनेक बलवान् राजे होऊन गेले. त्यांच्याहि जवळ पुरोहित होते, परंतु आज तूं जें वर्तन करीत आहेस तसलें वर्तन, हे राजा, त्यांनीं पूर्वीं कधींच केलें नाहीं. ते राजे बलवान् होते, अस्त्रविद्येचा अभ्यास त्यांनीं केला होता. परंतु सुखदुःखाचा ईश जो मी त्या माझा त्यांनीं सत्कारच केला. तुझ्या अंगीं कांहीं बाहुबलाचें सामर्थ्य असेल तर तें स्वतंत्रपणें दाखीव. ब्राह्मणांच्या बलाचा आश्रय घेऊन तूं हें काय मांडलें आहेस?" हें धनदाचें भाषण ऐकतांच मुचकुंदाला अत्यंत राग आला व त्यानें त्याला उद्देशून मोठें न्यायघटित, असंदिग्ध व असंभ्रांत असें भाषण केलें.

मुचकुंद—ब्रह्मदेवानें ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन्ही एकबल म्हणून निर्माण केले आहेत. ब्राह्मणाचें बल वेगळें व क्षत्रियाचें बल वेगळें असें मानूं लागल्यास प्रजापालनाचें कार्य व्यवस्थित तऱ्हेनें चालणार नाहीं. तपश्चर्येचें मंत्रबल हें नित्य ब्राह्मणांच्या ठिकाणीं प्रतिष्ठित असतें व अस्त्र-विद्येचें बाहुबल हें क्षत्रियाचे ठिकाणीं नित्य प्रतिष्ठित असतें. ब्राह्मणांचें

तपोबल व क्षत्रियांचें बाहुबल या दोघांनीं एकत्र होऊन प्रजासंरक्षणाचें कार्य करावयाचें असतें. मग, मी त्याच तऱ्हेनें वागत असतांना माझी तूं काय म्हणून निंदा करतोस ? ”

त्यावर त्या सपुरोहित मुचकुंदाला वैश्रवण म्हणाला,

‘ हे राजा, ईश्वराच्या अनुज्ञेवांचून मी कोणाला राज्य देत नाहीं व त्याच्या अनुज्ञेशिवाय कोणाचें राज्य काढूनहि घेत नाहीं. मी तुला ही सगळी पृथ्वी दान देतों. हिचें तूं पालन करून राज्योपभोग घे. ’ हें ऐकून मुचकुंद राजा म्हणाला—

मुचकुंद्—आपण दान दिलेल्या पृथ्वीचें राज्य करण्याची माझी इच्छा नाहीं. माझ्या बाहुबलानें मी पृथ्वी जिंकीन व तिचें राज्य करीन.

भीष्म—मुचकुंदाचें हें भाषण ऐकून वैश्रवण कुबेर अतिशय विस्मित झाला. त्याची क्षत्रधर्मावरील निरतिशय श्रद्धा पाहून त्याला आश्चर्य वाटलें. नंतर स्वपराक्रमानें संपादिलेल्या पृथ्वीच्या राज्याचा उपभोग क्षत्रधर्मानुसार मुचकुंदानें घेतला. हे युधिष्ठिरा, याप्रमाणें जो राजा ब्राह्मणांचा योग्य मान ठेऊन त्यांच्या साहाय्यानें चालतो, तो सबंध पृथ्वी जिंकूं शकतो व त्याला अतुल यशःप्राप्ति होते. ब्राह्मणानें नित्य हातीं उदक घेऊन तपश्चर्या करावी. क्षत्रियानें नित्य हातीं शस्त्र धारण करून प्रजारक्षण करावें. या जगतीतलावर जें जें कांहीं आहे तें तें सर्व ब्रह्म-क्षत्रियांच्या दोघांच्या आधीन आहे. १२.१.७४.

---

## अध्याय ७५ वा.

[ १ राज्यस्वीकार करण्याविषयीं युधिष्ठिराला भीष्माचा उपदेश. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, राजानें कोणत्या तऱ्हेनें वागावें म्हणजे त्याचे हातून प्रजांचें संवर्धन होतें व त्याला पुण्यलोकांची प्राप्ती होऊं शकते, तें मला सांग.

भीष्म—राजानें नेहमीं दानशील, यज्ञशील, उपवासरत व तपोमग्न राहून प्रजापालनाचे कामीं नेहमीं दक्ष राहावें. सर्व प्रजांचें धर्मानें पालन करणाऱ्या राजानें धार्मिकांना उत्थापन देऊन दानादि प्रकारांनीं त्यांचा सन्मान करावा. राजानें धर्माचा मान ठेवला, तरच इतर लोक धर्माचा मान ठेवतील.

राजा जें जें करतो तेंच प्रजांनाहि आवडतें. हे राजा, राजानें शत्रूंच्या संबंधांत नित्य मृत्यूप्रमाणें दंडधारण करून सज्ज असावें. सर्व दस्यूंचा वध करावा. कोणत्याहि लोभाला बळी पडून कोणालाहि क्षमा करूं नये. राजानें ज्यांचें चांगलें संरक्षण केलें आहे, अशा प्रजांच्या हातून जें धर्माचरण घडतें त्याचा चौथा हिस्सा राजाला मिळतो. प्रजा जें अध्ययन करील, जें दान करील किंवा जें जें यज्ञकर्म करील त्या सर्वांचा चौथा हिस्सा धर्मानें प्रजापालन करणाऱ्या राजाला मिळतो. पण, प्रजांचें रक्षण यथान्याय न करणाऱ्या राजाच्या राज्यांत जें जें पाप होतें, त्या पापाचाहि चौथा हिस्सा राजाकडे येतो. अशा स्थितींत प्रजांचें सगळेंच पाप दुष्ट व खोटें बोलणाऱ्या राजाकडे जातें असें कित्येक म्हणतात. पण, अर्धें पाप राजाकडे जातें हा मात्र निश्चित सिद्धांत होय. अशा प्रकारच्या पापापासून राजाची मुक्तता कोणत्या तऱ्हेनें होते तें सांगतों, ऐक. चोरांनीं हरण केलेलें धन जर परत मिळविणें राजाला अशक्य होईल, तर अशा दुर्बल राजानें स्वतःच्या कोशांतून तें द्रव्य मालकाला द्यावें. सर्व वर्णांतील मनुष्यांनीं ब्राह्मणांच्या द्रव्याचें ब्राह्मणांइतक्याच आस्थेनें रक्षण केलें पाहिजे. ब्राह्मणांच्या संबंधांत अपकार करणाऱ्या मनुष्यानें राष्ट्रांत राहूं नये. ब्राह्मणांच्या द्रव्याचें रक्षण केल्यानें सर्व गोष्टींचें संरक्षण होतें. त्यांच्याच प्रसादानें राजा कृतकृत्य होतो. प्राणिमात्र ज्याप्रमाणें पर्जन्यावर किंवा पक्षी ज्याप्रमाणें एखाद्या महावृक्षाच्या आश्रयावर जगतात, तद्वत् सर्वार्थ साधून देणाऱ्या नृपावर मनुष्यांचें जीवन अवलंबून आहे. लोभी व नेहमीं विषयासक्त असणाऱ्या, दुष्ट व अति-हव्यासी राजाकडून प्रजापालन व्यवस्थित रीतीनें होणें शक्य नाहीं.

युधिष्ठिर—राज्यसुखाच्या लोभानें राजपदाची इच्छा मीं मनांत क्षणभरहि वागविली नाहीं. तेव्हां, धर्मार्थसाधन करण्यासाठींच मी वनांत जातों. राजपदाची इच्छा धर्माचरणाची प्राप्ति करून घेण्यासाठीं करणें मला आवडतें. राजपद स्वीकारल्यानें धर्म साधत नाहीं, तेव्हां ज्यांत धर्म नाहीं, असलें राज्य मला नको. अरण्यांत जाऊन तेथील यज्ञाचरणास योग्य अशा ठिकाणीं दंडाचा न्यास करून व इंद्रियनिग्रह करून मी मूलफलाशन करीन व मुनिवृत्तीनें धर्माचें आराधन करीन.

भीष्म—युधिष्ठिरा, ही जी तुझी अतिदयाशील, कठोरपणाचा लवलेशहि नसलेली बुद्धि ती माझ्या पूर्ण परिचयाची आहे. पण ती या कामीं निरुपयोगी ठरते. निर्भेळ, दयाशील वृत्तीच्या मनुष्याच्या हातून राज्यशकट हांकला जाणें

शक्य नाहीं. हे राजा, तूं अतिशय हलक्या मनाचा, अतिशय सरळ, अतिधार्मिक व म्हणूनच एका अर्थानें निर्बल, धर्म व दया यांनीं युक्त असा आहेस. याच कारणासाठीं लोकांत तुला कोणी मानीत नाहीं. तुझ्या वाडवडिलांच्या लौकिकाला उचित अशा तऱ्हेचा आयुष्यक्रम तूं घालवावास. ज्या तऱ्हेनें आयुष्य घालविण्याची इच्छा तुला आहे, तो आयुःक्रम राजेलोकांना उचित नव्हे. एकप्रकारच्या निर्वेदामुळें जी आत्यंतिक दयावृत्ति तुझ्यांत उत्पन्न झाली आहे, तिचाच तूं अवलंब करूं लागशील, तर प्रजापालनरूपी धर्माचरणाचें फल तुला कधींहि मिळणार नाहीं. पांडु राजानें किंवा कुंतीनें तुझ्याकरितां असला वर कधींच मागून घेतला नव्हता. तूं बुद्धिमान् व प्रज्ञावान् असून आतां करीत आहेस असलें आचरण करावेंस, अशी त्यांची इच्छा कधींच नव्हती. तूं शौर्य, बल व सत्य यांनीं युक्त आहेस, असें तुझ्या पित्यानें नेहमीं म्हणावें. तुझ्यापासून मोठेपणा व आत्यंतिक औदार्य यांचीच अपेक्षा कुंतीनें केली होती.

देवसंतर्पण व पितृसंतर्पण हीं मनुष्यलोकींचीं दैवतें आहेत. पितर व देव यांच्या आशा नेहमीं पुत्रांच्या कर्तबगारीवर अधिष्ठित झालेल्या असतात. दान, अध्ययन, यज्ञकर्म, प्रजांचें परिपालन हा क्षत्रियांचा धर्म होय. हा तुला योग्य वाटो वा अयोग्य वाटो, त्या धर्माचें आचरण जन्मापासूनच तुला लागलेलें आहे. योग्य प्रसंगीं राज्यशकटाचा भार मस्तकावर वाहून नेत असतां राजा मरी क्षीण झाला, तरी हे कौंतेया, त्यांत त्याची कीर्ति किमपि क्षीण होत नाहीं. सर्व प्रकारें नियंत्रित अश्वसुद्धां अस्खलितपणें रथ वाहून नेतो. मात्र राजाच्या बोलण्यांत आणि कृतींत मेळ असणें अवश्य आहे. कारण सिद्धि ही कर्मावर अवलंबून असते. कोणताहि धार्मिक गृहस्थ अथवा राजा ब्रह्मनिष्ठाप्रमाणें कधीं धर्माचरण करीत राहिला आहे असें नाहीं. जें चांगलें कृत्य आहे, तें थोडकें असलें, तरी त्यांतील सार विपुल असल्यामुळें तें मोठेंच होय. राज्य करण्यांत हिंसादोष घडत असल्यामुळें जरी तें तुच्छ वाटत असलें, तरी बहुजनांच्या सुखहेतूमुळें तें राजाला श्रेयस्कर होय. कांहीं न करण्यापेक्षां थोडें केलेलें बरें. कर्म न करणें यापेक्षां जगांत दुसरें वाईट असें कांहीं नाहीं. जेव्हां एखाद्या कुलीन आणि धर्मज्ञ मनुष्याला साचिव्यादि पदाचा अधिकार प्राप्त होतो, तेव्हां प्रजेचें योगक्षेम उत्तम प्रकारें चालून ती गोष्ट राजाला हितकारक होते. धर्मनिष्ठ राजानें राज्यप्राप्तीनंतर कोणाला दान देऊन, कोणाला आपलें सामर्थ्य दाखवून तर कोणाशीं गोड

भाषण करून वश करावें. कुलीन, विद्वान् लोक चरितार्थ चालवितां न आल्यामुळें भयभीत होऊन ज्याच्याकडे येतात आणि तृप्त होऊन जातात, ह्याहून अधिक श्रेष्ठ असा धर्म तो कोणता ?

युधिष्ठिर—हे ताता, स्वर्गप्राप्तीचा उत्तम उपाय कोणता आहे ? त्यापासून प्राप्त होणारें उत्तम सुख कशा प्रकारचें असतें आणि त्यापुढें परम ऐश्वर्य प्राप्त होतें, तें माहीत असल्यास मला सांग.

भीष्म—जो राज्य करीत असतां भयाकुल झालेल्या मनुष्याला एक क्षणभर धीर मिळून क्षेमप्राप्ति होते, तो राजा स्वर्ग जिंकणारा होतो, हें मी तुला सत्य सांगतों. तरी हे कुरुसत्तमा, तूंच आतां आम्हां कौरवांवर प्रेम ठेवून त्यांचा राजा हो, स्वर्गप्राप्त्यर्थ यज्ञ कर, सज्जनांचें पालन कर आणि दुष्टांचा संहार कर. हे ताता, सर्व प्राणी जसे पर्जन्याच्या योगानें जगतात किंवा पक्षी ज्याप्रमाणें मधुर वृक्षांच्या आश्रयानें राहतात, त्याप्रमाणें तुझ्या साहाय्यानें तुझे सुहृज्जन आणि सज्जन लोक आनंदांत सुखानें नांदोत. जो राजा धीट, शूर, शत्रूवर प्रहार करणारा, दयाळु, जितेंद्रिय, वत्सल आणि आपल्या वैभवाचे सर्व विभागी आहेत, असें समजून वागणारा असतो, अशाचाच सर्व लोक आश्रय करितात. १२.१.७५.

---

## अध्याय ७६ वा.

[ १ भीष्म युधिष्ठिराला ब्राह्मणांचीं निषिद्ध कर्में व राजधर्म कथन करितो. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, जे आपापल्या कर्मांमध्यें आसक्त व जे कित्येक भलत्याच कर्मांत रत झालेले असे ब्राह्मण आहेत, त्यांतील भेद कोणता, तें मला सांग.

भीष्म—हे राजा, जे सर्व प्रकारच्या विद्यालक्षणांनीं युक्त असून सर्वांवर समदृष्टि ठेवितात, ते ब्रह्मसमान ब्राह्मण होत, असें सांगितलें आहे. ऋग्, यजु आणि साम या तीन वेदांत निष्णात असून जे स्वकर्मांनें वागणारे ब्राह्मण आहेत, ते देवतुल्य होत. जे ब्राह्मण जन्माला येऊन सर्व उचित कर्मांचा त्याग करतात व केवळ नामधारी ब्राह्मणांसारखे कृपणपणें वागतात, ते शूद्रसम होत. तसेंच ज्यांचें वेदाध्ययन झालें नाहीं व ज्यांचे येथें अग्न्याधान

होत नाहीं, अशा ब्राह्मणांकडून धार्मिक राजानें कर घ्यावा व त्यांना वेठीसहि धरावें. वेतन घेऊन धर्माधिकार चालविणारे व द्रव्य घेऊन देवपूजा करणारे, नक्षत्रज्ञानावर निर्वाह करणारे, सर्व वर्णांकडून यज्ञ करविणारे आणि नौका-साधनानें प्रवास करणारे हे पांच प्रकारचे ब्राह्मण चांडालतुल्य समजावे. ऋत्विक्, पुरोहित, मंत्री, दूत आणि हेर यांचें काम करणारे हे क्षत्रियतुल्य ब्राह्मण होत. अश्वसादी, गजसादी, रथी आणि पदाति हे ब्राह्मण वैश्यतुल्य समजावे. खजिन्याला तोटा आला असतां ब्रह्मतुल्य आणि देवतुल्य या ब्राह्मणांव्यतिरिक्त इतरांकडून कर घ्यावा. ज्यांनीं आपला धर्म सोडला आहे अशा ब्राह्मणांच्या व अब्राह्मणांच्या वित्तावर राजाचा अधिकार आहे, असें श्रुतीचें म्हणणें आहे. ज्यांनीं आपलें कर्म सोडलें आहे, अशा ब्राह्मणांची राजानें कधींहि उपेक्षा करूं नये. धर्मरक्षणार्थ त्यानें त्यांचें नियमन करावें किंवा इतर ब्राह्मणांपासून त्यांना वेगळें ठेवावें. ज्याच्या राज्यांत ब्राह्मण चोरी करीत असतात, तो राजाच अपराधी होय, असें विद्वानांचें मत आहे. वेदाध्ययन केलेले स्नातक ब्राह्मण जर केवळ चरितार्थाकरितां चोरी करीत असतील, तर राजानें त्यांच्या पोषणाची तजवीज अवश्य केली पाहिजे. उदरंभरणाची व्यवस्था करूनहि जर तो चौर्यकर्म सोडणार नाहीं, तर त्याला त्याच्या बांधवांसह राष्ट्रांतून घालवून द्यावें. १२.१.७६.

---

## अध्याय ७७ वा.

[ १ युधिष्ठिरप्रश्न. २ भीष्माकडून युधिष्ठिराला केकयराजोपाख्यानकथन. ]

( १ ) युधिष्ठिर—हे भरतर्षभा, राजाची सत्ता कोणत्या द्रव्यावर असते, व त्याचें वर्तन त्यासंबंधीं कशा प्रकारचें असावें, हें मला कथन कर.

( २ ) भीष्म—अब्राह्मणांमध्यें आणि ब्राह्मणांमध्यें जे कोणी धर्मविरुद्ध आचरण करणारे असतील, त्यांचे द्रव्यावर राजाचा अधिकार असल्याचें वेदांत सांगितलें आहे. शास्त्रविरुद्ध वागणाऱ्या ब्राह्मणांची राजानें कधींहि उपेक्षा करूं नये, असें पूर्वकालीन साधुपुरुषांचें मत आहे. ज्याच्या राज्यामध्यें ब्राह्मण लोक चोऱ्या करणारे असतात, तें चौर्य म्हणजे त्या राजाच्याच पातकाचें फल होय, असें समजलें जातें. म्हणून सर्व राजर्षींनीं आजपर्यंत ब्राह्मणांचें

परिपालन केलें आहे. यासंबंधीं प्राचीन इतिहास म्हणून एक गोष्ट सांगत असतात. केकय देशच्या राजानें सांगितलेली ती गोष्ट अशी आहे.

पूर्वी कोणी वेदाध्ययनसंपन्न व तीक्ष्ण आचरण करून तपोनुष्ठान करणारा केकय देशचा कैकय नांवाचा राजा होता. एकदां कोणी राक्षस अरण्यांत त्यावर बळजबरी करून त्याला नेत असतां राजा म्हणाला—

राजा—माझ्या देशांत कोणी चोर नाहीं, कृपण नाहीं, कीं कोणी मद्यपीहि नाहीं. अग्न्याधान किंवा यजन न करणारे असेहि कोणी माझ्या राज्यांत नाहींत. मग तुझा मजमध्यें प्रवेश कसा झाला? माझ्या राष्ट्रांत कोणी अविद्वान्, नियमनिष्ठतेनें व्रतें न पाळणारा किंवा सोमपान न करणारा असाहि कोणी ब्राह्मण नाहीं. माझ्या राज्यांत विविध प्रकारच्या दक्षिणा देऊन लोक यज्ञ करीत असतात. अध्ययनरहित व व्रतरहित असा कोणीहि या राज्यांत सांपडणार नाहीं. माझ्या राज्यांत ब्राह्मण स्वतः अध्ययन करून दुसऱ्यांना अध्यापन करितात, यज्ञ करितात व दुसऱ्याकडून करवितात, दान देतात व प्रतिग्रह घेतात. अशा प्रकारच्या षट्कर्मांत सर्वदा ते आसक्त असतात. माझ्या राज्यांत ब्राह्मणांना सर्वदा मान मिळत असून ते कर्मनिष्ठ, सत्यवादी, सौम्य मनाचे आणि आपल्या द्रव्याचे सर्व विभागी आहेत असें मानणारे आहेत, असें असतां तुझा मजमध्यें प्रवेश झाला हें कसें? माझ्या राज्यांत क्षत्रिय लोक कोणाकडे कधींहि याचना करीत नाहींत, दान करितात. ते सत्यधर्मविशारद असून अध्यापन न करितां अध्ययन करीत असतात. इतरांचें यज्ञकर्म न चालवितां स्वतः यज्ञ करितात. ते ब्राह्मणांचें परिपालन करणारे असून संग्रामांतून कधींहि पलायन करीत नाहींत. ते स्वकर्मनिष्ठ असतां तुझा मजमध्यें प्रवेश झाला हें कसें? माझ्या राज्यांतील वैश्य लोक शेती, गोरक्षण आणि वाणिज्य यांवर निष्कपटपणानें आपला चरितार्थ चालवितात. ते सावधानतेनें आपापल्या कार्यांमध्यें दक्ष राहून सदाचरणी व सत्यवचनी आहेत. ते सर्वांशीं मिळून आपल्या संपत्तीचा उपभोग घेत असतात. तसेंच इंद्रियदमन, शौचाचार आणि स्नेह हेहि गुण त्यांचे अंगीं आहेत. अशा रीतीनें माझे वैश्य लोकहि आपापल्या कर्मांमध्यें आसक्त असतां तुझा मजमध्यें प्रवेश व्हावा, हें कसें? माझे शूद्र लोकहि कोणाचा हेवा न करितां तीन्ही वर्णांची सेवा करून आपली उपजीविका चालवितात. ते सदा स्वकर्मनिष्ठ असतात. असें असतां तुझा मजमध्यें प्रवेश व्हावा हें कसें?

आतां माझ्या स्वतःविषयीं म्हणशील तर मीहि दीन, अनाथ, वृद्ध, दुर्बल, आतुर आणि स्त्रिया यांना माझ्या संपत्तीचा विभाग देतों. यथाविधि प्रस्थापित झालेले कुलधर्म, देशधर्म इत्यादिकांचा मीं कधीं उच्छेद केला नाहीं. माझ्या राज्यांत तपस्वी लोकांचा सर्वदा सत्कार होत असून त्यांचें योग्य रीतीनें पालनहि होत असतें. इतकेंच नव्हे, तर माझ्या संपत्तीचा विभागहि मी त्यांना देत असतों. माझ्या संपत्तीचा विभाग इतरांना दिल्याशिवाय तिचा उपभोग मी कधींहि घेत नसतों. परस्त्रीशीं मी कधीं संबंध ठेवीत नाहीं व कधीं एकटा क्रीडासक्तहि होत नाहीं. ब्रह्मचाऱ्यावांचून दुसरा कोणीहि माझ्या राज्यांत भिक्षा मागत नाहीं किंवा कोणीहि संन्याशी ब्रह्मचर्यरहित नसतो. ऋत्विजांवांचून माझ्या राज्यांत कधीं होम होत नाहीं. विद्वान् लोकांचा, वृद्धांचा किंवा तपस्वी जनांचा मी केव्हांहि अनादर केला नाहीं. माझें सर्व राष्ट्र झोंपीं गेलें असतां त्यांच्या रक्षणार्थ मी जागत बसतों. माझा पुरोहित मोठा बुद्धिमान्, वेदाध्ययनसंपन्न असून, मोठा तपस्वी, सर्वधर्मवेत्ता व माझ्या सर्व राष्ट्रावर सत्ता चालविणारा आहे. मी द्रव्यदानानें विद्याप्राप्तीची इच्छा करितों; सत्यतेनें वागून व ब्राह्मणांचें परिपालन करून द्रव्य संपादन करूं इच्छितों आणि वडिलांची शुश्रूषा करण्याकरितां त्यांचा आश्रय करितों. मला राक्षसांची भीति बाळगण्याचें कारण नाहीं. माझ्या राष्ट्रामध्यें कोणीहि विधवा स्त्री नाहीं. कपटी, चोर, यज्ञ करूं नये, अशांचा यज्ञ करणारा कोणी पापकर्मी नामधारी ब्राह्मणहि माझ्या देशांत नाहीं. आणि म्हणूनच मला राक्षसांची भीति वाटत नाहीं. धर्माकरितां युद्ध करीत असतां शस्त्राघातांनीं छिन्न झाली नाहीं, अशीं दोन अंगुलेंहि जागा माझ्या शरीरावर नाहीं. गोब्राह्मण व यज्ञ यांसाठीं लोक माझ्या राष्ट्रामध्यें सर्वदा स्वस्तिवाचन करितात. माझ्या कल्याणाची इच्छा करीत असतात. असें असतां माझ्या शरीरांत तुझा प्रवेश कसा झाला ?

राक्षस—हे कैकेया, ज्याअर्थीं सर्व अवस्थांमध्यें तुझें लक्ष धर्माकडे आहे, त्याअर्थीं आतां तूं गृहीं जा, तुझें कल्याण असो. मीहि आतां जातों. हे केकयाधिपते, जे सर्वदा गोब्राह्मण आणि आपल्या प्रजाजनांचें पालन करितात, त्यांना राक्षसांपासून व अग्नीपासून कधींहि भीति नसते. ज्यांचे पुरोहित ब्राह्मण आहेत, ब्रह्म हें ज्यांचें उत्कृष्ट बल आहे आणि ज्यांच्या प्रजा नेहमीं अतिथिप्रिय आहेत, त्यांना स्वर्गप्राप्ति होते.

भीष्म—हे राजा, म्हणूनच ब्राह्मणांचें राजानें रक्षण करावें. त्यांचें रक्षण केलें असतां तेहि राजाचें रक्षण करितात. उत्तम प्रकारें आचरण ठेवणाऱ्या राजांना त्यांचा आशीर्वाद मिळत असतो. म्हणून राजानें अयोग्य मार्गानें जाणाऱ्या ब्राह्मणांचें नियमन करावें आणि पुढें प्रजानुग्रहाकरितां त्यांना आपल्या संपत्तीचा विभाग द्यावा. याप्रमाणें जो राजा आपल्या नगरांतील आणि राष्ट्रांतील प्रजांसंबंधीं वर्तन ठेवितो, त्याचें येथें कल्याण होतें व तो इंद्रलोकीं जातो. १२.१.७७.

---

## अध्याय ७८ वा.

[ १ ब्राह्मणानें आपत्कालीं वैश्यवृत्ति स्वीकारावी कीं काय असा युधिष्ठिराचा प्रश्न. २ आपद्धर्मकथन. ]

(१) युधिष्ठिर—हे भारता, आपत्कालींहि राजधर्मांचें पालन करून ब्राह्मणानें आपली उपजीविका चालवावी, असें तूं सांगितलेंस; परंतु आपत्कालीं वैश्यवृत्तीचा स्वीकार करून ब्राह्मणानें आपला चरितार्थ करावा किंवा नाहीं, ह्याविषयीं तुझें काय मत आहे ?

(२) भीष्म—क्षात्रधर्मानें वागण्यास ब्राह्मण जर शक्त नसेल, तर त्यानें वैश्यधर्मानें वागून आपला चरितार्थ चालवावा आणि त्यांतहि वृत्तिक्षय होऊन उपजीविका चालविणें कठीण झाल्यास त्यानें कृषि आणि गोरक्षण ह्यांचें अवलंबन करून रहावें.

युधिष्ठिर—हे भरतर्षभा, वैश्यधर्म स्वीकारून कोणत्या वस्तूंचा विक्रय केल्यानें ब्राह्मणाच्या स्वर्गप्राप्तीस ती गोष्ट विरोधक होईल.

भीष्म—युधिष्ठिरा, सुरा, लवण, तीळ, गाई, मेंढ्या, म्हशी, वृषभ, मध, मांस आणि शिजलेलें अन्न हे पदार्थ कोणताहि प्रसंग आला, तरी ब्राह्मणानें विकूं नयेत. यांचा विक्रय केल्यानें ब्राह्मण नरकास जातो. अज हा अग्नि, मेष हा वरुण, सूर्य हा अश्व, अन्न ही पृथ्वी आणि धेनु ही यज्ञ किंवा सोम अशा देवता आहेत. हे पदार्थ विकल्यानें ह्या देवताविक्रयाचें पाप लागतें. म्हणून ह्यांचा विक्रय केव्हांहि करूं नये. हे भारता, शिजलेलें अन्न देऊन त्याच्या ऐवजीं अपक्व अन्न घेणें शहाण्यांना मान्य नाहीं. भोजनाकरितां पाहिजे असल्यास कच्चें (धान्य) देऊन शिजलेलें अन्न घ्यावें. ' हें शिजलेलें अन्न आम्ही भक्षण

करितों, त्याऐवजीं हें कच्चें ( तंडुलादि ) अन्न तूं शिजवून तयार कर,' असें बोलून परस्परांनीं मोबदला केल्यास त्यांत कोणत्याहि प्रकारें अधर्म होत नाहीं. हे युधिष्ठिरा, व्यवहारप्रवृत्त लोकांचा असल्या प्रकारच्या विनिमयासंबंधीं जो सनातन धर्म आहे, तो मी तुला सांगतों, नीट ऐक. ' मी तुला हें देतों आणि त्याच्या ऐवजीं तूं मला अमुक वस्तु दे ' हें म्हणणें योग्य असून त्या व्यवहारांत बलात्कार दिसून येत नाहीं. त्यामुळें तो उचित धर्म होय. फार प्राचीन कालापासून अशा प्रकारचे व्यवहार ऋषि आणि इतर लोक यांमध्यें चालत आले आहेत आणि ते निःसंशय योग्यहि आहेत.

युधिष्ठिर—हे ताता, जेव्हां सर्व प्रजा धर्माचा त्याग करून शस्त्रग्रहण करिते आणि त्यामुळें राजाचें बळ क्षीण होतें, तेव्हां राजानें लोकांचें संरक्षण कसें करावें ? अशा प्रसंगीं तो आपला आश्रय आहे, असें लोकांना कसें वाटावें ? ह्याविषयीं मला संशय आला आहे, तरी हे नराधिपा, त्यासंबंधीं तूं सविस्तर सांगून माझें समाधान कर.

भीष्म—दान, तप, यज्ञ, निर्द्रोह आणि आत्मनिग्रह ह्यांच्या योगानें ब्राह्मणादि वर्णांनीं आपलें कल्याण करून घ्यावें. त्यांपैकीं ज्यांमध्यें मंत्रबल असेल, त्यांनीं इंद्राचें सामर्थ्य जशा देवता वाढवितात, त्याप्रमाणें सर्व बाजूंनीं उठून राजाचें सामर्थ्य वृद्धिंगत करावें. राजा क्षीणबल झाला असतां त्याला ब्राह्मण हेच मुख्य आधार आहेत, म्हणून शहाण्या राजानें ब्राह्मणांच्याच सामर्थ्यावर उद्योगाला प्रवृत्त व्हावें. राजा जय मिळवून जेव्हां राष्ट्रांत सर्वत्र शांतता प्रस्थापित करितो, तेव्हां सर्व वर्णांचे लोक आपापले धर्म यथायोग्य रीतीनें पाळीत असतात. परंतु मर्यादा सोडून चोरादिकांनीं भीति उत्पन्न केली असतां हे युधिष्ठिरा, सर्व वर्णांनीं शस्त्रग्रहण करावें; तसें करण्यांत त्यांस दोष लागत नाहीं.

युधिष्ठिर—आतां सर्व क्षत्रिय जर ब्राह्मणांचा द्वेष करूं लागतील, तर मग ब्राह्मणांचा त्राता कोण ? त्यांनीं कोणता धर्म स्वीकारावा आणि कोणाचा आश्रय संपादावा ?

भीष्म—अशा वेळीं तपानें, ब्रह्मचर्यानें, शस्त्रसामर्थ्यानें, बलानें, निष्कपटानें किंवा कपटानें आपल्याशीं अमर्याद रीतीनें वागणाऱ्या क्षत्रियांचें ब्राह्मणांनीं नियमन करावें. त्यांचें नियमन करण्याला ब्राह्मणच समर्थ आहेत.

कारण ब्राह्मणांपासूनच क्षत्रियांची उत्पत्ति झाली आहे. उदकापासून अग्नि, ब्राह्मणापासून क्षत्रिय आणि पाषाणापासून लोह ह्यांची उत्पत्ति झाली असून त्यांचें सर्वगामी तेज त्यांच्या त्यांच्या उत्पत्तिस्थानाकडे गेल्यास त्याचाच नाश होतो. जेव्हां लोह पाषाणाचा छेद करूं पाहतें, अग्नि उदकाचा संहार करूं इच्छितो किंवा क्षत्रिय ब्राह्मणांचा द्वेष करूं लागतो, तेव्हां त्यांत त्या तिघांचाच क्षय होतो. हे युधिष्ठिरा, क्षत्रियांचें तेज व बल कितीहि उच्च प्रकारचें असलें, तरी तें ब्राह्मणतेजापुढें मंदावतें. ब्रह्मवीर्य मंद पडून व क्षात्रवीर्य दुर्बळ होऊन जेव्हां सर्व वर्ण ब्राह्मणांशीं द्वेष करून वागूं लागतात, तेव्हां आपल्या जीवाचीहि पर्वा न करितां जे संतप्त होऊन ब्राह्मणांकरितां, धर्मांकरितां आणि आपल्या स्वतःकरितां युद्धार्थ सज्ज होतात, ते थोर कीर्ति पावतात. कारण, ब्राह्मणांकरितां सर्वांनीं शस्त्रग्रहण करावें, असें सांगितलें आहे. यज्ञ, अध्ययन, आणि तपश्चर्या यांनीं युक्त असणारे किंवा उपोषण करून किंवा अग्निप्रवेश करून प्राण देणारे अशांना जी उत्कृष्ट गति मिळते, ती अशा शूरांनाहि मिळते.

प्रसंगानुसार ब्राह्मणानें तीन्ही वर्णांवर शस्त्र उगारलें असतां त्याला दोष लागत नाहीं, अशाप्रकारें युद्ध करून देह ठेवणें यापेक्षां दुसरा श्रेष्ठ धर्म नाहीं, असें सज्जनांचें मत आहे. ब्रह्मद्वेष करणाऱ्यांचें शासन करण्याकरितां जे कोणी युद्ध करून आपल्या प्राणांची आहुति देतात, त्यांना नमस्कार असो ! त्यांचें कल्याण होवो ! त्यांना मिळणारे लोक आम्हांलाहि मिळोत, स्वर्गाला योग्य त्या वीर पुरुषांना ब्रह्मलोकाची प्राप्ति होते, असें मनूनें सांगितलें आहे. ज्याप्रमाणें अश्वमेध यज्ञांत अवभृथ स्नान केल्यानें पातकांचा नाश होऊन जसे लोक पवित्र होतात, तसेंच युद्धांत शस्त्राघातांनीं वध पावलेले लोकहि शुद्ध होत असतात. देशकालाला अनुसरून धर्माला अधर्माचें व अधर्माला धर्माचें स्वरूप येतें; कारण देश आणि काल यांचा महिमाच अशा प्रकारचा आहे. मैत्रीनें वागणारे लोक प्रसंगीं क्रूर कर्मे करूनहि उत्तम अशा स्वर्गलोकाची प्राप्ति करून घेतात. आत्मसंरक्षणाकरितां, वर्णसंकर झाला असतां, अथवा दुष्ट जनांचें नियमन करण्याकरितां ब्राह्मणानें तीनहि कालांत शस्त्रग्रहण केल्यास तो दोषावह होत नाहीं.

युधिष्ठिर—चोर बलवान् होऊन युद्धार्थ उठले असतां व वर्णसंकर होऊन क्षत्रियांचें प्रजापालनकार्य करण्याविषयीं कोणी समर्थ नसतां कोणी ब्राह्मण, वैश्य किंवा शूद्र यानें आपल्या हातांत अधिकार घेऊन धर्मा-

नुरोधानें त्या चोरापासून प्रजेचें रक्षण करावें किंवा न करावें ? त्याला तें कार्य करूं द्यावें किंवा न द्यावें ? अशासमयीं क्षत्रियांवाचून इतरांनीं शस्त्र धरणें आवश्यक आहे, असें मला वाटतें.

भीष्म—अपार आणि नौकारहित समुद्रांत जो मूर्तिमंत पार अथवा नाव होऊन रक्षण करितो, मग तो शूद्र असो किंवा दुसरा कोणी असो, तो सर्वथा मानास पात्र होतो. हे राजा, ज्याचा आश्रय करून शत्रुपीडित आणि अनाथ झालेले लोक सुखानें नांदतात, त्याचा त्यांनीं प्रेमपूर्वक आपला बांधव समजून बहुमान करावा. जो सर्वदा आपलें भयापासून रक्षण करितो, तो सर्वथा मानपात्र होतो. जो बैल वाहून नेण्याच्या कामीं निरुपयुक्त असतो, जी गाय दूध देत नाहीं, जी स्त्री वंध्या आहे आणि जो राजा रक्षण करूं शकत नाहीं, त्यांचा उपयोग काय आहे ? ज्याप्रमाणें काष्ठाचा गज, चर्ममय हरिण, षंढ पुरुष आणि माळरान हीं सर्वथा निरुपयोगी होत, त्याप्रमाणेंच अध्ययन न करणारा ब्राह्मण, प्रजारक्षण न करणारा राजा आणि वृष्टि न करणारा मेघ हेहि केवळ व्यर्थ होत. जो सर्वदा सज्जनांचें रक्षण करितो आणि दुष्टांना त्यांचेपासून दूर पळवितो, असाच राजा करावा. त्याचाच आश्रय करून हें सर्व जगत् चालत असतें. १२.१.७८.

---

## अध्याय ७९ वा.

[ १ भीष्माकडून युधिष्ठिराला ऋत्विजांचीं लक्षणें, इत्यादिकांचें कथन. ]

( १ ) हे वक्तृश्रेष्ठा पितामहा, ऋत्विज् कशाकरितां निर्माण झाले व ते कशा प्रकारचे असावे, तें मला सांग.

भीष्म—राजांचीं शांतिक-पौष्टिकादि कर्में करणें हें ब्राह्मणकुलोत्पन्न ऋत्विजांचें कर्तव्य होय. ते ऋक्-सामादि वेद आणि मीमांसा यांमध्यें निष्णात असावे. त्यांचें व राजाचें सर्वदा एकमत असावें, त्यांचें भाषण मधुर असावें, ते परस्परांशीं मैत्रीनें वागणारे, सर्वत्र समदृष्टि ठेवणारे, दुष्ट वर्तन न करणारे व सत्यवचनी असावेत. त्यांनीं व्याजावर चरितार्थ करूं नये, सरळपणानें वागावें, कोणाचा द्रोह करूं नये व त्यांना अभिमान नसावा; त्यांच्या अंगीं भीड, सहनशीलता, इंद्रियदमन व शांति असावी. ते बुद्धिसंपन्न व धैर्ययुक्त असावेत, त्यांनीं इंद्रियदमन करावें; कोणाला पीडा देऊं नये; वासना व द्वेष यांचा त्याग

करावा. ते अध्ययनशील, सदाचरणी आणि कुलीन असावेत. त्यांनीं सर्वदा अहिंसक व ज्ञानतृप्त असावें. असे जे ब्राह्मण तेच ऋत्विज होण्याला योग्य आहेत. ह्या सर्व ऋत्विजांचा यथायोग्य मान करणें योग्य आहे.

युधिष्ठिर—यज्ञांत दक्षिणा देण्याविषयीं वेदवचन आहे, परंतु कोणास काय द्यावें, याविषयीं त्यांत उल्लेख नाहीं. सर्वस्वदानासारखी मोठी दक्षिणा सांगितली असल्यामुळें ती आपद्धर्माला प्रतिकूळ आहे. शास्त्राची आज्ञा घोर असून ती कर्त्याच्या सामर्थ्याकडे लक्ष्य देत नाहीं. यज्ञ श्रद्धापूर्वक केला पाहिजे, असें वेदांत सांगितलें आहे. परंतु त्यांत सांगितल्याप्रमाणें दक्षिणा न देतां चरु देऊन यज्ञ केला असतां त्या श्रद्धेचा तरी काय उपयोग होणार ?

भीष्म—वेदांकडे दुर्लक्ष्य केल्यानें, शाठ्यानें अथवा कपटानें कोणालाहि कधीं महत्वप्राप्ति होत नाहीं. म्हणून तूं अशी बुद्धि कधीं धारण करूं नकोस. युधिष्ठिरा, दक्षिणा ही यज्ञाचें अंग असून ती वेदांचें पोषण करणारी आहे. दक्षिणेवांचून केलेले यज्ञ कर्त्याला कधींहि फलदायक होत नाहींत. एक पूर्णपात्र मात्र दक्षिणेसारखेंच फलद्रूप होणारें आहे. सोम हा ब्राह्मणांचा राजा असल्याचें वैदिक मंत्रांत सांगितलें आहे. यज्ञाकरितां लागणाऱ्या द्रव्यासाठीं त्याचा विक्रय करूनहि यज्ञ करावा. मात्र त्या द्रव्याचा उपयोग यज्ञाव्यतिरिक्त इतर कामीं उदरभरणार्थ करूं नये. असें केल्यानें ती गोष्ट यज्ञाला साहाय्यक होत असते, असें धर्मनिष्ठ मुनींनीं सांगितलें आहे. यज्ञकर्ता पुरुष, यज्ञकर्म आणि सोम हीं तिन्ही न्यायाला अनुसरून असलीं पाहिजेत. यज्ञकर्ता पुरुष जर वाईट आचरणाचा असेल, तर त्याचें कर्म त्याला व इतरांनाहि उपयुक्त होत नसतें. केवळ देहधारणाकरितां महात्म्या ब्राह्मणांनीं केलेलीं यज्ञकर्मे शुभावह होत नसतात, असें श्रुतिवचन असल्याचें आमच्या ऐकण्यांत आहे.

आतां यज्ञापेक्षांहि तप श्रेष्ठ होय, असें जें श्रुतिवचन आहे, त्यांत सांगितलेलें तप कोणतें तें मी सांगतों, नीट ऐक. अहिंसा, सत्यवचन, दुष्टपणाचा त्याग, दम आणि दया हेंच तें तप होय. शरीरशोषण करणें हें तप नव्हे, वेदांना अप्रमाण मानणें, शास्त्राज्ञांचें लंघन करणें आणि सर्वत्र अव्यवस्था उपन्न करणें हें आपल्या नाशाचें कारण आहे. आतां हे पार्था, अनेक ऋत्विजांचें कर्म ज्ञानी तपस्वी मनुष्य कशा प्रकारें करितात, तें सांगतों, ऐक. जीव-ब्रह्मांचें ऐक्य करण्याचें योगसाधन तीच त्यांची स्रुचा, परमात्म्याचे

ठिकाणीं लीन होणारें मन हेंच त्यांचें आज्य आणि ज्ञान हें उत्तम प्रकारचें पवित्र होय. कुटिलपणा हा प्राण्याला मृत्यूकडे पोहोंचविणारा असून सरळपणा हा ब्रह्मपदाला पोंचविणारा आहे. ज्ञानाचा विषय तो हाच आहे. व्यर्थ प्रलापानें काय होणार आहे ? १२.१.७९.

---

## अध्याय ८० वा.

[ १ मित्रामित्रलक्षणें. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, कितीहि अल्प गोष्ट असली, तरी ती दुसऱ्या कोणाचे साहाय्यावांचून एकट्याच पुरुषाच्या हातून शेवटास जाणें अशक्य असतें; मग राज्य चालविण्याची गोष्ट किती अवघड असेल बरें ? असे जे साहाय्यकारी राजाचे सचिव, ते कशा स्वभावाचे असावेत, त्यांचा आचार कसा असावा, राजानें कोणावर विश्वास ठेवावा व कोणावर ठेवूं नये ?

भीष्म—हे राजा, राजाचे मित्र चार प्रकारचे असतात. कित्येक उभयतांचा उद्देश एकच असल्यामुळें होतात; कित्येक भक्तीमुळें झालेले असतात; कोणी स्वाभाविकपणें झालेले, तर कोणी कृत्रिमतेनें—कांहीं उपायानें—झालेले असतात. धर्मात्मा हा राजाचा पांचवा मित्र होय. वस्तुतः तो अमक्या एकाचा अथवा दोघांचाहि मित्र नसतो. जिकडे धर्म असतो तिकडे त्याचें वास्तव्य असतें. त्याचें आचरण धर्माप्रमाणें असतें. त्याला जी गोष्ट आवडत नसेल ती राजानें केव्हांहि सांगूं नये. विजिगीषु राजे नेहमीं धर्माधर्म लक्ष्यांत आणून वागत असतात. या चार प्रकारच्या मित्रांपैकीं मधले दोघे श्रेष्ठ प्रकारचे असून पहिला व शेवटचा यांविषयीं राजानें सर्वदा संशयित असावें. जें कार्य राजाला स्वतः करावयाचें असेल, त्यासंबंधीं त्यानें सर्वांविषयीं नित्य संशयित रहावें. राजानें मित्ररक्षणासंबंधी कधींहि हयगय करूं नये. राजा अशा कामीं उपेक्षा करील तर लोकतिरस्कारास तो पात्र होतो. वाईट माणसें चांगलीं होतात व चांगलीं वाईट होतात. शत्रु मित्र होतात व मित्र शत्रु होतात. जो पुरुष चंचल चित्ताचा असेल, त्याच्यावर पूर्ण विश्वास कोण ठेवील ?

राजानें जें सर्व महत्त्वाचें काम असेल, तें स्वतःच्या नजरेखालीं करावें. राजानें कोणावर पूर्ण विश्वास टाकून राहणें म्हणजे ती गोष्ट धर्म आणि अर्थ यांच्या नाशाला कारण होणारी आहे. तसेंच सर्वांवर अविश्वास ठेवणें हेंहि

मृत्युसमान आहे व विश्वास टाकणें हाहि अकालिक मृत्यु होय. कारण विश्वास ठेवणारा मनुष्य अशा रीतीनें मृत्यूच्या तडाक्यांत सांपडतो. तो ज्यावर विश्वास ठेवतो, त्याच्या इच्छेवरच त्याचें जीवित अवलंबून असतें. म्हणून त्यानें कांहीं गोष्टींत लोकांवर विश्वास ठेवावा व कांहीं गोष्टींत लोकांविषयीं संशयित असावें, ही पूर्वापार नीति चालत आलेली आहे. मी मेलों असतां हा माझा पैसा अमक्याकडे जाईल, असें ज्यासंबंधें राजाला वाटत असतें, त्याच्याविषयीं त्यानें सर्वदा संशयित असावें. अशा मनुष्याला शहाणे लोक शत्रु समजतात. ज्याच्या क्षेत्रांतून दुसऱ्याच्या क्षेत्रांत पाणी जावयाचें असतें, त्याच्या इच्छेवांचून बांध फुटून तें पाणी त्या दुसऱ्याच्या शेतांत जाऊं शकणार नाहीं. परंतु एखाद्या वेळीं अधिक पाणी होईल, असें वाटल्यास तो बांध फोडण्याची इच्छाहि करील. म्हणून शेजारच्या राजाला आपल्या बाजूचें करून ठेवलें पाहिजे. कारण शत्रुसैन्याचा जोर अधिक वाटल्यास तो त्यास आपल्या राज्यांत मार्ग काढून देईल. म्हणून अशा प्रकारचे लोक म्हणजे शत्रूच होत.

राजाचा उत्कर्ष कितीहि झाला, तरी ज्याची तृप्ति होत नाहीं व हानि झाल्यास जो अत्यंत दीन होत असतो, तो उत्तम प्रतीचा मित्र होय, असें सांगितलें आहे. ज्याचा नाश झाला असतां आपलाहि नाश होईल, असें ज्याच्यासंबंधानें वाटत असेल, त्याजवर पित्याप्रमाणें विश्वास टाकावा. आपली शक्ति वाढत असली, तर तीबरोबर त्याचाहि उत्कर्ष करावा. धार्मिक कृत्यामध्येंहि कांहीं अपाय दिसून आल्यास त्यापासून जो संरक्षण करितो, तोहि मित्र समजावा. राजावरील संकटाची ज्याला भीति वाटते, तो राजाचा उत्तम मित्र होय. अशा मित्राचा नाश व्हावा, अशी जे इच्छा करितात, ते राजाचे शत्रु होत, असें सांगितलें आहे. ज्याला आपल्यावरील संकटांची सर्वदा भीति वाटत असते व आपली कितीहि भरभराट झाली, तरी ज्याला दुःख होत नाहीं, तो आत्मसम मित्र होय, असें म्हटलें आहे. जो सुरूप, सुंदर वर्णाचा, सुस्वर आवाजाचा, सहनशील, असूयाहीन, कुलीन आणि संततियुक्त असतो, तो त्याच्या खालच्या प्रतीचा मित्र होय.

जो बुद्धिमान्, स्मृतिमान्, दक्ष आहे, जो स्वभावतः क्रूर नाहीं, मानाचें किंवा अपमानाचें ज्याला कांहीं वाटत नाहीं, असा मनुष्य, मग तो ऋत्विज् असो, आचार्य असो किंवा मित्र असो, त्याचा सत्कार करून तूं आपल्या

गृहीं अमात्य म्हणून त्याला ठेवावें. धर्म आणि अर्थ यांसंबंधी तुझे सर्व विचार आणि तुझें गुह्य कारस्थान यांची त्याला सर्व माहिती कळवून पित्याप्रमाणें त्याजवर विश्वास टाकावा. दोन किंवा तीन मनुष्यांची एकाच कार्यावर कधीं योजना करूं नये. कारण एखाद्या गोष्टीविषयीं त्यांमध्यें मतभेद होऊन ते परस्परांना सहन होत नसतो. जो थोर मनुष्य कीर्तिमान् असून सर्वदा नीतीनें वागणारा असतो, जो सामर्थ्यवानांशीं द्वेष करीत नाहीं, भलती गोष्ट कधींहि मनांत आणीत नाहीं, जो कांहीं इच्छा धरून भयानें, लोभामुळें किंवा क्रोधामुळें धर्मत्याग करीत नाहीं, जो दक्ष असून ज्याचें बोलणें आवश्यक तितकेंच असतें, अशा मनुष्याला राजानें आपला अमात्य नेमावें. जे कुलीन, शीलसंपन्न, सहिष्णु, आपली प्रौढी न मिरविणारे, शूर, थोर मनाचे, विद्वान् आणि कार्याकार्यकुशल असतील, अशाच मनुष्यांला वेगवेगळ्या कामांवर अमात्य नेमावेत. त्यांचा बहुमान करून व त्यांना आपल्या वैभवाचे वांटेकरी करून ठेवावें, म्हणजे ते आपले साहाय्यकर्ते होऊन अनेक प्रकारें कल्याणकर्ते होत असतात व ईर्ष्यापूर्वक आपापलीं कामें करितात.

मृत्यूसारखेंच ज्ञातिजनांपासूनहि राजानें भय धरून असावें. ज्ञातीला मांडलिक राजांप्रमाणें राजाचें वैभव कधीं सहन होत नसतें. हे महाबाहो, सरल, मृदु, दानशील, लोकलज्जा बाळगणारा आणि सत्यवादी अशा राजाचा विनाश झाला असतां ज्ञातिजनांखेरीज दुसऱ्या कोणालाहि आनंद होत नसतो. परंतु ज्यांना ज्ञातिजन नाहींत, असे लोकहि फारसे सुखी नसतात. म्हणून ज्ञातिजनांचा तिरस्कार करूं नये. ज्याला ज्ञातिबांधव नाहींत, अशा पुरुषाचा शत्रु सहज पराभव करून टाकितात आणि शत्रूंकडून एकदां पराभव झाला तर त्याला ज्ञातीचाच आधार असतो. ज्ञातीपैकीं एकाचा अपमान झाला असतां तो दुसऱ्याला सहन होत नाहीं. कोणीं जरी त्याचा अपमान केला असला, तरी तो आपलाच होय, असें त्या ज्ञातिजनांना वाटत असतें. म्हणून ज्ञातीपासून जसे फायदे आहेत, तसें कांहीं तोटेहि आहेत. ज्याला कोणी ज्ञातिबांधव नाहींत, तो कोणावर अनुग्रह करीत नाहीं किंवा कोणापुढें नमतहि नाहीं. ज्ञातीमध्यें चांगल्या व वाईट अशा प्रकारच्या गोष्टी दिसून येतात. आपल्या ज्ञातिजनांचा आपण सर्वदा सन्मान करावा, त्यांचा आदर बाळगावा, वाणीनें आणि कृतीनें त्यांच्यांशीं गोडीनें असावें, त्यांचें प्रिय करावें, अप्रिय किमपि करूं नये. त्यांवर आपला विश्वास आहे, असें दाखवावें; परंतु विश्वास

मात्र कधीं ठेवूं नये. त्यांचे गुण किंवा दोष काढीत बसूं नये. अशा रीतीनें जो दक्षतेनें वागतो, त्याचे शत्रुसुद्धां संतुष्ट होऊन त्याशीं मित्रत्वानें वागतात.

जो आपले ज्ञातिजन, संबंधी, मित्र, शत्रु आणि मध्यस्थ यांच्यांशीं अशा रीतीनें वागतो, तो चिरकाल यशःसंपन्न होतो. १२.१.८०.

---

## अध्याय ८१ वा.

[ १ नारद-कृष्णसंवादकथन. ]

( १ ) युधिष्ठिर—आपले ज्ञातिजन आणि संबंधिवर्ग, तसेंच मित्र व शत्रु यांना वश करून घेणें कठीण आहे, मग त्यांचें चित्त आपल्याविषयीं कसें अनुकूल करून घेतां येण्यासारखें आहे तें सांग.

भीष्म—याविषयीं वासुदेव आणि नारदमुनि यांमध्यें झालेला संवाद प्राचीन इतिहास म्हणून सांगत असतात, तो असा आहेः—

वासुदेव—नारदा, जो आपला जिव्हाळ्याचा मित्र नाहीं, त्याला आपलें हृद्गत कधींहि सांगूं नये. तो मित्र जरी असला, तथापि शहाणा नसेल किंवा शहाणा असूनहि जर तो चंचल वृत्तीचा असेल, तर त्यालाहि सांगूं नये. म्हणून हे नारदा, मी तुझें पूर्ण बुद्धिबल जाणून तुला कांहीं विचारणार आहें, शिवाय तुझा संचार स्वर्गांत असल्यामुळें तुझें सामर्थ्य विशेष आहे, हें सांगावयास नको. ज्ञातिश्रेष्ठत्वाची प्रौढी मिरवून मी जरी ज्ञातीचें दास्य करीत नाहीं, तरी भोग्य वस्तूंपैकीं अर्ध्या भागाचा उपभोग घेतों आणि ज्ञातिजनांचीं दुर्वचनें सोसतों. हे देवर्षे, अग्नीची उत्पत्ति करणाऱ्या अरणीप्रमाणें त्यांचे शब्द माझें अंतःकरणाचें मंथन करून सर्वदा दग्ध करीत असतात. संकर्षण—बळराम—सर्वदा आपल्या सामर्थ्यानें कोणाला विचारीनासा झाला आहे. गद सुकुमार आहे आणि प्रद्युम्न हा आपल्या स्वरूपसौंदर्यानें मत्त झाला आहे, त्यामुळें मला कोणी साहाय्यकर्ता नाहींसा झाला आहे. नारदा, अंधक आणि वृष्णि कुलांत पुष्कळ भाग्यशाली, बलवान्, शत्रूंना अजिंक्य आणि धैर्यवान् असे पुरुष आहेत. ते ज्या बाजूला वळणार नाहींत, त्यांचा सर्वस्वी नाश होईल व ते ज्या पक्षाला मिळतील, त्याला सर्वस्व प्राप्त होईल. ते दोघेहि मला आपापल्या बाजूकडे वळविण्याचा यत्न करीत आहेत, परंतु मी त्यांपैकीं एकाहि बाजूला वळत नाहीं. कारण, आहुक आणि अक्रूर हे अंधक आणि वृष्णि कुलांतील

प्रमुख पुरुष असून त्यांचा पक्ष धरणें किंवा न धरणें ह्या दोन्ही गोष्टी मला सारख्याच दुःखदायक आहेत. नारदा, द्यूत खेळणाऱ्या दोघां पुरुषांच्या मातेप्रमाणें दोघांचाहि जय व्हावा, अशी माझी इच्छा आहे. अशा रीतीनें दोघांच्याहि संबंधानें मला अत्यंत क्लेश होत आहेत. म्हणून माझें व माझ्या ज्ञातिजनांचें कल्याण काय केल्यानें होईल, तें तूं मला सांग.

नारद—हे वार्ष्णेया, आपत्ति बाह्य व आभ्यंतर अशा दोन प्रकारांनीं मनुष्यावर त्याच्या स्वतःच्या कृतीनें अथवा दुसऱ्या कांहीं कारणानें उद्भवतात. त्यांपैकीं ही आभ्यंतर आपत्ति तूं आपल्या कर्मानेंच स्वतःवर ओढून घेतली आहेस. बलदेव आणि दुसरे भोज लोक हे कांहीं उद्देशानें, अभिलाषानें किंवा दुसऱ्यांच्या बीभत्स शब्दांवरून अक्रूराच्या अनुरोधानें वागणारे आहेत. तूं स्वतः आपलें सर्व ऐश्वर्य दुसऱ्याला देऊन टाकिलें आहेस आणि आतां तुला बरेंच मनुष्यबळ असलें तरी, ज्ञातिजनांच्या स्वाधीन केलेलें राज्य वांती करून बाहेर टाकिलेल्या अन्नाप्रमाणें बभ्रु व उग्रसेन यांजकडून परत घेतां येणार नाहीं. असें करण्यांत विशेषतः ज्ञातीमध्यें फूट पडण्याचीहि भीति आहे. आतां मोठें दुष्कर कर्म करून ती गोष्ट घडवून आणणें म्हणजे मोठी द्रव्यहानि होऊन महाक्षय होईल, म्हणून लोहनिर्मित शस्त्र न घेतां अत्यंत मृदु, परंतु लोकांचे हृदयाचा छेद करणारें, असें एखादें शस्त्र घेऊन त्याचे योगानें सकळ दोष नाहींसे करून टाक आणि त्यांच्या मनांत प्रेम उत्पन्न कर. अशा रीतीनें त्यांची जिव्हाच छेदून केल्यासारखें होईल.

वासुदेव—मुने, ह्या ज्ञातिजनांची जिव्हा ज्याचे योगानें छेदिली जाईल आणि सकल दोष नाहींसे होऊन त्यांचे मनांत पुनः प्रेमभाव उत्पन्न होईल, असें अलोहमय आणि सौम्य शस्त्र कोणतें हें मीं कसें समजावें ?

नारद—सर्वदा यथाशक्त्या अन्नदान करणें, सहनशीलपणा, सरलत्व, मनाचा कोमलपणा आणि ज्यांच्या त्यांच्या योग्यतेनुसार आदरसत्कार करणें, हेंच तें लोहमय नसलेलें शस्त्र होय. ज्ञातिबांधव कटु आणि क्षुद्रपणें बोलूं इच्छितील, तर तूं आपली कठोर वाणी, क्रूर निश्चय आणि मनांतील वाईट संकल्प हीं शांत कर. जो पुरुष थोर नाहीं, ज्यानें आपलें चित्त स्वाधीन ठेवलें नाहीं किंवा ज्याला कोणी साहाय्यकर्ता नाहीं, अशाला आपल्या माथीं मोठा कार्यभार घेतां येत नाहीं, तरी तो कार्यभार तूं स्वतः आपल्या उरावर घे.

सपाटीवर कोणताहि वृषभ मोठा भार वाहून नेतो. परंतु दुर्गप्रदेशांतून मोठें ओझें घेऊन जाण्यास कसलेला वृषभच पाहिजे. हे केशवा, भेदामुळें संघाचा नाश होतो आणि तूं तर संघांतील मुख्य आहेस. तुझ्यामुळें हा संघ फुटून जाणार नाहीं, असें कांहीं कर. बुद्धि, शांति, इंद्रियनिग्रह आणि धनत्याग ह्यांशिवाय शहाणा मनुष्य गुणी होत नसतो. आपल्या पक्षाची भरभराट करणें हें यशस्कर व आयुष्यवर्धक कृत्य आहे. म्हणून कृष्णा, तूं जेणेंकरून ज्ञातीचा विनाश होणार नाहीं, असा कांहीं उद्योग कर. तुला भूतकाळचें व भविष्यकाळचें कांहीं अविदित आहे असें नाहीं. तसेंच तुला षड्गुणांची योजना केव्हां करावी आणि शत्रूवर केव्हां चालून जावें हेंहि माहीत आहे.

हे महाबाहो, यादव, कुकुर, भोज, अंधक आणि वृष्णि, तसेच सर्व लोक आणि लोकेश्वर हे सर्व तुझ्यावर अवलंबून आहेत. हे माधवा, सर्व ऋषिहि तुझ्याच विचारानें चालत असतात. तूं प्राणिमात्राचा गुरु आहेस आणि त्यांचें गतागतहि तूं जाणतोस. हे यदुश्रेष्ठा, तुझ्या प्राप्तीमुळेंच सर्व यादव आज सुखानें नांदत आहेत. १२.१.८१.

---

## अध्याय ८२ वा.

[ १ भीष्माकडून युधिष्ठिराला अमात्यपरीक्षणार्थ कालकवृक्षीयोपाख्यानकथन. ]

( १ ) भीष्म—हा मी तुला प्रथम वर्तनक्रम सांगितला. हे भारता, आतां तुला दुसरा सांगतों, ऐक. जो कोणी राजकार्य उत्तम प्रकारें करूं जाणतो, त्या मनुष्याचें राजानें रक्षण करावें. जो कोणी राजकोश हरण अमात्य करीत असतां राजाला कळवील, मग तो राजसेवक असो, अथवा दुसरा कोणी पोष्य असो, हे युधिष्ठिरा, त्याचें म्हणणें राजानें एकांतांत ऐकून घ्यावें आणि त्याचें अमात्यापासून रक्षण करावें. कारण, द्रव्यापहार करणारे अमात्य अशा प्रकारच्या लोकांचा बहुधा वध करीत असतात. राजकोश लुटणारे सर्व एकत्र होऊन त्या कोशाचें रक्षण करणारास पीडा देतात आणि त्याचें रक्षण कोणीं न केल्यास तो नाश पावतो. यासंबंधीं कालकवृक्षीय मुनीनें कोसल देशाधिपतीला सांगितलेली हकीकत प्राचीन इतिहास म्हणून सांगत असतात. ती अशी आहेः—

कोसल देशाचा अधिपति क्षेमदर्शी याला राज्यप्राप्ति झाली असतां कालकवृक्षीय नांवाचा कोणीएक मुनि त्याकडे आला, असें आमच्या ऐकण्यांत

आहे. हातांत एक कावळ्याचा पिंजरा घेऊन तो मुनि क्षेमदर्शींच्या राज्यांत बातमी काढण्याकरितां मोठ्या दक्षतेनें सारखा फिरत असे. हा वायस मला भूत, भविष्य आणि वर्तमान अशा तीनहि काळांत घडलेल्या सर्व गोष्टी सांगत असतो तर तुम्हीहि ह्या काकविद्येचें अध्ययन करा, असें सांगत अनेक पुरुषांसह तो शहरांत सर्वत्र फिरत असे. तेव्हां राजाधिकाऱ्यांचीं सर्व दुष्कृत्यें त्याच्या नजरेस आलीं. हे सर्व अधिकारी राजाला कसे फसविणारे आहेत व ते सर्व त्यांचे व्यवहार कशाप्रकारें चालले आहेत हें जाणून तो तापसी 'मी सर्वज्ञ आहें' असें सांगत कावळ्याला घेऊन राजदर्शनाकरितां आला.

कोसलाधीशाकडे आल्यावर त्याचा अमात्य सर्व अलंकार घालून सभेंत बसलेला त्याच्या दृष्टीला पडला. त्याला पाहून मुनि त्याला म्हणाला, 'अरे, तूं अमक्या ठिकाणीं असें केलेंस. ह्या अमक्या अमक्या मनुष्याला तें सर्व ठाऊक आहे. राजाचा कोश तूं लुटल्याचें हा कावळा मला सांगत आहे. तेव्हां आतां हा प्रकार तूंच शीघ्र सांगावा हें बरें.' राजकोशाचा अपहार करणाऱ्या दुसऱ्याहि कामगारांस तो म्हणाला, 'हा कावळा कधींहि अनृत बोलल्याचें आमच्या ऐकण्यांत नाहीं.' हे कुरुद्वहा, त्यामुळें राजाचे ते सर्व अधिकारी बिथरले व त्यांनीं रात्रीच्या वेळीं तो मुनि निद्रिस्थ झाला असतां बाण मारून त्या कावळ्याचा प्राण घेतला.

आपला कावळा बाणांनीं मरून पडल्याचें पाहून दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो ब्राह्मण क्षेमदर्शी राजाकडे गेला आणि म्हणाला, 'हे राजा, तूं सर्वांचा स्वामी, प्राण आणि धन यांचा मालक आहेस, म्हणून मी तुझ्यापाशीं अभय मागतों. तुझी अनुज्ञा असल्यास तुझ्या कल्याणाची गोष्ट मी तुला सांगणार आहें. जो ऐश्वर्याची इच्छा करणारा असेल, त्यानें सारथि ज्याप्रमाणें उत्तम अश्वाला शिकविण्याची इच्छा करितो, त्याप्रमाणें मित्रास कल्याणोपदेश करण्याच्या इच्छेनें जो पावलेला, मित्राच्या हानीनें संतप्त झालेला, मित्रहिताकरितांच केवळ अन्याय सहन न होऊन, 'ह्या तुझ्या द्रव्याचें हरण होत आहे,' असें जो सांगेल, तो आपला हितकर्ता आहे, असें समजून त्याला क्षमा करणें योग्य आहे.' त्यावर राजा म्हणाला, 'तूं मला जें सांगणार आहेस, तें जर माझ्या हिताचें आहे, तर मी त्याबद्दल तुला क्षमा करणार नाहीं, असें कसें होईल? हे ब्राह्मणा, मी तुला शपथपूर्वक सांगतों कीं, तुला वाटेल तें बोल, मी तें करण्यास सर्वदा तयार आहें.'

मुनि—तुझ्या राष्ट्रामध्यें पापी कोण आहेत, चांगले कोण आहेत, तुला भृत्यवर्गांकडून कशा प्रकारची भीति आहे, हें समजून घेऊन तुला सांगण्याकरितां मी तुजजवळ आलों आहें. राजाची सेवा करण्यांत काय दोष आहेत, हें विद्वान् लोकांनीं पूर्वींच सांगून ठेविलें आहे. राजसेवा करणें हें अत्यंत वाईट असून तें अगतिक लोकांकरितांच आहे. राजाशीं संबंध ठेवणें म्हणजे विषारी सर्पांशींच संबंध ठेवणें आहे, असें म्हटलें आहे. राजाला पुष्कळ मित्र असतात, तसेच शत्रुहि अनेक असतात. त्या सर्वांपासून राजाश्रयानें राहणाऱ्यांस सर्वदा भीति असते. राजापासून त्यांना कोणत्या क्षणीं भीति उत्पन्न होईल, हें सांगतां येण्यासारखें नाहीं. सेवकाकडून राजकार्यांमध्यें पूर्णपणें दुर्लक्ष न होणें ही गोष्ट कधींहि शक्य नाहीं. तथापि कल्याणेच्छु सेवकानें तसें कधीं करूं नये. सेवकाच्या हातून प्रमाद झाला असतां राजाचें मन त्याविषयीं विटतें, व एकदां राजाच्या मनाचा बिघाड झाला म्हणजे सेवकाच्या जीविताला भीति असते. प्रदीप्त झालेल्या अग्नीजवळ ज्याप्रमाणें मोठ्या दक्षतेनें जावें लागतें, त्याप्रमाणें शहाण्या मनुष्यानें राजसंनिध जावें. ज्याप्रमाणें क्रुद्ध विषारी सर्पाची सेवा करावयाची त्याप्रमाणें मनुष्यानें आपले जीविताचा नाश झाला आहे असें समजून आपला प्राण आणि धन यांचा प्रभु जो राजा त्याची प्रयत्नानें सेवा करावी. त्याच्याशीं भाषण करितांना, पुढें बसतांना, अधिकार चालवितांना, जवळ जातांना, इंगित कळवितांना आणि अंगचेष्टा करितांना त्यांत कांहीं चुकत नसेल ना, अशी शंका घेऊन त्यानें सर्वदा राजसेवा करावी.

राजाला संतुष्ट ठेवलें असतां तो आपणाला देवतेप्रमाणें सर्वार्थ साधून देतो. तसाच तो क्षुब्ध झाला असतां समूळ दग्ध करून सोडतो. राजा, असेंच मार्गे सांगितलें आहे आणि तसें सर्वत्र होतहि आहे. यापुढें तुझी कार्यसिद्धि मी चांगली करणार आहें. आमच्यासारखा अमात्य संकटकाळींच बुद्धीचें साहाय्य करीत असतो. हा माझा कावळा तुझ्या कार्यासाठींच नाश पावला आहे. त्यासंबंधीं मी तुला दोष देत नाहीं. कारण, असें करणारांना तूं प्रिय होतास असें नाहीं. तूं आपलें हिताहित समजून घे. दुसऱ्यावर विश्वास ठेवून राहूं नकोस. तुझ्या द्रव्याचा अपहार करणारे व भूतमात्राचें अकल्याण करूं इच्छिणारे जे तुझ्या वाड्यांत आहेत, त्यांच्याशीं माझें वैर आहे. जो कोणी तुझ्या नाशानें आपल्याला राज्य मिळावें, अशी इच्छा करणारा असेल, त्याचें कार्य तुझ्या

जवळच्या लोकांना अनुकूल करून घेतल्याशिवाय सिद्ध होणार नाहीं. अशा मंडळीच्या भीतीनेंच मी दुसऱ्या आश्रमाला जातों. त्यांनीं कपटानें, निष्कामबुद्धीनें तुझ्या हितार्थ असणाऱ्या माझ्या कावळ्याचा बाण मारून वध केला आहे.

हे राजा, ही गोष्ट माझ्या तपोबलानें मला कळली आहे. अनेक सुसरी, मासे, ग्राह आणि तिमिंगल यांच्या समूहानें युक्त ही तुझी राष्ट्ररूपी नदी, त्याचप्रमाणें सिंह, व्याघ्र यांनीं आकुल व वृक्षांचे सोट, मोठमोठे पाषाण आणि कंटक यांनीं व्याप्त अशा हिमालयांतील गुहेप्रमाणें प्रवेश करण्यास कठीण ही तुझी राष्ट्ररूपी दरी मी ह्या बिचाऱ्या कावळ्याच्या साहाय्यानें उतरून गेलों आहें. अग्नीच्या साहाय्यानें अंधकारमय दुर्ग प्रदेशांतून व नौकांच्या मदतीनें जलमय समुद्रांतून पलीकडे जातां येतें. परंतु राजरूपी दुर्ग तरून जाण्याचा मार्ग शहाण्यांना अद्याप कळला नाहीं. हें तुझें राज्य अंधकारानें व्याप्त झालेलें असून अशा ठिकाणीं तुला देखील विश्वास ठेवून राहतां येणें शक्य नाहीं, तेथें माझ्यासारख्याची ती वाट काय? जेथें बरें आणि वाईट यांची योग्यता सारखीच आहे, तेथें राहणें कधींहि कल्याणकारक नाहीं. येथें सत्कृत्य करा अथवा दुष्कृत्य करा, वध हा व्हावयाचाच. न्यायानें पाहिलें असतां दुष्कृतीनेंच वध व्हावा, सत्कर्म करणाराचा होऊं नये. म्हणून येथें सुज्ञ मनुष्यानें स्थिर राहतां नये, त्यानें तत्काळ पलायन करावें हें बरें.

राजा, सीता नांवाची एक नदी आहे. तीमध्यें नौका देखील बुडत असते. तशाच प्रकारचें हें तुझें राष्ट्र म्हणजे सर्वभक्षक जाळेंच होय, असें मला वाटतें. तुला मधुर पण विषमिश्रित भोजन मिळालें आहे. त्यामुळें तुझें आचरण असज्जनासारखें असून सज्जनासारखें त्यांत कांहीं नाहीं. हें पार्थिवा, तूं सर्पांनीं वेष्टिलेल्या कूपासारखा आहेस. दुर्गम वाट, विस्तृत तीर आणि बांबूंच्या झुडपांनीं अथवा वेतांच्या लतांनीं युक्त जशी गोड पाण्याची नदी असावी, तसा तूं आहेस. अथवा ज्याप्रमाणें कुत्रे, गिधाडें आणि कोल्हे यांनीं वेष्टित राजहंस असावा तसा तूं आहेस. ज्याप्रमाणें मोठ्या वृक्षाचा आधार घेऊन त्यावर गवत वाढतें, पुढें तें वाढून त्या वृक्षाला आच्छादून टाकितें आणि शेवटीं वणवा उग्र इंधनाच्या रूपानें त्या वृक्षाचाच नाश करून टाकितो, तसे तुझे अमात्य आहेत. अशांचा तूं शोध लाव. तूंच त्यांना अमात्यांच्या पदवीवर बसविलेंस आणि त्यांचें पालनहि तूंच केलें आहेस. असें असतां ते तुझा अवमान करून तुझ्या

प्रिय मनुष्यांचा वध करूं इच्छित आहेत. सर्प असलेल्या गृहामध्यें अथवा वीरपत्नीच्या घरांत ज्याप्रमाणें जार प्रवेश करतो, तसा मी तुझ्या राज्यामध्यें राहिलों तो मोठ्या सावधपणें तुझें आणि तुझ्या अमात्यांचें शील पहावें, या हेतूनेंच होय. राजा जितेंद्रिय आहे काय, त्याचे जवळचे लोक त्याला वश आहेत काय, त्यांना राजा आवडतो कीं काय, तसेंच राजाला प्रजा आवडते कीं काय, हें समजून घेण्याच्याच इच्छेनें हे राजसत्तमा, मी येथें आलों. क्षुधिताला ज्याप्रमाणें अन्न आवडतें, तसा तूं मला आवडत आहेस. तृष्णा नसलेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें उदक आवडत नसतें, त्याप्रमाणें हे तुझे अमात्य मला आवडत नाहींत. त्यांनीं मजवर लादलेला दोष म्हणजे मी तुझा कार्यकर्ता एवढाच होय. माझा द्वेष करण्याचें दुसरें कांहीं कारण निःसंशय नाहीं. त्यांचा द्रोह मी करीत नाहीं, तथापि माझा मात्र द्रोह ते करितात. भग्नपृष्ठ सर्पाप्रमाणें दुष्टांतःकरणाच्या शत्रूची भीति बाळगली पाहिजे.

राजा—मीं केलेला बहुमान आणि मोठा सत्कार यांचा स्वीकार करून तूं पुनः माझ्या राज्यांत रहा. ज्यांना तूं नको असशील, ते माझ्या वाड्यांत राहूं शकणार नाहींत. आतां यापुढें यांचें काय करावयाचें तें तूंच सांग. जेणें-करून माझ्या हातून शासनधर्म उत्तम पाळला जाऊन मला पुण्य लागेल, तें सांग आणि मला कल्याणमार्गाला लाव.

मुनि—राजा, त्यांचा अपराध उघडकीस न आणतां आधीं त्यांचे अधिकार कमी कर आणि मग त्यांचे दोष त्यांच्या पदरांत घालून एकेकाचा वध कर. एकच अपराध करणारे अनेक असले म्हणजे कांट्यांना देखील चिरडून टाकण्यास ते कमी करणार नाहींत, मग माझ्यासारख्या सौम्य तपस्व्याचा नाश करितील, यांत नवल तें काय? मंत्रभेद होईल, या भीतीनें मी हें सांगत आहें. आम्ही ब्राह्मण म्हणजे दयाळू असून आमचें शासनहि अत्यंत सौम्य आहे. आम्ही स्वतःसारखेंच तुझें, तसें इतरांचेंहि कल्याण इच्छितों.

राजा, आतां मी तुला माझी माहिती सांगतों. मी तुझा संबंधी आहें. माझें नांव मुनि कालकवृक्षीय असें आहे. मी तुझ्या पित्याचा संमत मित्र असून अत्यंत सत्यवचनी होतों. तुझ्या पित्याचें मरण होऊन राज्यावर संकट आलें असतां मी सर्व इच्छा सोडून केवळ तपश्चर्येंत काळ घालविला. तुला हें मी स्नेहानें सांगत आहें; कारण तूं पुनः चूक करूं नये. सुखदुःखांचा अनुभव

घेऊन आणि पुनः दैवयोगानें राज्यप्राप्ति होऊन अमात्यांवर विश्वास टाकून तुझ्या हातून असा प्रमाद कां व्हावा?

भीष्म—युधिष्ठिरा, नंतर त्या राजकुलामध्यें पुनः तो ब्राह्मणश्रेष्ठ पुरोहित होऊन सर्वत्र आनंदीआनंद झाला. त्याचें एकछत्री राज्य होऊन त्या कालकवृक्षीय मुनीनें त्या यशस्वी कोसलाधिपतीकरितां उत्तम उत्तम यज्ञ केले. त्या मुनीचें हितप्रद भाषण ऐकून कोसलाधीशानेंहि सर्व पृथ्वी जिंकली आणि हे भारता, त्याच्या सांगण्याप्रमाणें त्यानें आचरण ठेविलें. १२.१.८२.

---

## अध्याय ८३ वा.

[ १ भीष्माकडून युधिष्ठिराला मंत्र्यादिलक्षणकथन. ]

(१) युधिष्ठिर—हे पितामहा, सभासद, साहाय्यक, सुहृज्जन आणि परिचारक हे कसे असावे, तें मला सांग.

भीष्म—भिडस्त, इंद्रियदमनशील, सत्यत्व आणि सरलता यांनीं युक्त असणारे, वेळीं योग्यायोग्य सांगणारे असे सभासद असावेत. जे सर्वदा तुझ्या सांनिध्यांत आहेत, जे अतिशूर आहेत, शास्त्रसंपन्न आहेत, तसेच जे सुसंतुष्ट असून आपापल्या कार्यांमध्यें महोत्साही आहेत, अशा ब्राह्मणांना तूं संकटप्रसंगीं आपल्या साहाय्याकरितां म्हणून घेत जावें. हे भारता, कुलीन पुरुषाचा सर्वदा सत्कार केला असतां तो आपली शक्ति कधींहि लपवून ठेवीत नाहीं, म्हणून तूं कुलीनांचाच आश्रय कर. कुलीनाचें पालन करून त्याला ठेवल्यास राजा संतुष्ट असो, अथवा नसो, तो पीडित असो अथवा कोणीं त्याला मारलें असो, तो राजाला सोडून जावयाचा नाहीं. कुलीन, आपल्याच देशांत जन्मास आलेले, शहाणे, रूपवान्, बहुश्रुत, प्रगल्भ आणि तुजवर सर्वदा अनुरक्त असेच तुझे परिचारक असावेत. दुष्कुलीन, लुब्ध, दुष्ट, निर्लज्ज, असे लोक जोंपर्यंत त्यांचा हात ओला आहे, तोंपर्यंतच तुझी सेवा करतील. कुलीन, शीलसंपन्न, राजाचा हेतु बरोबर ओळखणारे, दयाशील, देशकाल आणि आपलें कर्तव्य ओळखणारे, स्वामिकार्याविषयीं तत्पर अशा लोकांना राजानें आपल्या मंत्रिपदावर सर्व कार्यांमध्यें नेमावें. द्रव्यदान, मान व अभ्यर्थसत्कार व कमीअधिक प्रिय केल्यानें आपल्या उपयोगीं पडतील, अशांना तुझ्या धनाचे आणि सुखाचे मात्र वांटेकरी करावें. ज्यांनीं आपलें वर्तन सोडलें नाहीं असे विद्वान्, सदा-

चरणी, नियमनिष्ठ, सदैव तुझीच इच्छा करणारे, थोर मनाचे आणि सत्यवचनी लोक तुझा त्याग कधींहि करणार नाहींत.

जे मंदबुद्धि व अनार्य लोक आचार पाळीत नाहींत, तसेच जे कधीं वचनाप्रमाणें वागत नाहींत, त्यांच्याविषयींहि तूं खबरदारी घ्यावी. समुदायाला सोडून राजानें एकट्याची इच्छा कधींहि करूं नये. एकटा जर पुष्कळांपेक्षां विशेष गुणी असेल, तर मात्र त्यांना सोडून त्या एकट्याचाच स्वीकार करावा. कोणाच्याहि अंगीं पराक्रम दिसून येणें, हें कल्याणाचें लक्षण आहे. कीर्ति ज्याला श्रेष्ठ वाटत असते, तो वचनाप्रमाणें वागणारा असतो. जो समर्थ मनुष्यांचा आदर ठेवितो, स्पर्धा ज्यांच्यांशीं करूं नये, त्यांशीं जो कधीं स्पर्धा करीत नाहीं, कोणा एका हेतूनें, भयानें, क्रोधानें, किंवा लोभानें जो कधीं धर्मत्याग करीत नाहीं, ज्याला गर्वबुद्धि नसते, जो सर्वदा सत्यवचनी असतो, जो क्षमाशील आणि मानपात्र असतो, त्याची परीक्षा घेऊन सर्व गुप्त गोष्टींत तूं त्याचें साहाय्य घेत जा.

मनुष्य कुलीन, संततिसंपन्न, सहनशील, आत्मसंयमी, शूर, कृतज्ञ आणि सत्यनिष्ठ निघणें हें, हे पार्था, कल्याणाचें लक्षण आहे. जो ज्ञानी पुरुष अशा रीतीनें वागत असतो, त्याच्याशीं त्याचे शत्रु देखील संतुष्ट राहतात आणि त्याचे मित्रहि होतात. राजानें अमात्यांचे गुणावगुणांची परीक्षा घ्यावी. आत्मसंयमी, ज्ञानवान् आणि कल्याणेच्छु राजानें आपले संबंधी, आप्त, कुलीन, आपल्याच देशांत जन्म पावलेले, द्रव्यदानानें कधींहि न वळणारे, दुर्वर्तन न करणारे, अशा उत्तम परीक्षकांकडून अमात्यांची निवड करवावी. कल्याणेच्छु राजानें उत्तम जातीचे, वेदमार्गानें जाणारे, वंशपरागत आणि अभिमानरहित अशा मंत्र्यांची योजना करावी. ज्यांची बुद्धि विनयशील आहे, ज्यांचा स्वभाव उत्तम आहे, ज्यांच्या अंगांत तेज, धैर्य, क्षमा, शौच, प्रेम, स्थिति आणि धारणसामर्थ्यादि गुण आहेत, अशांची परीक्षा करून राजानें त्यांस मंत्री करावें. ज्यांच्यामध्यें मोठेपणा आला आहे, जे राज्यकारभारांत धुरंधर आहेत, ज्यांच्यामध्यें कायिक, वाचिक इत्यादि पांच प्रकारचें कपट नाहीं, अशा लोकांची राजानें परीक्षा घेऊन त्यांस मंत्री करावें. ज्यांच्या वाणींत आवश्यक गोष्टींचें ज्ञान करून देण्याचें सामर्थ्य आहे, जे वीर, कार्यविशारद, कुलीन आणि सत्त्वसंपन्न आहेत ते मंत्रिपदाला योग्य होतात.

तेजोहीन पुरुषाकडे कोणतेंहि कार्य सोंपविलें असतां तें त्याच्यानें शेवटास नेववत नाहीं. तो दुसऱ्यांनाहि सर्व गोष्टींत संशयांत पाडतो. जो मनुष्य कुलीन असून धर्मार्थकामांकडे लक्ष्य देतो, परंतु बहुश्रुत नसतो, त्याला कोणत्याहि महत्त्वाचे कामांत विचार करितां येत नाहीं. त्याचप्रमाणें एखादा बहुश्रुत आहे, परंतु कुलीन नाहीं, तर त्याची स्थिति मार्गदर्शकावांचून चालणाऱ्या अंधळ्याप्रमाणें होऊन त्याला लहानशाहि कामांत कसें वागावयाचें तें समजत नाहीं. तसेंच ज्याचा विचार स्थिर नाहीं, असा मनुष्य बुद्धिमान्, विद्वान् आणि समयज्ञ असूनहि त्याला एखादें काम चिरकालानें सुद्धां शेवटास नेतां येत नसतें. ज्याला शास्त्रज्ञान नसून ज्याची बुद्धि उत्तम प्रकारची नाहीं, जो मूर्ख आहे, अशाला कोणत्याहि कामाचा विविष्ट परिणाम काय होईल, हें नीट समजत नसतें. जो मंत्री आपल्यावर प्रेम करणारा नसेल, त्यावर विश्वास ठेवणें योग्य नाहीं. म्हणून आपल्यावर अनुरक्त नसणाऱ्या मंत्र्याकडे आपले गुप्त विचार कधींहि प्रकट करूं नयेत. अशा प्रकारचा कुटिल मंत्री वाऱ्याच्या योगानें वृक्षाच्या छिद्रांमध्यें शिरून त्याचें भस्म करून टाकणाऱ्या अग्नीप्रमाणें इतर मंत्र्यांच्या साहाय्यानें राजाला त्रासदायक होतो. राजा क्रुद्ध झाला असतां सेवकाला त्याच्या स्थानावरून दूर करितो, कठोर वाणीनें त्याची निंदा करितो, परंतु मागाहून तो प्रसन्नहि होतो. राजावर प्रेम करणाऱ्या मनुष्याला हें सर्व सहन करितां येतें. मंत्र्याचा क्रोध म्हटला म्हणजे विजेच्या कडकडाटाप्रमाणें असतो. राजाच्या कल्याणाच्या इच्छेनें जो त्या रागाला सहन करितो व जो सुखदुःखांमध्यें समान असतो, अशा मनुष्याचा राजानें कोणत्याहि गोष्टींत विचार घ्यावा.

जो सरळ नाहीं, परंतु आपल्यावर प्रेम करणारा आहे, ज्ञानसंपन्न आहे, शिवाय दुसरेहि अनेक गुण ज्याच्या अंगीं आहेत, अशाला राजानें आपल्या मसलतींत घेऊं नये. त्याचप्रमाणें जो शत्रूंशीं मिळून असतो आणि पौरजनांना बहुमान देत नाहीं, तो आपला मित्र नव्हे, असें समजून राहावें आणि त्याला आपले गुप्त विचार कधींहि सांगूं नयेत. जो अविद्वान्, अशुचि शीलाचा, निष्ठुर मनाचा, शत्रुसेवक, आत्मश्लाघा करणारा, सुहृद्भाव न ठेवणारा, क्रोधिष्ठ आणि लोभी असेल, त्यालाहि आपले गुप्त विचार कळवूं नयेत. जो आपल्या येथें आगंतुक म्हणून आला आहे, तो आपल्यावर अनुरक्त असला किंवा बहुश्रुत असला तरी त्याचा सत्कार करावा, त्याची योग्य व्यवस्था

ठेवावी, परंतु आपले गुप्त विचार त्याला समजूं देऊं नयेत. ज्याच्या पित्याला पूर्वी अन्याय करून पदच्युत केलें असेल आणि आतां त्याला मान देऊन जरी जागेवर नेमिलें असेल, तरी त्याला आपल्या मसलतींत घेऊं नये. ज्या मित्राचें धन कांहीं ना कांहीं कारणावरून सरकारांत जमा केलें असेल, तो कितीहि गुणवान् असला, तरी त्याला आपल्या गुप्त मसलतींत घेऊं नये.

जो मोठा शहाणा, बुद्धिमान् , ज्ञानी, ज्याचा जन्म आपल्याच देशांत झाला असून जो अत्यंत शुचिर्भूतपणानें वागतो, ज्याचें आचरण सर्व कामांमध्यें अत्यंत शुद्ध असतें, तोच राजाचे गुप्त विचार ऐकण्यास योग्य होय. ज्याचें ज्ञान आणि अनुभव हीं उत्तम प्रकारचीं असून जो आपला व शत्रूचा स्वभाव पूर्णपणें ओळखतो, जो राजाशीं सुहृदासारखा वागतो, त्यालाच राजानें आपले मसलतींत घ्यावें. जो सत्यवचनी, उत्तम शीलाचा, गंभीर, भिडस्त, सौम्य आणि पितृपितामहापासून आश्रयास राहिलेला असतो, त्याला राजानें आपल्या मसलतींत घ्यावें. जो सर्वदा संतुष्ट, सज्जनांना मान्य, सत्यवादी, प्रगल्भ आणि पापाचा द्वेष करणारा, उत्तम मसलत देणारा, देशकालाचें ज्ञान असणारा आणि शूर असतो, त्याला राजानें आपले गुप्त विचार कळवावे. जो सामोपचारानें सर्व लोकांना वश करण्याला समर्थ असतो, त्याला राष्ट्रावर शासन चालविणाऱ्या राजानें आपल्या मसलतींत घ्यावें. ज्याच्या न्याय्य वर्तनावरून राष्ट्रांतील व देशांतील सर्व लोकांचा विश्वास ज्यावर बसला आहे, जो मोठा योद्धा असून परम नीतिसंपन्न आहे, अशाला राजानें आपले गुप्त विचार कळवावे. या वरील गुणांनीं संपन्न असून, अत्यंत पूज्य, प्रजेच्या स्वभावाचें ज्ञान असलेले व महत्त्वाची कामगिरी करूं इच्छिणारे असे तीन तरी पुरुष राजाचे मंत्री असावे. त्यांनीं आपल्या व शत्रूच्या प्रजेंतील छिद्रें पहावीं. कारण मंत्र्यांच्या विचारांवरच राष्ट्राची अभिवृद्धि अवलंबून असते. आपलें छिद्र कधीं शत्रूच्या दृष्टीस पडूं देऊं नये, परंतु शत्रूचें छिद्र पाहून राजानें त्यावर चालून जावें. कूर्माप्रमाणें राजानें आपलीं सर्व राज्यांगें सर्वदा गुप्त ठेवावीं. आपल्या राज्यांत त्यानें शत्रूला येऊं देऊं नये. राजाचे विद्वान् मंत्र्यांनीं राष्ट्रासंबंधी चाललेले विचार सर्वदा गुप्त ठेवावे.

मंत्र हें राजाचें कवच असून इतर लोक हे त्याचे अवयव आहेत. प्रणिधि हीं राज्याचीं मूळें असून मंत्र हें राज्याचें बळ आहे, असें सांगितलें आहे. मंत्री आपल्या वृत्तीकरितां राजाच्या मागें लागलेले असतात, ते महाक्रोध, मान आणि

ईर्ष्या यांचा त्याग केल्यानेंच सुखी होतात. कायिक, वाचिक, अशा पांच प्रकारचें कपट ज्यांना ठाऊक नाहीं, अशा मंत्र्यांबरोबरच राजानें आपले गुप्त व्यवहार करावे. त्या तिघां मंत्र्यांचे त्रिविध विचारांचा आपल्या मनाशीं विचार करून नंतर त्यांचें व आपलें मत धर्मार्थ-काम यांचें ज्ञान असलेल्या आपल्या ब्राह्मण गुरूपुढें मांडावें व त्याचा अभिप्राय पडेल, तदनुसार निर्णय द्यावा. ज्यांना मंत्र-तंत्र वगैरे तत्त्वसिद्धांत, अवगत आहेत ते अशाच प्रकारें राजानें विचार करावा म्हणून सांगतात. म्हणून प्रजेला स्वाधीन ठेवणाऱ्या राजानें आपले गुप्त विचार याच रीतीनें सर्वदा अंमलांत आणावे. अशा विचारांचे वेळीं कोणी खुजे, कुबडे, अशक्त, लंगडे, आंधळे, जड, स्त्रिया, षंढ लोक आणि पशु इत्यादिकांचा पुढें-मागें, खालीं-वर किंवा जवळपास कोठेंहि संचार होऊं देऊं नये किंवा मंदिराच्या वरील गच्चीवर चढून किंवा एखाद्या दर्भादि जळाऊ पदार्थविरहित निर्जन, परंतु उजेडाच्या ठिकाणीं बसून वाग्दोष किंवा नेत्रकटाक्षादि अंगदोष, ज्यांच्या योगानें आपले विचार उघडकीस येतील, त्यांचा त्याग करून वेळ न घालवितां गुप्त विचार करावे. १२.१.८३.

---

## अध्याय ८४ वा.

[ इंद्र-बृहस्पतिसंवादकथन. ]

( १ ) भीष्म—हे युधिष्ठिरा, भाषण कसें असावें, याविषयीं इंद्र आणि बृहस्पति यांचा संवाद प्राचीन इतिहास म्हणून सांगत असतात, तो असा—

शक्र—हे ब्रह्मन् , कोणती गोष्ट योग्य रीतीनें केल्यास मनुष्य सर्व प्राण्यांना प्रमाणभूत होऊन जगांत मोठा कीर्तिसंपन्न होईल ?

बृहस्पति—शक्रा, मुख्यत्वेंकरून साम—सर्वांशीं गोड भाषण करून राहणें—याचा उपयोग केल्यानें मनुष्य सर्वांना प्रमाणभूत होऊन लोकांत महा-यशस्वान् होतो. जो कांहींएक भाषण न करितां कपाळाला आठ्या घालून बसलेला राहतो, तो नेहमीं सर्वांच्या तिरस्कारास पात्र होतो. जो कोणालाहि पाहतांच हंसतमुख होऊन आपणच त्यांशीं संभाषण करूं लागतो, त्यावर सर्व लोक प्रसन्न होतात. दानाबरोबर त्याच्या जोडीला जर गोड भाषण नसेल, तर एखाद्याला तोंडीं लावण्याचे पदार्थांवांचून दिलेल्या अन्नाप्रमाणें तें दान आनं-

दप्रद होत नसतें. इंद्रा, सामोपचाराच्या मधुर भाषणानें द्रव्यग्रहण केलें, तर त्या योगानें सर्व लोक ताब्यांत राहतात. दंडाची योजना करितांना देखील सामाचाच अवलंब करावा. असें केल्यानें लोकांचें समाधान होऊन त्यांचें मन उद्विग्न होत नाहीं. सामोपचाराचा उत्तम उपयोग करून गोड आणि मधुर भाषण केल्यास त्यासारखें दुसरें कोणतेंच उत्कृष्ट साधन नाहीं.

भीष्म—असें बृहस्पतीनें सांगितल्यावर इंद्रानें त्याप्रमाणें केलें. हे कौंतेया, तूंहि असाच वागत जा. १२.१.८४.

---

## अध्याय ८५ वा.

[ १ अमात्यलक्षणादिकांचें कथन. २ राजानें दूतवध कधींहि करूं नये. ३ सेनापति कसा असावा ? ]

( १ ) युधिष्ठिर—हे राजेंद्रा, राजानें कशा प्रकारें प्रजापालन केलें असतां त्याच्या हातून उत्तम प्रकारें धर्माचरण होऊन त्याला शाश्वत कीर्ति प्राप्त होते ?

भीष्म— जो शुचिर्भूत राजा शुद्ध व्यवहारानें पक्षपात न करितां प्रजापालनांत तत्पर राहतो, त्याला धर्म आणि कीर्ति यांबरोबर उत्तम लोकांचीहि प्राप्ति होते.

युधिष्ठिर—राजानें कोणाशीं, कोणत्या स्वरूपाचे व्यवहार करावे व त्यांचा निर्णय कसा लावावा, हें मी तुला विचारीत आहें, तर हे महाप्राज्ञा, तें मला बरोबर सांग. पुरुषाच्या गुणांविषयीं तूं मला सांगितलेंस, परंतु ते सर्व गुण माझ्या मतें एकाचे ठिकाणीं सांपडणार नाहींत.

भीष्म—बुद्धिमान् युधिष्ठिरा, तूं म्हणतोस, तें तसेंच आहे. या सर्व शुभ गुणांनीं युक्त एकहि पुरुष सांपडणें अत्यंत कठीण आहे. परंतु यांपैकीं थोडे सद्गुण ज्यांच्या अंगीं आहेत, असे पुरुष प्रयत्न केल्यास या लोकीं मिळतील. तरी तूं कशा प्रकारचे अमात्य ठेवावेस, हें सांगतों.

चार विद्वान्, प्रगल्भ, शुचिर्भूत आणि स्नातक ब्राह्मण; आठ बलसंपन्न आणि सशस्त्र क्षत्रिय; एकवीस वित्तसंपन्न वैश्य आणि तीन शुद्धवर्तनी व विनयसंपन्न शूद्र; तसेंच अष्टगुणांनीं[१] युक्त असा सूतजातींतील एक पौराणिक

---

१ आठ गुण–शुश्रूषा, श्रवण, ग्रहण, धारण, ऊहन ( तर्क ), अपोहन ( तर्कनिरास ), विज्ञान आणि तत्त्वज्ञान.

यांना तूं अमात्य कर. हे सर्व प्रगल्भ व कोणाची असूया न करणारे असावे. ते सर्व पन्नास वर्षांच्या वयाचे असावे. श्रुतिस्मृतींचें ज्ञान त्यांना असून ते विनयशील, समदृष्टि ठेवणारे, विवादकार्यांमध्यें न्याय देण्याविषयीं समर्थ, धनलोभ न धरणारे व सैात घोर व्यसनांपासून अलिप्त असे असावे. यांपैकीं आठ मंत्र्यांमध्यें बसून राजानें विचारविनिमय करावा व आपला निर्णय राष्ट्रामधून सर्वत्र प्रसिद्ध करावा. अशा रीतीनें राजानें आपल्या प्रजाजनांवर नित्य देखरेख ठेवावी. कोणापासूनहि तूं गुप्तपणें द्रव्यदान घेऊं नकोस. त्याच्या योगानें मोठी कार्यहानि होत असते आणि अशा रीतीनें एकदां कार्यहानि झाली म्हणजे होणारा अधर्म तुला आणि त्या द्रव्य देणाऱ्यांलाहि बाधक होईल. मग श्येनपक्ष्याच्या भीतीनें जसे पक्षी पळून जातात, त्याप्रमाणें तुझ्या राज्यांतील लोक पळून दूर जातील किंवा समुद्रांत भग्न झालेल्या नौकेप्रमाणें हळूहळू अन्यत्र निघून जातील. या लोकीं अधर्मानें प्रजापालन करणाऱ्या राजाच्या मनांत नेहमीं भीति राहून स्वर्गाचें द्वारहि त्याला बंद होतें.

हे राजश्रेष्ठा, आतां धर्म ज्याचा आधार असें जें धर्मासन—न्यायासन—त्यावर बसून जो अधर्मानें वागतो, मग तो राजा असो, अमात्य असो, अथवा राजपुत्र असो, अथवा त्या त्या कामावर नेमलेला दुसरा कोणी असो, तो आपणांला पुढें करून राजासकट नरकांत जाऊन पडतो. बलवंतांनीं बलात्कार केल्यामुळें दैन्यानें रडत बसणाऱ्या अनाथांचा राजा हाच पालक होय. दोघांचा वाद सुरू झाला असतां तेथें साक्षीच्या बळावर त्याचा निर्णय करावा. जेथें गरिबाला कोणी साक्षी नसेल, अशा वेळीं राजानें दीव्यादि उपाय योजावे आणि अपराधी लोकांना न्यायानुसार शिक्षा द्यावी. पातकी मनुष्यांना त्यांच्या अपराधानुरूप दंड करावा. ऐश्वर्यसंपन्न असतील त्यांना दंड करावा आणि निर्धन असतील त्यांना बंधनाची शिक्षा द्यावी. जे कोणी दुराचारी असतील, त्यांवर राजानें शस्त्रप्रहार करवावे. त्यानें गोड भाषण आणि द्रव्यदान यांच्या योगानें सर्वांचें परिपालन करावें. जो कोणी राजाच्या वधाची इच्छा करील, गृहांना आग लावील, चोरी करील अथवा परस्त्रीशीं संबंध करून वर्णसंकर करील, त्याला देहांत शिक्षा सांगावी. याप्रमाणें योग्य प्रकारें शासन करणाऱ्या आणि उत्कृष्टपणें राजधर्म चालविणाऱ्या राजाला पाप लागत नसून पुण्यच लागत असतें. जो

१ सात व्यसनें—मृगया, द्यूत, स्त्री, मद्यपान (हीं कामज व्यसनें) व दंडपारुष्य, वाक्पारुष्य आणि अर्थदूषण हीं ( क्रोधज व्यसनें ) मिळून सात.

मूर्ख राजा आपल्या इच्छेनुसार शिक्षा देत असतो, तो या लोकीं अपकीर्ति पावतो आणि मेल्यावर नरकास जातो. भलत्याच्या सांगण्यावरून भलत्याला कधींहि शासन करूं नये. शास्त्रदृष्ट्या विचार करून त्याला प्रतिबंधांत ठेवावें, अथवा सोडून द्यावें.

( २ ) कोणत्याहि प्रकारची आपत्ति आली, तरी तींत राजानें दूताचा वध कधीं करूं नये. दूताचा घात करणारा राजा आपल्या सचिवांसह नरकाला जातो. यथोक्तवादी दूताचा जो क्षात्रधर्मरत राजा वध करितो, त्याच्या पितरांना भ्रूणहत्येचें पाप लागतें. कुलीनता, उत्तम शील, वक्तृत्व, दक्षता, भाषणमाधुर्य, यथोक्तवादित्व आणि उत्कृष्ट स्मृति हे सात गुण दूताच्या अंगीं असावे. हेच गुण राजाचा द्वारपाल, शरीररक्षक आणि मुख्य यांमध्येंहि असले पाहिजेत. धर्मशास्त्रतत्त्व जाणणारा, संधि-विग्रहांचें ज्ञान असलेला आणि मतिमान्, धैर्यवान्, भिडस्त, राजरहस्य गुप्त ठेवणारा, कुलीन, सत्त्वसंपन्न आणि पापरहित असा अमात्य स्तुत्य होय.

( ३ ) राजाचा सेनापतिहि ह्याच गुणांनीं युक्त असावा. त्याला निरनिराळ्या व्यूहरचना, आयुधें आणि यंत्रें यांचें ज्ञान असून तो अत्यंत पराक्रमी, वृष्टि, वात, शीत आणि उष्ण यांची पीडा सहन करणारा असावा; शत्रूंचीं छिद्रेंहि त्याला माहीत असा[illegible]. हे नृपश्रेष्ठा, दुसऱ्यांचा विश्वास आपल्यावर बसेल, असें राजानें वागावें, परंतु आपण मात्र इतरांवर कधींहि विश्वासूं नये. त्यानें आपल्या पुत्रावर देखील विश्वास ठेवणें योग्य नाहीं. हे अनघा, हें शास्त्रार्थतत्त्व मीं तुला सांगितलें आहे. कोणावरहि विश्वास न ठेवणें हें राजाचें श्रेष्ठ रहस्य आहे. १२. १. ८५.

---

## अध्याय ८६ वा.

[ १ नगरें कशा प्रकारचीं असावीं ? २ नगरांचीं लक्षणें व त्यांतील व्यवस्था. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, राजानें जेथें रहावयाचें, तें नगर कशा प्रकारचें असावें किंवा नवीन बांधावयाचें झाल्यास तें कोणत्या प्रकारें बांधवावें, तें मला सांग.

( २ ) **भीष्म**— हे कौंतेया, जेथें पुत्र, बांधव आणि ज्ञातिजन यांसह रहावयाचें, तें नगर कशा प्रकारचें असावें व त्याचें रक्षण कसें करावयाचें, यासंबंधीं

प्रश्न करणें केव्हांहि न्याय्यच आहे. म्हणून तुला विशेषतः दुर्ग कसे असावे तें सांगतों. तें ऐकून तूं तशाप्रकारचे दुर्ग करण्याविषयीं प्रयत्न कर. सहा प्रकारचे दुर्ग बांधवून त्यांच्या आश्रयानें नगरें वसवावींत, त्यांमध्यें सर्व प्रकारची संपत्ति असावी व पुष्कळ लोक रहाण्याचीहि सोय असावी. हे दुर्ग (किल्ले) धन्वदुर्ग (ज्याच्या सभोंवतीं निर्जल प्रदेश आहे), महीदुर्ग (भुईकोट), गिरिदुर्ग (डोंगरी किल्ला), मनुष्यदुर्ग (ज्याचें रक्षण मनुष्यें करितात), मृद्दुर्ग (सभोंवतीं मातीचे तट असलेला) आणि वनदुर्ग (सभोंवतीं वन असलेला) अशा सहा प्रकारचे असतात. ह्यांपैकीं एखाद्या दुर्गाच्या आश्रयानें राजनगर असावें. यांत सर्वदा धान्यें आणि आयुधें यांची विपुलता असावी. त्याचे तट मजबूत असावे व सभोंवतींचा खंदकहि बळकट असावा. त्यांमध्यें गज, अश्व आणि रथ पुष्कळ असावे. अनेक कुशल शिल्पकार असावे. तेथें सर्व प्रकारची सामुग्री असावी. धार्मिक आणि उद्यम दक्ष लोक तेथें रहात असावे. त्यांमध्यें बलसंपन्न लोक, गज आणि अश्व असावे. त्यांत मोठमोठें शोभिवंत चौक आणि बाजार असावे. सर्व व्यवहार उघडपणें चालून तेथें नित्य शांति असावी. भीति कोठूनहि नसावी. तेथें सदोदित रमणीयता असून वाद्यनाद चालत असावे. तेथील गृहें मोठमोठीं भव्य असून लोक शूर आणि धनसंपन्न असावे. नेहमीं वेदघोष चाललेला असावा. समाज जमून सर्वत्र उत्सव चालून त्यांत देवार्चनें होत असावीं. अशा नगरामध्यें अमात्य आणि सैन्य यांस आपलें स्वाधीन ठेवून राजानें रहावें.

त्या ठिकाणीं राजानें कोश, सैन्य, मित्र आणि व्यवहार यांची वृद्धि करावी. आपल्या राष्ट्रांतील आणि नगरांतील सर्व दोष काढून टाकावेत. आपलें भांडागार आणि आयुधागार यांची वृद्धि करीत असावें. सर्व प्रकारचे वस्तुसंग्रह करावे आणि यंत्रायुधालयेंहि वाढवावीं. लांकूड, लोखंड, भुसा, कोळसे, इमारतीचीं लांकडें, शिंगें, हाडें, वेणुनिर्मित वस्तु, मज्जा, तेल, चरबी, मध, सर्व प्रकारचीं औषधें, ताग, राळ, धान्यें, आयुधें, बाण, ढाली, स्नायु, वेत, मुंज (गवत), लव्हाळे आणि मोठ्या आवाजाचीं वाद्यें, ह्या सर्वांचा संग्रह असावा. राजानें पुष्कळ पाण्याचे तलाव, विहिरी व अनेक चिकाळ वृक्ष यांचें संरक्षण करावें. आचार्य, ऋत्विज्, पुरोहित, मोठमोठे धनुर्धर, कारागीर, ज्योतिषी, वैद्य, ह्यांचा नेहमीं प्रयत्नानें सत्कार करावा आणि विद्वान्, बुद्धिमान्, आत्मनिग्रही, दक्ष, शूर, बहुश्रुत, कुलीन, सत्वसंपन्न अशा लोकांची

सर्व कार्यांवर योजना करावी. राजानें धार्मिक लोकांना सर्वदा मान द्यावा व अधार्मिकांचा निग्रह करावा. सर्व वर्णांतील लोकांना आपापल्या कार्यामध्यें प्रयत्नपूर्वक लावावें. नगरांतील व राष्ट्रांतील सर्व लोकांचे उघड आणि गुप्त व्यवहार हेरांकडून समजून घेऊन नंतर ते करूं द्यावे.

हेर, गुप्त विचार, कोश आणि विशेषेंकरून दंड ह्या गोष्टींवर राजाची नजर असावी. कारण सर्व राजकार्यकुशलता या गोष्टींवरच अवलंबून असते. आपल्या नगरांत व राष्ट्रांत असलेले त्रयस्थ, शत्रु आणि मित्र यांच्या सर्व कार्यांवर हेरांकडून दृष्टि ठेवावी आणि नंतर त्यांच्याकरितां जें कांहीं करावयाचें असेल तें अवधानपूर्वक करावें. त्यानें आपल्या भक्तांचा सर्वदा उत्तम सत्कार करावा, शत्रूंचा निग्रह करावा, नित्य यज्ञ करावे आणि कोणालाहि क्लेश न देतां दान करावें. त्यानें प्रजेचें रक्षण करावें आणि धर्माला विघातक अशी कोणतीहि गोष्ट करूं नये. दीन, अनाथ, वृद्ध, विधवा स्त्रिया यांचा योगक्षेम आणि चरितार्थ यांची व्यवस्था ठेवावी. आश्रमवासी तपस्वी लोकांना राजानें वेळचेवेळीं वस्त्र, पात्र आणि अन्न देऊन त्यांचा सत्कार करावा, त्यांचा आदर ठेवावा, त्यांना सन्मानपूर्वक वागवावें आणि त्यांना आपल्यासंबंधीं, सर्व कार्यासंबंधीं आणि राष्ट्रासंबंधीं हकीकत कळवावी. त्यांच्यांशीं सर्वदा नम्रतेनें वागावें. राजानें सर्वार्थत्यागी, सत्कुलीन आणि बहुश्रुत तापसांचा शयन, आसन, आणि भोजन हीं देऊन सत्कार करावा आणि कोणत्याहि संकटप्रसंगीं त्यांज-वर विश्वास ठेवावा. चोर देखील अशा प्रकारच्या तापसांवर विश्वास टाकितात. त्यांजवळ आपली ठेव ठेवावी आणि त्यांजपासून ज्ञान संपादन करावें. लोकांना कळूं नये म्हणून त्यांजकडे वरचेवर जाऊन त्यांचा बहुमान करूं नये. एखादा आपल्या राष्ट्रामध्यें, दुसरा परराष्ट्रांत, तिसरा अरण्यामध्यें आणि चवथा मांडलि-कांच्या नगरांत अशा प्रकारें चार ठिकाणीं चार तापसी ठेवावे. त्यांची सत्कार-मानपूर्वक व्यवस्था ठेवावी आणि त्यांस आपल्या ऐश्वर्यांचे भागीदारहि करावे. आपल्या राष्ट्रांतील तपस्वी लोकांप्रमाणेंच परराष्ट्रांतील व अरण्यांतील तापसांची व्यवस्था राखावी. कारण एखादे प्रसंगीं राजा आश्रयाची इच्छा करून आल्यास हेच तपस्वी लोक त्याला त्याच्या इच्छेनुसार आश्रय देऊं शक-तात. असो. याप्रमाणें राजानें कशा प्रकारच्या नगरांत रहावें, त्याविषयींची माहिती मीं तुला संक्षेपानें सांगितली आहे. १२. १. ८६.

---

## अध्याय ८७ वा.

[ १ राष्ट्ररक्षणादिप्रकारकथन. २. राष्ट्रसंरक्षणांत वैश्य लोकांना महत्त्व. ]

( १ ) युधिष्ठिर—हे भरतश्रेष्ठा, राष्ट्राचें संरक्षण कसें करावें आणि त्याची वृद्धि कशी करावी, हें जाणण्याची मला फार इच्छा आहे, तर तें मला सांग.

भीष्म—मी तुला राष्ट्रसंरक्षण, तसेंच राष्ट्राची वृद्धि होण्याचे उपाय यांविषयीं सर्व सांगतों, लक्ष्यपूर्वक ऐक. प्रत्येक गांवावर एकएक अधिकारी नेमावा; तसेंच दहा ग्रामांवर, वीस गांवांवर, पुढें शंभर, सहस्र गांवांवर एकएक असे अधिकारी नेमावे. गांवामध्यें जे दोष असतील, ते ग्रामाधिकाऱ्यानें दशग्रामाधिकाऱ्याला कळवावे. त्यानें ते वीस ग्रामांवरील अधिकाऱ्याला कळवावे. अशा रीतीनें विसांवरच्या अधिकाऱ्यानेंहि आपल्या देशांतील वृत्त वरिष्ठ अधिकाऱ्यास–शतग्रामाधिपतीस–कळवावें. गांवांत जे जे भोज्य पदार्थ असतील, त्यांवर ग्रामाधिपतीची सत्ता असावी व त्यानें दशग्रामाधिपतीची व्यवस्था ठेवावी. त्यानें विसांवरच्या अधिकाऱ्याची व्यवस्था राखावी. हे भरतश्रेष्ठा, ग्रामशताध्यक्षाला राजानें एक मोठा, धनधान्यसंपन्न व बहुवस्तीचा गांव मानपूर्वक द्यावा. ह्या गांवाची व्यवस्था गांवाचें पालन करणाऱ्या दुसऱ्या अधिकाऱ्याच्या हातांत असावी. सहस्रग्रामाधिपतीला एक लहानसें नगर द्यावें, त्यांतील उत्पन्न वेतन म्हणून त्यानें भोगावें. त्यासंबंधीं संग्रामकृत्य व ग्रामकृत्य हीं त्यानें पहावीं. त्याच्या वेगवेगळया गोष्टींवर लक्ष्य ठेवणारा म्हणून एका धर्मज्ञ सचिवाची योजना राजानें करावी. नगरोनगरीं राजहितावर दक्षतेनें नजर ठेवणारा एक मोठा अधिकारी असावा. नक्षत्रांवर उच्चस्थानीं जसा ग्रह असतो, तसा तो सर्व कार्यांमध्यें सर्वांवर प्रमुख असावा. त्यानें त्याचीं राष्ट्रसंबंधीं कृत्यें हेरांकडून समजून घ्यावीं.

जे प्रजारक्षणार्थ योजिलेले पुरुष परवध करणारे, पापी, परद्रव्यापहारी आणि शठ असतील, त्यांच्यापासून प्रजाजनांचें रक्षण अवश्य केलें पाहिजे. विक्रय, क्रय, प्रवासाचा मार्ग, भोजनखर्च, त्यांचा परिवार आणि योगक्षेम यांचा विचार करून तदनुसार राजानें वैश्य लोकांवर कर बसवावे. उत्पन्न, दान, चरितार्थ आणि शिल्पकाम यांच्या गोष्टी विचारांत घेऊन राजानें शिल्पकारांवरील कर आकारावे. युधिष्ठिरा, राजानें लहानमोठे कर यथान्याय प्रजेवर बसवावे, पण जेणेंकरून करांच्या भाराखालीं प्रजेचा नाश होणार नाहीं, अशी करांची

योजना करावी. फल आणि कर्म यांचा विचार करूनच त्यानें करांची योजना करावी. फल आणि कर्म यांजपासून कांहींच प्राप्ति होणारी नसल्यास त्या कामीं कोणीहि प्रवृत्त होणार नाहीं. राजा व कार्यकर्ता या दोघांनाहि त्या कार्यापासून होणाऱ्या फलाची प्राप्ति होईल, असा विचार करूनच राजानें कर बसवावे. त्यानें लोभानें आपल्या व दुसऱ्याच्या मुळावर घाव घालूं नये. लोभाचीं सर्व द्वारें बंद करून राजानें सर्वांशीं प्रेमानें वागावें. राजा फार खादाड आहे, अशी एकदां प्रसिद्धि झाली म्हणजे प्रजा राजाचा द्वेष करूं लागते आणि मग त्याचें कल्याण तरी कसें होणार? अशा अप्रिय राजाला फलप्राप्तिहि होत नाहीं.

हे भारता, विचारवान् राजानें प्रजा हा एक वत्स आहे अशा समजुतीनें राष्ट्ररूप धेनूची धार काढावी. वत्साचें बल वाढविलें, तर तो पुढें कामाचे श्रम सहन करण्यास समर्थ होतो. परंतु त्याला दूध न राखतां अतिधार काढली असतां त्याच्या हातून फारसें काम होत नाहीं. त्याचप्रमाणें राष्ट्राला पिळून त्यापासून कर घेतले असतां त्याच्या हातून कोणतेंहि महत्कार्य होत नाहीं. जो राजा स्वतः राष्ट्राचें रक्षण करून त्यावर कृपा ठेवितो व त्यापासून प्राप्त होणाऱ्या द्रव्यप्राप्तीवर आपली उपजीविका भागवितो, त्याला मोठी फलप्राप्ति होते. संकटकालाकरितां म्हणून राजानें राष्ट्राला द्रव्य देऊन त्याची वाढ करावी. अशा रीतीनें राष्ट्र हाच एक खजिना होऊन तो आपल्या गृहींच असल्यासारखें राजाला वाटेल. राजानें आपल्या सर्व पौरजनांवर, देशांतील लोकांवर आणि जवळच्या व दूरच्या आश्रितांवर, जरी त्यांजवळ विशेषसें द्रव्य नसलें, तरी यथाशक्ति दया करावी.

प्रसंगविशेषीं राजानें भेद ह्या उपायाचा अवलंब करून चोरट्या लोकांना फूस द्यावी व अशा रीतीनें मध्यमवर्गांतील लोकांकडून—गांववाल्यांकडून—पुष्कळ द्रव्य काढावें. असें केल्यानें सुखदुःखांत समान राहणारे लोकांचा त्याजवर कोप होणार नाहीं. प्रजेपासून पैसा घेण्यापूर्वीं त्याचीं कारणें प्रजेला भीति दाखवून समजावून द्यावीं व राष्ट्रामध्यें राजानें फिरावें व येणारें संकट लोकांच्या नजरेस आणावें. "हें संकट आपल्यावर आलें आहे, परचक्राची मोठी भीति आहे. कळकाला फल येण्यांत जसा त्याचाच नाश होत असतो, तसाच याचाहि नाश होणार आहे. माझे शत्रु पुष्कळ चोरट्यांना साहाय्यार्थ घेऊन

आपल्याच नाशासाठीं आम्हांवर धांवून येत आहेत. ह्या भयंकर प्रसंगीं तुमच्याच रक्षणाकरितां मी तुमच्याजवळ द्रव्य मागत आहें. भय नाहींसें झालें असतां तुमचें द्रव्य ज्याचें त्यास परत दिलें जाईल. असें तुम्हीं न केल्यास तुमच्यावर बलात्कार करून शत्रु जो पैसा घेतील, तो तुम्हांला परत मिळणार नाहीं. तुमच्या बायकामुलांचा वगैरे सर्वांचा नाश होईल. बायकामुलांसाठींच जर धनसंग्रह करावयाचा असेल, तर या तुमच्या उद्योगानें मला मोठा आनंदच होणार आहे. मी तुम्हांला माझ्या स्वतःच्या पुत्रांप्रमाणेंच समजून तुमच्याकडून यथाशक्ति या आपत्कालीं द्रव्य घेणार आहें. सामर्थ्यवान् वृषभाप्रमाणें तुम्हीं या संकटप्रसंगीं कार्यभार सोसला पाहिजे. कोणत्याहि विपत्तींत मनुष्यानें द्रव्यावर लोभदृष्टि ठेवून राहूं नये."

( २ ) अशाप्रकारें मधुर, सौम्य आणि औपचारिक शब्दांनीं कालवेत्त्या राजानें द्रव्यसंपादन करावें, आज्ञापत्रें देऊन अधिकाऱ्यांना लोकांकडे पाठवावें व तटबंदी, भृत्यवर्गाचें पोषण, व्यय, संग्रामभीति आणि योगक्षेम या सर्वांचा विचार करून राजानें वैश्यलोकांवर कर बसवावा. वैश्यलोक अरण्यवासी असल्यामुळें त्यांची उपेक्षा केल्यास त्यांचा नाश होईल. म्हणून त्यांच्यांशीं त्याचें आचरण मृदुपणाचें असावें. राजानें वैश्यलोकांचें सांत्वन व रक्षण करावें; त्यांना द्रव्यदान करावें; त्यांची व्यवस्था उत्तम ठेवावी; त्यांना आपल्या संपत्तीचे वांटेकरी करून त्यांचें कल्याण करावें. हे भारता, राजानें वैश्यलोकांना मदत करून कररूप प्राप्त झालेल्या द्रव्याचा आपणहि उत्तम प्रकारें उपयोग करावा. वैश्य हे राष्ट्र, व्यवहार आणि कृषि यांची वृद्धि करणारे असल्यामुळें दयाशील राजानें त्यांच्यांशीं प्रेमपूर्वक वागावें आणि त्यांजवर हलके कर बसवावे. सर्वांशीं क्षेमबुद्धीनें वागणें हें वैश्यांच्या ठिकाणीं विशेषेंकरून इष्टोत्पत्तीस येतें. म्हणून हे युधिष्ठिरा, तूंहि या क्षेमबुद्धीसारखें श्रेष्ठ दुसरें कांहीं नाहीं, असें समजून त्यांच्यांशीं प्रेमानें वागत जा. १२. १. ८७.

---

*

## अध्याय ८८ वा.

[ १ भीष्माकडून युधिष्ठिराला करग्रहणादिप्रकारकथन. २ धनवंतांची महती. ]

(१) **युधिष्ठिर**—हे महामते पितामहा, राजा समर्थ असूनहि त्याला कोश वाढविण्याची इच्छा झाली, तर त्यानें कशा प्रकारचें आचरण ठेवावें, तें मला सांग.

**भीष्म**—देश, काल, बुद्धि आणि बल यांच्या अनुरोधानें प्रजाहिततत्पर आणि धर्मार्थी राजानें प्रजापालन करावें. त्यांचें तसें आपलेंहि कल्याण सर्वदा ध्यानांत आणून त्यानें आपल्या राज्यांतील सर्व कार्यें करावीं. ज्याप्रमाणें भ्रमर वृक्षांच्या फुलांतून मध काढतात, त्याप्रमाणें राजानें प्रजेला पीडा न होईल, अशा रीतीनें करांच्या रूपानें त्यांजकडून द्रव्य घ्यावें. ज्याप्रमाणें वांसराची काळजी घेऊनच मनुष्य धार काढितो, स्तन अगदीं पिळून टाकीत नाहीं, त्याप्रमाणें राजानें कर घ्यावे. त्यानें जळूप्रमाणें अगदीं न दुखवितां मृदुपणानें राष्ट्राकडून कर घ्यावे. ज्याप्रमाणें वाघीण आपल्या पिलांना दांतांत धरून हळूच दुसऱ्या ठिकाणीं नेते, त्यांना यत्किंचितहि पीडा देत नाहीं किंवा तीक्ष्ण मुखाचा उंदीर निजलेल्या मनुष्याचा पाय सौम्य उपायानें कुरतुडून टाकितो, त्याप्रमाणें राजानें राष्ट्रशोषण करीत रहावें. प्रथम थोडथोडा कर बसवून नंतर तो हळू हळू वाढवावा. ज्याप्रमाणें नवीन जनावराला तयार करतांना प्रथमतः थोडथोडें ओझें घालून क्रमाक्रमानें तें वाढवीत जातात आणि हळू हळू त्याला दोरीनेंहि बद्ध करितात, अशा रीतीनें पाशबद्ध होण्याची त्याला संवय लागली असतां, मग तें काम त्याला सुखसाध्य होतें. राष्ट्राचेंहि असेंच आहे. हे सर्व उपाय प्रत्येक मनुष्याला लागू पडतील असें नाहीं. म्हणून मुख्यमुख्य लोकांना संतुष्ट ठेवलें असतां इतर लोकहि हळू हळू अनुकूल होतील. योग्य प्रसंगीं त्यांचें सांत्वन करून त्यांच्यांशीं गोड बोलून त्यांजवर सत्ता चालवावी. अयोग्य प्रकारें आणि अयोग्य कालीं त्यांजवर कर बसवूं नये. योग्य वेळीं व योग्य प्रकारें सामोपचाराच्या मार्गानें प्रजेकडून कर घ्यावे. हे उपाय म्हणजे राजनीतीचेंच तत्त्व असून ते मीं तुला सांगितले आहेत. त्यांत मायेचा-कपटाचा-यत्किंचित्‌हि विचार केलेला नाहीं. अश्वाला भलत्याच उपायांनीं ताळ्यावर आणण्याचा उपाय केल्यास त्याचा कांहींएक उपयोग न होतां तो अधिकच खवळतो.

मद्यपानगृहें, वेश्या, कुंटिणी, नाटकी लोक, द्यूतकार व अशाच प्रकारचे

जे दुसरे लोक असतील, ते राष्ट्राला घातक आहेत, म्हणून त्यांचें नियमन राजानें करावें. हे राजा, हे लोक राष्ट्रांत राहिल्यास यांपासून दुसरे चांगले लोक बिघडतात. आपत्तिकालाव्यतिरिक्त कोणीं कोणाकडे कांहीं मागूं नये, असें मनूनें सांगून ठेविलें आहे. जर सर्व लोक कोणतेंहि काम न करतां केवळ याचनेवरच उदरपोषण करूं लागतील, तर निःसंशय हे सर्व लोक लयाला जातील. सर्वांचा नियामक जो राजा, तो जर असल्या लोकांचें नियमन करणार नाहीं, तर त्यांच्या पापाच्या चौथ्या हिश्शाचा तो वांटेकरी होतो. राजा हा जसा प्रजेच्या पुण्याचा भोक्ता आहे, तसाच तो त्यांच्या पापाचाहि वांटेकरी आहे. म्हणून राष्ट्रामध्यें जे कोणी पापी असतील, त्यांचें नियमन राजानें केलें पाहिजे. जो अशा लोकांचा निग्रह करीत नाहीं, तो राजा पापी होतो. मद्यपानगृहांचें नियमन करावें, त्यांच्या ठिकाणीं अति आवड धरणें हें कल्याणाचा नाश करणारें आहे. कामामध्यें (रतिविलासामध्यें) आसक्त झालेला पुरुष कोणतें दुष्कृत्य करणार नाहीं? तो कामवश होऊन मद्य, मांस, परधन, परस्त्री यांमध्यें आसक्त होईल व शास्त्रहि तसेंच आहे असें दाखवील. ज्यांना परिवार मुळींच नाहीं, अशा लोकांनीं आपत्कालीं याचना केल्यास त्यांना केवळ धर्मबुद्धीनें—त्यांच्या भीतीनें नव्हे—दान करावें. तुझ्या राज्यांत याचक, त्याचप्रमाणें लुटारू लोकहि नसावेत. असले लोक म्हणजे प्रजेला लुबाडणारे होत, त्यांचे कल्याणकर्ते नव्हत. जे लोक सर्वकाळ भूतमात्रावर कृपादृष्टि ठेवून त्यांच्या उत्कर्षाकरितां झटतात, अशींच माणसें राष्ट्रामध्यें असावीं. प्राण्यांना पीडा करणारे लोक असूं नयेत.

(२) हे महाराजा, जे अधिकारी प्रजेकडून अधिक द्रव्य घेतात, त्यांना शिक्षा करावी, व त्यांचे जागीं दुसऱ्यांची योजना करून त्यांचेकडून कर घेववावे. कृषि, गोरक्षण आणि वाणिज्य आणि यांसारखाच दुसरा कोणताहि धंदा राजानें लोकांकडून करवावा. हीं कृत्यें करणाऱ्या लोकांना जर इतरांपासून त्रास होईल, तर त्यामुळें राजाची निंदा होते. राजानें सर्वदा धनवान् लोकांना खाणें, पिणें, वस्त्रें हीं देऊन सत्कार करावा आणि मजप्रमाणेंच माझ्या प्रजाजनांवरहि तुमची कृपा असावी, अशी त्यांस विनंति करावी. हे भारता, धनवान् लोक हे राजाचें प्रमुख अंग आहे, ते सर्व प्राण्यांना वशिंडासारखे आहेत, यांत संशय नाहीं. प्राज्ञ, शूर, धनवान्, सामर्थ्यसंपन्न, धार्मिक, तपस्वी, सत्यवादी आणि बुद्धिमान् हेच प्रजेचें रक्षण करूं शकतात. म्हणून हे राजा, सर्व

प्राण्यांवर दया करीत जा. सत्य, सरळपणा आणि शांति धारण कर आणि दुष्टपणाचा त्याग कर. अशा रीतीनें वागल्यास दंडशक्ति, कोश, मित्र आणि भूमि ह्यांची तुला प्राप्ति होईल. तूं सत्य आणि सरळपणा धरून हे राजा, मित्र आणि कोश यांच्या बलानें युक्त होशील. १२. १. ८८.

## अध्याय ८९ वा.

[ १ युधिष्ठिराला राजनीतिकथन. ]

( १ ) भीष्म—वनस्पति आणि भक्ष्यफलें हीं तुझ्या राज्यांत कोणीं तोडूं नयेत. ब्राह्मणांचा आहार म्हणजे फलमूलें हाच होय, असें विद्वान् लोकांचें म्हणणें आहे. ब्राह्मणांनीं भक्षण करून अवशिष्ट राहिल्यास तें इतर जनांनीं भक्षण करावें. ब्राह्मणाला विरोध करून त्याचें द्रव्य दुसऱ्यानें कधींहि हरण करूं नये. ब्राह्मण जर चरितार्थाकरितां राज्यत्याग करून जाऊं लागला, तर राजानें त्याची व त्याच्या कुटुंबाच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था करावी. इतकेंहि करून तो जाऊंच लागला, तर ब्राह्मणसभेंत त्याला म्हणावें, ' दिलेल्या वृत्तींत तुमचें समाधान नाहीं, आतां लोकांनीं तरी आपापल्या वृत्तींत संतुष्ट कसें रहावें ?' असें म्हटल्यावर तो निःसंशय राज्यत्यागाचा विचार सोडून देईल. कदाचित् 'आतांच तूं माझ्या चरितार्थाची सोय करीत आहेस,' असें म्हणाला तर पूर्वींची गोष्ट आपणाला ठाऊक नाहीं, असें प्रार्थनापूर्वक त्याला सांगावें. ' हे ब्राह्मणा, लोक असें म्हणत होते, परंतु माझा त्या गोष्टीवर विश्वास बसेना,' असें सांगावें आणि ज्या भोग्य वस्तूंची त्याला इच्छा असेल, त्या देऊन आणि त्याचा चरितार्थ चालत नसेल तर तो चालवून त्याला ठेवून घ्यावें.

कृषि, गोरक्ष्य आणि वाणिज्य हें इहलोकींचें उदरनिर्वाहाचें साधन आहे. त्याचप्रमाणें वेदत्रयीनें प्रतिपादित कर्में हीं स्वर्गप्राप्तीचीं साधनें आहेत. वेदत्रयी ही प्राणिमात्राचा उत्कर्ष करणारी आहे. अशा वेदत्रयीची हयगय होत असतां जे तिला विरोध करितात, ते चोरच होत. त्यांच्या वधाकरितां ब्रह्मदेवानें क्षत्रियांना निर्माण केलें आहे. हे नृपा, तूं शत्रूंवर जय मिळीव, प्रजेचें रक्षण कर, यज्ञ कर आणि मोठ्या वीर्यानें रणांगणावर शत्रूंशीं युद्ध कर. जे रक्षण करण्यास पात्र आहेत, त्यांचें जो रक्षण करितो, तोच राजा राजसत्तम होय. जे अशा लोकांचें रक्षण करीत नाहींत, त्यांचा कांहींएक उपयोग नाहीं. हे

युधिष्ठिरा, राजानें सर्वलोकहिताकरितां म्हणून सर्वदा युद्ध केलें पाहिजे. यासाठीं त्यानें चारांची–हेरांची–योजना करावी. स्वकीयांपासून परकीयांचें, व परकीयांपासून स्वकीयांचें, तसेंच परकीयांकडून परकीयांचें आणि स्वकीयांकडून स्वकीयांचें असें सर्वांचें सर्वदा रक्षण कर. हे राजा, तूं स्वतःचें रक्षण करून पृथ्वीचें पालन कर.

हें सर्व राज्यादि आत्ममूलक आहे, असे विद्वान् लोक म्हणतात. 'माझ्यामध्यें दोष कोणता आहे, मला कोणतें व्यसन आहे, माझ्यामध्यें वैकल्य कोठें आहे, कोणत्या कर्मानें मी दोषास्पद होईन,' ह्या गोष्टींचा राजानें नेहमीं विचार करावा. तसेंच गेल्या दिवशीं आपल्या हातून घडलेली गोष्ट लोकांना पसंत आहे किंवा नाहीं, हेंहि त्यानें गुप्त आणि विश्वासू हेर पृथ्वीवर पाठवून त्यांजकडून समजून घ्यावें. 'माझें आचरण लोकांना आवडतें किंवा नाहीं, तसेंच माझे राज्यांत होत असलेलें यश त्यांना इष्ट आहे किंवा अनिष्ट आहे,' ह्याचाहि राजानें विचार करणें इष्ट आहे. धर्मज्ञ, धैर्यशील, रणांतून पलायन करून न जाणारे, राष्ट्रीयपक्षाचे लोक, राजसेवक, अमात्य आणि मध्यस्थ लोक, यांपैकीं कोणी राजाची स्तुति करणारे असतील, तर कोणी निंदाहि करणारे असतील, त्या सर्वांचा तूं सारखाच सत्कार कर. हे युधिष्ठिरा, कोणतीहि गोष्ट सर्वांना सारखीच आवडते, असें नाहीं. कारण मित्र, शत्रु आणि मध्यस्थ हे सर्वांना असावयाचेच.

युधिष्ठिर—बाहुबल व इतर गुण हीं सारखींच असून कोणता गुण श्रेष्ठ असल्यामुळें राजा इतर मनुष्यांवर सत्ता चालवितो ?

भीष्म—जंगम प्राणी स्थावरांना भक्षण करितात, दंष्ट्रायुक्त प्राणी दंष्ट्राविरहित प्राण्यांवर आपली उपजीविका करितात, क्रुद्ध विषारी सर्प लहान सर्पांना खातात. हे युधिष्ठिरा, म्हणून राजानें प्रजेविषयीं, तसेंच आपल्या शत्रूंविषयींहि अत्यंत सावधगिरीनें वागलें पाहिजे. कारण थोडेंसें दुर्लक्ष दिसून येतांच हे लोक गृध्राप्रमाणें आपल्यावर झडप घालतात. युधिष्ठिरा, तुझ्या राज्यांतील व्यापारी लोक करांनीं पीडित होऊन उद्विग्न झालेले नाहींत ना ? राज्याचा कर सोसून जे इतरांचेंहि पोषण करितात असे शेतकरी अत्यंत पीडित होऊन राष्ट्र सोडून जात नाहींत ना ? येथें आपण जें दान करितों, त्याच्याच योगानें देव, पितृगण, मनुष्य, नाग, राक्षस आणि पशुपक्षी राहतात. हे भारता, मीं तुला

राष्ट्रवृत्ति आणि राजांचें संरक्षण ह्यांविषयीं सांगितलें आहे. ह्याचविषयीं मी तुला आणखीहि कांहीं सांगेन. १२. १. ८९.

---

## अध्याय ९० वा.

[ १ युधिष्ठिराला उतथ्य व मांधातृ यांमधील संवादाचें-धर्ममाहात्म्याचें-कथन. ]

( १ ) भीष्म—युधिष्ठिरा, युवनाश्वपुत्र मांधात्याला ब्रह्मवित्तम उतथ्यानें मोठ्या प्रेमानें जे क्षात्रधर्म सांगितले, ते सर्व तुला मी सांगतों.

उतथ्य—राजा हा धर्माकरितां आहे, कामवासना परिपूर्ण करून घेण्याकरितां नव्हे. हे मांधात्या, राजा हा लोकसंरक्षणाकरितां आहे, हें ध्यानांत ठेव. राजा जर धर्माचरण करणारा असला, तर त्याला देवत्वाची प्राप्ति होते. तो जर अधर्मानें वागूं लागला, तर त्याला नरकाची प्राप्ति होते. धर्म हा सर्व लोकांचा आधार आहे, तसाच तो राजावर अवलंबून असतो, म्हणून त्या धर्माचें जो उत्तम रीतीनें रक्षण करतो, तोच खरा राजा होय. परम धार्मिक असा जो लक्ष्मीवान् राजा तोच धर्म होय, असें म्हटलें आहे. राजाकडून पाप्यांचें निवारण न झाल्यास दोघांची निंदा होते आणि धर्म नाहीं असें लोक म्हणूं लागतात. स्वधर्मानें वागणाऱ्यांना तत्काल अर्थसिद्धि होत असते आणि म्हणूनच लोक त्या मंगलप्रद धर्माचें आचरण करीत असतात. नाहींतर धर्मवर्तनाचा उच्छेद होतो. अधर्माची प्रवृत्ति होते व रात्रंदिवस मोठें भय वाटत असतें. जर पाप्यांचें निवारण झालें नाहीं तर, 'हें माझें आहे, हें माझें नव्हे' असें सज्जन लोक जें म्हणतात, तें त्यांना म्हणतां येणार नाहीं. राज्यांत जेव्हां पापी लोकांचें प्राधान्य विशेष दिसून येतें, तेव्हां आपली पत्नी, पशु, क्षेत्र, निवासस्थान हीं दृष्टीस पडणार नाहींत. देवांना पूजेची व पितरांना स्वधेची ओळख राहणार नाहीं. पापी लोकांचें निवारण न झाल्यास अतिथींचा कोणी सत्कार करणार नाहीं. व्रताधिकारी ब्राह्मण लोक यज्ञ करणार नाहींत आणि वृद्ध मनुष्याच्या मनाप्रमाणें सर्वांचें अंतःकरण विह्वल होऊन जाईल.

इहपरलोकांचा विचार करून ऋषींनीं 'हा साक्षात् धर्मच होय' अशा भावनेनें राजा निर्माण केला आहे. ज्यांच्या ठिकाणीं धर्म विराजमान असतो, त्यालाच राजा म्हणतात. ज्याच्या ठिकाणीं धर्म दिसून येत नाहीं, त्याला देव वृषल ( शूद्र ) म्हणतात. वृष शब्दाचा अर्थ भगवान् 'धर्म' हा आहे आणि जो

त्याचा लय करितो, तो देवांच्या मतें वृषल होय. म्हणून धर्माचा लोप करूं नये. धर्माच्या वाढीबरोबरच सर्व भूतांची वाढ होत असते. त्याचा ऱ्हास होऊं लागला म्हणजे सर्व प्राण्यांचाहि ऱ्हास होतो. म्हणूनच धर्माची अभिवृद्धि करीत असावें. धर्म हा धनाला प्राप्त करून देणारा असल्यामुळें तसाच तो मनुष्यमात्राला आंवरून धरणारा असल्यामुळें त्याला धर्म म्हणतात. हे राजा, या धर्मानेंच अधर्माला मर्यादा घातली आहे. ब्रह्मदेवानें प्राणिमात्राच्या उत्कर्षासाठींच धर्म निर्माण केला आहे. म्हणून प्रजानुग्रह करण्याच्या इच्छेनें राजानें राष्ट्रामधून धर्मप्रवृत्ति करावी. धर्म हा सर्वांत श्रेष्ठ असल्याचें सांगितलें आहे. हे पुरुषश्रेष्ठा, जो स्वतः उत्तम प्रकारचें आचरण ठेवून प्रजापालन करितो, तोच राजा होय. काम आणि क्रोध ह्यांना वश न होतां जो प्रजापालन करितो, त्यालाच राजपदवी शोभते. हे भरतसत्तमा, राजांना अत्यंत श्रेयस्कर असा एक धर्मच आहे.

हे मांधात्या, धर्माची उत्पत्ति ब्राह्मणापासून झालेली आहे, म्हणून सर्वदा त्यांचा सत्कार करावा व मत्सरभाव सोडून त्यांच्या इच्छा परिपूर्ण कराव्या. त्यांना असंतुष्ट ठेवल्यास त्यांपासून राजांस मोठें भय उत्पन्न होतें. त्यांना कोणी मित्र होत नाहींत; शत्रु मात्र अनेक होतात. पूर्वी विरोचनपुत्र बलि ह्यानें ब्राह्मणांशीं मूर्खपणानें विरोध केल्यामुळें त्याची सर्व संपत्ति त्याला सोडून इंद्राकडे गेली. आपली सर्व संपत्ति इंद्राकडे गेल्याचें पाहून बलीला मोठा पश्चात्ताप झाला. हें अभिमानाचें आणि मत्सराचें फळ होय. म्हणून हे युधिष्ठिरा, तुझा त्याग लक्ष्मीनें कधीं करूं नये, म्हणून तूं ही गोष्ट सर्वदा चित्तांत ठेव. त्या संपत्तीला अधर्मापासून दर्प नांवाचा पुत्र झाला, असें श्रुतींत सांगितलें आहे. ह्या दर्पाकडून अनेक देव, असुर आणि राजर्षि यांचा नाश झाला आहे. हे राजा, म्हणून तूं ह्याविषयीं सावध रहा. त्याला जिंकल्यानें राजा होतां येतें, आणि त्यानें जिंकलें असतां मनुष्य दास होतो. म्हणून हे मांधात्या, तुझें यश चिरकाल पृथ्वीवर रहावें अशी तुझी इच्छा असल्यास तूं दर्पयुक्त होऊन अधर्माचें वर्तन आपल्या हातून कधींहि होऊं देऊं नकोस.

हे राजा, तूं मत्त, प्रमत्त, उन्मत्त, निंदित आणि असदाचारी यांचा सहवास सोडून दे. कोणत्याहि अवस्थेंत त्यांपासून तूं परावृत्त होऊन रहा. त्याचप्रमाणें ज्याला शासन केलें आहे असा अमात्य, विशेषेंकरून स्त्रिया, पर्वत, विषम स्थळें, गज, अश्व आणि सर्प इत्यादिकांविषयीं सर्वदा दक्ष रहावें

आणि रात्रीच्या वेळीं सहसा बाहेर फिरायाला जाऊं नये. कंजूषपणा, अभिमान, दंभ आणि क्रोध हीं वर्ज्य करावींत. अविज्ञात स्त्रिया, क्लीब, स्वच्छंदाचारिणी स्त्रीवर्ग, परभार्या आणि कन्या यांच्यांशीं कधींहि संबंध ठेवूं नये. वर्णसंकरामुळें कुलामध्यें पापरूपी राक्षसाचा संचार होतो. राजाच्या हातून सतत दोष घडत गेल्यास, क्लीब, अंगहीन, मुके आणि विचारहीन व अशा प्रकारचे दुसरे लोक राज्यांत उत्पन्न होतात. म्हणून राजानें प्रजाहिताकडे लक्ष्य ठेवून सर्वदा आपलें वर्तन ठेवावें. क्षत्रियाकडून प्रमाद घडल्यास त्याचा परिणाम फार भयंकर होतो. प्रजासंकर करणाऱ्या अधर्मांची अभिवृद्धि होते. उन्हाळयांत थंडी उत्पन्न होते व थंडीच्या दिवसांत थंडी मुळींच भासत नाहीं. अवृष्टि आणि अतिवृष्टि आणि त्यांबरोबरच वेगवेगळे रोग प्रजांमध्यें शिरतात. अशा प्रसंगीं धूमकेतु इत्यादिकांसारखे भयंकर ग्रह दिसूं लागतात आणि राजनाशसूचक असे अनेक उत्पात होतात. जो राजा आपल्या स्वतःचें व प्रजेचेंहि कल्याण करीत नाहीं, त्याच्या प्रजांचा आधीं नाश होतो आणि नंतर तोहि नाश पावतो. एकाचें द्रव्य दोघांनीं लुटावें आणि दोघांचें दुसऱ्या अनेकांकडून लुटलें जावें, त्याप्रमाणेंच कुमारिकांचें कौमार्य नष्ट व्हावें, हें राजास मोठें दूषण आहे, असें सांगितलें आहे. जेव्हां राजा राजधर्मांचा त्याग करून प्रमादकारी होतो, तेव्हां 'ही वस्तु माझी आहे, ही माझी नाहीं' असें कोणाला म्हणतांच येत नाहीं. १२. १. ९०.

---




## अध्याय ९१ वा.

[ १ उतथ्य-मांधातृ-संवादकथन—नृपतीचीं कर्तव्यें. ]

(१) उतथ्य—योग्य कालीं पर्जन्यवर्षी मेघ आणि धर्मचारी राजा ह्या दोन गोष्टी जुळून आल्या असतां प्रजेचें सुखानें पोषण होतें. वस्त्रांचा रंग न घालवितां मळ कसा काढावा, ह्याचें ज्ञान ज्या परटाला नाहीं, तो केवळ निरुपयोगी होय. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र यांपैकीं कोणी जर स्वकर्म सोडून अनेक कर्मांच्या ठिकाणीं आसक्त होऊन राहील, तर तो स्वकर्तव्यच्युत रजकाप्रमाणेंच निरुपयोगी होय. कर्म शूद्राला, कृषि वैश्याला, दंडनीति राजाला आणि ब्रह्मचर्य, तप, मंत्र आणि सत्य ह्या गोष्टी ब्राह्मणाला सांगितल्या आहेत. या चार वर्णांपैकीं क्षत्रिय, रजकाला ज्याप्रमाणें वस्त्रें शुद्ध करण्याचें ज्ञान असतें, त्याप्रमाणें आपल्या

प्रजेचे आचरणांतील दोष काढण्यास समर्थ असेल, तर तो त्यांचा पिता व अधिपति होतो.

हे भरतश्रेष्ठा, कृत, त्रेता, द्वापर आणि कलि हीं चार युगें राजाच्या वर्तनावर अवलंबून असतात. म्हणून राजालाच युग असें म्हणतात. जर राजाच्या हातून दोष घडेल तर चातुर्वर्ण्य, चार वेद आणि आश्रम हे सर्व मोह पावतील. राजाच्या हातून दोष घडल्यास तीन (गार्हस्पत्यादि) अग्नि, तीन (ऋग्, यजु आणि साम) वेद आणि दक्षिणायुक्त यज्ञ यांत सर्व घोंटाळा होतो. राजा भूतमात्राच्या उत्कर्षाकरितां तसाच नाशाकरितांहि आहे. राजा धर्मात्मा असेल, तर तो प्रजांचा उत्कर्षकर्ता आणि तो अधर्मात्मा असेल तर त्यांचा विनाशक होय. राजाच्या हातून जर प्रमाद घडला, तर त्याच्या स्त्रिया, पुत्र, बांधव आणि सुहृद् हे सर्व शोकमग्न होऊन जातात. गज, अश्व, धेनु, उष्ट्र, खेचर आणि गर्दभ हेहि राजा अधर्मशील झाला असतां दुःख पावतात. हे मांधात्या, दुर्बलाकरितांच ब्रह्मदेवानें बलाची उत्पत्ति केली आहे. दुर्बल प्राणी यांची योग्यता फार मोठी आहे. कारण, राजानें त्यांचें पालन केल्यास त्याला पुण्यप्राप्ति होते व त्यांचें पालन न केल्यास त्याला मोठें पाप लागतें. जो दुर्बल मनुष्य व त्याचे संबंधी राजाचे अनुरोधानें वागत असतात, ते सर्व राजा अधर्मी झाला असतां शोकमग्न होतात. दुर्बल प्राणी, मुनि आणि सर्प यांची दृष्टि अत्यंत असह्य आहे, असें मला वाटतें, म्हणून तूं दुर्बलांच्या तडाक्यांत कधींहि सांपडूं नकोस.

हे मांधात्या, दुर्बलांची दृष्टि तुजवर पडून तुझा बांधवांसह कधींहि नाश होऊं नये, म्हणून तूं दुर्बलांना न दुखवितां त्यांना मान देत जा. दुर्बलांच्या दृष्टीनें दग्ध झालेल्या वंशामध्यें मुळींच वाढ होत नाहीं. ती त्या वंशाला मुळासकट दग्ध करून टाकिते. दुर्बलांशीं कोणींहि अतिप्रसंग करूं नये. दुर्बलता ही बलापेक्षां अत्यंत श्रेष्ठ आहे. निर्बल मनुष्याच्या दृष्टिपातानें दग्ध झालेल्या बलिष्ठाचा अवशेष यत्किंचितहि रहात नसतो. दुर्बल मनुष्याचा कोणीं अपमान केला, त्याचा वध केला, अथवा त्याला क्लेश दिले आणि अशा वेळीं त्याचें संरक्षण करणारा कोणी नसल्यास राजावर कांहीं तरी दैवी शिक्षा येऊन ठेपते. मांधात्या, तूं संग्रामरत होऊन दुर्बलांकडून करग्रहणादिक करूं नकोस.

अग्नि ज्याप्रमाणें समीपच्या वस्तूला दग्ध करून टाकितो, त्याप्रमाणें दुर्बलांची दृष्टि तुजवर पडून तुला जाळून न टाको. विनाकारण दुखविल्यामुळें रोदन करणाऱ्या दुर्बलांच्या नेत्रांतून गळणारे दुःखाश्रू त्यांचा छळ करणाऱ्यांच्या पुत्रांचा आणि पशूंचा संहार करितात. त्याचें फल जरी त्यांना स्वतःला मिळालें नाहीं, तरी तें त्यांच्या पुत्रांना किंवा नातवांना मिळतेंच. कारण आपल्या हातून झालेलें पापकर्म गाईप्रमाणें तत्काल कधींच फलदायक होत नसतें. जेथें दुर्बलाचा वध होत असतां त्याचा त्राता म्हणून कोणी आढळत नसतो, तेव्हां एखादी मोठी दैवी शिक्षा त्या राष्ट्रावर येऊन पडते. ज्या कालीं देशांतील सर्व लोक ब्राह्मणांप्रमाणें भिक्षा मागूं लागतात, तेव्हां ते राजाच्या नाशाला कारण होत असतात. जेव्हां राज्यामध्यें पुष्कळ राजपुरुष अन्यायानें वर्तणूक करून राहणारे असतात, तेव्हां तें राजाचें महापातक होय. जेव्हां पुष्कळ राजपुरुष लोभाविष्ट होऊन रडकुंडीस आलेल्या राष्ट्रांतील अनाथ लोकांकडून युक्तीनें द्रव्य हरण करितात, तेव्हां तें राजाचें मोठें पाप समजलें जातें. एखादा मोठा वृक्ष उत्पन्न होतो, वाढीस लागतो आणि पुष्कळ प्राणी त्याच्या आश्रयास राहून छाया भोगतात; परंतु जेव्हां तो वृक्ष छेदून टाकिला जातो अथवा दग्ध केला जातो. तेव्हां त्याच्या आश्रयानें राहणारे सर्व प्राणी निराश्रित होतात. जेव्हां राष्ट्रामध्यें लोक राजगुणांचें वर्णन करीत धर्माचें अथवा एखाद्या सत्कर्माचें उत्तम प्रकारें आचरण करितात, तेव्हां राजाची भरभराट होते; परंतु तेच लोक जर धर्मभ्रमानें अधर्माचरण करूं लागतील, तर त्यांचें सर्व पुण्य लयाला जातें.

जेव्हां दुष्ट लोकांना, ते दुष्ट आहेत, असें समजूनहि सज्जनांमध्यें उघडपणें प्रवेश मिळतो, तेव्हां त्या राष्ट्रांतील राजांमध्यें कलीचा प्रवेश होतो. परंतु जेथें राजा असभ्य लोकांना शिक्षा करितो, तेथें त्याच्या राज्याची अभिवृद्धि होते. जो राजा योग्य रीतीनें अमात्यांचा मान ठेवितो आणि मंत्र आणि युद्ध या कामांत त्यांचा विचार घेऊन युद्धावर पाठवितो, त्याचे राज्याची वृद्धि होते आणि तो सर्व पृथ्वीवर चिरकाल राज्य करितो. जो राजा एकाद्याचें सत्कृत्य अथवा सद्भाषण लक्ष्यांत आणून त्याचें गौरव करितो, त्याला उत्तम धर्मप्राप्ति होते. जो राजा इतरांशीं मिळून राज्यव्यवहार करितो, अमात्यांचा अवमान कधीं करीत नाहीं, बलाढ्य आणि गर्विष्ठ लोकांना शिक्षा करितो; जो कायावाचामनानें सर्वांचा प्रतिपाळ करितो, पुत्राच्याहि अपराधाची क्षमा करीत नाहीं, दुर्बलांना आपल्या ऐश्वर्याचा विभाग देऊन नंतर आपण त्याचा उपभोग घेतो आणि अशा

रीतीनें त्यांना बलसंपन्न करितो, जो राष्ट्राचें रक्षण करितो, चोरादिकांना हांकून लावितो आणि समरांगणावर जय मिळवितो, प्रिय मनुष्यानें जरी कृतीनें अथवा भाषणानें पापाचरण केलें असलें, तरी जो त्याबद्दल क्षमा कधींहि करीत नाहीं, तो राजा धर्मनिष्ठ होय. जो राजा वणिजादि प्रवाश्यांचें स्वपुत्रांप्रमाणें पालन करितो, योग्य मर्यादांचें जो कधीं उल्लंघन करीत नाहीं, जो कामक्रोधादिकांचा त्याग करून श्रद्धेनें विपुल दक्षिणासंपन्न यज्ञ करितो अशाच्याच राज्यामध्यें धर्माची वसति असते. जो दीन, अनाथ आणि वृद्ध यांचे अश्रू पुसून त्यांना आनंदवितो, जो मित्रांचा उत्कर्ष आणि शत्रुजनांचा संहार करितो, साधूंचा बहुमान टेवितो; जो सत्याचा प्रेमानें प्रतिपाळ करितो नित्य भूमिदान करितो, अतिथींचा त्याचप्रमाणें भृत्यवर्गाचाहि सत्कार करितो, त्या राजाच्या नगरांतच धर्म वस्ती करितो. निग्रह (दंड) आणि अनुग्रह (कृपा) या धर्मांप्रमाणें जो वागतो, त्याला इहपरलोकींहि सुखप्राप्ति होते.

हे मांधात्या, योग्य नियमन करणारा राजा हा सर्व धार्मिकांना परमेश्वरासारखा वाटत असतो. त्यानें प्राणांचें (इंद्रियांचें) नियमन केलें असतां त्याला ऐश्वर्य प्राप्त होतें व तसें न केल्यास त्याचा निःपात होतो. ऋत्विज्, पुरोहित आणि आचार्य यांचा सत्कारपूर्वक बहुमान ठेवणें आणि त्यांवर कृपादृष्टि राखणें हा राजाचा धर्म होय. ज्याप्रमाणें यम हा सर्व भूतांवर सारखी दृष्टि ठेवून त्यांचें योग्य रीतीनें नियमन करतो, त्याप्रमाणें राजानेंहि आपल्या प्रजांचें यथाविधि नियमन करावें. हे पुरुषश्रेष्ठा, राजाला सहस्राक्षाची–इंद्राची–उपमा देत असतात. त्याला जो धर्म असें वाटेल, तोच धर्म होय. तूं सावधानपणें क्षमा, बुद्धि, धृति आणि मति हे गुण संपादावे, तसेंच प्राणिवर्गाची जिज्ञासा आणि चांगलें व वाईट कृत्य कोणतें हेंहि नीट समजून घ्यावें. सर्व लोकांना मिळवून घेऊन, त्यांना दान देऊन व त्यांच्यांशीं गोड बोलून आपल्या नागरिकांचें आणि राष्ट्रजनांचें प्रेमपूर्वक पालन करावें.

ज्या राजाचें राज्यकारभारांत लक्ष नसतें, तो प्रजेचें पालन करण्याविषयीं समर्थ होत नसतो. कारण, राज्य हा मोठा भार असून तें चालविणें अत्यंत दुष्कर आहे. त्याचें रक्षण करण्यास दंडनीतिज्ञ, ज्ञानवान् आणि शूर अशा राजाचीच आवश्यकता आहे. दंडनीतीचें ज्ञान नसणाऱ्या, मूर्ख व धैर्यहीन राजाच्या हातून त्याचें रक्षण कधींहि होऊं शकणार नाहीं. म्हणून तूं विद्वान्,

कुलीन, दक्ष, आपल्यावर अनुरक्त आणि बहुश्रुत अशा अमात्यांकडून सर्व प्रजाजन, तपस्वी आणि आश्रमी लोक यांचे विचार समजून घेत जा. त्या योगानें तुला प्राणिमात्राचे धर्म समजून येतील. अशा रीतीनें स्वदेशीं आणि परदेशींहि तुझ्या हातून धर्मव्यत्यय होणार नाहीं. ह्यासाठीं अर्थ आणि काम ह्यांहून धर्माचीच योग्यता विशेष आहे. धर्मात्माच इहपरलोकीं सुख मिळवितो. मनुष्यांचा आदरसत्कार केल्यानें तीं स्त्री-पुत्रांचाहि त्याग करून त्या आदर करणाऱ्याला साहाय्यक होतात. लोकसंग्रह, दान, गोड भाषण, सावधानता आणि शुचिर्भूतता हे गुण राजाला ऐश्वर्य देणारे आहेत. ह्या गुणांकडे तूं दुर्लक्ष करणें कधींहि योग्य होणार नाहीं. राजानें नेहमीं सावध असावें. त्याला आपले व शत्रूचे दोष समजत असावे. त्यानें आपलें छिद्र शत्रूला दिसूं देऊं नये. शत्रूचें मात्र दिसून येतांच त्यांजवर धांवून जावें. इंद्र, यम, वरुण आणि सर्व राजर्षि ह्याच मार्गानें चालत आले आहेत. म्हणून तूंहि त्याच मार्गाचें अव-लंबन कर. हे महाराजा, त्या राजर्षींनीं आचरिलेल्या तत्त्वानुसार तूं वाग आणि शीघ्र स्वर्गसाधक मार्गाचा स्वीकार कर. हे भारता, धर्माचरणी राजाची कीर्ति महातेजस्वी देव,ऋषि, पितर आणि गंधर्व हे परलोकीं गातात.

**भीष्म**—हे भारता, मांधात्याला त्या उतथ्यानें असें सांगितलें असतां त्यानें निःशंकपणें तसें आचरण ठेविलें आणि पृथ्वीवर एकछत्री राज्य केलें. हे राजा, तूंहि त्या मांधात्याप्रमाणें धर्माचरण करून पृथ्वीचें संरक्षण कर, म्हणजे तुलाहि धर्मप्राप्ति होईल. १२. १. ९१.

---

## अध्याय ९२ वा.

[ १ युधिष्ठिरप्रश्न. २ युधिष्ठिराला वामदेव व वसुमना यांमधील संवादाचें भीष्माकडून कथन. ]

(१) **युधिष्ठिर**—हे भारता, धर्मेच्छु राजानें कशा प्रकारें वर्तन ठेविलें पाहिजे, हें मी तुला विचारीत आहें, तर तें तूं मला सांग.

(२) **भीष्म**—ह्याविषयीं तत्त्ववेत्त्या बुद्धिमान् वामदेवानें सांगितलेला एक पुरातन इतिहास उदाहरण म्हणून सांगत असतात. पूर्वी वसुमना नांवाचा कोणी ज्ञानवान्, धृतिमान् आणि शुचि राजा होता. त्यानें तपस्वी वामदेव

महर्षि याला प्रश्न केला कीं, ‘ भगवन्, कोणत्या प्रकारचें आचरण केल्यानें मी धर्मापासून च्युत होणार नाहीं, तें धर्मार्थयुक्त वाक्यांनीं मला सांग.’ त्यावर तो तपस्विश्रेष्ठ वामदेव ऋषि त्या सुखासीन राजाला बोलला—

वामदेव—राजा, तूं धर्माप्रमाणेंच वागत जा; कारण धर्माहून श्रेष्ठ असें दुसरें कांहीं नाहीं. धर्मानें वागणाऱ्या राजांनाच ही पृथ्वी जिंकितां येते. जो राजा अर्थसिद्धीहून धर्म श्रेष्ठ आहे असें समजून धर्माच्या अभिवृद्धीकरितां सतत यत्न करितो, तो धर्मानें सुशोभित होतो. अधर्मप्रवृत्त होऊन जो राजा बलात्काराच्या जोरावर वागतो, तो शीघ्र धर्म आणि अर्थ ह्या दोन्ही पुरुषार्थांना मुकतो. ज्याचा सचिव दुष्ट व पापी आहे व जो स्वतः धर्मनाशक आहे, तो सर्व लोकांना वध्य असून आपल्या परिवारासह सत्वर नाश पावतो. अर्थसिद्ध्यर्थ प्रयत्न न करणारा, मनाला वाटेल तसें वागणारा आणि व्यर्थ बडबड करणारा राजा सर्व पृथ्वीला मिळवूनहि सत्वर नाश पावतो. तो केवळ आपलें कल्याण डोळ्यांसमोर ठेऊन कोणाशींहि मत्सरभाव न ठेवितां जितेंद्रिय होऊन वर्तन ठेवील, तर नद्यांच्या योगानें जशी समुद्राची वाढ होते, त्याप्रमाणें त्या मतिमान् राजाचा उत्कर्ष होतो. राजानें आपण धर्म, काम, अर्थ, बुद्धि आणि मंत्र यांमध्यें परिपूर्ण आहों, असें कधीं मानूं नये. कारण, सर्व लोकांचे व्यवहार या पुरुषार्थांवरच चालू असतात. यांकडे लक्ष देऊन वागणाऱ्या राजाला यश, कीर्ति, संपत्ति आणि प्रजा यांची प्राप्ति होते.

जो राजा धर्माचरण करणारा असून सर्वदा धर्म आणि अर्थ यांचें चिंतन करीत असतो, तोच महापदाला चढतो. कोणाला दान न देणारा, कोणावरहि प्रेम न करणारा, दंडनीत्यनुसार न वागणारा व साहसी स्वभावाचा राजा लवकरच नाश पावतो. त्या मूर्ख राजाला आपलें पापकृत्य न कळल्यामुळें जगामध्यें त्याची अपकीर्ति होते आणि शेवटीं त्याला नरकप्राप्ति होते. जो राजा लोकांचा मान करणारा, दाता, गोड स्वभावाचा, लोकांना अनुकूल होऊन वागणारा असतो, त्याजवर संकट आलें असतां तें आपल्यावर आल्यासारखें समजून त्याच्या निवारणाकरितां लोक तयार असतात. ज्याला धर्मोपदेशक गुरु म्हणून कोणी नसतो किंवा जो दुसऱ्या कोणाला विचारूंहि इच्छित नाहीं, जो द्रव्यप्राप्तीकरितां वाटेल तसें वागतो, त्याला चिरसुखाची प्राप्ति होत नाहीं. धर्मप्रकरणांत गुरूला महत्व देणारा, अर्थविषयांत स्वतः लक्ष्य घालणारा व लाभ

झाला असतां धर्माकडे प्रवृत्त होणारा असा जो त्यालाच चिरकालचें सुख मिळतें. १२. १. ९२.

---

## अध्याय ९३ वा.

[ १ वामदेवानें सांगितलेली गीता–राजाचें वर्तन. ]

( १ ) **वामदेव**—जेथें राज्यांमध्यें राजा बलवान् होऊन अधर्मांचा प्रसार करितो, तेथें त्याचे वंशज त्याचेंच अनुकरण करितात. असें झालें असतां राष्ट्रांतील सर्व लोक अविनीतपणें वागूं लागतात आणि शेवटीं तें राज्य लवकरच नष्ट होऊन जातें. राजा स्वधर्मनिष्ठ असला म्हणजे लोक त्याचेंच अनुकरण करितात आणि तो कुमार्गानें जाऊं लागला म्हणजे त्याचे स्वजनांना सुद्धां तें वर्तन सहन होत नाहीं. जो राजा साहसी असतो व ज्याच्या अंगचीं सर्व लक्षणें शास्त्रविरुद्ध असतात, त्याच्या हातून एखादें भयंकर कृत्य होऊन त्याचा शीघ्र विनाश होतो. पूर्वीं होऊन गेलेल्या श्रेष्ठांनीं, मग ते जित असोत किंवा अजित असोत, घालून दिलेल्या मार्गानें जो क्षत्रिय जात नाहीं, तो क्षत्रियधर्मापासून भ्रष्ट होतो. त्याचप्रमाणें पूर्वीं आपलें कल्याण करणारा असा शत्रु रणांत हातीं लागला असतां जो द्वेषामुळें त्याचा मान करीत नाहीं, तोहि क्षत्रियधर्मापासून च्युत होतो.

जो राजा चांगल्या स्थितींत असतां सर्व सुखोपभोगांत मग्न असतो, परंतु आपत्ति प्राप्त झाली असतां तिचें निवारण करण्यास चुकत नाहीं, तो सर्व लोकांना प्रिय होतो आणि त्याच्या संपत्तीचाहि नाश होत नाहीं. कोणीं आपलें अप्रिय केलें असतां त्यावर अपकार न करितां उपकार करावा. जो अप्रियाच्या ठिकाणीं प्रिय आचरण करितो, तो सत्वर सर्वांस प्रिय होतो. राजानें असत्य भाषण सोडून द्यावें आणि कोणीं याचना केल्याशिवाय त्याचें प्रिय करावें. कामामुळें, क्रोधामुळें किंवा द्वेषभावामुळें धर्माचा त्याग करूं नये. कोणीं कांहीं प्रश्न केला असतां त्याला उत्तर देण्याला लाजूं नये. अप्रगल्भ भाषण करूं नये. कोणत्याहि कामीं त्वरा नसावी. कोणाचाहि हेवा करूं नये. असें केलें असतां लोक सहजच वश होतात. आपल्या मनासारखी गोष्ट झाली असतां तीबद्दल अत्यंत हर्षित होऊं नये किंवा अप्रिय झालें तरीहि कधीं वाईट वाटून घेऊं नये. एखाद्या वेळीं द्रव्यासंबंधीं नुकसान झालें तरी

प्रजाहिताकडे लक्ष्य देऊन दुःख करीत बसूं नये. जो राजा स्वभावतःच दुसऱ्यांचें प्रिय करतो, त्याचीं सर्व कार्यें सिद्धीला जातात आणि त्याची संपत्तिहि त्याचा कधीं त्याग करीत नाहीं. जो आपल्या विरुद्ध गोष्टींत सर्वदा निवृत्त राहून आपल्या प्रिय गोष्टींत अनुकूलतेनें असतो, अशा आपल्यावर भक्ति ठेवणाऱ्या मनुष्याला राजानें नेहमीं आपल्या आश्रयास ठेवावें. जो अत्यंत इंद्रियनिग्रही असून राजाशीं अनुकूलतेनें वागणारा, शुचिर्भूत, शक्त आणि प्रजांवर सर्वदा प्रेम करणारा असेल, त्यालाच राजानें महत्पदावर योजावें. ह्या गुणांनीं युक्त असूनहि जो राजावर अत्यंत प्रेम ठेऊन त्याच्या द्रव्यसंबंधी कार्याकडे दक्षतेनें वागणारा असेल, त्याला राजानें द्रव्याधिकारी करावें.

जो मूर्ख, विषयासक्त, लुब्ध, दुराचरणी, शठ, कपटी, हिंस्र वृत्तीचा, दुर्बुद्धि, बहुश्रुत नसलेला, औदार्यरहित, मद्यासक्त, द्यूत, स्त्रिया आणि मृगया यांमध्यें सर्वदा आसक्त असतो, अशाला महापदावर योजणारा राजा वैभवाला मुकतो. जो राजा स्वतःचें रक्षण करून रक्षणास योग्य अशा दुसऱ्यांचेंहि रक्षण करितो, त्याच्या प्रजांची अभिवृद्धि होऊन त्याला मोठ्या पदाची प्राप्ति होते. आपले हितकर्ते आणि स्वकीय यांस व इतरांसहि अविदित अशा गुप्त हेरांकडून इतर राजांवर जो नजर ठेवतो, तो राजा सर्वांत श्रेष्ठत्व पावतो. बलिष्ठ शत्रूला अपकार केल्यावर आपण दूर आहों, अशा समजुतीनें राजानें कधींहि स्वस्थ बसूं नये. कारण, किंचित् दुर्लक्ष्य झाल्याचें पाहून ते शत्रु एकदम ससाण्यासारखे त्याजवर धांवून येतात. ज्याच्या राज्याचा पाया दृढ आहे व जो मनाचा दुष्ट नाहीं, अशा राजानें आपल्या बलाचा विचार करून बलहीन राजांवर चालून जावें. आपल्याहून बलवत्तरांवर चालून जाऊं नये. विक्रमानें पृथ्वी संपादून प्रजेचें न्यायानें पालन करावें. जो धर्मपरायण राजा असेल, त्यानें रणावरच मरण पावावें, हें चांगलें. येथें जें जें कांहीं आहे, त्याला मरण हें अंतीं लागलेलें आहे. अविनाशी असें कांहीं नाहीं. म्हणून राजानें धर्मनिष्ठ राहून न्यायानें प्रजापालन करावें.

राज्याचें सुरक्षण, युद्धाची तयारी, न्यायानें राज्य चालविणें, गुप्त विचार करणें आणि प्रजेला सुख देणें, ह्या पांच गोष्टींनीं राज्याची अभिवृद्धि होत असते. ह्या पांच गोष्टी ज्या राजाकडे गुप्तपणें चालतात, तोच सर्व राजांत श्रेष्ठ होय. ज्याच्या राज्यांत वरील गोष्टी उत्तम प्रकारें चालतात, तोच राजा

ह्या पृथ्वीचा उपभोग घेतो. ह्या सर्व गोष्टींवर एकालाच नजर ठेवतां येणें शक्य नसल्यामुळें दुर्गाधिकारीप्रभृतींकडे त्या सोंपवाव्या. असें केल्यानें राजाला चिरकाल पृथ्वीचा उपभोग घेतां येतो. जो दानशील, आपल्या वैभवांत सर्वांचा विभाग आहे असें समजून त्यांसह त्याचा उपभोग घेणारा, दयालु, शुद्धाचरणी आणि कोणाचा कधींहि त्याग न करणारा असा असेल, त्यालाच लोक राजा करितात. जो आपलें स्वतःचें मत सोडून दुसऱ्यांचे कल्याणकारक विचार ऐकून त्यांप्रमाणें वर्तन ठेवितो, त्यालाच लोक अनुकूल होतात. जो मित्रानें सांगितलेली लाभदायक गोष्ट आपल्या मताच्या उलट असल्यामुळें सहन करीत नाहीं आणि प्रतिकूल गोष्टी ऐकून सदोदित खिन्न होऊन राहतो, जो सज्जनांप्रमाणें कधींहि वागत नाहीं, तो राजा क्षात्रधर्मापासून च्युत होतो.

शिक्षा केलेला अमात्य, तसेंच विशेषेंकरून स्त्रिया, पर्वत, विषम दुर्गप्रदेश, गज, अश्व आणि सर्प यांपासून राजानें आपलें संरक्षण करावें. जो राजा आपल्या मुख्य मंत्र्यांना सोडून हलक्यांवर प्रेम करितो, तो संकटकाल प्राप्त झाला असतां त्यांतून पार पडत नाहीं. जो चंचल मनाचा राजा मनश्चांचल्यामुळें, द्वेषानें किंवा क्रोधानें आपल्या कल्याणेच्छु ज्ञातिजनांचें चांगलें पाहत नाहीं, तो मृत्यूच्या अगदीं संनिध वास करीत असतो, असें समजावें, जो आपल्याला प्रिय असलेल्यांना आणि गुणवान् लोकांना त्यांचें प्रिय करून आपलेंसें करून घेतो, त्याला चिरकाल कीर्ति प्राप्त होते. अकालीं प्रजेकडून कररूपानें द्रव्य घेऊं नये. आपलें अप्रिय झालें असतां त्याबद्दल खेद करूं नये व प्रिय झाल्याबद्दलहि अति हर्ष मानूं नये. नित्य आरोग्यकारक कर्में करण्यांत आसक्त असावें. आपल्यावर कोणते राजे अनुरक्त आहेत व भयानें आपला आश्रय कोणीं घेतला आहे, ह्याचें राजानें नित्य चिंतन करीत असावें. बलवान् राजानें दुर्बलांवर विश्वास ठेवून कधींहि राहूं नये. कारण भारुंड पक्ष्याप्रमाणें हे दुर्बल लोक राजा बेसावध आहे असें पाहून त्यावर एकाएकीं तुटून पडतात. राजा सर्वगुणसंपन्न व प्रिय भाषण करणारा असला, तरी पापी लोक त्याचा द्रोह करितात. म्हणून राजानें कोणावरहि कधीं विश्वास ठेवून राहूं नये. हें राजाचें रहस्य नहुषपुत्र ययातीनें सांगितलें आहे. मनुष्यांविषयीं सावधगिरी घेऊन वागणारा राजा असेल, तरच तो मोठमोठ्या शत्रूंचा नाश सहज करूं शकेल. १२. १. ९३.

---

## अध्याय ९४ वा.

[ १ युधिष्ठिराला भीष्माकडून वामदेवानें सांगितलेल्या राजधर्मांचें कथन. ]

( १ ) **वामदेव**—हे नराधिपा, राजानें युद्धावांचून आपला जय साधून घ्यावा. कारण युद्धानें मिळविलेला जय कमी प्रतीचा समजला आहे. मूळ जर बळकट नसेल, तर त्यांत नवीन भर मिळवून घालण्याचा प्रयत्न कोणीं करूं नये. पाया जर बळकट नसेल, तर नवीन राज्यापासून राजाला कोणताच लाभ होणार नाहीं. ज्याचा देश मोठा ऐश्वर्यसंपन्न आहे, ज्यांतील लोक संपन्न असून राजभक्त आहेत, जो स्वतः संतुष्ट राहून सचिवांचें उत्तम रीतीनें पोषण करितो, त्याचींच मूळें कायम झालीं आहेत, असें समजावें. ज्याचे योद्धे अत्यंत संतुष्ट, ज्यांना राजानें खुषींत ठेविलें आहे, जे शत्रुवंचनेमध्यें अत्यंत निष्णात आहेत, अशा राजाला लहानशा सैन्याच्या योगानें सुद्धां पृथ्वी जिंकितां येते. ज्याच्या नगरांतील व राष्ट्रांतील लोक प्राणिमात्रावर दया करणारे, सधन आणि धान्यसंपन्न असतात, तो राजा दृढमूल समजावा. ज्यावेळीं आपला पराक्रमकाल अगदीं जवळ आला आहे, असें राजाला वाटेल, तेव्हां त्या बुद्धिमान् राजानें परभूमि आणि परधन मिळविण्याच्या प्रयत्नाला लागावें. ज्याचें वैभव वाढत असून ज्याची सर्व प्राण्यांवर दया असते, त्याचप्रमाणें स्वतःच्या संरक्षणाविषयीं जो नित्य सावध असतो, अशा राजाच्या राज्याची वाढ त्वरित होते. स्वजन आपल्याशीं उत्तम रीतीनें वागत असतां त्यांशीं जो कपटानें वर्तन ठेवितो, तो परशूनें तोडून टाकिलेल्या वनाप्रमाणें आपलाच घात करून घेतो. राजानें शत्रूंचा सदोदित वध करीत असावें, अशाशिवाय ते कधीं कमी होत नसतात. क्रोधाचा नाश कसा करावा, हें ज्याला ठाऊक आहे, त्याला कोणीच शत्रु नसतो. आर्यजन ज्याचा नित्य तिरस्कार करतात, असलें कृत्य शहाण्या राजानें कधीं करूं नये. जें कृत्य कल्याणकारक आहे, असें मनाला वाटत असेल, तेंच त्यानें करण्याचा प्रयत्न करावा. आपण आरंभिलेलें कार्य उत्तम रीतीनें संपवून जो राजा सुखाचा अनुभव घेण्याची इच्छा करितो, त्याचा दुसरे कधीं अपमान करीत नाहींत किंवा त्याला स्वतःहि दुःख करण्याचा प्रसंग येत नाहीं. याप्रमाणें जो राजा आपलें वर्तन ठेवितो, तो इह-परलोकीं विजयी होतो.

**भीष्म**—याप्रकारें वामदेवाचें भाषण ऐकून राजानें त्याच्या म्हणण्याप्रमाणें सर्व केलें. तूंहि तसेंच कर. तसें केल्यानें तुलाहि निःसंशय इह-परलोकांची प्राप्ति होईल. १२. १. ९४.

---

## अध्याय ९५ वा.

[ १ युधिष्ठिराला युद्धधर्मकथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—पितामहा, जेव्हां एकाद्या क्षत्रियाला युद्धामध्यें अन्य क्षत्रियावर जय मिळविण्याची इच्छा होईल, तेव्हां आपला विजय होण्याकरितां त्यानें कोणत्या प्रकारचें वर्तन ठेवावें, हें मला सांग.

भीष्म—शत्रु जिंकल्यावर राजानें आपली साहाय्यकारी सेना बरोबर घेऊन किंवा एकट्यानेंच त्याच्या राष्ट्रामध्यें जावें आणि म्हणावें, 'मी तुमचा राजा आहें, मी तुमचें सदोदित रक्षण करीन, मला योग्य कर द्या आणि माझ्या आश्रयाखालीं रहा.' त्या लोकांनीं राजा म्हणून त्याचा स्वीकार केल्यास उत्तमच आहे, परंतु ते जर त्याच्या विरुद्ध उठतील, तर राजानें त्या विरोधकांचा वाटेल त्या उपायानें निग्रह करावा. अत्यंत मानी परंतु आत्मत्राणाविषयीं असमर्थ असा क्षत्रिय निःशस्त्र आहे, असें पाहून दुसरा कोणीहि मनुष्य त्याजवर शस्त्र उचलील.

युधिष्ठिर—हे पितामहा, आतां कोणी क्षत्रिय दुसऱ्या क्षत्रियावर चालून आला तर त्यानें कशा प्रकारें युद्ध करावें, तें मला सांग.

भीष्म—क्षत्रियांनीं कवच घातल्याशिवाय केव्हांहि युद्धाला जाऊं नये. युद्धकालींहि 'तूं बाण सोड आणि मीहि तुजवर बाण टाकितों' असें परस्परांनीं परस्परांना सांगावें. तो सज्ज होऊन आला तर आपणहि युद्धाला सज्ज व्हावें. तो जर ससैन्य आला, तर आपणहि ससैन्य होऊन त्याला युद्धार्थ आह्वान करावें. त्यानें कपटानें युद्धास आरंभ केल्यास आपणहि कपटाचा अवलंब करावा. तो धर्मानें युद्ध करूं लागल्यास आपणहि धर्मानेंच युद्ध करून त्याचें निवारण करावें. अश्वावर बसून रथ्याशीं कधींहि युद्ध करूं नये, तर रथ्यानेंच रथ्यावर चालून जावें. कोणी संकटांत असतां त्याजवर प्रहार करूं नये, त्याचप्रमाणें भयग्रस्त किंवा युद्धजित झालेल्या मनुष्यावरहि शस्त्रप्रहार करणें योग्य नव्हे. बाणास विषाचें पाणी दिलेल्या अशा कर्णी बाणांची–त्रिशूलाकार बाणांची–योजना कधीं करूं नये. हें दुष्टांचें आयुध आहे. युद्ध न्यायानें करावें. प्रहार करणाऱ्यावर कधीं क्रोध करूं नये. फूट पडून एखाद्या वीराला कोणी साहाय्यकर्ता नाहींसा होऊन तो व्यसनाधीन झाला असेल आणि तो जर शक्तिहीन, अपत्यरहित, भग्नशस्त्र, विपन्न, प्रत्यंचा तुटून अश्व हत होऊन गेलेले असा असेल, तर

त्याला आपल्या नगरामध्यें आणवून त्याची वैद्याकडून व्यवस्था ठेवावी, अथवा त्याला आपल्या गृहीं नेऊन पोंचवावें. वीराला क्षतरहित करून सोडून देणें हा सनातन धर्म होय. सर्वदा धर्मानेंच युद्ध करावें, असें मनूनें सांगितलें आहे.

सत्पुरुषाच्या ठिकाणीं सद्धर्म वास करीत असतो. त्याचा आश्रय करून आपण कोणाचाहि नाश करूं नये. जो अधर्मानें युद्ध करून शत्रूवर जय मिळवितो, तो कपटी, दुष्ट, आपल्या हातूनच आपला नाश करून घेतो. हें कृत्य म्हणजे केवळ दुष्टाचेंच होय. दुष्टांना देखील धर्ममार्गानेंच जिंकावें. धर्मानें वागून मृत्यु आलेला चांगला, परंतु पापकर्मानें मिळविलेला जय बरा नाहीं. हे राजा, आचरिलेलें अधर्मकृत्य गाईप्रमाणें जरी तत्काल फल देत नसलें, तरी तें मूळें आणि फांद्या यांना दग्ध करून अखेर त्या पाप-कर्त्यालाहि गांठतें. पापी मनुष्य पापी कर्मावर द्रव्य मिळवून अत्यंत आनंदित होतो. पुढें त्या पापकर्मामध्येंच आसक्त होऊन जसजसा तो वैभवास चढतो, तसतसें जगांत धर्मच नाहीं, असें त्याला वाटतें आणि तो शुचिर्भूत लोकांचा उपहास करितो. शेवटीं वरुणाच्या पाशांत बद्ध होऊन नाश पावतो. तो शेवटपर्यंत आपणाला अमर समजतो. तो मोठ्या बुधल्याप्रमाणें सर्वदा फुगलेला राहून पुण्यकर्माकडे त्याची प्रवृत्ति कधीं होत नाहीं. पुढें नदीच्या कांठावरील वृक्ष जसा जलप्रवाहानें समूळ नाश पावतो, त्याप्रमाणें त्याचाहि नाश होतो. नंतर दगडावर आपटून भिन्न झालेल्या कुंभाप्रमाणें लोक त्याची निंदा करितात. म्हणूनच धर्माला अनुसरून सर्वदा विजय आणि कोश मिळविण्याचा राजानें यत्न करावा. १२. १. ९५.

---

## अध्याय ९६ वा.

[ भीष्माकडून युधिष्ठिराला राजधर्मकथन. ]

( १ ) भीष्म—राजानें अधर्मानें पृथ्वी जिंकून घेण्याची कधींहि इच्छा करूं नये. अधर्मानें जय मिळाल्यावरून कोणत्या राजाला खरा आनंद होणार आहे? कारण अधर्मानें मिळविलेला विजय अध्रुव असून स्वर्गप्राप्तीस प्रतिबंधक असतो. हे भरतर्षभा, तो राजा व पृथ्वी या दोघांच्याहि नाशाला कारण होत असतो. ज्याचें कवच भिन्न झालें आहे, जो शरण आला आहे, ज्यानें हात जोडून शस्त्र खालीं ठेविलें आहे, अशा शत्रूला धरून ठेवावें, पण त्याचा वध करूं नये. ज्याला

आपल्या पराक्रमानें जिंकलें असेल, त्याच्याशीं राजानें युद्ध करीत राहूं नये. एक वर्षपर्यंत त्याच्याशीं युद्ध न करितां 'मी तुमचा दास आहें' असें त्याजकडून म्हणवून घ्यावें व असें तो नच म्हणेल तर वर्षानंतर त्याचा पुनर्जन्म झाला, असें समजून सोडून द्यावें. युद्धांत पराक्रमानें हरण करून आणलेल्या कन्येला 'आपल्याशीं किंवा दुसऱ्या कोणाशीं विवाहबद्ध होण्याची तुझी इच्छा आहे काय,' असें विचारावें व तशी तिची इच्छा नसल्यास वर्षानंतर तिला परत पाठवावें. तसेंच दासदासी, धन इत्यादि जें कांहीं बलात्कारानें हरण करून आणलें असेल, तें वर्षानंतर ज्याचें त्यास परत करावें. वध्य मनुष्याचें द्रव्य राजानें स्वतः करितां कधीं घेऊं नये. त्याच्या गाई असतील, तर दुधाकरितां त्या ब्राह्मणांना द्याव्या आणि बैल असतील तर ते कामाला लावावे. प्रसंगविशेषीं त्या वध्य पुरुषाला सोडूनहि द्यावें.

राजानें राजाशींच युद्ध करावें. कारण, शास्त्रानेंच हा धर्म म्हणून सांगितलेला आहे. जो राजा नाहीं, अशानें राजावर कधींहि चालून जाऊं नये. दोन सैन्यांमध्यें युद्धप्रसंग प्राप्त होऊन तीं परस्परांशीं युद्धार्थ भिडलीं असतां दोहोंमध्यें संधि करून देण्याच्या इच्छेनें कोणी ब्राह्मण आला असतां युद्ध बंद करावें. जो कोणी ब्राह्मणाच्या वचनाचें उल्लंघन करील, तो पुरातन मर्यादेचा भंग करणारा होय. इतकें असून एखाद्या क्षत्रियाधमानें ब्राह्मणवचनाचा अनादर केला, तर त्याला जातिबाह्य करावें आणि त्याला सभेमधून दूर करावें. तो मर्यादेचा भंग करणारा म्हणजे धर्माचा लोप करणारा आहे. विजिगीषु राजानें अशा प्रकारचें वर्तन कधींहि ठेवूं नये. धर्मानें मिळविलेल्या विजयापेक्षां अधिक मोठा असा दुसरा लाभ कोणता आहे ? युद्धांत जिंकलेल्या अनार्य लोकांस गोड भाषणानें आणि भोग्य वस्तूंच्या दानानें शांत करावें, ही राजांची उत्कृष्ट नीति आहे. त्यांच्यांशीं गोडीनें न वागल्यास आपल्या राज्यास कंटाळून ते आपले शत्रु होतील आणि आपल्यावर संकट केव्हां येईल, अशी वाट पाहत राहतील व संधि येतांच शत्रूला जाऊन मिळतील. आपल्या संकटप्रसंगीं ते शत्रूंला साहाय्यक होतील. हे राजा, अशा रीतीनें राजाच्या संकटाची इच्छा करणारे ते संतुष्ट होतील.

शत्रूला कपटानें फसवूं नये व त्यावर केव्हांहि मोठा प्रहार करूं नये. असें केल्यानें कदाचित् तो प्राणत्यागहि करील. एखाद्या राजाजवळ अल्पसंपत्ति असली, तरी तिच्या योगानें तो संतुष्ट असतो आणि शुद्ध जीवित हें अत्यंत

मानास्पद आहे असें समजतो. ज्याचें राष्ट्र मोठें विस्तृत व संपन्न असून ज्यांतील लोक राजावर प्रेम करणारे असतात, ज्याचे सेवक आणि अमात्य सर्वदा संतुष्ट असतात, तो राजा दृढमूल होय, असें समजावें. ऋत्विज, पुरोहित, आचार्य आणि दुसरे ज्ञानवान् लोक अशा पूज्यांचाहि जो नित्य सत्कार करितो, त्याला लोकवेत्ता असें म्हणतात. अशाच प्रकारचें वर्तन ठेवल्यानें देवश्रेष्ठ इंद्राला इंद्रपदाची प्राप्ति झाली व दुसरेहि कित्येक राजे इंद्रपदाला गेले.

हे राजा, प्रतर्दन नामक राजानें मोठा संग्राम करून शत्रूकडून भूमि खेरीज करून त्याची सर्व संपत्ति, अन्न आणि ओषधि हीं जिंकून घेतलीं, परंतु त्याचें पाप त्याला लागलें नाहीं. दिवोदास राजानें अग्निहोत्राचा अग्नि, हविर्द्रव्यें आणि सिद्धान्न हें शत्रूकडून हरण केलें. हे पदार्थ हरण करूं नयेत, असें शास्त्र असल्यामुळें त्याचें त्याला पाप लागलें. तसेंच नाभाग राजानें शत्रूला जिंकून श्रोत्रिय आणि तापसी यांच्या द्रव्याखेरीज इतर सर्व द्रव्य–राजासकट राष्ट्रसुद्धां दक्षिणारूपानें अर्पण केलीं. युधिष्ठिरा, पूर्वींच्या धर्मज्ञ राजांनीं याप्रमाणें श्रेष्ठ-कनिष्ठ अशा दोनी प्रकारचीं द्रव्यें शत्रूंकडून जिंकून घेतलेलीं होतीं, ही गोष्ट मला मान्य आहे. युद्धकलेला सर्व विद्यांत श्रेष्ठ समजून विजय संपादन करण्याची इच्छा प्रत्येक राजानें करावी. परंतु माया किंवा दंभ या योगानें वैभवाला चढण्याची इच्छा मात्र कोणीं कधीं करूं नये. १२. १. ९६.

---

## अध्याय ९७ वा

[ युधिष्ठिराला भीष्माकडून सयुक्तिक युद्धधर्मकथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे नराधिपा, क्षात्रधर्माहून अत्यंत पापी असा दुसरा कोणताच धर्म नाहीं. शत्रूवर चाल करून गेला असतां अथवा युद्धप्रसंगीं राजा मोठमोठ्या माणसांचा वध करितो. तेव्हां उत्तम लोकांची प्राप्ति होण्याकरितां राजानें कोणतें कर्म करणें अवश्य आहे, तें जाणण्याची मला मोठी इच्छा आहे, तर हे भरतर्षभा, तें तूं मला सांग.

**भीष्म**—पापी लोकांचा निग्रह करून, सज्जनांचा संग्रह करून, तसेंच यज्ञ आणि दान यांच्या योगानें राजे शुचिर्भूत आणि निर्मल होतात. विजयेच्छेनें राजे लोक प्रजेला पीडा करितात, परंतु विजय संपादन केल्यावर तेच तिला

वैभवाला चढवितात. प्रजेच्या कल्याणार्थ दान, यज्ञ आणि तप यांच्या योगानें पातकाचा नाश करितात आणि प्राणिमात्रावर अनुग्रह करून आपल्या पुण्याची अभिवृद्धि करितात. ज्याप्रमाणें शेतकरी शेत तयार झालें असतां शेतांतील गवत व इतरहि कांहीं धान्य उपटून टाकितो, परंतु त्यामुळें धान्याची किमपिहि हानि न होतां उलट त्याची वाढ होते, त्याप्रमाणें युद्धांत क्षत्रिय वीर शस्त्रें टाकून अनेकांचा वध करितात, परंतु युद्धसमाप्तीनंतर पुनः त्या प्रजेचा उत्कर्ष केल्यानें त्या पातकाची निष्कृति होते.

जो राजा धनापहार, वध, क्लेश आणि चोर यांपासून प्रजेचें रक्षण करितो, तो प्रजेला अत्यंत सुखदायक वाटतो. त्याला सर्व यज्ञ केल्याचें फल लाभतें. अभयप्रदान ही त्या यज्ञांतील दक्षिणा होय. तो इहलोकीं सर्व सुखांचा अनुभव घेऊन शेवटीं इंद्रलोकाला जातो. जो राजा ब्राह्मणांसाठीं युद्ध करण्याचा प्रसंग आला असतां आत्मरूपी यूप उभारतो आणि शत्रूंशीं युद्ध करितो, त्याला अनंतदक्षिण यज्ञ केल्याचें फळ मिळतें. शत्रूचे बाण सोसून त्यावर चारी बाजूंनीं शर सोडून त्याला जो व्याप्त करून सोडतो, अशाहून दुसरें कांहीं श्रेष्ठ कृत्य या जगतांत आहे, असें देवांना सुद्धां वाटत नाहीं. रणांगणावर जितक्या शस्त्रांचा त्याच्या शरीरावर प्रहार होऊन त्याच्या त्वचेचा भेद झाला असेल, तितके सर्वकामप्रद आणि अक्षय्य लोक त्याला मिळतात. संग्रामभूमीवर त्याच्या शरीरांतून जें रक्त वाहत असतें, त्या स्रावाच्या योगानें त्याचीं सर्व पातकें धुवून जातात. युद्धामध्यें शत्रूकडून ताप पावून क्षत्रियाला जीं दुःखें सहन करावीं लागतात, त्यांच्या योगानें त्याच्या तपाची वृद्धि होते, असें धर्मवेत्ते लोकांचें मत आहे. मनुष्य ज्याप्रमाणें पर्जन्यापासून उदकाची इच्छा करितो, त्याप्रमाणें भीरु धार्मिक लोक शूरापासून आपल्या संरक्षणाची इच्छा करितात. अशा प्रसंगीं त्या भीरु लोकांना युद्धाच्या तोंडीं न देतां जर त्यांचें रक्षण केलें, तर त्या शूराला मोठें पुण्य लागेल. कदाचित् ते भित्रे लोक त्या शूर पुरुषाचे पूर्व उपकार स्मरून त्याला प्रणाम करून न्याय्य युद्ध स्वतःच करतील, व त्याचें साहाय्य घेणार नाहींत, तरी सुद्धां त्या क्षत्रियाला तें कर्म पुण्यप्रद होणार नाहीं.

समान दिसणाऱ्या पुरुषांमध्यें मोठें अंतर दृष्टोपत्तीस येतें. रणांगणावर परस्पर सैन्यें एकत्र भिडलीं असतां शूर असतात ते स्वर्गप्राप्त्यर्थ शत्रूवर तुटून पडतात आणि भीरु पुरुष आपल्या साहाय्यकर्त्यांना संकटांत टाकून पलायन करितात. संग्रामामध्यें आपल्या साहाय्यकर्त्यांना सोडून ते नीच पुरुष आपल्या

गृहाकडे पळून जातात. असे लोक कधीं निपजूं नयेत. इंद्रादिक देव अशा लोकांचें कल्याण कधीं करीत नसतात. आपल्या साहाय्यकांचा त्याग करून आपले प्राणांचें संरक्षण करूं इच्छितो, त्याचा काठ्यांनीं अथवा मातीच्या ढेंकळांनीं वध करावा किंवा त्याला गवतांत गुंडाळून जाळून टाकावें किंवा पशूप्रमाणें बडवून मारावें. कफ-मूत्रांचा त्याग करीत आणि दीनाप्रमाणें रडत अंथरुणावर पडून मरणें हा क्षत्रियाचा धर्म नव्हे. शस्त्रप्रहारानें शरीर क्षत न होतां क्षत्रियास मृत्यु आला असतां त्याचें तें कृत्य प्रशंसनीय गणलें जात नाहीं. युधिष्ठिरा, गृहामध्यें मरण येणें हें क्षत्रियाला कधीं प्रशस्त वाटत नाहीं. असलें कृत्य शूरांना शौर्याचें वाटत नसून अधर्माचें आणि अत्यंत दीनपणाचें वाटतें. 'हें दुःख अत्यंत कष्टप्रद, अति दुःखकारक आणि फार पापदायक आहे' असें तो दीनपणानें ओरडेल, पुत्रादिकांना रडवील, त्याच्या मुखाला दुर्गंधि सुटेल; परंतु तशा स्थितींतहि आपणाला निरोगी स्थिति प्राप्त व्हावी आणि आपण युद्ध करून मरावें, अशीच तो इच्छा करील. वीर, अभिमानी आणि थोर मनाच्या पुरुषाला असा मृत्यु येणें कधींहि इष्ट नसतें. रणामध्यें आपल्या ज्ञातिजनांसह घोर युद्ध करून त्यांत तीक्ष्ण शस्त्रप्रहारांनीं विद्ध होऊन मरण पावणें, हें क्षत्रियाला योग्य आहे. जो शूर असतो तो क्रोध आणि आवेश यांनीं युक्त होऊन निकरानें युद्ध करितो, तेव्हां शत्रूनें केलेले शस्त्रप्रहार देखील त्याला कळत नाहींसे होतात. तो युद्धांत मरण पावून व लोकपूजित आणि प्रशस्त स्वधर्म मिळवून इंद्रलोकाला जातो. तसेंच रणाग्रभागीं उभा राहून सर्वोपायांनीं शत्रूशीं युद्ध करणारा आणि त्याला पाठ न दाखवितां प्रसंगीं प्राणहि सोडणारा शूर पुरुष इंद्रलोक मिळवितो. जेथें शत्रूंनीं वेष्टित होऊन पुरुष दैन्य न दाखवितां वध पावतो, तेथेंच त्याला अक्षय्य लोकांची प्राप्ति होते. १२. १. ९७.

---

## अध्याय ९८ वा.

[ १ सुदेवानें रणयज्ञ करून इंद्रलोकाची प्राप्ति कशी करून घेतली, तद्विषयक इंद्र आणि अंबरीष यांमधील संवाद भीष्म युधिष्ठिराला सांगतो. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, युद्ध करीत असतां मागें न फिरतां जे शूर रणांत मृत्यु पावतात, त्यांना कोणते लोक प्राप्त होतात, तें मला सांग.

**भीष्म**—युधिष्ठिरा, ह्यासंबंधीं अंबरीष आणि इंद्र यामध्यें झालेला पुरातन

संवाद लोक सांगत असतात, तो ऐक. नाभागपुत्र अंबरीष हा दुर्लभ स्वर्गाला गेला असतां, तेथें इंद्रासह आपल्या सचिवाचें दर्शन त्याला झालें. सर्वतेजोमय अशा दिव्य विमानांत बसून आपला सेनापति वर चालला आहे, असें पाहून अंबरीषाला त्याच्या वैभवाचें आश्चर्य वाटलें आणि तो इंद्राला म्हणाला—

अंबरीष—या सागरान्त सर्व पृथ्वीचें यथाविधि पालन करून धर्मबुद्धीनें चातुर्वर्ण्याशींहि मीं यथाशास्त्र वर्तन ठेवलें. कडक ब्रह्मचर्य, सदाचरण, गुरुशुश्रूषा, वेदाध्ययन आणि राजशास्त्र यांचें धर्मबुद्धीनें मीं पालन केलें आहे, अतिथींना अन्नपानानें, पितरांना श्राद्धादिकांनीं, ऋषींना वेदाध्ययनानें व देवांना उत्तम प्रकारच्या यज्ञांनीं मीं तृप्त केलें आहे. क्षात्रधर्माप्रमाणें वागून मी यथाशास्त्र शत्रूंशीं युद्ध करून त्यांचा पराजय केला आहे. देवराज इंद्रा, हा सुदेव पूर्वी माझा सेनापति असून तो एक शांतिसंपन्न योद्धा होता. असें असतां येथें त्याचें मजपेक्षां श्रेष्ठत्व कां व्हावें ? यानें कोणत्याहि प्रकारचे यज्ञ केले नाहींत किंवा ब्राह्मणांनाहि तृप्त केलें नाहीं. तेव्हां माझ्यापेक्षां ह्याचा अधिक उत्कर्ष व्हावा हें कसें ?

इंद्र—बाबा अंबरीषा, या सुदेवानें मोठा रणयज्ञ केला आहे. दुसरेहि जे कोणी अंगांत कवच घालून व सैन्याच्या अघाडीला उभे राहून युद्ध करितात, त्यांना या रणयज्ञाचा अधिकार पोंचतो.

अंबरीष—इंद्रा, या यज्ञामध्यें होमद्रव्यें कोणतीं, आज्य कोणतें, दक्षिणा कोणती आणि ऋत्विज कोणते, तें मला सांग.

इंद्र—या रणयज्ञांतील गज ऋत्विज व अश्व हे अध्वर्यु होत. शत्रूचें मांस हें हवि व रुधिर हें आज्य होय. शृगाल, गृध्र आणि डोमकावळे हे पक्षी सदस्य होत. हे आज्यशेषाचें प्राशन करून हवि भक्षण करितात. प्रास, तोमर तीक्ष्ण तलवारी, शक्ति आणि परशु ह्या याज्ञिकांच्या हातांतील स्रुचा होत. धनुष्यांपासून वेगानें सुटणारा, तीक्ष्ण व शत्रूचे शरीराचा भेद करून जाणारा बाण तो स्रुवा होय. व्याघ्रचर्मानें वेष्टित, हस्तिदंती मूठ असलेला, गजसोंड उतरून काढणारा खड्ग हीच त्या रणयज्ञांतील स्फ्य होय. लखलखित व तीक्ष्ण प्रास, शक्ति, ऋष्टि आणि परशु अशीं जीं लोहमय शस्त्रें, त्यांनीं केलेले आघात हें वसुनामक द्रव्य होय. रणामध्यें शत्रूचे प्रहार घेऊन व त्याजवर प्रहार करून वाहणारी जी मोठी रक्तधार तीच ह्या रणहोमांतील सर्व कामना पूर्ण करणारी समृद्ध पूर्णा-

हुति होय. 'कापा, तोडा,' असे जे शब्द सैनिकांच्या तोंडून निघत असतात, तींच या रणयज्ञांत यमसदनामध्यें बसून सामवेद्यांनीं गाइलेलीं सामें होत. शत्रुसैन्याची अघाडी हेंच येथील हविर्धान–हवि ठेवण्याची जागा–होय. गज, हय आणि कवचधारी योद्धे यांचा समुदाय तो या रणयज्ञांतील श्येनचित् नांवाचा अग्नि होय. सहस्रावधि वीरांचा संहार होऊन संग्रामामध्यें जीं त्यांचीं धडें उठतात, तोच खदिरकाष्ठांचा अष्टपैलू यज्ञस्तंभ होय.

हे पृथ्वीपते, अंकुशानें टोंचल्यामुळें चींचीं करणारे गज हेच ईडामंत्र म्हणणारे ब्राह्मण असून वीरांचा हस्ततलध्वनि हाच तेथील वषट्कार होय. त्या युद्धयज्ञामध्यें दुंदुभि हा त्रिसामा व उद्गाता होय. ब्रह्मस्व हरण केलें जात असतां युद्धामध्यें जो त्याच्या रक्षणाकरितां आपल्या प्रिय शरीराचा त्याग करितो, त्याला अनंतदक्षिणायुक्त यज्ञ केल्याचें फल मिळतें. जो शूर वीर आपल्या स्वामिकार्यासाठीं रणाग्रभागीं उभा राहून पराक्रम गाजवितो, भयानें मागें परतत नाहीं, तसेंच ज्याचा नीलचर्मानें आच्छादिलेला खड्ग आणि ज्याचे परिघतुल्य बाहू ह्यांच्या योगानें रणवेदी सर्वदा व्याप्त असते, जो रणामध्यें उभा राहिला असतां कोणाच्याहि साहाय्याची अपेक्षा करीत नाहीं, त्याला माझ्या लोकासारखे लोक मिळतात. जेथें रक्ताची नदी वाहत असून तिचा प्रवाह सारखा चालला आहे, दुंदुभि हेच ज्यांतील बेडूक व कांसव आहेत, वीरास्थि ज्यांतील कठीण दगड आहेत, मांस आणि शोणित हा ज्यांमधील चिखल आहे, खड्ग आणि ढाली हीं ज्या नदींतील होडगीं आहेत, मृत वीरांचे केंस हे जींतील शेवाळ आणि गवत आहेत, अश्व, गज हे जेथें छिन्न होऊन ज्यांचा त्या नदीवर सेतु झाला आहे, पताका आणि ध्वज हे जीमधील वेत आहेत, मेलेले गज हे जेथील मकर आहेत, रक्तोदकानें जी सदा भरलेली असून तीरावरील लोकांना तरून जाण्यास अत्यंत कठीण आहे, ऋष्टि-खड्गादिक आयुधें ह्या ज्या नदीवरून तरून जाणाऱ्या मोठ्या नौका आहेत, तसेंच गृध्र, कंक आणि डोमकावळे हे जीमधील लहानलहान होड्या आहेत, जिच्या तीरावर मनुष्यमांसभक्षक प्राण्यांचा संचार आहे, अशी जी शूराला परलोकदायक व भीरु जनाला अशुभकारक रक्तनदी त्या संग्रामामध्यें वाहत असते, तेंच त्या रणयज्ञांतील शूरांचें अवभृथस्नान आहे.

त्या रणयज्ञांतील वेदीवर ज्याच्या शत्रूचीं मस्तकें आणि गजाश्वांचे स्कंधप्रदेश पडलेले असतात, अशा वीरपुरुषाला माझ्या लोकासारखेच लोक प्राप्त

होतात. शत्रुसैन्याचा अग्रभाग ही त्याची प्रियेसह नित्य शयन करण्याची जागा व स्वतःच्या सैन्याचा अग्रभाग हें त्या वीरपुरुषाचें हविर्भाग ठेवण्याचें स्थान असतें. त्याच्या दक्षिणेकडे असणारे योद्धे हे सदस्य असून उत्तरेकडील योद्धे आग्नीध्र होत आणि शत्रुसेना ही त्याची पत्नी होय. त्याला दूर असें कांहीं नाहीं. जव्हां दोनी बाजूंकडील व्यूहरचना होते, तेव्हां त्याच्या अग्रभागीं असलेली उघडी जागा ती त्याची वेदी आणि वेद हे तेथील अग्नि होत. जो योद्धा त्रस्त होऊन संग्रामांतून परतला असतां शत्रूच्या हातून वध पावतो, त्याची अप्रतिष्ठा होऊन तो नरकाला जातो, यांत संशय नाहीं. ज्यानें छिन्न केलेल्या शत्रुसैन्याच्या रक्तप्रवाहानें वेदी व्याप्त होऊन मृतांचे केंस, मांस आणि अस्थि यांनीं भरून जाते, त्या वीराला उत्तम गति मिळते. जो शत्रुपक्षाकडच्या सेनापतीचा वध करून त्याच्या रथावर आरूढ होतो, तो विष्णूप्रमाणें पराक्रमी होऊन बृहस्पतीप्रमाणें सर्वसमर्थ होतो. शत्रुपक्षाकडील नायक, त्याचा पुत्र किंवा दुसरा कोणी तत्पक्षीय सन्मान्य वीर याला जो कोणी जीवंत धरून आणील, त्याला माझ्या लोकासारखे लोक मिळतील.

युद्धामध्यें हत झालेल्या शूराबद्दल कोणींहि शोक करूं नये. त्याला स्वर्गांतहि मान मिळत असल्याकारणानें त्याजविषयीं शोक करणें अयोग्य आहे. त्याच्या संबंधानें अन्नदान, उदकदान, स्नान करणें अथवा अशौच धरणें यांचें कारण नाहीं. त्याला कोणत्या प्रकारच्या लोकांची प्राप्ति होते तें सांगतों, ऐक. युद्धामध्यें वध पावलेल्या शूराकडे सहस्रावधी अप्सरा तो आपला पति व्हावा, म्हणून धांवत येतात. जो कोणी या युद्धधर्माचें पालन करितो, त्याला तप, पुण्य, सनातन धर्म आणि चार आश्रम संपादन केल्यासारखे होतात. युद्धामध्यें वृद्ध, बाल आणि स्त्री यांचा वध करूं नये. त्याचप्रमाणें ज्यांनीं पाठ फिरविली आहे किंवा जे दांतीं तृण धरून 'मी तुझा आहें' असें म्हणून शरण आले आहेत, त्यांचाहि वध करूं नये. वृत्र, बळ, पाक, मायावी विरोचन, अनिवार नमुचि, अनेक प्रकारच्या माया जाणणारा शंबर, दितिपुत्र विप्रचित्ति, सर्व दनुपुत्र आणि प्रल्हाद ह्यांचा युद्धामध्यें संहार केल्यामुळेंच मी देवेंद्र या पदवीला प्राप्त झालों आहें.

भीष्म—अशाप्रकारें त्या इंद्राचें भाषण ऐकून अंबरीषानें त्याचा मोठा सत्कार केला आणि आपल्या वीरांना मिळालेली सिद्धि अगदीं योग्य आहे, ही गोष्ट त्यानें मान्य केली. १२. १. ९८.

---

## अध्याय ९९. वा.

[ १ जनकानें आपल्या योद्ध्यांना स्वर्ग व नरक दाखवून युद्धार्थ कसें उत्तेजित केलें, त्याचें भीष्माकडून युधिष्ठिराला कथन. २ वीरवृत्ति कशी असावी. ]

( १ ) भीष्म—युधिष्ठिरा, आतां प्रतर्दन आणि मिथिलाधिपति जनक या उभयतांमध्यें युद्ध झाल्याची कथा सांगत असतात, तींत रणदीक्षा घेतलेल्या जनकानें आपल्या योद्ध्यांना युद्धार्थ कसें उत्तेजित केलें, हें समजून येण्यासारखें आहे. म्हणून ती मी तुला सांगतों, लक्ष्यपूर्वक ऐक.

मिथिलाधिपति महात्मा जनक राजा हा सर्वतत्त्ववेत्ता होता. त्यानें आपल्या योद्ध्यांना योगबलानें स्वर्ग आणि नरक दाखवून म्हटलें, " हे तेजस्वी अक्षय्य लोक सर्वदा गंधर्वकन्यांनीं वसती केलेले आणि सर्वकामना परिपूर्ण करणारे आहेत. युद्धामध्यें जे यत्किंचितहि भीति बाळगीत नसतात, अशा शूर लोकांकरितांच हे आहेत. तसेच हे समरांत विमुख होऊन पलायन करणाऱ्या लोकांकरितां शाश्वत नरक आणि अकीर्ति आहेत, तेहि पाहून घ्या आणि नंतर तुमच्या मनाला जें योग्य वाटेल त्याप्रमाणें वागा. ह्या दोहोंकडे पाहून प्राणांचीहि पर्वा न करितां तुम्ही शत्रूला जिंका. ह्या अप्रतिष्ठाकारक नरकाला वश होऊं नका. युद्धामध्यें शूरांनीं शरीरत्याग करणें, हें स्वर्गद्वाराच्या प्राप्तीचें उत्तम साधन आहे."

( २ ) याप्रमाणें त्या जनकराजाचें भाषण ऐकून त्या योद्ध्यांनीं शत्रूला रणांत जिंकून राजाला आनंदित केलें. म्हणून धैर्यवान् पुरुषानें रणाच्या अग्रभागीं सर्वदा असावें. गजांच्या मध्यभागीं रथी, रथांच्या मागें सादी आणि त्या सादींच्या मध्यभागीं कवचधारी पदाति असावेत. जो राजा आपल्या सैन्याची अशी व्यूहरचना करितो, तो सर्वदा शत्रूवर जय मिळवितो. युधिष्ठिरा, क्षत्रियानें नित्य अशाच रीतीनें वागावें. अत्यंत क्रोधी मनुष्य सुयुद्धाच्याच योगानें स्वर्गाची इच्छा करितो. मकर ज्याप्रमाणें समुद्राला क्षोभवून सोडतात, त्याप्रमाणें सैनिकांनीं सैन्याचा क्षोभ करावा. त्यांनीं परस्परांची व्यवस्था लावावी आणि कष्टी झालेल्या लोकांस उत्तेजित करावें. जिंकून घेतलेल्या प्रदेशाचें नीट रक्षण करावें व युद्धांत भग्न झालेल्या लोकांचा फारसा पाठलाग करूं नये. जीविताविषयीं त्यांची निराशा झाली असल्यामुळें ते एकदां उलटले असतां त्यांचा वेग असह्य असतो, म्हणून त्यांच्या मागें लागूं नये. शिवाय भयानें पळून

जाणाऱ्या लोकांवर शूर लोक शस्त्र टाकूं इच्छीत नाहींत. चर प्राण्यांचें अचर पदार्थ, दंष्ट्रायुक्त प्राण्यांचे दंष्ट्राहीन जीव, तृषार्तांचें जल आणि शूर पुरुषांचें भीरु हे अन्न होत. पृष्ठ, उदर, हस्त, पाद इत्यादि सर्व अवयव समान असतांहि भीरु लोक पराभव पावतात आणि म्हणूनच ते भयार्त शूरापुढें हात जोडून सर्वदा नम्र असतात. हे सर्व लोक शूरांच्याच बाहूंवर पुत्रांप्रमाणें अवलंबून असतात. म्हणून शूर कशाहि स्थितींत असला तरी तो सन्मानास पात्र आहे. त्या तिन्ही लोकांमध्यें शौर्यापेक्षां श्रेष्ठ असें दुसरें कांहीं नाहीं. शूर सर्वांचें पालन करितो. जगांतील सर्व गोष्टी शूरावरच अवलंबून आहेत. १२. १. ९९.

---

## अध्याय १०० वा.

[ १ युद्ध करण्याच्या प्रकारांचें कथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भरतर्षभा, जयार्थी लोक प्रसंगवशात् धर्माकडे कानाडोळा करून व सेनेला उत्साहित करून शत्रूवर चालून कसे जातात, तें मला सांग.

**भीष्म**—युधिष्ठिरा, क्षात्रधर्म, रणांगणावर मरणनिश्चय, शिष्टाचार आणि राजशासनभीति अशा चार उपायांनीं धर्माला स्थिरता येते. आतां धर्म आणि अर्थ ह्यांचे सद्यःफलदायी असे उपाय सांगतों. चोर निर्मर्याद होऊन धर्मार्थाला विनाशक झाले असतां, त्यांच्या प्रतिबंधार्थ, तसेंच सर्वकार्यसिद्ध्यर्थ मी शास्त्रसिद्ध उपाय सांगतों, ते ऐक. हे भारता, सरळ आणि वक्र अशा दोन्ही प्रकारच्या मार्गांचें ज्ञान असावें, परंतु वांकड्या मार्गानें कधीं जाऊं नये. परंतु शत्रु जर त्या मार्गांचें अवलंबन करून आला, तर त्याच मार्गानें आपणहि त्याच्या विरुद्ध जावें. कित्येक भेदबुद्धीनें राजाची सेवा करीत असतात, ते वस्तुतः राजाचे शत्रुच होत. त्यांचें कपट राजाला कळून आल्यावर त्यानें त्यांस शत्रूंप्रमाणें शिक्षा करावी.

हे पार्था, बाणघातांपासून रक्षण करणाऱ्या गजांच्या झुली, वृषभ, अजगर, शल्य (बाण), कंटक, अणकुचीदार बाण, कवचें, चवऱ्या, पाणी दिलेलीं आयुधें, पीत व रक्त कवचें, अनेकरंगी पताका, केतु, ऋष्टि, तोमर, खड्ग, तीक्ष्ण परशु, बाणाग्रें आणि ढाली इत्यादिकांची उत्तम योजना राजानें केलेली असावी. शस्त्रें

पाणीदार असून योद्धेहि दृढनिश्चयी असावे. चैत्र किंवा मार्गशीर्ष महिना हा शत्रूवर चाल करण्यास योग्य आहे, असें सांगितलें आहे. कारण त्या वेळेला पृथ्वीवर धान्यें पिकून तयार असतात व उदकाचीहि सर्वत्र विपुलता असते. शिवाय त्यावेळीं थंडीहि फार नसते व उन्हाचीहि बाधा होणारी नसते. म्हणून त्यावेळीं अथवा शत्रु संकटांत असेल त्यावेळीं त्यावर चालून जावें. शत्रूला बाधा करण्याच्या ह्याच वेळा प्रशस्त होत. जलयुक्त आणि तृणयुक्त सपाटीचा मार्ग शत्रूवर जाण्यास योग्य आहे. बरोबर कुशल आणि वनभागांची माहिती असणारे हेर असावे. मृगगणांप्रमाणें अरण्यांतून जाणें त्यांच्या मदतीशिवाय कधींहि शक्य नसतें. म्हणून विजयेच्छु राजे त्यांची सैन्यामध्यें भरती करितात. अग्रभागीं कुलीन आणि सामर्थ्यवान् पुरुषांचें सैन्य असावें. तळ देण्याची जागा जलयुक्त असून तीसभोंवतीं मोकळें मैदान असावें.

अशा रीतीनें व्यवस्था ठेवली असतां शत्रु चालून आल्यावर त्याचा प्रतिकार करितां येतो. सभोंवतीं मैदान असण्यापेक्षां वन असलेलें पुष्कळ चांगलें असें युद्धकुशल लोक समजतात. दुर्गाच्या जवळच सैन्याचा तळ असावा. अशा रीतीनें सैन्याचा तळ देऊन व पदातींचें गोपन करून शत्रूवर मारा करणें हाच संकटनिवारणाचा उत्तम उपयोग होय. सप्तर्षींना पाठीवर घेऊन ( दक्षिणाविमुख होऊन ) व पर्वताप्रमाणें स्थिर होऊन युद्ध करावें. अशाप्रकारें युद्ध करून दुर्जय अशा शत्रूंसहि जिंकण्याची इच्छा करावी. जिकडे वायु वाहत असेल किंवा ज्या बाजूनें सूर्य किंवा शुक्र प्रकाशित असेल, तिकडे जय असतो. हे तिघेहि एकाच वेळीं प्रादुर्भूत होतील, तर यांपैकीं पूर्वींच्यांचें श्रेष्ठत्व अधिक समजावें. जेथें चिखल, पाणी, सेतुप्राकारादिकांचे भाग व ढेंकळें नसतील, अशाच ठिकाणीं अश्वभूमि करावी, असें युद्धकुशल लोकांचें मत आहे. रथदळाला सपाट, चिखल, खांचखळगे नसलली जागा प्रशस्त होय. लहानलहान वृक्ष, अरण्य आणि पाणी असलेला प्रदेश गजदळाला योग्य आहे. सभोंवतीं डोंगराळ जागा, अनेक दुर्ग तसेच कळक आणि वेत यांनीं युक्त प्रदेश असून त्याच्या समीप पर्वत व उपवनें असतील, तर ती जागा पायदळाला प्रशस्त होय. सैन्यांत पायदळ विशेष असणें सर्वदा श्रेयस्कर होय. चांगल्या दिवसांत रथदळ आणि अश्वदळ अधिक असणें योग्य आहे. प्रावृट्कालीं सैन्यामध्यें पदाति आणि गजदळ यांचा भरणा अधिक असावा. याप्रकारें देश आणि काल यांचा विचार करून शत्रूवर चाल करून जातांना सैन्याची योजना करावी. अशाप्रकारें जो राजा तिथि आणि

नक्षत्रें पाहून व ब्राह्मणांचे आशीर्वाद घेऊन शत्रूवर चाल करून जातो, त्याला सदैव जय मिळतो.

झोंपलेले, तृषित, श्रांत आणि ज्यांची तुटातूट झाली आहे, अशांवर शस्त्रप्रहार कधींहि करूं नये. त्याचप्रमाणें जे मोक्षेच्छु असतील, जे प्रयाणाला निघाले असतील, जे स्थानांतर करूं इच्छिणारे असतील किंवा जे खाण्यापिण्यांत रममाण झालेले असतील, तसेंच विद्ध, मूर्च्छापन्न, हत, अत्यंत क्षीण, भयग्रस्त, उद्योगांत रत, सुरंगादि गुप्त उपायांनीं त्रस्त, कार्यासाठीं बाहेर पडलेले, बाहेरून तृणादिक वस्तू आणणारे, गृहीं यावयास निघालेले, परंपरागत राजाचे व अमात्यांचे रक्षक, अशांवरहि शस्त्रप्रहार करूं नये. जे कोणी शत्रुसैन्याचा भेद करितात व आपल्या सैन्यामध्यें फूट पडली असतां त्याची जूट करूं शकतात, त्यांना आपल्या बरोबरीनें अन्नपान देऊन त्याशिवाय वेतनहि दुप्पट द्यावें. सैन्यामध्यें दहांवर एक व शंभरांवर एक असे निरनिराळे अधिकारी नेमावे. त्याचप्रमाणें हजारांवरहि एका शूर व आलस्यरहित पुरुषाची योजना करावी. युद्धाला निघतांना सैन्यांतील सर्व प्रमुख लोकांना म्हणावें कीं युद्धांत जय मिळणें किंवा न मिळणें ही गोष्ट संशयास्पद आहे. म्हणून आपण एकमेकांना सोडतां नये. संग्राम करीत असतां जे कोणी भित्रे युद्ध सोडून पळून जाण्याची इच्छा करणारे असतील, त्यांनीं आधींच येथून परत जावें. शत्रूशीं तुमुल रणप्रसंगीं जे आपल्या वरिष्ठाचा शत्रूकडून घात होऊं देतील, त्यांच्या हातून शत्रूचा भंग किंवा वध होणें कधींहि शक्य नाहीं. संग्रामांतून पळून जाणारा मनुष्य स्वतःचा आणि स्वपक्षाचाहि नाश करीत असतो. पलायन करणाराला अर्थनाश, वधप्राय दुःख, अकीर्ति आणि अपेश यांची प्राप्ति होते. पळून जाणाऱ्या मनुष्याविषयीं कर्णकटु आणि दुःखदायक असे शब्द लोक उच्चारीत असतात. पळणाऱ्याचे दांत-ओंठ फुटून जातात व त्याला सर्व शस्त्रें खालीं ठेवावीं लागतात; अखेरीला शत्रूकडून तो बद्ध होतो. जे आपले शत्रु असतील, त्यांजवरच असला प्रसंग येवो. अशाप्रकारें जे युद्धविमुख होऊन पळून जाणारे लोक असतील ते नराधम केवळ लोकसंख्येंत भर घालणारे असून त्यांचा इहलोकीं किंवा परलोकींहि कांहीं उपयोग होत नसतो.

बा युधिष्ठिरा, विजय मिळवून आनंदित झालेले शत्रु चंदनाची उटी व भूषणें अंगावर घालून पळून जाणाऱ्या पुरुषाच्या पुढें धांवत येतात. संग्रामामध्यें शत्रु त्याचा दुर्लौकिक करितात, तें दुःख माझ्या मतें मरणाहूनहि अधिक

आहे. ' जय हा सर्व धर्मांचें व सुखाचें मूळ आहे. भीरु लोक ज्या मरणाला अत्यंत भिऊन जातात, त्यालाच शूर पुरुष मोठ्या आनंदानें पत्करितात. म्हणून स्वर्गाची इच्छा धरून रणांगणावर प्राणांचीहि पर्वा न करितां युद्धांत आम्हांला जय मिळो अथवा मृत्यु येवो, सद्गति ही आम्हांला मिळणारच, ' याप्रमाणें शपथ घेऊन व जीवावर उदार होऊन शूर पुरुष शत्रुसैन्यामध्यें प्रवेश करतात. अग्रभागीं तलवारी व ढाली घेऊन पुरुषांचें सैन्य असावें. पिछाडीला रथसैन्य असावें. मध्यभागीं स्त्रिया असाव्या. शत्रूवर प्रहार करण्यासाठीं पदातींना वाढवीत जावें. जे पुरवासी वृद्ध लोक असतील, त्यांनीं पुढें असावें; त्याचप्रमाणें संमत, बलवान् आणि बुद्धिमान् लोकहि पुढें असावे. त्यांचे मागें दुसरे लोक असावे, अशा वेळीं भीरु लोकांनाहि प्रयत्नपूर्वक धीर देऊन बरोबर घ्यावें. कारण आपलें सैन्य फार मोठें आहे, असें शत्रूला वाटण्याकरितां तरी त्यांना जवळ बाळगावें. सैन्य थोडें असतां तें एकत्र करून शत्रूशीं युद्ध करावें. सैन्य मोठें असल्यास तें सर्वत्र पसरून ठेवावें. अल्प सैन्याला मोठ्या सैन्याशीं युद्ध करावयाचें असल्यास सेनापतीनें आपल्या सैन्यांत सूचीमुख व्यूहाची रचना करावी. शत्रु येऊन भिडला असतां, खरें असो किंवा खोटें असो, ' शत्रूचा मोड झाला, मदतीचें सैन्य येऊन पोहोंचलें, आतां निर्भयपणें शत्रूवर प्रहार करा, ' असें बलवान् लोकांनीं हात वर उभारून मोठ्यानें ओरडून त्या भैरव शब्दानें शत्रूला पीडित करावें. ह्यावेळीं अघाडीला असणाऱ्या लोकांनीं मोठमोठे सिंहनाद करावे आणि क्रकच, शृंग, नगारे, मृदंग, पणव, इत्यादि वाद्यें वाजवून त्या योगानें एकच कलकलाट करून सोडावा. १२. १. १००.

---

## अध्याय १०१ वा.

[ १ योधपुरुषांचीं लक्षणें. ]

( १ ) युधिष्ठिर—हे भारता, पुरुषाचें शील कोणत्या प्रकारचें असावें; त्याचा आचार कशा स्वरूपाचा असावा; तो कसा असावा; त्याचें कवच कसलें असावें; त्यानें शस्त्रें कसलीं वापरावीं; म्हणजे तो समरभूमीवर युद्ध करण्याला योग्य होतो तें, हे पितामहा, तूं मला सांग.

भीष्म—हे युधिष्ठिरा, ज्याच्या त्याच्या घराण्याच्या आचाराप्रमाणें, किंवा ज्याच्या त्याच्या प्रांतांतील चालीप्रमाणें, जो ज्या शस्त्रांत अगर अस्त्रांत

प्रवीण असेल, त्याला त्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें समरांत कार्य करतां येतें. आपल्या प्रांताच्या किंवा घराण्याच्या रीतीला अनुसरून वीर पुरुष समरभूमीवर आपलीं कार्यें करतात. गांधार, सिंधुदेश व सौवीर प्रांत इकडील लोक, वाघनखें व प्रास (या नांवाचें फेंकून मारण्याचें एक आयुध) यांचा उपयोग करण्यांत कुशल असतात. यांना भीति अशी कसलीच वाटत नाहीं. हे बलिष्ठ असून युद्धकलेच्या सर्व अंगांत प्रवीण असतात. उशीनर देशांतील लोक सर्व शस्त्रांत पारंगत असून बलिष्ठ असतात. पूर्वेकडील प्रांतांतले लोक गजयुद्धांत प्रवीण असून कापट्यानें शत्रूला कसें खेळवावें, याची त्यांना चांगली माहिती असते. यवन, काम्बोज व मथुरेच्या आसपासच्या प्रदेशांतील लोक बाहुयुद्धांत कुशल असतात व दाक्षिणात्यांना तरवार घेऊन कसें युद्ध करावें याची चांगली माहिती असते. वीर पुरुष एकाद्याच प्रांतांत जन्माला येतात व दुसरीकडे येत नाहींत, असें नाहीं. सर्व प्रांतांतून प्रायः मोठाले बलिष्ठ व शूर असे पुरुष निर्माण होतात. त्यांचीं सामान्य लक्षणें तुला सांगतों, तीं ऐक. सिंह व वाघ यांच्याप्रमाणें शूर पुरुषाचा आवाज व नेत्र हीं असतात. त्यांची गतिहि सिंह व वाघ यांच्या गतीप्रमाणेंच असते. यांची दृष्टि पारवे व सर्प यांच्यासारखी तीक्ष्ण असते. ते सर्व शूर पुरुष मोठ्या धडाडीचे असतात. हरिणासारखा आवाज, चित्याप्रमाणें नेत्र व ऋषभासारखी दृष्टि असणाऱ्या पुरुषांचा वेग अतिशय मोठा असतो. किंकिणीसारखा—बारीकशा घंटेसारखा—आवाज असणारे पुरुष प्रमादशील, मंदबुद्धीचे व रागीट असतात. मेघगर्जनेसारखा ज्यांचा आवाज असतो, अशा पुरुषांची मुद्रा रागीट असते. कांहीं लोक उंटासारखे असतात, ते व ज्या लोकांच्या नाकाचे शेंडे व जिभा वांकड्या असतात, असे लोक फार दूरचा पल्ला गांठणारे, शत्रूवर जोरानें तुटून पडणारे असतात. मांजरासारखे वक्र शरीराचे, अंगावर फार केंस नसलेले व ज्यांची त्वचा पातळ आहे, असे लोक अत्यंत जलद व चपळ चालीचे असतात व म्हणून असल्या लोकांचा पाठलाग करणें कठीण होतें. घोरपडीप्रमाणें सर्वांगांचा गोळा करून रहाणारे लोक स्वभावानें कोमल प्रकृतीचे असतात.

ज्या पुरुषांचा आवाज व गति हीं अश्वाप्रमाणें असतात, ते कोणतेंहि कार्य पार पाडण्यास समर्थ असतात. कसदार शरीराचे, बांधेसूद ठेवणीचे, विशाल वक्षःस्थल धारण करणारे, सर्व अवयवांनीं सुसंघटित असे लोक रणवाद्यांची धुमाळी कानीं येतांच क्षुब्ध होऊन जातात, त्यांना मोठा चेव येतो व कल-

ह्याच्या योगानें त्यांना आनंद होतो. ज्यांचे डोळे अगदीं खोल गेलेले अथवा अगदीं बाहेर आलेले असतात असे पिंगट नेत्रांचे, भुंवया वर चढविलेले, मुंगसांसारख्या डोळ्यांचे, सर्व शूर पुरुष समरांगणावर प्राण देणारे असतात. ज्यांचे नेत्र वक्र असतात, कपाळपट्टी रुंद असते, ज्यांची हनुवटी मांसल नसते, बाहु वज्रासारखे कठिण असतात व ज्यांच्या बोटांवर चक्रें असतात, असे कृश व अंगाच्या शिरा स्पष्ट दिसणारे पुरुष युद्ध उपस्थित झालें असतांना गजांप्रमाणें गर्दींत घुसतात व त्यांचा पाठलाग करणें दुरापास्त होतें. ज्यांचीं केशाग्रें पल्लवित झालेलीं असून त्यांत एक प्रकारचें तेज असतें, ज्यांचे पार्श्वभाग, हनुवटी व चेहेरा हीं स्थूल असतात, ज्यांचे खांदे उन्नत असतात, मान भरदार असते, जे गरुडाप्रमाणें उद्धट असतात, ज्यांचें मस्तक वाटोळें असतें, मुख विशाल असतें, ज्यांच्या तोंडाची ठेवण मांजराच्या तोंडाच्या ठेवणीसारखी असते, ज्यांचा आवाज उग्र असतो व जे अत्यंत कोपिष्ठ असतात असे पुरुष युद्धांत शत्रूंवर चालून जातात. ज्यांना धर्माचें ज्ञान नाहीं, प्रसंगीं जे शिष्टाचाराला सोडून वागतात, असे घोर, दिसण्यांत विक्राळ, भिल्ल वगैरे लोक जीवाची पर्वा न करितां रणांतून कधींहि माघार घेणारे नसतात. त्यांना रणांगणांत पुढें करावें. ते मरतील किंवा मारतील. हे अधार्मिक व भिन्न वृत्तीचे लोक असल्यामुळें ह्यांच्यापुढें सामोपचाराच्या गोष्टी कधीं चालत नसतात. ते आपल्या राजावर सुद्धां क्रुद्ध होण्यास कमी करीत नाहींत. १२. १. १०१.

---

## अध्याय १०२ वा.

[ १ जयचिह्नें आणि राजनीति ह्यांचें युधिष्ठिराला कथन. ]

(१) युधिष्ठिर—हे भरतर्षभा, जयशील सैन्याचीं उत्तम चिह्नें कोणतीं तें तुझ्यापासून समजून घेण्याची माझी इच्छा आहे.

भीष्म—हे भरतश्रेष्ठा, जयशील सैन्याचीं उत्तम लक्षणें कोणतीं तीं सांगतों. दैवाचा कोप होऊन मनुष्य काळाच्या तडाक्यांत सांपडला असतां विद्वान् लोक ज्ञानचक्षूनें तें सर्व ओळखतात आणि जपहोमादि मंगलकृत्यें प्रायश्चित्त म्हणून करून त्या अनिष्टाची शांति करितात. दैवज्ञसंपत्ति व पुरोहितसंपत्ति अशी द्विविध संपत्ति असणें हें जयलक्षण होय. म्हणून राजानें ही द्विविध संपत्ति जवळ

बाळगून असावें. हे भारता, ज्या सैन्यांतील योद्धे व वाहनें सर्वदा उत्साहयुक्त असतात, त्या सैन्याला उत्तम जय मिळतो. तसेंच जेव्हां अनुकूल वारा वाहतो, इंद्रधनुष्यें दृष्टोत्पत्तीस येतात, ज्या सैन्याच्या मागें मेघ आणि सूर्यकिरण धांवत असतात, कोल्हे, बगळे, गृध्र ज्याला अनुकूल दिशेनें जात असतात, त्याला निश्चयपूर्वक उत्तम सिद्धि मिळत असते. अग्नीचें तेज प्रसन्न असून, त्याचे किरण सरळ जाणारे व दक्षिणाभिमुख असतात, धूर मुळींच नसतो, आहुतींचा पुण्यकारक गंध सुटलेला असतो, हीं पुढील विजयाचीं पूर्वचिह्नें होत. युद्धाला निघालें असतां शंख व भेरी यांचा मधुर व गंभीर नाद जेथें होत असतो, योद्धेहि युद्धाविषयीं उत्सुक असून माघार घेणारे नसतात, तें युद्धाच्या पुढील विजयाचें पूर्वचिह्न होय. युद्धाला निघालेल्या व निघणाऱ्या वीरांचे मागून आणि डावीकडून हरिण असावा. उजव्या बाजूस असणारे हरिण हे शत्रूवर वधाच्या इच्छेनें चाल करून जाणाऱ्या योद्धयाचा जय होईल, असें सुचवितात व अग्रभागीं चालणारे हरिण अपशकुन सूचित करून गमनाचा निषेध करितात.

हंस, क्रौंच, शतपत्र, चाष इत्यादि पक्ष्यांनीं मंगलकारक शब्द करणें आणि आनंदित व धैर्ययुक्त असणें हीं भावी जयाचीं चिह्नें होत. शस्त्रांनीं, कवचांनीं, ध्वजांच्या योगानें, नानाप्रकारच्या यंत्रांमुळें, तरुण योद्धयांच्या तेजस्वी मुखचर्येमुळें देदीप्यमान दिसणारी व त्यामुळें शत्रु जिच्याकडे पाहूं शकत नाहींत, अशी सेना ज्यांच्याजवळ आहे, त्यांना विजयश्री हटकून माळ घालते. ज्यांचे सैनिक आज्ञापालन करण्यांत तत्पर असतात, गर्विष्ठपणा ज्यांच्या अंगांत मुळींच नसतो, जे परस्परांशीं मित्रभावानें वागतात आणि सदाचारानें राहतात, त्यांना यशःप्राप्ति निश्चयपूर्वक होते. मनाला आनंद देणारे शब्द, स्पर्श व गंध ज्या ठिकाणीं असतात व योद्धयांच्या अंगांत जेथें वीरश्रीचा संचार असतो, तेथें जयश्रीचा वास निश्चयानें असतो. युद्धांत प्रवेश केलेल्या वीराचे डाव्या बाजूला व प्रवेश करूं पाहणाऱ्याचे उजव्या बाजूला कावळा असणें हें शुभ चिह्न होय. असा कावळा पाठीमागून येत असल्यास निश्चयानें कार्यसिद्धि सुचवितो व पुढें असलेला कार्य हातीं घेऊं नको, म्हणून सांगत असतो.

युधिष्ठिरा, चतुरंग अशी मोठी सेना जुळवून आपण प्रथमतः सामोपचारानें वागावें आणि नंतर युद्धाला तयार व्हावें. युद्धांत मिळणारा जय हा केव्हांहि

गौण होय. कारण तो यदृच्छया अथवा दैवयोगानें मिळतो. पाण्याचा प्रचंड वेग अथवा घाबरून पळत सुटलेले हरिण, ह्यांच्याप्रमाणें चोहोंकडून कोंडमारा होऊन निराश झालेली सेना उलटली म्हणजे अनावर होते. वीरपुरुष ज्ञाते असले तरी शेजारचे योद्धे युद्धांत पराजय पावून पळूं लागले, म्हणजे तेहि पळून जाऊं लागतात. त्याला मग कांहीं कारण नसतें. कितीहि प्रचंड सेना असली तरी ती हरिणांच्या समूहाप्रमाणें असते. समूहांतील एक हरिण पळून जाऊं लागलें, म्हणजे ज्याप्रमाणें त्याच्या मागून इतर हरणें धांवत सुटतात, त्याप्रमाणें सैन्यांत एकदां फूट पडली म्हणजे त्याला आंवरून धरण्याचें काम अत्यंत कठीण असतें. परस्परांचें बळ किती आहे तें ओळखणारे, सर्वदा उत्साहसंपन्न, निश्चयी, जीवावर उदार होणारे असे पन्नास वीर एकत्र मिळाले तरी ते शत्रूच्या सैन्याला नाहींसें करितील. इतकेंच नव्हे, तर दृढनिश्चयी, कुलीन व योग्य सन्मान दिलेले असे पांच, सहा किंवा सात वीर जरी एकत्र मिळाले तरी तेहि शत्रूवर जय मिळवितील. शक्य तोंपर्यंत युद्ध करण्याचें मनांत आणूं नये. साम, दान आणि भेद हे उपाय थकल्यानंतर युद्धाचा उपाय अवलंबावयाचा असतो.

सेनेच्या नुसत्या दर्शनानेंच भित्र्या माणसांना कांपरें भरतें. देदीप्यमान वज्राला पाहिल्यावर तें कोठें पडेल, म्हणून जशी त्याची भीति वाटत असते, तद्वत् सेना कोणावर येऊन पडेल, याची भीति त्यांना वाटत असते. युद्ध जवळ आलें आहे असें कळतांच जे त्याजवर उलट चालून जातात, त्या योद्धयांच्या अवयवांना घाम सुटतो. सर्व स्थावरजंगमात्मक प्रदेश पीडित होऊन जातो आणि अस्त्रतापानें संतप्त झालेल्या लोकांचा मगज क्षीण होतो. म्हणून बाहेरून क्रूरपणा दाखवून सामोपचारानेंच शत्रुयोद्धयांशीं पुनः पुनः सख्य जुळवावें. दुसऱ्या पक्षाकडून त्रास होऊं लागला म्हणजे ते आपोआपच संधि करण्याला तयार होत असतात. शत्रूला जे आंतून साहाय्यकारी असतील, त्यांच्यामध्यें फूट पाडण्यासाठीं हेरांची योजना करावी. जो दुसरा राजा शत्रूपेक्षां अत्यंत बलवान् असेल, त्याच्याशीं संधि करावा. कारण, अशा रीतीनेंच शत्रूला उत्तम रीतीनें त्रास देतां येतो व तो आणि त्याचे साहाय्यकारी यांना सर्व बाजूंनीं प्रतिबंध करण्यास सोपें पडतें.

क्षमा ही साधूंकरितांच आहे. तिचा दुष्टांकरितां कधींहि उपयोग करूं नये. आतां हे पार्था, क्षमा आणि अक्षमा यांचें प्रयोजन सांगतों, ऐक. जो राजा शत्रूला

जिकल्यानंतर त्याला क्षमा करितो, त्याचें यश वृद्धिंगत होतें व त्याच्या हातून मोठा अपराध झाला तरी शत्रूचा त्याच्यावर विश्वास बसतो. शत्रूला जर्जर केल्यानंतरच क्षमा करणें योग्य होय, असें शंबरासुराचें मत आहे. तापविल्यावांचून काष्ठ वांकविलें तर तें पूर्वस्थितीला येतें. परंतु विद्वान् लोकांना हें आचरण पसंत नसून त्यांना हें उदाहरणहि चांगलेंसें पटत नाहीं. क्रोध न करितां व नाशहि न करितां आपल्या पुत्राप्रमाणें शत्रूचें नियमन करावें. युधिष्ठिरा, राजा उग्र असला म्हणजे तो लोकांना द्वेषपात्र होतो. मऊ असला म्हणजेहि त्याचा अवमान होतो. म्हणून त्यानें या दोहों गुणांचें अवलंबन करावें.

हे भारता, प्रहार करण्यापूर्वीं व तो करीत असतांहि गोड भाषण करावें. तसेंच प्रहार केल्यावर शोक केल्यासारखें दाखवून दया दाखवावी. ‘ युद्धामध्यें माझ्या लोकांकडून शत्रु मारले गेले, हें मला इष्ट नाहीं व मीं पुनः पुनः सांगितलें असतांहि त्यांनीं माझें ऐकिलें नाहीं. हे लोक जीवंत असते तर बरें झालें असतें. अशा लोकांचा वध होणें केव्हांहि इष्ट नाहीं. रणापासून पलायन करून न जाणारे लोक अत्यंत दुर्लभ होत. म्हणून ज्यानें या योद्धयांचा वध केला आहे, त्यानें माझें अप्रिय केलें आहे, ’ असें बोलून दाखवून खासगी रीतीनें त्या शत्रुवध करणाऱ्यांचा सत्कार करावा. मेलेले आणि मारणारे हे दोघेहि अपराधी आहेत असें दाखवावें. लोकसंग्रह करण्याच्या इच्छेनें मेलेल्याच्या खांद्यावर हात ठेवून शोक करावा. अशा रीतीनें सर्व अवस्थांमध्यें सामोपचारानें वागलें असतां धर्मज्ञ राजा निर्धास्त होतो आणि सर्वांना प्रिय होतो. हे भारता, सर्व प्राणिमात्राचा त्यावर विश्वास बसतो आणि एकदां विश्वास बसला असतां प्रजेचा वाटेल त्या कामीं त्याला उपयोग करून घेतां येतो. म्हणून ज्याला पृथ्वीचा उपभोग घेण्याची इच्छा आहे, अशा राजानें सर्व लोकांमध्यें विश्वास उत्पन्न करावा व निष्कपटपणें त्या सर्वांचें योग्य परिपालन करावें. १२–१–१०२.

---

## अध्याय १०३ रा.

[ १ शत्रूशीं वर्तन कसें ठेवावयाचें, याचें इंद्र-बृहस्पतिसंवादरूपानें कथन. ]

(१) युधिष्ठिर—हे पितामहा, मृदु अथवा कठोर अशा बलसंपन्न शत्रूशीं प्रथमतः राजानें कसें वर्तन ठेवावें, तें मला सांग.

भीष्म—युधिष्ठिरा, ह्यासंबंधीं इंद्र आणि बृहस्पति यांचा संवादरूप एक पुरातन इतिहास उदाहरण म्हणून सांगत असतात, तो असा आहे. पूर्वी एकदां शत्रुवीरांतक देवाधिदेव इंद्र बृहस्पतीकडे गेला आणि हात जोडून त्याला अभिनंदन करून म्हणाला—

इंद्र—हे ब्रह्मन्, मीं शत्रूंशीं मोठ्या सावधगिरीनें कसें वागावें? त्यांचा समूळ उच्छेद न करितां कोणत्या उपायानें त्यांचें दमन होऊं शकेल? समोरासमोर सैन्य भिडवून युद्ध केल्यास शत्रूवर मला जय कदाचित् मिळवितां येईल. तरी मीं काय केलें असतां देदीप्यमान व प्रतापी लक्ष्मी माझा त्याग करणार नाहीं?

इंद्राचें तें भाषण ऐकून धर्म, अर्थ आणि काम यांमध्यें कुशल, प्रतिभासंपन्न आणि राजनीतिविशारद बृहस्पति त्याला म्हणाला—

बृहस्पति—अपकार करणाऱ्या शत्रूला कलहानें ताळयावर आणण्याचा उपाय कधीं कोणीं योजूं नये. कारण, क्रोधाचा आणि अक्षमेचा मार्ग केवळ अज्ञान लोकांकरितां आहे. शत्रूचा वध करण्याची इच्छा करणाऱ्यानें त्याला केव्हांहि सावध करूं नये. क्रोध, भय आणि हर्ष यांना मनांतच आंवरून धरून विश्वास दाखविल्यासारखें करावें, परंतु विश्वास कधींहि ठेवूं नये आणि त्याशीं व्यवहार करावा. सर्वदा त्याशीं गोड बोलावें, त्याचें अप्रिय करूं नये. त्याच्याशीं शुष्क कलह करूं नये व विनाकारण कंठशोष करीत बसूं नये. ज्याप्रमाणें पक्ष्यांची शिकार करणारा मनुष्य पक्ष्यासारखाच शब्द काढतो आणि त्यांना वश करून घेतो, त्याप्रमाणें राजानेंहि आपल्या शत्रूला वश करून घ्यावें आणि नंतर त्याचा वध करावा. हे वासवा, ज्याला शत्रूला जिंकावयाचें असतें, त्यानें स्वस्थ झोंप घेत कधीं राहूं नये. कारण तो दुष्टात्मा सदैव जागृत राहून अग्नीच्या ठिणग्यांतून जसा फिरून अग्नि पेट घेतो, तसा पुनः प्रबल होऊन युद्धार्थ तयार होतो. विजय कोणाला मिळेल, हें संशयित असल्यामुळें आपण होऊन शत्रूवर कधींहि चाल करून जाऊं नये. शत्रूला विश्वास दाखवून त्याला आपलासा करून घ्यावा. तुच्छतेनें त्याची आपण अवज्ञा करीत आहों, असें बाहेर दाखवावें आणि त्याचें कार्य किंचित् ढिलें असल्याचें नज़रेस येतांच आपल्या मंत्रवेत्त्या सचिवांच्या विचारानें त्याजवर प्रहार करण्यास चुकूं नये. आपल्या कल्याणेच्छु जनांकडून त्याच्या सैन्यांत भेद करावा. कार्यारंभ, मध्य आणि शेवट यांचें

धोरण ठेवून शत्रुसैन्यविषयक वैरभाव मनांत गुप्त ठेवावा आणि शत्रुसैन्याची माहिती मिळवून तदनुसार त्यांत फूट पाडून, द्रव्याचें आमिष दाखवून आणि क्वचित् प्रसंगीं विषादिकांचाहि उपयोग करून त्याला दुर्बल करून सोडावें. शत्रूशीं निकट संसर्ग ठेवणें केव्हांहि हितकर नाहीं. पुष्कळ दिवसपर्यंत वाट पहात राहून संधि येतांच शत्रूचा वध करावा. त्याचा आपणांवर विश्वास बसेल, या उद्देशानें कालक्षेप करीत रहावें. शत्रूवर एकदम प्रहार करण्यास प्रवृत्त होऊं नये. आधीं आपणास जय मिळेल, अशी खात्री करून घ्यावी. त्याच्या हृदयावर शस्त्रप्रहार करण्यांत किंवा कटु शब्दांनीं त्याला दुखविण्यांत कोणताहि लाभ नाहीं. वेळ येतांच मात्र प्रहार करण्यास चुकूं नये. कारण, संधि पुनः-पुनः येत नसते.

हे देवेंद्रा, शत्रुवध करूं इच्छिणाऱ्या राजानें आलेली संधि दवडली तर ती पुनः येणें अत्यंत कठीण होय. शत्रु अकालीं आपल्यावर चालून आल्यास साधुसंमत मार्ग पत्करावा आणि त्याला आपला मित्र करून घ्यावा; त्याला कोणत्याहि प्रकारें त्रास देऊं नये. त्यानें काम, क्रोध आणि अहंकार हीं टाकून द्यावीं आणि शत्रूचें छिद्र पुनः पुनः शोधीत रहावें. हे सुरश्रेष्ठा, मार्दव, निष्ठुर शासन, आलस्य आणि प्रमाद हीं अंगीं असल्यास शत्रु कपटाचा उपयोग करून त्या मूर्खास पीडा देत असतो. म्हणून या चार गोष्टींचा त्याग करून शत्रूच्या मायेचा संहार केल्यानें राजा शत्रूला सहज मारूं शकतो. जें गुप्तकार्य एकट्याच्याच विचारानें होणें शक्य असेल, तें एकट्यानेंच करावें. तें अनेकांना सांगितलें असतां त्याची चालढकल होते किंवा तें अनेकांच्या कानांवरहि जातें. जर तें कार्य एकट्याच्या हातून होणें शक्य नसेल, तर इतरांचीहि संमति घ्यावी. शत्रू अदृश्य असल्यास ब्रह्मदंडाची योजना करावी व दृश्य असल्यास त्याजवर चतुरंगसेनेची योजना करावी. प्रथमतः भेदाची योजना करावी. आधीं भेदाची योजना करून स्वस्थ बसावें. योग्य वेळ आली असतां त्या त्या शत्रूवर चालून जावें. योग्य प्रसंगीं बलवत्तर शत्रूला प्रणामहि करावा आणि सर्वदा सावध राहून व त्याच्या गैरसावधपणाचा फायदा घेऊन त्याच्या वधाची संधि पहात बसावें. प्रणिपात, दान आणि मधुर भाषण यांनीं देखील शत्रूशीं संबंध ठेवावा. त्याला आपल्याविषयीं संशय येईल, असें कोणतेंहि कृत्य करूं नये. संशय येण्याचीं सर्व स्थळें टाळावीं. राजानें शत्रूवर कधींहि विश्वास ठेवून राहूं नये. कारण दुखविलेले लोक सूड घेण्याची मोठ्या तत्परतेनें वाट पाहत असतात. देवेंद्रा, वेग-

वेगळे व्यवसाय करणाऱ्या चंचल राजाचें वैभव टिकणें अत्यंत दुष्कर आहे. कधीं कधीं चंचल वृत्तीचे राजे आपल्या अस्थिरतेनें प्राणासहि मुकतात, म्हणून सर्वदा सावध राहून राजानें आपले मित्र कोण व शत्रु कोण ह्याचा विचार करावा. राजा मृदु असला म्हणजे लोक त्याचा अपमान करितात व तो निष्ठुर असला तर त्याजविषयीं कंटाळा करितात, म्हणून अत्यंत मृदु अथवा अत्यंत निष्ठुरहि असूं नये. तूं मृदु, तसा निष्ठुरहि हो. ज्याप्रमाणें पुराच्या मोठ्या जोरानें सर्वत्र पाणी वाहूं लागून बांध फुटण्याचें भय असतें, त्याप्रमाणें राजाच्या दुर्लक्ष्यामुळें राज्यहि नष्ट होण्याचा संभव असतो.

इंद्रा, पुष्कळ शत्रूंशीं एकाच वेळीं एकट्यानें कधींहि युद्ध करूं नये. साम, दान, दंड आणि भेद या उपायांचा अवलंब करून एकेकाचा नाश करावा आणि कोणी अवशिष्ट राहिल्यास त्याशीं मोठ्या निपुणतेनें वागावें. तो समर्थ असला तरी त्यानें सर्वांशीं युद्ध करण्याचें आरंभूं नये. जेव्हां अश्व, गज, रथ आणि पदाति यांनीं युक्त, विपुल यंत्रसामग्रीनें पूर्ण, आपल्यावर अनुरक्त अशी अफाट षडंगसेना[1] जवळ असेल आणि शत्रूपेक्षां आपण बलवत्तर आहों, अशी खात्री असेल, तेव्हांच राजानें विचार न करितां उघडपणें शत्रूवर चाल करून जावें. शत्रूशीं नेहमीं साम, मृदुपणा, त्याचें गुप्त शासन, त्यावर चालून जाणें, त्याच्या धान्याची नासधूस, त्याचें विषमिश्रित जल करणें किंवा त्याची अमात्य-कोशादि व्यवस्था, या गोष्टींचा वरचेवर विचार करीत बसूं नये. यांपैकीं एखाद्या उपायाचा प्रसंगानुसार उपयोग करावा. शत्रूवर नानाप्रकारचे कपटप्रयोग करावे, त्याच्या शत्रूंना त्याजवर उठवावें, परंतु आपल्या कीर्तीला कलंक लागेल, असें कृत्य करूं नये. आपल्या हितकर्त्यांकडून शत्रूंनीं नगरावर अथवा राष्ट्रावर योजिलेल्या अधिकाऱ्यांना वश करून घ्यावें. इंद्रा, पूर्वीं देखील आपल्या शहरांची योग्य व्यवस्था ठेवून राजांनीं शत्रूच्या नगरांत शिरून अनेक उपभोग्य वस्तु हरण करून आणल्या आहेत. राजा, ते राजे आपल्या लोकांना गुप्तपणें पैसा देऊन व बाहेरून ‘हे अपराधी असल्यामुळें ह्यांची मालमत्ता जप्त केली आहे,’ असें प्रसिद्ध करून शत्रूंच्या नगरांवर नजर ठेवण्यास त्यांची योजना करीत असत. त्याचप्रमाणें तूंहि अनेक सुशिक्षित शास्त्रवेत्त्या लोकांकडून आपल्या शत्रूंना मारविण्याचे कपटप्रयोग करावे.

---

१ षडंगसेना—रथ, तुरग, मातंग, पदाति, कोश आणि वाणिज्यमार्ग.

इंद्र—हे द्विजसत्तमा, दुष्ट पुरुषाचीं लक्षणें कोणतीं व अशा पुरुषाला मला कसें ओळखतां येईल, हें मी विचारीत आहें, तरी तें तूं मला सांग.

बृहस्पति—दुष्ट मनुष्य दुसऱ्याचे अवगुण त्याच्या मागें सांगत असतो आणि त्याच्या चांगल्या गुणांची असूया करितो. दुसरे कोणी त्याचे गुण गाऊं लागले असतां तोंड फिरवून स्वस्थ बसतो, जोरानें श्वासोच्छ्वास टाकितो, दांत-ओंठ चावतो आणि मस्तक हालवीत राहतो. तो दुसऱ्या मंडळींत मिसळतो, परंतु परकीयाप्रमाणें भाषण करितो. सांगितलेलें काम दृष्टीआड होतांच करीत नाहीं, प्रत्यक्ष भेट झाली असतां कांहींहि बोलत नाहीं, वेगळ्या ठिकाणीं जाऊन भोजन करितो आणि आज हें योग्य झालें नाहीं, हें चांगलें झालें नाहीं, म्हणून सांगत सुटतो. त्याच्या बसण्यांत, झोंपण्यांत आणि चालण्यांत देखील हे त्याचे अंतःकरणांतील भाव दिसून येतात. आतां दुसऱ्याला दुःख झालें असतां आपण दुःखी होणें आणि तो आनंदित असतां आपण आनंदित होणें हीं मित्रांचीं लक्षणें असून त्याच्या उलट असणें ही शत्रूंचीं लक्षणें होत. हे त्रिदशाधिपा, हीं मीं सांगितलेलीं लक्षणें ध्यानांत ठेव. दुष्ट मनुष्यांचा स्वभाव बलवत्तर असतो. हे सुरसत्तमा, शास्त्रतत्त्व श्रवण करून दुष्टांचीं लक्षणें मीं तुला बरोबर सांगितलीं आहेत.

भीष्म—हें बृहस्पतीचें भाषण ऐकून शत्रुनाश करण्याविषयीं उत्सुक इंद्रानें योग्य समयीं विजयप्राप्त्यर्थ सर्वत्र फिरून आपल्या सर्व शत्रूंना स्वस्वाधीन करून ठेविलें. १२. १. १०३.

---

## अध्याय १०४ था.

[ १ भीष्म युधिष्ठिराला कौसल्य-कालकवृक्षीयसंवाद रूपानें-अस्थिर ऐश्वर्य कसें असतें तें सांगतो. ]

युधिष्ठिर—धार्मिक, सुखेच्छु राजा अमात्यांकडून त्रस्त, संपत्तिहीन आणि कोश व दंड ( राजशासन ) विरहित झाला असतां त्यानें काय करावें ?

भीष्म—युधिष्ठिरा, ह्यासंबंधीं क्षेमदर्शी राजाचा इतिहास सांगत असतात, तो मी तुला सांगतों, लक्ष्यांत ठेव. पूर्वी क्षेमदर्शी नांवाचा राजपुत्र क्षीणबल होऊन संकटांत सांपडला असतां कालकवृक्षीय ऋषीकडे गेला आणि त्याला वंदन करून म्हणाला—

राजा—हे ब्रह्मन्, संपत्तीचा भाग मिळण्याला पात्र असून व तिजविषयीं पुनःपुनः प्रयत्न करूनहि माझ्यासारख्या पुरुषाला राज्यप्राप्ति झाली नाहीं, तर त्यानें काय करावें ? हे साधुश्रेष्ठा, मरण, दैन्य, पराश्रय आणि क्षुद्र आचार यांविरहित कांहीं अन्य उपाय मला सांग. मानसिक व शारीरिक व्याधींनीं ग्रस्त झालेल्या मजसारख्या मनुष्याला धर्म आणि कर्तव्य यांचें ज्ञान असणारे तुझ्यासारखे पुरुषच आधार होत. विषयोपभोगांचा त्याग करून ज्ञानरूपी द्रव्य प्राप्त झालें असतां शोक आणि प्रीति यांचा अर्थातच निरास होतो आणि मनुष्याला सुख होतें. जे केवळ द्रव्यामुळेंच सुखी दिसतात, अशा पुरुषांविषयीं मला कींव वाटते. मला पुष्कळ पैसा मिळाला, परंतु तो स्वप्नांत मिळाल्याप्रमाणें नाश पावला आहे. जे आपल्या विपुल द्रव्याचा त्याग करितात, ते खरोखर मोठें दुष्कर काम करीत असतात. द्रव्य जवळ नसूनहि आमच्या सारख्यांला त्याचा त्याग करतां येत नाहीं. हे ब्रह्मन्, त्यामुळेंच मी द्रव्यहीन होऊन दीन स्थितीला पोंचलों आहें, तरी जेणेंकरून मला सुख होईल, असें कांहीं तरी अन्य साधन सांग.

ह्याप्रमाणें त्या बुद्धिमान् कौशल्य राजपुत्रानें भाषण केल्यावर महातेजस्वी कालकवृक्षीय मुनीनें त्याला उत्तर दिलें.

मुनि—मी व माझें म्हणून जें कांहीं आहे, तें चिरंतन टिकणारें नाहीं, हें सुज्ञ मनुष्यानें आधीं ध्यानांत आणलें पाहिजे. जें आहे असें तुला वाटत आहे, तें नाहीं असें समज. अशा तऱ्हेनें वागणारा शहाणा मनुष्य घोर संकटांनीं व्याप्त झाला, तरी शोक करीत नाहीं. जें होऊन गेलेलें आहे व जें पुढें होणार आहे, तें झालेलें नाहीं व पुढें होणारहि नाहीं, अशी तुझी भावना झाली म्हणजे तूं अधर्मापासून मुक्त होशील. पूर्वीच्या राजांकडे व त्यांच्याहि पूर्वीच्या राजांकडे जें कांहीं होतें त्याचा तुझ्याशीं कांहींच संबंध नाहीं ! असें ज्ञान एकदां झालें असतां कोणता मनुष्य दुःखांत पडेल बरें ? जें कांहीं होतें, त्याचा नाश झाला आहे व जें नव्हतें तें उत्पन्न होणारें आहे. तेव्हां शोक करण्यांत कांहीं अर्थ नाहीं आणि म्हणून कांहीं झालें, तरी शोक कधीं करूं नये. हे राजा, तुझा पिता आज कोठें आहे ? तसेंच तुझा पितामह आज कोठें आहे ! आज ते तुझ्या दृष्टीस पडत नाहींस व तूंहि त्यांस दिसत नाहींस. आपली स्वतांची अशाश्वतता दिसत असतांहि तूं त्यांच्याकरितां वृथा शोक कां करीत आहेस ? शिवाय

तूं पक्कें जाण कीं तुलाहि मरावयाचें आहे. हे राजा, तूं, तुझे मित्र आणि तुझे शत्रु हे सर्व नाश पावणार आहेत. आज जे वीस किंवा तीस वर्षांचे दिसत आहेत, ते सर्व शंभर वर्षांच्या पूर्वीं नाश पावणार आहेत. विपुल द्रव्याचा त्याग करणें शक्य नसेल, तर 'हें माझें आहे' अशाप्रकारचें त्याजवरील ममत्व सोडून द्यावें, व आपलें कल्याण करून घ्यावें. जें आपल्या हातांत आलें नाहीं व जें पूर्वींच नष्ट झालें आहे, तें आपलें नव्हे, असें समजणारे व दैव बलवत्तर आहे असें मानणारे तेच पंडित होत. श्रेष्ठ बुद्धि आणि पौरुष यांमध्यें तुजसमान अथवा तुझ्याहूनहि अधिक योग्यतेचे लोक द्रव्य नसूनहि जीवंत राहतात व राज्यहि करितात. ते तुझ्यासारखा शोक करीत नाहींत. म्हणून तूंहि शोक करूं नकोस. बुद्धि आणि पौरुष या गुणांमध्यें तूं त्यांच्यापेक्षां अधिक किंवा निदान त्यांच्यांशीं तुल्यबल तरी नाहींस काय ?

राजा—हे ब्राह्मणा, प्रयत्नावांचून माझ्या स्वाधीन झालेलें हें सर्व राज्य प्रचंड अशा कालाच्या ओघांत सांपडून नाश पावणार आहे, हें मला समजतें. हे तपोधना, केवळ दैवयोगानें मिळेल, त्यावरच निर्वाह करून राहत असतां वाहून जाणाऱ्या जलप्रवाहाप्रमाणें कालाकडून हरण होणारें राज्य मी पहात आहें, त्याचेंच फल हा शोक होय.

मुनि—हे कोसलाधिपते, अर्थाचें वास्तविक स्वरूप ध्यानांत आणून भविष्य व भूत या दोन्ही कालांच्या स्थितीबद्दल कोणीं शोक करूं नये. तूंहि सर्व गोष्टींत अशा तऱ्हेनें वागत जा. ज्या वस्तु तुला मिळण्यासारख्या असतील, त्यांचीच अपेक्षा कर; न मिळणाऱ्या वस्तूंची इच्छा केव्हांहि करूं नकोस. प्राप्त झालेल्या स्थितीचा अनुभव घे आणि अप्राप्य वस्तूंचा शोक करीत बसूं नकोस. तुला जें कांहीं मिळालें असेल, तेवढ्यांतच तूं सुख मानून रहा. शुद्ध स्वभाव असलेला मनुष्य जरी द्रव्यहीन असला, तरी शोक करीत नाहीं. दुर्बुद्धि मनुष्य गेलेल्या वैभवासंबंधानें सृष्टिकर्त्यांची निंदा करीत असतो व मिळालेल्या द्रव्याच्या योगानें संतुष्ट राहत नाहीं. दुसरे नीच स्थितींत असलेले लोक श्रीमंत आहेत, असें त्याला वाटतें आणि ह्याच कारणामुळें त्याचें दुःख वाढत असतें. हे राजा, आपल्या पौरुषासंबंधीं अभिमान बाळगणाऱ्या लोकांना ईर्ष्या आणि अभिमान हीं असतात. हे कोसलाधीशा, तूं तसा मत्सरी नाहींसना ? तुझ्याजवळ जरी संपत्ति नसली, तरी ती दुसऱ्याजवळ असल्याचें

पाहून तुला वाईट वाटूं नये. शहाणे लोक दुसऱ्याच्या संपत्तीनेंहि सुखी असतात. मत्सरी मनुष्याजवळ जरी संपत्ति असली तरी ती त्याजवळून जाते.

धर्माचरण करणारे व योगधर्माचें ज्ञान असणारे धीर पुरुष संपत्तीचा आणि पुत्र-पौत्रांचा आपण होऊन त्याग करितात. दुसरे संपत्ति ही अति अस्थिर, अत्यंत चंचल आणि परम दुर्लभ आहे असें जाणून तिचा नाद सोडतात. तूं शहाणा असूनहि अस्थिर व पराधीन अशा संपत्तीची इच्छा धरून संताप कां करीत आहेस ? तुला ज्ञानाची इच्छा असल्यास ह्या अर्थांचा आधीं त्याग कर ! कारण हे सर्व अर्थ अनर्थरूप आणि अनर्थ हे अर्थरूप भासत असतात. कित्येकांचा अर्थप्राप्तीकरितांच अर्थनाश होत असतो. कोणी संपत्ति हेंच आत्यंतिक सुख असें समजून तिच्यामागें लागतात. दुसरे कोणी संपत्तीमध्येंच रममाण होऊन तिच्यापेक्षां कल्याणकारक दुसरें कांहीं नाहीं, असें समजून वागतात. अशा समजुतीनें त्यांचे उद्योग बंद पडून त्यांनीं कष्टानें मिळविलेली संपत्ति नष्ट होते आणि मग अर्थातच द्रव्याच्या संबंधानें त्यांला विरक्ति उत्पन्न होते. कांहीं कुलीन लोक धर्माचा स्वीकार करून लौकिक सुखाचा त्याग करितात आणि पारलौकिक सुखाची इच्छा करितात. कित्येक द्रव्यलोभी लोक धनावांचून जगणें व्यर्थ आहे, असें समजून जीविताचा त्याग करितात. अशा प्रकारच्या मनुष्यांचें अज्ञान आणि त्यांची क्षुद्र बुद्धि यांचा विचार कर ! जीवित हें अशाश्वत असतां हे सर्व अज्ञानानें अर्थावर दृष्टि ठेवून राहतात. संचय, आयुष्य आणि संयोग ह्यांचा शेवट अनुक्रमें विनाश, मरण आणि वियोग ह्यांत होत असल्यामुळें कोणता शहाणा मनुष्य यांत मन घालील ?

हे राजा, द्रव्याला पुरुष अथवा पुरुषाला द्रव्य हें अवश्य सोडून जावयाचेंच, तेव्हां कोणता सुज्ञ पुरुष त्याबद्दल शोक करीत बसेल ? दुसऱ्या लोकांचे सुद्धां आप्त आणि द्रव्य हीं नाहींशीं होतात, त्यांकडे पहा आणि राजा, मग आपल्या बुद्धिकल्पित विपत्तीविषयीं विचार कर. तूं आपल्या इंद्रियांचा निग्रह कर, मनाचें संयमन कर आणि वाणीला आंवरून धर. दुर्बळ आणि शत्रु अशा लोकांकडे जरी हे अर्थ गेले, तरीहि त्याचा निषेध कोणी करणार नाहीं. कारण ते प्राप्त होण्याकरितांच निर्माण झालेले आहेत. यदृच्छेनें त्यांचा वियोग झाला व ते परत मिळण्याचा संभव नसला तर तुझ्यासारखे ज्ञानसंतृप्त व पराक्रमी लोक शोक करीत बसत नाहींत. तुझ्यासारखा अल्पसंतुष्ट, निश्चयी,

मृदु, स्थिर आणि निश्चित बुद्धीचा ब्रह्मचर्य पालन करणारा कधीं शोक करीत नसतो. ही दुष्ट, क्रूर व हीन पुरुषांनाच योग्य अशी नृशंसवृत्ति तुला शोभत नाहीं. याहून फलमूलांवर उपजीविका करून, वाणीचें दमन करून, प्राणिमात्रावर दया ठेवून आणि आत्म्याचा निग्रह करून वनामध्यें एकटाच जाऊन रहा. सुळया दंतांच्या गजांबरोबर अरण्यामध्यें रममाण होणें आणि वन्य पदार्थांच्या योगानें संतुष्ट होणें हें ज्ञानी पंडिताला शोभण्यासारखें आहे. प्रचंड डोह क्षुब्ध झाला असतां जसा आपोआप शांत होतो, तसा तूंहि आपल्या मनाचें स्वतःच समाधान करून घे, म्हणजे ह्या ऐश्वर्यहीन स्थितीमध्येंहि तुला सुख मिळेल. तुझें जीवित सुखाचें होण्यास हाच एक उपाय मला दिसत आहे. हे राजा, ऐश्वर्य मिळण्याचा संभव नसतां, सचिवादिकांनीं त्याग केला असतां आणि दैव प्रतिकूल असतां, याहून श्रेयस्कर असा दुसरा कोणता मार्ग आहे, असें तुला वाटतें? १२–१–१०४.

---

## अध्याय १०५ वा.

[१ राजानें शत्रूवर जय मिळविण्याकरितां कपटाचें कसें वर्तन करावें, ह्याचें कालक-वृक्षीयसंवादांत कथन.]

(१) मुनि—हे क्षत्रिया, आपणामध्यें कांहीं पराक्रम आहे, असें जर तुला वाटत असेल तर तुला मी राज्यप्राप्तीसाठीं एक नीति सांगतों. त्या नीतीप्रमाणें वागणें जर तुला शक्य असेल आणि तदनुसार तूं करूं इच्छीत असशील, तर तुला जें मी सांगत आहें, तें लक्ष्यपूर्वक ऐक. त्याप्रमाणें तूं वागलास तर तुला विपुल द्रव्य मिळेल. राज्य, राज्यप्राप्तीचा मंत्र व अगणित ऐश्वर्याची तुला पुनः प्राप्ति होईल. हें तुला इष्ट वाटत असेल, तर मला सांग, म्हणजे मी तुला ती नीति सांगतों.

राजा—प्रभो, ती नीति तूं मला सांग. त्याप्रमाणें वागण्यास मी तयार आहें. तुझ्याशीं आज झालेला माझा हा समागम सफल होवो.

मुनि—ढोंगीपणा, काम, क्रोध, हर्ष आणि भीति यांचा त्याग करून, हात जोडून आणि प्रसंगविशेषीं प्रणाम करून तूं शत्रूंचीहि सेवा कर. त्यांची उत्कृष्ट आणि शुद्ध कर्मांनीं तूं आराधना कर. असें केल्यानें तो सत्यसंगर विदेहाधिपति तुला वेतनरूपानें द्रव्य देईल. तूं सर्व लोकांना प्रमाणभूत होऊन त्याचा

उजवा हात होऊन राहशील. मग तुला उत्साही, निर्व्यसनी, शुचिर्भूत असे साहाय्यक मिळतील. शास्त्रानुसार आचरण ठेवून मन आणि इंद्रियें ताब्यांत ठेवणारा राजा आपला स्वतःचा उद्धार करून प्रजेलाहि संकटांतून काढून तिला आनंदवितो. त्या धैर्यवान् आणि श्रीमान् जनक राजानें तुझा सत्कार केला असतां तूं सर्व लोकांना प्रमाणभूत व आदरणीय होशील. नंतर मित्रबळ मिळवून तसेंच उत्कृष्ट मंत्र्यांचा विचार घेऊन शत्रुराज्यांत फूट पाड आणि ज्याप्रमाणें बेलफळानेंच बेलफळ फोडतात, त्याप्रमाणें शत्रुहस्तेंच शत्रूचा नाश कर किंवा दुसऱ्यांशीं संधि करून ह्या शत्रूचा नाश कर. दुर्लभ आणि सुंदर अशा वस्तू–स्त्रिया, वस्त्रें, शय्यासनें, महामोलाचीं वाहनें, वाडे, पक्षी, पशुसमुदाय, उत्तमोत्तम खाण्याचे व सुगंधी पदार्थ आणि फळें इत्यादि–देऊन त्यांवर त्याच्या मनाची आसक्ति उत्पन्न कर. असें केल्यानें त्याचा नाश होईल.

अशा रीतीनें शत्रूचा वध करायाचा असला किंवा त्याची उपेक्षा करावयाची असली तरी ती गोष्ट सुनीतीचा विचार करून शत्रूला प्रकट करूं नये. शत्रूच्या राज्यामध्यें विद्वानांना संमत अशा मार्गानें तूं आनंदांत रहा. कुत्रा, हरिण आणि कावळा यांची वृत्ति–जागरूकता, भयचकितत्व आणि परेंगितज्ञत्व –धारण करून तूं त्यांमध्यें मैत्रीनें रहा. मोठमोठीं व दुःसाध्य अशीं कामें तूं त्या शत्रूंकडून करीव. बलाढ्य शत्रूबरोबर महानदीप्रमाणें विरोध कर. मोठमोठीं उपवनें, शय्या, आसनें, इत्यादि सुखोपभोगाच्या वस्तूंनीं त्याच्या खजिन्यांतील द्रव्य नाहींसें करून टाक. यज्ञदान करण्याविषयीं त्याला प्रवृत्त करून प्रसिद्ध प्रसिद्ध ब्राह्मणांचें त्याजकडे वर्णन कर आणि त्यांना आमंत्रणें द्यावयाला लाव. म्हणजे ते ब्राह्मण तुला अनुकूल होतील आणि त्याला लांडग्यांप्रमाणें खाऊन टाकितील.

पुण्यशील पुरुषांना निःसंशय सद्गति प्राप्त होते व स्वर्गामध्यें त्याला सर्वांत पवित्र असें स्थान मिळतें. हे कोसलाधिपते, धर्म किंवा अधर्म ह्या दोहोंमध्यें प्रवृत्त झालेल्या राजाचा कोश नष्ट झाला असतां तो शत्रूच्या स्वाधीन होतो. तेव्हां स्वर्ग आणि जय ह्या दोहोंलाहि मूळ कारण जो कोश त्याचा आधीं नाश झाला पाहिजे. कारण, त्याच्यामुळेंच शत्रु सर्वदा आनंदांत असतात. तूं सर्वदा त्यांच्याकडे प्रयत्नवादापेक्षां दैववादाचें वर्णन करीत जा. कारण, दैवपर मनुष्याचा निःसंशय नाश होत असतो. शत्रूकडून विश्वजित् यज्ञ करवून त्याचें

सर्वस्व हरण कर. नंतर मोठमोठ्या लोकांना होणाऱ्या पीडा त्याला निवेदन कर आणि त्यांचे निवारणार्थ कोणातरी योगसाधनी पवित्र मनुष्याचें त्याजकडे वर्णन कर. त्यामुळें सर्व त्याग करण्याची इच्छा होऊन तो राज्यत्यागहि करण्यास प्रवृत्त होईल. त्याचप्रमाणें सर्व शत्रुविनाशक अशा सिद्ध औषधांच्या उपायांनीं त्याचे गज, अश्व आणि मनुष्यें यांचा वध करून टाक. हे व अशा प्रकारचे अनेक दांभिक उपाय शास्त्रांत सांगितले आहेत. ते मनोनिग्रही, सहनशील पुरुषानेंच करणें शक्य आहे. १२. १. १०५.

---

## अध्याय १०६ वा.

[ १ कालक-वृक्षीयाच्या आज्ञेवरून कोसलाधिपतीस विदेहाधीशाकडून पुनः ऐश्वर्यप्राप्ति झाल्याचें भीष्माकडून युधिष्ठिरास कथन. ]

( १ ) **राजा**—हे ब्रह्मन्, कपट अथवा दंभ यांहीं निर्वाह करून राहण्याची माझी इच्छा नाहीं. केवढीहि मोठी संपत्ति असली तरी अधर्मानें ती मिळविण्याची माझी इच्छा नाहीं. मीं पूर्वींच या गोष्टीचा त्याग केला आहे. ज्याच्या योगानें लोक मजविषयीं शंका घेणार नाहींत आणि ज्या योगानें माझें पूर्ण कल्याण होईल, अशा मात्सर्यरहित धर्मानें मी राहूं इच्छितों. आपण सांगितलेल्याप्रमाणें करण्यास मी समर्थ नाहीं व आपणहि मला असें सांगणें योग्य दिसत नाहीं.

**मुनि**—हे क्षत्रिया, तुझे भाषणावरून तूं उत्तम शीलसंपन्न आहेस, असें मला वाटत आहे. तुझा स्वभाव आणि बुद्धिहि तुला अनुरूप आहेत. तेव्हां आतां तुम्हां दोघांच्या कार्यसिद्ध्यर्थ मी यत्न करीन आणि तुमचें चिरकाल टिकणारें सख्य घडवून आणीन. तुझ्यासारख्या कुलीन, मात्सर्यरहित, बहुश्रुत आणि राज्यकारभार चालविण्यास समर्थ अशा पुरुषाला कोणता राजा अमात्य करणार नाहीं ? कारण तूं राज्यभ्रष्ट होऊन आणि मोठ्या संकटांत पडूनहि कोणाशीं मत्सर न करितां सदाचरणानें वागूं इच्छित आहेस. तो सत्यवचनी विदेहाधिपति माझ्या येथें येईल, तेव्हां त्याला मी सांगेन, तसें तो निःसंशय करील.

**भीष्म**—असें बोलून त्या मुनीनें विदेहाधिपतीला बोलावून आणलें आणि म्हटलें, " हा राजकुलामध्यें जन्मला असून ह्याचें अंतःकरण मीं पूर्णपणें ओळ-

खिलें आहे. आरशाप्रमाणें ह्याचें हृदय शुद्ध आहे. हा शरत्कालच्या चंद्राप्रमाणें शुद्ध आहे. ह्याच्या ठिकाणीं पापाचा लेशहि मला दिसत नाहीं. मीं याची सर्व बाजूंनीं परीक्षा पाहिली आहे. माझ्यावर जसा तुझा विश्वास आहे, तसाच ह्याच्यावरहि ठेवून तूं ह्याच्याशीं संधि कर. कोणत्याहि राजाला अमात्यावांचून तीन दिवसहि राज्य चालवितां येणार नाहीं. अमात्य हा शूर आणि बुद्धिमान् असला पाहिजे. राज्य सुरळीत चालविण्याला ह्याच दोन गुणांची आवश्यकता आहे. धर्मनिष्ठ लोकांना ह्या प्रकारचें सद्गतिदायक दुसरें साधनच नाहीं. हा महात्मा राजपुत्र सज्जनांच्या मार्गाला अनुसरून वागणारा आहे. तूं ह्या धर्मनिष्ठ पुरुषाला आश्रय दिलास तर हा तुझ्या मोठमोठ्या शत्रूंचा निग्रह करील. कदाचित् स्वाधिकाराकरितां पितृपितामहांप्रमाणें तुला जिंकण्याची इच्छा करून हा तुझ्याशीं रणांगणावर युद्धार्थ उभा राहिला, तर तूंहि क्षत्रिय-व्रताला अनुसरून याच्याशीं युद्ध कर. क्षत्रियाचें युद्ध करणें हें स्वकर्मच होय. परंतु माझ्या आज्ञेनें तूं आपल्या कल्याणाकरितां म्हणून याच्याशीं युद्ध न करितां याला वश करून घे. अनुचित लोभाचा त्याग करून सर्वदा धर्मावर दृष्टि ठेव. काम किंवा द्रोह यांमुळें स्वधर्माचा त्याग करणें तुला इष्ट नाहीं. सर्वदा अमक्याचा खात्रीनें जय होईल, अथवा सर्वदा अमक्याचाच पराजय होईल, असें निश्चयात्मक सांगतां येणें शक्य नाहीं. म्हणून शत्रूला आपण अनुकूल करून घ्यावें. मनुष्यानें जय आणि पराजय हे आपल्या शरीरांतच पाहून घ्यावे. पूर्णपणें कार्यांत जय मिळविण्यास आपलीं इंद्रियें आपल्या स्वाधीन पाहिजेत. तशीं तीं नसल्यास आपल्या कार्यांत हानि होत असते."

हें त्याचें भाषण ऐकून विदेहाधिपति जनकानें त्या ब्राह्मणश्रेष्ठाचा गौरव-पूर्वक सत्कार केला आणि त्याच्या म्हणण्याला अनुमति देऊन म्हटलें, 'महा-प्राज्ञ, बहुश्रुत आणि आम्हां उभयतांच्याहि कल्याणाच्या इच्छेनें तूं जें सांगि-तलेंस, तें अगदीं योग्य आहे. जें जें तूं मला सांगितलेंस, त्या त्या प्रमाणें सर्व कांहीं मी करीन. तुझें म्हणणें सर्वथा मला श्रेयस्कर आहे, यांत किमपि संशय नाहीं.' नंतर त्या जनकानें कोसलाधिपतीस बोलावून म्हटलें, 'धर्मानें व नीतीनें मीं सर्व लोक जिंकिले, परंतु हे पार्थिवसत्तमा, तूं आपल्या गुणांनीं मला जिंकिलें आहेस. आतां तूं आपणाला तुच्छ मानून न घेतां जेत्याप्रमाणें रहा. मी तुझ्या बुद्धीचा आणि तुझ्या पराक्रमाचाहि अनादर करीत नाहीं. तसेंच मीं तुला जिंकिलें आहे, म्हणूनहि तुझा अवमान करणार नाहीं.

तूं जेत्याप्रमाणें खुशाल रहावें. तुझा मी योग्य सत्कार करीन, तूं माझ्या वाड्यामध्यें ये.'

असें म्हणून त्या दोघांनीं त्या मुनीचा सत्कार केला आणि नंतर ते जनकगृहाला गेले. तेथें गेल्यावर जनकानें त्या कोसलाधिपति क्षेमदर्शीचें योग्य प्रकारें पाद्य, अर्घ्य आणि मधुपर्क यांनीं पूजन करून सत्कार केला आणि त्याला आपली कन्या देऊन विविध रत्नेंहि अर्पण केलीं. अशाप्रकारचें वर्तन ठेवणें हाच राजांचा परम धर्म होय. जय आणि पराजय हे नेहमीं मनुष्याला यावयाचेच असतात. १२. १. १०६.

---

## अध्याय १०७ वा.

[ १ वीरमंडल कसें असावें, ह्याविषयीं कथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे शत्रुतापना, तूं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांचे धर्म, वृत्त, आचरण, द्रव्य, जीविकोपाय आणि त्यांना त्यापासून मिळणारें फल; राजांचें द्रव्य, कोश, कोशसंग्रह करण्याचे प्रकार; जय, अमात्यांचें वर्तन, प्रजेची उन्नति करण्याचे प्रकार; षड्गुणांची योजना, सैन्याचें वर्तन, दुष्टांचें परिज्ञान, सत्पुषांचीं लक्षणें; आपल्या बरोबरीच्या, कमी प्रतीच्या आणि आपल्यापेक्षां अधिक योग्यतेच्या पुरुषांचीं लक्षणें, मध्यम स्थितींतील लोकांच्या संतोषाकरितां वृद्धि पावणाऱ्या राजानें कसें वर्तन ठेवावें, क्षीणबल झालेल्या लोकांशीं त्यानें कसें वागावें, हें सर्व तूं धर्माला अनुसरून सुगम रीतीनें व उपदेशरूपानें मला सांगितलेंस. जयशील राजाचें वर्तन कसें असावें, तेंहि तूं मला सांगितलें आहेस. हे ज्ञानिश्रेष्ठा, आतां शूरांचें वर्तन कसें असावें, त्याविषयीं ऐकण्याची माझी इच्छा आहे. वीरांचा उत्कर्ष कसा होतो, त्यांच्यामध्यें कोणत्या उपायानें फूट पडणार नाहीं, ते शत्रूंना कोणत्या प्रकारानें जिंकण्याची इच्छा करितात, त्यांना मित्र कसे प्राप्त होतात? मला वीरसमुदायामध्यें फूट पडणें हें विनाशाचें कारण आहे, असें वाटतें. त्याचप्रमाणें ते वीरहि अनेक असल्यामुळें त्यांमध्यें कोणतीहि गोष्ट गुप्त राहणें अत्यंत कठीण आहे. म्हणून हे परंतपा, हें सर्व तुजपासून पूर्णपणें ऐकण्याची माझी इच्छा आहे. वीरांमध्यें जेणेंकरून फूट न पडेल, तें मला सांग.

भीष्म—हे भरतसत्तमा, वीरसमुदाय, कुळें आणि राजे यांमध्यें वैर पेटविण्याला लोभ आणि क्रोध हे कारण आहेत. प्रथमतः राजाला लोभ उत्पन्न होतो आणि नंतर त्याच्यापासून आपणाला प्राप्ति होत नाहीं, असें पाहून वीरांना क्रोध येतो. अशाप्रकारें ते एकमेकांचा नाश व त्याबरोबरच द्रव्याचाहि ऱ्हास करितात आणि गुप्त हेर, मंत्रशक्ति, बलात्कारानें द्रव्यग्रहण, सामदानादि उपाय यांनीं ते परस्परांना ओढून खालीं आणण्याचा प्रयत्न करीत असतात. ऐक्यानें एकत्र राहणाऱ्या वीरांना राजानें द्रव्यदान न केल्यामुळें त्यांमध्यें अर्थांतच भेदबुद्धि उत्पन्न होते आणि त्यांचीं अंतःकरणें कलुषित होऊन भयानें ते शत्रूला जाऊन मिळतात. असा भेद झाला म्हणजे तो वीरसमुदाय बर्बल होतो आणि मग शत्रु त्याला सहज जिंकूं शकतो. म्हणून वीरांनीं सर्वदा एकमतानें राहूनच कोणत्याहि कार्याला प्रवृत्त व्हावें. संघशक्ति, बळ आणि पौरुष यांच्या योगानें द्रव्यप्राप्ति होत असते आणि संघशक्तीनें राहणाऱ्या लोकांशीं बाहेरचे लोकहि मैत्रीनें वागतात. ज्ञानवृद्ध लोक सांगतात कीं, 'दुसऱ्यांशीं कपटवृत्तीनें न वागतां परस्परांची सेवा करून राहणारे लोकच सर्वदा सुखी असतात. शास्त्रानुसार सर्व धार्मिक व्यवहार चालविल्यानें आणि सर्वांवर योग्य नजर ठेविल्यानें वीरसमुदाय वृद्धि पावतात. पुत्र आणि बंधुवर्ग यांना निग्रहांत ठेवून, त्यांना नीतीचें वळण लाविल्यानेंहि वीरसमुदाय वृद्धि पावतात. तसेंच हेरांची योजना, मंत्र आणि कोशसंग्रह करण्याविषयीं सर्वदा तत्पर अशा वीरांचीहि भरभराट होत असते. हे नृपा, प्राज्ञ, शूर, महोत्साही व कार्यतत्पर अशा लोकांना नित्य मान देत राहिल्यानेंहि वीरसमुदायाचा उत्कर्ष होत असतो.

हे भरतसत्तमा, द्रव्यवान्, शूर, शस्त्रज्ञ आणि शास्त्रपारंगत वीर संकटांत सांपडून मूढ झालेल्यांना त्यांतून तारून नेत असतात. क्रोध, भेद, भय, दंड, छळ, निग्रह, वध ह्या गोष्टींमुळेंच वीरसमुदाय शत्रूला जाऊन मिळतात. म्हणून तूं प्रमुख प्रमुख वीरांचा सन्मान करीत जा. कारण, हे पार्थिवा, लोकयात्रा ही पुष्कळशी त्यांजवरच अवलंबून असते. वीरांमध्यें जे मुख्य असतील, त्यांच्यांशींच तूं गुप्त मसलती किंवा हेरांसंबंधीं विचार करीत जा. सर्वांना मसलत कळविणें कधींहि इष्ट नाहीं. वीरगणांमध्यें जे प्रमुख असतील, त्यांना घेऊनच त्या सर्वांचें हित तूं करावें. उलट पक्षीं त्यांच्यामध्यें फूट पडून ते आपल्या मताप्रमाणें वागूं लागल्यास कार्यहानि होऊन अनर्थ घडत असतात. वीरांमध्यें फूट पडून ते स्वेच्छेनुसार वागूं लागले असतां त्यांमधील शहाण्या लोकांनीं

मध्यें पडून त्यांचा त्वरित निग्रह केला पाहिजे. कुलांमध्यें एकदां कलह सुरू झाले आणि कुलांतील वृद्ध पुरुषांनीं त्यांकडे कानाडोळा केला म्हणजे त्यांच्या योगानें कुलाचा नाश होतो. आपापसांत फूट पाडणारें जें आभ्यंतर भय त्याचें प्रथमतः नियमन केलें पाहिजे. बाहेरील फूट ही निःसार असते. तीमध्यें भिण्यासारखें कांहीं नसतें. हे राजा, आभ्यंतर भय हें एकदम समूळ उच्छेद करून टाकितें. स्वाभाविकपणें क्रोध, मोह किंवा लोभ यांमुळें वीरांमध्यें बेबनाव होऊन परस्परांमध्यें भाषण बंद होणें हें पराभवाचें लक्षण होय. जाति आणि कुल हीं सर्वांचीं समान असल्यामुळें शत्रूला उद्योग, बुद्धि किंवा कांहीं लोभनीय वस्तु यांच्या योगानें वीरांमध्यें फूट पाडतां येत नाहीं. केवळ भेद व दान या दोन गोष्टींनींच वीरमंडळांमध्यें शत्रूला फूट पाडतां येते. म्हणून वीरांचा मोठा आधार म्हणजे संघशक्ति हाच होय. १२. १. १०७.

---



## अध्याय १०८ वा.

[ १ माता, पिता आणि गुरु ह्यांचें माहात्म्यवर्णन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भारता, धर्ममार्ग हा मोठा असून [illegible] पुष्कळ आहेत. तेव्हां या धर्मामध्यें अवश्य असें कोणतें कर्तव्य आहे आणि कोणतें कार्य तुझ्या मतें श्रेष्ठ आहे, कीं त्याच्या योगानें मला इहलोकीं व परलोकींहि उत्तम धर्मप्राप्ति होईल.

**भीष्म**—माता, पिता आणि गुरु यांची पूजा मला अत्यंत मान्य आहे. हींत आसक्त झालेल्या मनुष्याला उत्तम लोकांची प्राप्ति होऊन महद्यशहि मिळत असतें. म्हणून युधिष्ठिरा, ते जें सांगतील, तें धर्माला धरून असो किंवा धर्माला प्रतिकूल असो, मनुष्यानें अवश्य करावें. त्यांची अनुज्ञा न मिळाल्यास दुसऱ्या धर्माचें आचरण करूं नये. ते सांगतील, तोच निश्चयपूर्वक धर्म समजावा. माता, पिता आणि गुरु ही त्रयी म्हणजे स्वर्गादि तीन लोक, हेच ब्रह्मचर्यादि तीन आश्रम, हेच ऋग्वेदादि तीन वेद आणि हेच गार्हपत्यादि तीन अग्नि होत. पिता हा गार्हपत्य अग्नि असून माता ही दक्षिणाग्नि आणि गुरु हा आहवनीयाग्नि असें सांगितलें आहे. ह्या तीन अग्नींची योजना सर्वश्रेष्ठ आहे. ह्या तिघांची सेवा प्रमाद न करितां केल्यास तुला तिन्ही लोक प्राप्त होतील. पितृसेवेनें इहलोक, मातृसेवेनें परलोक आणि गुरुसेवेनें ब्रह्मलोक यांची प्राप्ति होते. हे भारता,

ह्या तिघांशीं तूं आपलें वर्तन उत्तम ठेव. तसें केल्यानें तुझी तिन्ही लोकांत उत्तम कीर्ति होईल, तसेंच तुझें कल्याण होऊन उत्तम फलदायक असा धर्म तुला घडेल. त्यांचा अतिक्रम केव्हांहि करूं नये. त्यांच्या आधीं अन्नसेवन करूं नये किंवा त्यांना दूषणहि देऊं नये. त्यांची नित्य शुश्रूषा करावी. ह्यांतच उत्तम पुण्य प्राप्त होत असतें.

हे राजसत्तमा, ह्या तिघांची उत्तम प्रकारें शुश्रूषा केल्यास कीर्ति, पुण्य, यश आणि उत्तम लोकांची प्राप्ति होईल. त्यांचा अनादर झाल्यास मनुष्याच्या सर्व क्रिया विफल होतात. जो या तिघांचा अवमान करितो, त्याला इहलोक नाहीं व परलोकहि नाहीं. या गुरुत्रयाचा ज्यांच्याकडून अनादर होतो, त्यांची कीर्ति इहलोकींहि नाहीं व परलोकींहि होत नाहीं. शिवाय त्यांचें परलोकीं कल्याणहि होत नाहीं. या तिघांसाठीं मीं आजपर्यंत जें अर्पण केलें, त्याच्या शंभर किंवा सहस्र पटीनें मला फल मिळालें आहे. त्याचमुळें हे युधिष्ठिरा, मला तिन्ही लोकांचें ज्ञान आहे. दहा श्रोतियांपेक्षां एका आचार्याची योग्यता अधिक आहे. दहा आचार्यांपेक्षां एका उपाध्यायाची योग्यता श्रेष्ठ आहे. दहा उपाध्यायांहून पित्याची योग्यता श्रेष्ठ आहे. दहा पित्यांपेक्षां किंवा सर्व पृथ्वीहूनहि मातेची योग्यता श्रेष्ठ गणली आहे. माता ही सर्वांत श्रेष्ठ असून तिच्यासारखा दुसरा गुरु नाहीं. असें आहे, तथापि माझ्या मतें मातेपेक्षां किंवा पित्यापेक्षां गुरूची योग्यता अधिक आहे. मातापिता ह्यांचा संबंध जन्मापुरताच असतो. हे केवळ शरीराचीच उत्पत्ति करितात, परंतु गुरु जन्म दिव्य आणि अजरामर करितो. मातापितरांनीं जरी आपला अपकार केला, तरी ते अवध्यच होत. असें केल्यानें तो पुत्र दूषित होत नाहीं, किंवा त्याबद्दल राजालाहि दोष लागत नाहीं. आपला धर्म समजून जे आई-बापांचा वध करीत नाहींत, त्यांवर देव आणि ऋषि यांची सर्वदा कृपा असते.

जो गुरु वेदशिक्षण देऊन त्या योगानें दिव्य ज्ञानाची प्राप्ति करून देतो, तो माता-पितरांसमान समजावा. त्याचा केव्हांहि द्रोह करूं नये. गुरूपासून विद्याग्रहण करून जे त्याचा मनानें व कर्मानें मान ठेवीत नाहींत, त्यांना भ्रूणहत्येहून मोठें पातक लागतें. त्यांच्याहून अधिक पातकी दुसरा कोणी या जगांत नाहीं. ज्या भावनेनें गुरु त्यांशीं वागतो, त्याच भावनेनें त्यांनींहि गुरूंचा आदर ठेवावा. ज्यांना म्हणून सनातन धर्माची आवड असेल, त्यांनीं ह्या

गुरुत्रयाचा बहुमान करावा, त्याचें पूजन करावें व आपणाला मिळेल, त्याचाहि भाग त्याला द्यावा. ज्याच्या योगानें पितरांची आपण तृप्तता करितों, त्यानें प्रजापति संतुष्ट होतो. ज्याच्या योगानें आपण मातेला तृप्त करितों, त्यानें पृथ्वी संतुष्ट होते आणि ज्यानें आपण गुरूला तृप्त करितों, त्यानें ब्रह्म संतृप्त होतें. म्हणून माता किंवा पिता यांपेक्षां गुरूची योग्यता श्रेष्ठ आहे. गुरूचें पूजन केलें असतां देव, ऋषि आणि पितर हे तृप्त होतात. म्हणूनच गुरु हा सर्वांत श्रेष्ठ आहे. कोणत्याहि प्रकारच्या वर्तनानें आपण गुरूचा कधींहि अपमान करूं नये. त्याचप्रमाणें मातापितरांचाहि अवमान आपण कधीं करूं नये. त्यांचाहि गुरूप्रमाणेंच मान ठेवावा. त्यांचा अपमान करूं नये. त्यांच्या कृतीलाहि आपण दोष देऊं नये. गुरूंचा सत्कार करणाऱ्याला देव आणि महर्षि अनुग्राह्य समजतात. गुरु, पिता आणि माता ह्यांचा मनानें आणि कृतीनें जे द्रोह करितात, त्यांचें पातक भ्रूणहत्येहूनहि अधिक योग्यतेचें असतें. ह्या लोकामध्यें त्याहून अधिक पातकी असा कोणी नाहीं. तसेंच ज्यांनीं जन्म देऊन आपणाला पोसिलें, त्या मातापितरांना जो पोशीत नाहीं, त्यालाहि भ्रूणहत्येहून अधिक पाप लागतें. त्याहून अधिक पापी या जगांत दुसरा कोणी नाहीं. मित्रद्रोही, कृतघ्न, स्त्रीघातकी आणि गुरुद्रोही या चार प्रकारच्या पातक्यांना कांहीं प्रायश्चित्त असल्याचें माझ्या ऐकण्यांत नाहीं.

याप्रमाणें ह्या लोकीं मनुष्यानें जें कांहीं करावयाचें असतें तें सर्व तुला सविस्तर सांगितलें आहे. हेंच आचरण श्रेष्ठ होय. ह्याहून दुसरें श्रेष्ठ कांहीं नाहीं. धर्माला अनुसरून हें सर्व मीं तुला सांगितलें आहे. १२. १. १०८.

---

## अध्याय १०९ वा.

[ १ सत्यासत्यविवेचन. ]

(१) **युधिष्ठिर**—हे भारता, धर्मामध्यें राहूं इच्छिणाऱ्या मनुष्यानें कशाप्रकारें वागावें, हें जाणण्याची मला इच्छा आहे, तर तें तूं मला सांग. हें जग सत्य आणि अनृत या दोहोंनीं व्याप्त होऊन राहिलें आहे. त्यांपैकीं धर्मनिश्चयी मनुष्यानें कोणतें स्वीकारावें ? खरें कोणतें, असत्य कोणतें, सनातन धर्माला अनुसरून कोणती गोष्ट आहे, कोणत्या काळीं सत्य बोलावें आणि कोणत्या वेळीं असत्य बोलावें ?

भीष्म—सत्य बोलणें हेंच फार चांगलें. सत्याहून श्रेष्ठ दुसरें कांहीं नाहीं. तथापि ह्यासंबंधी लोकांची समजूत चुकीची झाली आहे, म्हणून सांगतों. कधीं कधीं सत्य न बोलतां असत्य भाषण करणें प्राप्त होतें. कारण असत्याला सत्याचें स्वरूप येतें आणि सत्याला असत्याचें स्वरूप येतें. जेथें सत्य कोणतें ह्याचा निर्णय होत नाहीं, तो मनुष्य मूर्ख असल्यामुळें त्याच्या हातून दोष घडतात. सत्य आणि असत्य ह्यांचें ज्ञान बरोबर झाल्यावरच मनुष्य धर्मज्ञ होतो. मनुष्य जरी अनार्य, दुर्बुद्धि आणि कठोर अंतःकरणाचा असला, तरी प्राण्यांना पीडा देणाऱ्या, अंधाचा वध करणाऱ्या, बलाक व्याधाप्रमाणें त्याच्या पदरीं एखाद्या वेळीं महत्पुण्य पडतें. तसेंच ज्याला धर्माचें सूक्ष्म तत्त्व बरोबर कळत नसतें, असा एखादा धार्मिक मनुष्य सत्यधर्म पाळण्याकरितां चोराला ब्राह्मणांचा मार्ग दाखविणाऱ्या सत्यवादी कौशिकाप्रमाणें[1] नरकांत पडतो, ह्यांत नवल तें काय ? गंगातीरावरील सहस्रशः सर्पांचीं अंडीं फोडणाऱ्या उलूक ( घुबड ) पक्ष्याप्रमाणें मनुष्याला एखाद्या वेळीं मोठें पुण्य लागतें. हा तुझा प्रश्न असा आहे कीं, त्यांतून धर्म कोणता हें शोधून काढणें अत्यंत कठीण आहे. मग हा प्रश्न निश्चयपूर्वक ठरवावा तरी कसा ? आणि प्राणिमात्राच्या अभ्युदयासाठींच धर्म सांगितलेला आहे, म्हणून तो अभ्युदय ज्याच्या योगानें साधेल, तोच धर्म होय. धारण करणारा तो धर्म होय. धर्मानें ह्या सर्व प्रजा धारण केल्या—बांधल्या गेल्या—आहेत. म्हणूनच ज्याच्या योगानें लोकांचें धारण केलें जातें, तो धर्म होय, असें सांगितलें आहे.

ज्याच्या योगानें प्राणिमात्राला पीडा होत नाहीं, तोच धर्म असें सांगितलें आहे. म्हणून जेथें प्राण्यांच्या हिंसेचा संबंध पोंचत नाहीं, तोच धर्म होय, असें निश्चयपूर्वक समजावें. कित्येकांच्या मतें श्रुतींत सांगितलेला तोच धर्म होय. दुसऱ्या कित्येकांच्या मतानें तो धर्म नाहीं. ह्या त्यांच्या मतांबद्दल आम्ही त्यांना दोष देत नाहीं. कारण श्रुतींत सांगितलेली प्रत्येक गोष्ट विधिरूप आहे असें नाहीं. जे कोणी दुसऱ्याचें धन अन्यायानें हरण करूं इच्छितात, त्यांना तें कोणत्या ठिकाणीं आहे, हें आपणाला ठाऊक असलें तरी न सांगणें हा धर्म होय. कांहीं न सांगितलें असतां सुटका होण्यासारखी असेल तर, कांहींच सांगूं नये. परंतु कांहींतरी सांगितल्याशिवाय सुटका नाहीं, किंवा न सांगि-

[1] ही कथा भाग ८ वा, कर्णपर्व अध्याय ६९, पृष्ठ ४५७ येथें आली आहे.

तल्यास आपल्याविषयीं संशय येण्याचा संभव आहे, असें जेथें असेल, तेथें सत्यापेक्षां असत्य सांगणेंच चांगलें. इतकेंच नव्हे, तर खोटी शपथ घेऊनहि त्या पाप्यांच्या हातून आपली सुटका होत असल्यास करून घ्यावी. शक्य असल्यास त्या पाप्यांना कांहींहि द्रव्य देऊं नये. कारण, पाप्यांना द्रव्य दिलें असतां तें त्या देणाऱ्याला पीडादायक होतें. कोणी दोघांनीं व्यापारास आरंभ करून धन तुझें, श्रम माझे आणि लाभ होईल तो दोघांचा सारखा, असा ठराव केला. पुढें चोरांकडून तें धन हरण केलें गेलें. तेव्हां व्यापारास पैसे देणारा धनको ऋणकोकडे पैसे मागूं लागला आणि त्याजपासून धन मिळविण्याच्या इच्छेनें त्याच्या शरीरास पीडा देऊं लागला. खऱ्या गोष्टीच्या पुराव्याकरितां त्यानें साक्षीदारहि आणले. अशा प्रसंगीं ते साक्षीदार 'यानें धनकोकडून अमुक पैसे घेतले' असें सांगतील, तर ते अनृतवादी होत.

एखाद्याचा प्राणनाश होत असतां किंवा विवाहकालीं असत्य भाषण केल्यास हरकत नाहीं. दुसऱ्याच्या द्रव्यरक्षणार्थ आणि दुसऱ्याच्या अर्थप्राप्त्यर्थ धर्माला अनुसरून असत्य भाषण करणारा नीच असला, तरी तो धर्माचीच इच्छा करणारा होय. एखाद्यानें वचन दिलें असतां व तें पाळण्याविषयीं तो समर्थ असतां जर तो मोडूं इच्छील, तर बलात्कारानें त्याला तें पाळण्याला भाग पाडावें. धर्मापासून भ्रष्ट होऊन अधर्माचें आचरण करणाऱ्या शठ मनुष्याचा वाटेल त्या उपायानें वध करावा. कारण, असें न केल्यास तो आसुर मार्गाचें अवलंबन करून त्यावरच उपजीविका करून राहील. पापी मनुष्याचा धर्म म्हटला म्हणजे एक धन हाच होय. अशा लोकांचें वर्तन सहन करूं नये किंवा त्यांच्याशीं कोणताहि संबंध ठेवूं नये. आपल्या दुष्टपणानेंच ते धर्मभ्रष्ट झालेले असतात. देव आणि मनुष्य या दोन्ही लोकांला मुकून ते प्रेततुल्य झालेले असतात. अशा यज्ञहीन व तपोहीन पुरुषांशीं कोणताहि संबंध ठेवूं नये. धनलाभासाठीं अत्यंत दुःखकारक असा प्राणनाश देखील झालेला बरा असें त्यांस वाटतें. पाप्यांमध्यें 'ह्या धर्माचा तूं स्वीकार कर,' असा उपदेश केल्यानें वळणारा कोणीच नसतो. आपण करितों तोच धर्म असें प्रत्येकाला वाटत असतें. अशा पापी मनुष्याचा जो वध करील, त्याला पाप लागत नाहीं. ते आपल्या कर्मानेंच हत झाले असल्या कारणानें त्यांना मारणें म्हणजे मृतांनाच मारण्यासारखें होय. अशा विचारहीन मनुष्याचा वध करण्यांत पुण्य प्राप्त होत असतें.

कपटाचरणानें उपजीविका करणारे हे लोक काक आणि गृध्र ह्यांप्रमाणेंच असल्यामुळें देहपात झाल्यावर ते त्याच योनींत जन्म घेतात. जो ज्याच्याशीं जशा रीतीनें वर्तत असतो, त्यानें त्याच्याशीं तशाच रीतीनें वर्तन ठेवावें. कपटी मनुष्याशीं कपटानें वागावें आणि सदाचरणानें वागणाऱ्याशीं सदाचरणानें वागावें. १२. १. १०९.

---

## अध्याय ११० वा.

[ १ संकटांतून तरून कसें जावें, त्यासंबंधीं युधिष्ठिराला उपायकथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भारता, प्राप्त स्थितींत प्राणिमात्र निरनिराळया गोष्टींनीं क्लेश पावत असतां कोणत्या उपायाचें अवलंबन केलें असतां ते त्या संकटांतून पार पडतील, तें मला सांग.

**भीष्म**—निरनिराळया आश्रमांमध्यें राहून जे आत्मनिग्रही ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यथाशास्त्र आचरण करितात; जे दांभिकपणानें वागत नाहींत; ज्यांचें वर्तन नियमबद्ध असतें; जे इंद्रियनिग्रही असतात; जे कोणी निंदा केल्यास उलट निंदा करीत नाहींत; दुसऱ्यानें पीडा केली असतां त्यास पीडा करीत नाहींत; जे दान करितात, परंतु याचना कधींहि करीत नाहींत; अतिथींना जे नित्य आपल्या गृहीं ठेवून घेतात; जे कोणाचा हेवा करीत नाहींत; जे सर्वदा अध्ययनशील असतात; जे धर्मवेत्ते मातापितरांशीं योग्य वर्तन ठेवून वागतात; जे दिवसा झोंप कधींहि घेत नाहींत; क्रिया, वाचा आणि अंतःकरण यांच्या योगानें जे पापाचरण करीत नाहींत आणि प्राण्यांवर विनाकारण हात उगारीत नाहींत, ते संकटांतून मुक्त होतात.

जे राजे विकारयुक्त होऊन लोभामुळें कोणाचेंहि द्रव्य हरण करीत नाहींत; जे आपल्या राष्ट्राचें रक्षण करितात; जे स्वस्त्रीशींच ऋतुकालीं संबंध ठेवतात; जे सर्वदा अग्निहोत्रांत तत्पर असतात; जे शूर संग्रामभूमीवर प्राणांचीहि पर्वा न करितां धर्माला अनुसरून ध्येयाची इच्छा करितात; जे प्राणत्याग येऊन ठेपला असतांहि सत्यच भाषण करीत असतात; जे भूतमात्राला आधारभूत असतात; ज्यांचें वर्तन कपटाचाररहित असतें; जे सर्वदा गोड भाषण करितात; ज्यांचें द्रव्य न्याय्य मार्गानेंच मिळविलेलें असतें; ते सर्व संकटें तरून जातात.

जे तपोनिष्ठ ब्राह्मण उत्तम प्रकारचें तप करून अनध्यायाचे दिवशीं अध्ययन करीत नाहींत; जे कौमार्यावस्थेपासून ब्रह्मचारी राहून विद्या आणि देवव्रतें पाळतात आणि तपश्चर्या करितात; जे महात्मे रजतमांचा त्याग करून सत्त्वस्थ झालेले असतात; ज्यांची भीति कोणालाहि नसते व जे कोणालाहि भीत नाहींत; जे सर्वांचे ठिकाणीं सारख्या रीतीनें वागतात; जे पुरुषश्रेष्ठ दुसऱ्याचें वैभव पाहून संताप पावत नाहींत; ग्राम्य गोष्टींकडे ज्यांचें लक्ष्य नसतें; जे सर्व देवतांचें पूजन करितात आणि शांत होऊन श्रद्धापूर्वक सर्व धर्मांचें श्रवण करितात; जे दुसऱ्यांकडून मानाची इच्छा करीत नाहींत, परंतु जे स्वतः दुसऱ्यास मान देतात; मान्य लोकांपुढें जे मस्तक नमवितात; जे विशुद्ध मनानें संततीची इच्छा करून तिथि तिथीला श्राद्धें करितात; जे क्रोधाला आंवरून धरितात आणि दुसऱ्याचा क्रोधहि शांत करितात; जे कोणावरहि क्रोध करीत नाहींत; जे मधु आणि मांस यांचा त्याग करितात; त्याचप्रमाणें जन्मापासून ज्यांनीं मद्याला कधींहि स्पर्श केला नाहीं, ते संकटें तरून जातात.

जे केवळ जीवित चालावें, यासाठींच अन्न भक्षण करितात; संतानाकरितांच स्त्रीसमागम करितात; ज्यांची वाणी सत्यभाषणाकरितांच असते; त्याचप्रमाणें जो प्राणिमात्राचें पालन करणारा, जो जगताच्या उपत्ति-विनाशाला कारणभूत, अशा श्रीनारायण परमात्म्याला जे भजतात, ते सर्व संकटांतून मुक्त होतात. ज्या परमेशाचे नेत्र सूर्यकमलांप्रमाणें आरक्त आहेत, जो पीतांबरधारी असून महाबाहु आहे, जो सर्वांचा हितकर्ता, बंधु, मित्र आणि संबंधी आहे, जो अचिन्त्यस्वरूपी प्रभु सर्व लोकांना चर्माप्रमाणें वेष्टून राहिला आहे, जो वैकुंठाधिपति प्रभु तुझे आणि अर्जुनाचे कल्याणाकरितां सर्वदा सज्ज होऊन राहिला आहे, त्याचा आश्रय करून जे त्याची भक्ति करितात, ते सर्व संकटें तरून जातात, यांत संशय नाहीं. संकटें तरून जाण्याच्या मार्गाचें जे पठण करितात, दुसऱ्यांना ऐकवितात किंवा ब्राह्मणांना कथन करितात, तेहि संकटमुक्त होतात.

हे अनघा, याप्रमाणें मनुष्य इह-परलोकीं जेणेंकरून संकटें तरून जातात, त्या क्रिया तुला मीं थोडक्यांत निवेदन केल्या आहेत. १२. ११. १०.

---

## अध्याय १११ वा.

[ १ चांगले-वाईट सेवक ओळखण्याचीं लक्षणें काय, असा युधिष्ठिराचा प्रश्न. २ व्याघ्र-गोमायुसंवादरूपानें भीष्माकडून त्याचें कथन. ]

(१) **युधिष्ठिर**—ताता भीष्मा, कित्येक लोक दिसण्यांत चांगले असतात, परंतु खरोखर ते तसे नसतात. दुसरे कित्येक चांगले असूनहि दिसण्यांत वाईट दिसतात. अशा लोकांना कसें ओळखावें, तें सांग.

(२) **भीष्म**—युधिष्ठिरा, ह्यासंबंधी व्याघ्र आणि गोमायु यांमधील संवाद पुरातन इतिहास म्हणून लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. पूर्वीं पुरिका नांवाच्या वैभवशाली नगरामध्यें पौरिक नांवाचा राजा होऊन गेला. तो परहिंसेमध्यें सर्वदा रत असा क्रूर नराधम होता. आयुष्य संपल्यावर पूर्वकर्मानुसार अनिष्ट अशा कोल्ह्याच्या जन्माला तो आला. पूर्वींच्या जन्मांतील वैभवाची आठवण होऊन त्याला फार वाईट वाटलें. तें इतकें कीं दुसऱ्यांनीं आणून दिलेलें मांसहि तो भक्षण करीत नसे. तो कोणाहि प्राण्याची हिंसा करीत नसे. सर्वदा सत्य भाषण करी व कडक व्रत पाळीत असे आणि खालीं पडलेलीं फळें यथाकालीं भक्षण करून उदरनिर्वाह करीत असे. त्याची राहण्याची जागा स्मशानांत होती व तेथें राहणें त्याला फार आवडत असे. तीच त्याची जन्मभूमि असल्यामुळें दुसऱ्या ठिकाणीं राहणें त्याला आवडत नसे. त्याच्या जातभाईंना ही त्याची शुचिर्भूतता सहन न होऊन अत्यंत नम्र भाषणानें ते त्याच्या निश्चयापासून त्याला ढळविण्याचा प्रयत्न करूं लागले. ते म्हणाले, 'ह्या भयंकर स्मशानांत तूं शुद्ध आचरणानें राहण्याची इच्छा करीत आहेस. तूं मांसभक्षक असल्यामुळें असलें वर्तन ठेवणें हें विरुद्ध आहे. तूं आमच्यासारखें वागावें; आम्ही तुला खावयाला देऊं, तें तूं खावें. तूं ह्या शुचिर्भूतपणाला सोडून दे; जें तुझें नेहमींचें अन्न तेंच तूं खात जा.'

हें त्यांचें भाषण ऐकून त्यानें मोठ्या शांततेनें मधुर, विस्तृत, सौम्य आणि हेतुपूर्ण वाक्यांनीं उत्तर दिलें. तो म्हणाला, "माझ्या जन्मावरून कुल ठरविणें योग्य होणार नाहीं. शीलानेंच कुलाचें महत्व ठरलें जावें. ज्याचे योगानें माझें यश वाढत जाईल, असें कर्म करण्याची माझी इच्छा आहे माझा जन्म स्मशानांत झाला आहे, तरी तेथें देखील समाधानवृत्ति कशी राहते, तें ऐका. मनुष्याच्या स्वभावानुरूप त्याच्या हातून कर्में घडत असतात. आश्रम हा कांहीं धर्माला कारण होत नाहीं. आश्रमांत राहून मनुष्याच्या हातून ब्रह्महत्या

घडली तर पाप लागत नाहीं काय? अथवा कोणत्याहि आश्रमांत न राहतां मनुष्यानें गाईचें दान केलें तर तें व्यर्थ जातें काय? तुम्ही केवळ स्वार्थलोभानें भक्षणांत आसक्त झाला आहां. तुम्ही मोहित झाल्याकारणानें परिणामीं होणाऱ्या नीच दोषांकडे तुमचें लक्ष्य जात नाहीं. ह्या दोषांमुळेंच जी असंतोषकारक, गर्ह्य, धर्महानीमुळें दूषित आणि इह-परलोकीं अनिष्ट अशी वृत्ति ती मला आवडत नाहीं." हें ऐकून तो गोमायु अतिशहाणा व पवित्र आहे, असें समजून एका पराक्रमी व्याघ्रानें त्याचा योग्य सत्कार केला आणि त्याला आपला सचिव होण्याची विनंति केली.

व्याघ्र—हे सौम्या, तुझा स्वभाव मला समजून आला. तूं माझ्या बरोबर वाटेल तिकडे फिर. तुला जे भोग आवडत असतील, त्यांचा उपभोग घे आणि तुला जे आवडत नसतील त्यांचा त्याग कर. आम्ही फार निष्ठुर आहों अशी आमची ख्याति आहे. म्हणून तूं सौम्यपणें वागलास, तर आमच्याकडून तुझें हित आणि कल्याण होईल.

हें त्या महात्म्या मृगराजाचें भाषण ऐकून तो गोमायु कृतज्ञतेनें किंचित् नम्र होऊन बोलला.

गोमायु—हे मृगराजा, माझ्याविषयीं तूं जें भाषण केलेंस, तें तुला अगदीं योग्य आहे. तूं धर्मार्थकुशल आणि शुचिर्भूत अशा अमात्याचा शोध करीत आहेस. कोणाहि राजाला अमात्यावांचून महत्त्व मिळणें शक्य नाहीं आणि अमात्य दुष्ट असून जर त्याच्या हातून दुष्टपणानें शरीराला अपाय होणारा असेल, तर त्याकडे तें महत्त्व राखलें जाणें कधीं शक्य नाहीं. जे आपल्यावर प्रेम करणारे, नीतिनिपुण, एकमेकांशीं सहायतेनें वागणारे, परस्परांशीं संबंध नसलेले, जुटीनें वागणारे, परस्परांपासून स्वतंत्र असलेले, आपल्या जयाची इच्छा करणारे, लोभरहित, दानाच्या कामीं कालातिक्रम न करणारे आणि विचारशील आहेत, अशांनाच तूं सचिव करून त्यांचा गुरूप्रमाणें अथवा पितरांप्रमाणें बहुमान कर.

हे मृगाधिपा, संतोषावांचून दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीची आवड मला नाहीं. सुखकारक भोगांची अथवा त्यासंबंधीं ऐश्वर्याची इच्छा मला नाहीं. त्याचप्रमाणें तुझ्या जुन्या नोकरांशीं माझें कधीं पटणार नाहीं. माझ्यासंबंधीं ते दुष्ट तुझें मन बिघडवून टाकतील. हे केवढेहि वैभव-

संपन्न असले, तरी त्यांचा आश्रय मला प्रशस्त वाटत नाहीं. मी आत्मसंयमी, मोठा भाग्यवान्, पापयांविषयींहि अनिष्ठुर, दीर्घदर्शी, उत्साहसंपन्न, दानशूर, सामर्थ्यवान्, कुशल आणि तृप्त असून वाटतील ते उपभोग घेणारा आहें. कोणत्याहि कामांत मला अपयश ठाऊक नाहीं. थोडक्यानें मी कधीं संतुष्ट होत नाहीं. सेवावृत्ति मीं कधीं केली नाहीं व ती कशी करावयाची याचेंहि ज्ञान मला नाहीं. स्वच्छंद रीतीनें मी वनांत फिरत असतों. राजाचा आश्रय जे करितात, त्यांना राजाचें बोलणें सोसून घेणें भाग पडतें. वनामध्यें राहणाऱ्यांना निर्भयपणें व्रताचरण करितां येतें. राजाकडून निमंत्रण येतांच मनामध्यें जी भीति उत्पन्न होते, ती फळें-मूळें खाऊन संतोषानें उपजीविका करणाऱ्यांच्या मनाला कधीं वाटत नाहीं. श्रमरहित मिळालेलें पाणी व ज्याला पुढें धोका आहे, असें मिष्टान्न या दोहोंचा विचार केला असतां ज्यांत शांति आहे तेंच सुख होय, असें माझें मत आहे.

राजांच्या आरोपांवरून दोषी ठरून जितके सेवक वध पावले आहेत, तितके खऱ्या अपराधानें सुद्धां शिक्षा पावलेले नाहींत. हे मृगेंद्रा, इतकें असूनहि हें काम मींच केलें पाहिजे, असा तुझा आग्रह असेल, तर माझ्याशीं तूं कसें वागावेंस, यासंबंधीं तूं करार करावा, अशी माझी इच्छा आहे. माझे जे कोणी आहेत, त्यांचा तूं मान केला पाहिजे, तसेंच माझें हितकर भाषण तूं ऐकलें पाहिजे. जी तुझी वृत्ति मी ठरवून देईन, ती स्थिर असावी. तुझ्या दुसऱ्या मंत्र्यांशीं मी कधींहि विचारविनियम करीत बसणार नाहीं. कारण ते नयकुशल वैभवप्राप्त्यर्थ माझ्याविषयीं तुला खोटें सांगतील. मी त्यांना एकेकट्याला गांठून एकांतीं हितकारक जें असेल, तें सांगेन. तूं आपल्या ज्ञातीसंबंधी हिताहिताच्या गोष्टी मला कधीं विचारूं नये. माझा विचार घेऊन नंतर तूं अमात्यांना त्रास देऊं नये. त्याचप्रमाणें तूं रागानें माझ्या लोकांना शिक्षा करूं नये.

अशाप्रकारचें त्या गोमायूचें भाषण ऐकून 'ठीक आहे' असें बोलून त्या मृगराजानें त्याचा बहुमान केला आणि त्याला आपला सचिव केलें. सचिवाच्या कामांत सर्वत्र त्याचा मान होत असल्याचें पाहून पूर्वीच्या सेवकांनीं आपापसांत कट करून त्याचा द्वेष करण्यास आरंभ केला. मित्रबुद्धि दाखवून व त्याचें मन वळवून ते दुष्ट त्याच्याशीं गोड भाषण करूं लागले. अशा रीतीनें

त्यांनीं त्याला आपल्या मंडळींत आणण्याची पुष्कळ खटपट केली. परद्रव्या-पहारी त्या दुष्टांना पूर्वीप्रमाणें आतां त्या गोमायूच्या नियंत्रणामुळें दुसऱ्यांकडून द्रव्य काढतां येणें अशक्य झालें. नंतर महत्पदाची इच्छा करून गोड गोड गोष्टी बोलून आणि पुष्कळ द्रव्य देण्याचें आमिष दाखवून त्याचें मन लोभ-विण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. तथापि त्या महाप्राज्ञ गोमायूचें मन यत्किंचितहि ढळलें नाहीं. नंतर दुसऱ्या कित्येकांनीं त्या गोमायूचा नाश करण्याच्या हेतूनें मृगराजासाठीं तयार करून ठेविलेलें त्याच्या आवडीचें मांस तेथून नेऊन त्याच्या घरांत नेऊन ठेविलें. तें मांस कोणीं नेऊन ठेविलें व तसें करण्यांत त्याचा काय उद्देश होता, हें सर्व त्या गोमायूला कळून आलें. परंतु कांहीं न बोलतां त्यानें तें सहन केलें. कारण, 'तूं माझ्या मैत्रीची इच्छा करीत असशील, तर मला त्रास होईल, असें कृत्य तूं कधीं करूं नये,' असा राजाशीं त्यानें करार केला होता.

भीष्म—पुढें तो व्याघ्र क्षुधित होऊन जेवणाकरितां उठला असतां त्या-करितां तयार करून ठेवलेलें अन्न त्याला कोठेंहि दिसेना. तेव्हां 'चोराला शोधून काढा,' अशी त्याची आज्ञा होतांच त्या कपटी मंत्र्यांनीं 'शहाणपणाची प्रौढी मिरविणाऱ्या आपल्या विद्वान् अमात्यानेंच तें नेलें आहे,' असें त्याला सांगितलें. गोमायूचा हा धीटपणा ऐकून त्या व्याघ्राला क्रोध आला आणि त्याचा वध करावा, असें त्याला वाटूं लागलें. आपणाला ही संधि उत्तम आहे, असें पाहून त्याच्या पूर्वीच्या मंत्र्यांनीं राजाला सांगितलें कीं, 'हा गोमायु आम्हां सर्वांचा अशाप्रकारें वृत्तिभंग करीत आहे.' असें सांगून आणखीहि त्याचीं अनेक दुसरीं कृत्यें त्यांनीं वर्णन करून मृगपतीला सांगितलीं. ते त्याला म्हणाले 'हें त्याचें असें कृत्य आहे. तो करणार नाहीं, असें काय कृत्य आहे ? ज्या प्रकारचा तो आहे, असें आपण ऐकिलें होतें, तशा प्रकारचा तो नाहीं. तो केवळ वाणीनें धर्मनिष्ठ आहे, परंतु स्वभावानें फार भयंकर आहे. धर्माच्या पांघरुणाखालीं ह्यानें खोटे आचार आरंभिले आहेत. स्वकार्यार्थ यानें भोजना-दिकांत ढोंग माजविलें आहे. आमच्या म्हणण्यावर आपला विश्वास नसेल, तर चला आमच्याबरोबर, तें मांस आम्ही त्याच्या येथें दाखवितों.' असें बोलून त्यांनीं तें गोमायूच्या गृहीं नेऊन ठेविलेलें मांस त्याला दाखविलें. गोमायूनें तें मांस पळविलें आहे, असें समजून आणि आपल्या मंत्र्यांचें तें भाषण ऐकून व्याघ्रानें त्या गोमायूचा वध करण्याविषयीं आज्ञा केली.

व्याघ्राची आज्ञा ऐकून त्या व्याघ्राची आई पुत्रास चार हिताच्या गोष्टी सांगण्याकरितां आली. ती त्याला म्हणाली, "पुत्रा, कपटानें चालविलेल्या ह्या कामांत तूं लक्ष घालूं नकोस. दुष्ट लोक कार्यस्पर्धेनें मत्सरग्रस्त होऊन चांगल्यालाहि दोष देतात. दुसऱ्याचें चांगलें कोणाला पाहवत नसतें. कारण चांगलें कृत्य वैराला उत्पन्न करणारें आहे. म्हणूनच कोणत्याहि कार्यतत्पर अशा शुचि मनुष्यावर दोषारोप केला जातो. वनांत राहून आपलीं कृत्यें करणाऱ्या मुनीला देखील मित्र, उदासीन आणि शत्रु असे तीन पक्ष उत्पन्न होतात. लोभ्यांना शुद्ध लोक आवडत नसतात. भिव्यांना चपल आवडत नाहींत. मूर्खांना पंडित लोक द्वेष्य वाटतात आणि दरिद्री लोक श्रीमंतांचा द्वेष करितात. अधार्मिक लोक धार्मिकांचा तिरस्कार करितात व कुरूप सुंदर पुरुषांचा मत्सर करितात. अनेक पंडित म्हणविणारे व कपटाचरणावर उपजीविका करून राहणारे मूर्ख आणि लोभी पुरुष बृहस्पतिसारख्या महाबुद्धिमान् व निर्दोष पुरुषालाहि दोष लावतात. तें मांस त्यानें तुझ्या येथून पळविलें म्हणावें, तर तूं देत असतांहि तो तें घेत नव्हता, ह्या गोष्टीचा नीट विचार कर. असभ्य लोक सभ्यांसारखे दिसतात व सभ्य लोक दिसण्यांत असभ्यांप्रमाणें दिसतात. सर्व लोक दिसतात, तशाच प्रकारचे ते असतात असें नाहीं. म्हणून त्यांची परीक्षा केली पाहिजे.

"आकाश कढईच्या पोकळीसारखें दिसतें, तसाच काजवा अग्नीसारखा दिसतो, परंतु विचार केला असतां आकाशाला कढईची पोकळी नाहीं किंवा काजव्याच्या अंगींहि अग्नि नाहीं. म्हणून प्रत्यक्ष दिसणाऱ्या गोष्टींत सुद्धां परीक्षा करून पाहणें आवश्यक आहे. कोणत्याहि गोष्टीची परीक्षा घेऊन विचार केला असतां मागाहून पश्चात्ताप होत नसतो. पुत्रा, राजानें दुसऱ्या कोणाचा वध करणें झाल्यास सहज करण्यासारखा आहे, त्यांत दुष्कर कांहीं नाहीं. परंतु राजाच्या अंगीं क्षमा असणें ही गोष्ट श्लाघ्य असून लोकांमध्यें यशोदायक आहे. तूं ह्याला आपल्याजवळ ठेवलें असून तो आपल्या गुणांनीं मांडलिकांमध्येंहि ख्याति पावला आहे. असला सत्पात्र मिळणें म्हणजे अत्यंत दुष्कर गोष्ट होय. हा तुझा हितकर्ता होय. ह्याचें तूं रक्षण केलें पाहिजे. जो राजा दुसऱ्या अमात्यांनीं दोष दिल्यामुळें एखाद्या शुद्धशील मनुष्याला दोषी समजतो, तो स्वतःच त्या अमात्यांकडून नाश पावतो."

असें बोलणें चाललें आहे, तों त्या गोमायूच्या शत्रुमंडळांतून कोणी धर्मात्मा पुढें आला आणि त्यानें तें सर्व कपट राजाला सांगितलें. तें ऐकून राजाला त्या गोमायूचें सर्व वर्तन समजून आलें. त्यामुळें त्याचा बहुमान करून आणि पुनः स्नेहपूर्वक आलिंगन देऊन राजानें त्याला मुक्त केलें. तो गोमायु नीतिशास्त्रज्ञ असल्यामुळें यापुढें त्यानें प्रायोपवेशन करण्याचा निश्चय केला आणि क्रोधसंतप्त होऊन राजाला तसें सांगितलें. त्यावर व्याघ्रानें त्या धर्मनिष्ठ गोमायूचा बहुमान करून त्या कृत्यापासून त्याचें निवारण करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. तें पाहून गोमायु सद्गदित होऊन नम्रपणानें त्याला म्हणाला—

"तूं माझा प्रथम सत्कार करून नंतर अपमान केला आहेस. तूं मला दुसऱ्यांच्या अवहेलनेस पात्र केलें आहेस. ह्यामुळें आतां तुझ्या पदरीं राहणें मला योग्य नाहीं. असंतुष्ट, स्थानापासून भ्रष्ट केलेले, मानाला मुकलेले, स्वतःचा द्रव्यापहार झालेले, दुसऱ्यानें वंचित केलेले, क्षीण झालेले, खोटे दोषारोप अंगीं आलेले, इत्यादि सेवक बहुधा प्रेमशून्य आणि निर्धन असतात. अवमान झालेल्या व स्थानच्युत अशा मजवर आतां तुझा विश्वास तरी कसा बसावा आणि मीं तरी तुजजवळ कसें रहावें ? केलेला करार मोडून तूं माझा अपमान केलास. एखादा मनुष्य शीलवान् आहे, असा एकदां ज्याचा सभेमध्यें गौरव केला, त्याचें आपली प्रतिज्ञा पालन करणाऱ्या राजानें वैगुण्य काढीत बसूं नये. तुझा आतां मजवर विश्वास बसणें शक्य नाहीं. तसें झाल्यानें मला दुःख होईल. तूं शंकित, मी भयभीत व दुसऱ्यांचीं छिद्रें पाहणारे, प्रेमरहित व असंतुष्ट असे इतर लोक आहेत आणि ह्या कामांत कपटहि फार आहे. ज्याचा एकदां भंग होऊन गेला, त्याची पुनः जुळणी करणें फार कठीण आहे आणि एकदां जुळलें असतां त्याचा पुनः भंग होणेंहि तितकेंच कठीण आहे. प्रीतीचा एकवार भंग होऊन पुनः ती जुळली तरी तींत पूर्वींप्रमाणें स्नेह राहत नाहीं. आपलें व दुसऱ्याचें हित साधण्यापेक्षां आपल्या यजमानाचेंच हित साधणारा पुरुष विरळा सांपडतो. कार्यापेक्षेनें वागणारे लोक पुष्कळ आहेत; पण स्वाभाविकपणें प्रेमानें वागणारे दुर्लभ होत. मनुष्याचें ज्ञान होणे राजांस अत्यंत कठीण आहे. कारण त्यांचें चित्त चंचल असतें. समर्थ आणि निःशंक असा मनुष्य शेंकडा एखादाच सांपडतो. एखाद्याला एकदम वैभवाला चढविणें आणि त्याला एकाएकीं खालीं आणणें यावरून राजाच्या बुद्धीमधील कमतरता दिसून येते."

याप्रमाणें धर्म, काम आणि अर्थ यांना अनुरूप असें गोड भाषण करून व राजाचें सांत्वन करून तो गोमायु अरण्याला गेला. त्यावेळीं मृगपति व्याघ्रानें त्याचें मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्या बुद्धिमान् गोमायूनें त्याला न जुमानतां प्रायोपवेशन केलें व शेवटीं देह ठेवून स्वर्गाला गेला. १२. १. १११.

---

## अध्याय ११२ वा.

[ १ भीष्म युधिष्ठिराला उष्ट्रग्रीवाचे चरित्राख्यानाचे द्वारा आलस्याचा परिणाम कथन करितो. ]

( १ ) युधिष्ठिर—हे धार्मिकश्रेष्ठा, राजानें काय करावें, काय केल्यानें तो सुखी होईल, तें मला बरोबर सांग.

भीष्म—होय. राजानें या लोकीं काय करावें व काय केलें असतां तो सुखी होईल, तें सांगतों. आम्हीं एका उष्ट्राची कथा ऐकिली आहे, ती सांगतों, तूं ऐक. तीप्रमाणें मात्र हे युधिष्ठिरा, कोणीं वागूं नये. पूर्वीं प्राजापत्य युगामध्यें एक मोठा उंट होऊन गेला. त्याला पूर्वजन्माचें स्मरण होतें. त्यानें अरण्यांत राहून मोठी उग्र तपश्चर्या केली. शेवटीं भगवान् ब्रह्मदेव प्रसन्न झाला आणि त्यानें त्याला ‘ वर माग ’ म्हणून सांगितलें.

उष्ट्र—भगवन्, आपल्या अनुग्रहानें ही माझी मान पूर्ण शंभर योजनें लांब व्हावी. कारण, हे विभो, मला चरावयाला जावें लागतें.

भीष्म—तें ऐकून वरदायक ब्रह्मदेवानें ‘ठीक आहे’ असें म्हटलें. नंतर तो उंट आपल्या वनांत निघून गेला. तें वरदान मिळाल्यामुळें कालमोहित होऊन त्या दुर्बुद्धि उंटानें आळसानें वनांतहि जाण्याचें सोडून दिलें. पुढें एकदां तो थकून गेला असतां ती आपली शंभर योजनें लांब असलेली मान पसरून तो चरत राहिला. इतक्यांत मोठ्या जोरानें वारा सुटूं लागला. तें पाहून तो उंट आपली मान व मस्तक एका गुहेमध्यें ठेवून राहिला. इतक्यांत सर्व जगताला जलमय करून सोडणारा पाऊस मोठ्या जोरानें आला. तेव्हां पाण्यानें सर्व अंगें भिजून थबथबलेला, थंडी अंगांत शिरून कुडकुडणारा आणि क्षुधेनें व्याकुळ झालेला कोणी कोल्हा आपल्या स्त्रीसह

त्या गुहेंत शिरला. हे भरतश्रेष्ठा, त्या क्षुधापीडित मांसभक्षक कोल्ह्यानें ती उंटाची मान एकदम भक्षण करण्याला आरंभ केला. जेव्हां आपली मान कोणी तरी खात आहे असें त्या उंटास कळून आलें, तेव्हां अत्यंत कष्टी होऊन त्यानें ती आंखडून धरण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. आपली मान खालींवर करून तिचा संकोच करण्याचा यत्न करीत असतांच तो कोल्हा आणि त्याची बायको यांनीं त्या उंटाला भक्षण करून टाकिलें. अशा रीतीनें कोल्ह्यानें त्या उंटाला भक्षण करून वारा व पाऊस बंद झाल्यावर कोल्हा त्या गुहेंतून बाहेर निघाला. त्या दुर्बुद्धि उंटानें आपण होऊनच आपलें मरण आपणावर असें ओढून घेतलें. ह्याप्रमाणें आळसाचा क्रमाक्रमानें काय परिणाम झाला तो पहा! तूं आत्मनिग्रहानें अशाप्रकारच्या आळसाचा त्याग करून सर्वदा उद्योग करीत रहा! विजय हा बुद्धिमूल आहे असें मनूचें म्हणणें आहे.

हे भारता, बुद्धीच्या योगानें होणारीं कामें श्रेष्ठ, बाहुबलानें होणारीं मध्यम, पायाच्या बलावर होणारीं कनिष्ठ आणि पडलेला भार सहन करून केलेलीं कामें सर्वांत कनिष्ठ प्रकारचीं होत. जो राजा सर्वदा दक्ष आणि आत्मनिग्रही असतो, त्याचेंच राज्य टिकतें. अतिलोभी मनुष्याला विजय मिळणें हें त्याच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून असतें. हे अनघा युधिष्ठिरा, गुप्त मसलती ऐकणारा, चांगल्या लोकांचें साहाय्य घेणारा आणि कोणतेंहि कृत्य परीक्षण करून करणारा, अशा मनुष्याजवळच लक्ष्मी राहते. ज्या राजाला पुष्कळ साहाय्यकारी असतात, तोच पृथ्वीचें पालन करूं शकेल. हे महेंद्रतुल्यविक्रमा, पूर्वीं होऊन गेलेल्या कर्तव्यज्ञ सत्पुरुषांनीं जें सांगितलें आहे, तेंच मीं शास्त्रदृष्ट्या तुला आज कथन केलें आहे. तरी हे राजन्, तूं याचा विचार करून वागत जा. १२. १. ११२.

---

## अध्याय ११३ वा.

[ १ विनयाचा आश्रय करून शत्रूला वश करें करून घ्यावें, ह्याचें सरित्सागरसंवादरूपानें कथन. ]

( १ ) युधिष्ठिर—हे भरतर्षभा, दुर्लभ राज्य प्राप्त झालें असतां ज्याच्याजवळ कांहीं साधनें नाहींत आणि ज्याचे शत्रु अत्यंत प्रबळ झाले आहेत, अशा राजानें काय करावें?

भीष्म—हे भारता, ह्यासंबंधीं सरिता आणि सागर ह्यांचा संवाद प्राचीन इतिहास म्हणून सांगत असतात. देवशत्रु दानवांना आपल्या पोटांत आश्रय देणाऱ्या नदीपति सागरानें एकदां आपणांस आलेली शंका सर्व नद्यांना विचारिली.

सागर—हे नद्यांनो, तुम्ही वेगानें वाहत असतां मोठमोठ्या वृक्षांना मूळ आणि शाखा यांसह उपटून आणलेलें मी पाहतों. त्यांत वेत मला कोठेंहि दिसत नाहींत. वेत म्हटला म्हणजे आकारानें अगदीं लहान असून त्याचें सामर्थ्यहि अल्प असतें व तो तुमच्या कांठावरच वाढलेला असतो. त्याला तुच्छतेनें तुम्हीं आणिलें नाहीं काय ? किंवा तुमचें कांहीं कार्य त्यानें केलें आहे काय ? तो आपलें तीर सोडून कां येत नाहीं. याविषयीं तुम्हां सर्वांचें मत ऐकण्याची माझी फार इच्छा आहे.

तें भाषण ऐकून त्या नदीपति सागराला मुद्देसूद, अर्थपूर्ण, हेतुयुक्त आणि हृदयाला पटेल असें उत्तर भागीरथी नदीनें दिलें.

गंगा—हे वृक्ष एकाच ठिकाणीं राहून आपलें स्थान कधींहि न सोडतां ताठ्यानें उभे असतात. यामुळें ज्यावेळीं आम्ही त्यांना प्रतिकूल असतों, तेव्हां त्यांना आपली जागा सोडून देणें भाग पडतें. वेताची तशी स्थिति नसते. वेत आमचा वेग येत असल्याचें पाहून नमतो, दुसरे तसे नमत नाहींत. नदीचा वेग निघून गेला असतां तो वेत पूर्ववत् आपल्या ठिकाणीं कायम रहातो. वेळप्रसंग जाणणारा, सदा वश असणारा, औद्धत्य टाकून वागणारा, सर्वदा अनुकूल राहणारा असा वेत नम्र असल्यामुळें आमच्याबरोबर वाहत येत नसतो. वारा आणि पाऊस यांच्या वेगाला अनुसरून ज्या ओषधि, वृक्ष आणि झुडपें नम्र किंवा उन्नत होतात, त्यांचा कधींहि पराभव होत नसतो.

भीष्म—शत्रु उत्कर्ष पावत असून बंध आणि नाश करण्याविषयीं समर्थ असेल तर जो त्याचा वेग प्रथम सहन करीत नाहीं, तो सत्वर नाश पावतो. आपल्या व शत्रूच्या सामर्थ्याचा व असामर्थ्याचा आणि वीर्याचा विचार करून जो वागतो, त्याचा कधींहि पराजय होत नाहीं. अशाप्रकारें ज्या कालीं आपल्याहून शत्रु अधिक बलवान् आहे असें वाटेल, त्या कालीं विद्वान् मनुष्यानें वेताप्रमाणें नम्रवृत्ति धारण करावी. हेंच शहाणपणाचें चिह्न होय. १२. १. ११३.

---

## अध्याय ११४ वा.

[ १ सभेमध्यें दुष्टाचें दुर्भाषण सहन करण्यांत कांहींच अप्रिय नाहीं. ]

(१) युधिष्ठिर—हे शत्रुतापना, एखाद्या मूर्ख पण धीट मनुष्यानें भरसभेंत कोणा विद्वान् व सौम्य मनुष्याला अपशब्द बोलून दुखविलें तर त्यानें काय करावें ?

भीष्म—हे राजा, याविषयीं शास्त्रांत काय सांगितलें आहे तें ऐक. बुद्धिमान् मनुष्यानें त्या दुर्बुद्ध मनुष्याच्या भाषणाची क्षमा करावी. जो आपली विनाकारण निंदा करितो त्याच्यावर न रागावलें असतां त्याचें पुण्य आपणाला लागतें आणि ह्याचें पाप त्याला लागत असतें. आतुर होऊन मोठ्यानें ओरडणाऱ्या टिटवीप्रमाणें त्याजकडे कोणींहि लक्ष देऊं नये. अशा रीतीनें तो लोकविद्वेषाला पात्र होऊन त्याचा आक्रोश मात्र व्यर्थ होतो. 'भरसभेंत मानपात्र अशा त्या मनुष्याला मी असें बोललों असतां तो लज्जित होऊन मेल्यासारखा शुष्क पडला आहे,' असें म्हणून तो निर्लज्ज स्वतःच्या पापकर्मांची स्तुति करीत असतो. अशा पुरुषाधमाची मोठ्या यत्नानें उपेक्षाच करणें योग्य आहे. अल्पमति मनुष्य जें जें बोलेल तें तें शहाण्यानें सोसावें. वनामध्यें निरर्थक आक्रोश करणाऱ्या निर्बुद्ध कावळ्याप्रमाणें एखाद्या प्राकृत मनुष्याच्या स्तुतीनें किंवा निंदेनें काय होणार आहे ? जर पापी मनुष्याच्या वाणीमध्यें एवढी शक्ति असती, तर वाणीनेंच त्याची सर्व कार्यसिद्धि होऊन एकाद्याचा वध करण्याची इच्छा होतांच त्याला दुसरें कांहीं करावें लागलें नसतें. 'तुझा पुत्र मरो' असें म्हणतांच तत्काळ त्या पुत्राचा मृत्यु झाला असता. मयूर ज्याप्रमाणें नृत्य करून दाखवूं लागला म्हणजे आपलें गुह्य लोकांना दिसत आहे, याची त्याला लज्जा वाटत नसते, उलट आनंद होत असतो, त्याप्रमाणें त्या मनुष्याला आपल्या वर्तनानें व कृतीनें आपल्याच मातेचा दोष व्यक्त होत असल्याची कांहींच लज्जा वाटत नाहीं. ज्याला लोकांमध्यें अवाच्य किंवा अकार्य असें कांहीं आहे असें वाटत नाहीं, त्या दुष्टकर्म्याशीं शुचिर्भूत मनुष्यानें कधींहि भाषण करूं नये.

जो मनुष्य तोंडावर गुण गाणारा व पाठीमागें निंदा करणारा असतो, त्याला कुत्र्याप्रमाणें उत्तम लोक, ज्ञान आणि धर्म, यांची प्राप्ति होत नसते. असल्या प्रकारच्या आपल्या पाठीमागें निंदा करणाऱ्या मनुष्यानें शेंकडो लोकांना दान

केलें किंवा यज्ञ केले तरी तें सर्व व्यर्थ जातें. म्हणून शहाण्या मनुष्यानें सज्जन लोक ज्याप्रमाणें कुत्र्याचें मांस वर्ज करितात, त्याप्रमाणें त्या प्रकारच्या पापी मनुष्याचा संबंध तोडावा. लोकसमूहापुढें निंदा करणारा दुरात्मा मनुष्य फणा उभारणाऱ्या सर्पाप्रमाणें आपले दोषच प्रकट करितो. असा मनुष्य आपलें कार्य करीत असतां त्याचा प्रतीकार करण्याच्या इच्छेनें जो पुढें होतो, त्याचे श्रम राखेंत लोळणाऱ्या दुर्बुद्धि गाढवाप्रमाणें व्यर्थ समजावे. जो सर्वदा परनिंदेंत गढून गेलेला, ज्यची कधींहि समाधानवृत्ति नसते, अशा मनुष्यरूपी लांडग्याला उन्मत्त होऊन गर्जना करणारा गज किंवा अतिभयंकर कुत्रा यांप्रमाणें नित्य टाळावें. मूर्ख लोकांच्या मार्गानें जाणारा, दम आणि विनय यांचा त्याग करणारा, पाप आचरणारा, शत्रूप्रमाणें वागणारा आणि दुसऱ्याचें वैभव सहन न होणारा, अशा पापमति मनुष्याचा सर्वदा धिक्कार असो. असले लोक तुला टाकून बोलूं लागले, तरी तूं खेद मानूं नको. स्थिरबुद्धीचे लोक उच्च मनुष्याचा नीच मनुष्याशीं झालेला संबंध निंद्य समजतात. दुष्ट मनुष्य क्रुद्ध झाला असतां पांच बोटांनीं थापट मारील, तोंडावर धूळ किंवा कोंडा फेंकील किंवा दांत विचकून भीति दाखवील. कारण, अशा मनुष्याच्या अंगीं ह्या गोष्टी स्वाभाविकच असतात. अत्यंत दुष्ट मनुष्यानें भरसभेंत केलेली निंदा वर सांगितलेले विचार डोळयांपुढें ठेवून जो सहन करील, त्याचें कांहींहि अप्रिय होणार नाहीं. १२. १. ११४.

---

## अध्याय ११५ वा.

[ १ राजाला उत्तम प्रकारच्या साहाय्यकर्त्यांची आवश्यकता. २ तें साहाय्य कशा प्रकारचें असावें, यासंबंधीं पात्रापात्रविचार. ]

(१) युधिष्ठिर—हे महाप्राज्ञ पितामहा, मला एक मोठा संशय आला आहे आणि तूं आमच्या कुलाचा उत्पादक असल्यामुळें त्याचें निरसन तूंच करणें मला योग्य वाटत आहे. हे ताता, दुराचारी व दुष्ट मनुष्यांच्या तोंडांत कशा प्रकारचे शब्द निघत असतात, हें तूं सांगितलेंच आहेस. म्हणून तुला माझी विनंति आहे कीं, राजाला हितकारक, कुळाला सुखदायक, वर्तमानकाळीं व भविष्यकाळीं कल्याण आणि वृद्धि करणारें, पुत्रपौत्रादिकांना आनंदविणारें, राष्ट्रवृद्धि करणारें आणि अन्नपानाला हितप्रद होऊन शरीरालाहि सुखकारक

होईल, असें जें कृत्य असेल, तें मला सांग. जो राजा अभिषिक्त होऊन मित्र आणि आपले सुहृज्जन ह्यांसह राज्यांत राहतो, त्यानें आपल्या प्रजाजनांचें रंजन कसें करावें ? ज्याचीं इंद्रियें स्वाधीन नसल्यामुळें स्नेह आणि अनुराग यांना वश होऊन जो दुर्जनांच्या संगतीला लागतो, त्याचे सर्व कुलीन सेवक त्याविरुद्ध होऊन त्यांचा प्राप्तीच्या कामीं त्याला किमपिहि उपयोग होत नाहीं. म्हणून दुर्बोध असे राजधर्म मला सांगून माझ्या संशयाचा निरास कर. बुद्धीनें तूं बृहस्पतीसारखा असल्यामुळें ते सांगण्यास तूंच समर्थ आहेस.

हे पुरुषव्याघ्रा, आमच्या कुलाचें हित करण्यांत तूंच एक सर्वदा रत असल्यामुळें ते राजधर्म तूं सांगशील किंवा जो नित्य आमची प्रशंसा करीत असतो, तो एक महाप्राज्ञ विदुर तरी सांगूं शकेल. तेव्हां कुलाला आणि राजाला हितप्रद असें तुझ्या तोंडचें भाषण ऐकून अविनाशी अमृताच्या योगानें तृप्त झाल्याप्रमाणें मी सुखानें निद्रा घेईन. राजानें सर्व गुणसंपन्न सेवक जवळ करावयाचे ते कशाप्रकारचे असावे ? त्यानें कोणत्या लोकांशीं व्यवहार करावा ? राजाजवळ जर भृत्य नसले, तर त्या एकट्याकडून प्रजेचें रक्षण होणें शक्य नाहीं. कारण त्याच्या कुळांत उत्पन्न झालेल्या प्रत्येक पुरुषाला त्या राज्याची इच्छा असते.

( २ ) भीष्म—हे भारता, कोणाच्याहि साहाय्यावांचून एकट्याच्यानें राज्य चालविणें कधींहि शक्य नसतें. तसेंच हे भरतश्रेष्ठा, एकट्याच्यानें द्रव्य मिळविणें व मिळविलेल्याचें संरक्षण करणेंहि शक्य नाहीं. ज्याचे सर्व सेवक ज्ञानी, अनुभवी, राजाचें हित चिंतणारे, कुलीन आणि प्रेमळ असतात, त्यालाच राज्यसुखाची प्राप्ति होते. ज्या राजाचे मंत्री कुलीन, कधींहि न फुटणारे, राजाच्या सहवासांत असणारे, त्याला चांगली मसलत देणारे, राजाचे पूर्वसंबंध जाणणारे, सज्जन, संकटापूर्वींच त्याची तरतूद लावणारे, देशकालानुसार वागणारे आणि गतगोष्टींसंबंधीं शोक न करणारे असतात, तोच राजा राज्यसुखाला प्राप्त होतो. ज्याचे मंत्री त्याचें सुख-दुःख तें आपलेंच आहे असें समजून वागणारे, जे त्याचें प्रिय करण्यांत दक्ष, जे राजद्रव्याविषयीं सर्वदा काळजी घेणारे आणि सत्यनिष्ठ असतात, तोच राजा राज्यसुख अनुभवितो. ज्याच्या देशांत प्रजेला दुःख म्हणून कधींच ठाऊक नसतें, प्रजा सदासर्वदा त्याच्या आश्रयाची इच्छा करणारी असते, जो क्षुद्र स्वभावाचा नसून सत्पथानें वागणारा असतो, अशाच राजाला राज्यसुख

मिळतें. ज्याचे कोशावर नेमलेल्या तुष्ट व आप्त पुरुषांकडून खजिन्याची सर्वदा वाढ होत असते, ज्याच्या कोष्ठागारावर-धान्याच्या कोठारावर-प्रामाणिक, निर्लोभी आणि संग्रहतत्पर असे योग्य पुरुष नेमलेले असतात, तोच राजा सुखी होतो. ज्याच्या राज्यांतील सर्व व्यवहार कृतकर्मांचें फल मिळवून देणारे म्हणजे शंख-लिखितांच्या गोष्टींत सांगितल्याप्रमाणें होतात, तोच राजा स्वधर्मफल भोगणारा होतो. जो राजा मनुष्यांचा संग्रह करितो, जो राजधर्मवेत्ता असतो, आणि जो संधि-विग्रहादि षड्वर्गांचा आश्रय करितो, त्यालाच स्वधर्मफलाची प्राप्ति होत असते. १२. १. ११५.

---

## अध्याय ११६ वा.

[ १ युधिष्ठिराला भीष्माकडून कोणीएका मुनीनें व्याघ्रभयानें भयभीत झालेल्या कुत्र्याला व्याघ्र केल्याचें कथन. ]

( १ ) भीष्म—ह्यासंबंधीं एक पुरातनकालची कथा सांगत असतात. तीवरून सज्जन लोक आचरण कसें ठेवीत असतात, हें समजून येण्यासारखें आहे. त्यासारखी एक गोष्ट मीं तपोवनांत ऐकिली होती. ती जमदग्निपुत्र रामाला मुनिश्रेष्ठांनीं सांगितली होती. ती कथा अशी आहे—

कोणी एका निर्जन महावनांत एक ऋषि राहत होता. तो फलमूलांवर आहार करीत असे. तो नियमनिष्ठ असून अत्यंत आत्मनिग्रही होता. तो व्रतशील, शांत, स्वाध्यायतत्पर, उपवासानें शुचिर्भूत आणि सात्त्विक वृत्तीचा होता. तो ज्ञानसंपन्न असून त्याचा तो सद्भाव पाहून त्या वनांतील सर्व सिंह, व्याघ्रादि क्रूर प्राणी, मदोन्मत्त मोठमोठे गज, चित्ते, गेंडे, अस्वलें आणि दुसरेहि भयंकर अनेक रक्तभक्षक जीव त्याजकडे येऊन व त्याला कुशल प्रश्न विचारून त्याशीं शिष्याप्रमाणें अत्यंत नम्रपणानें वागत असत. ह्याप्रमाणें ते सर्वजण त्या ऋषीला कुशलप्रश्न विचारून आल्या मार्गानें परत जात असत. तेथें एक ग्राम्य पशु-कुत्रा होता. तो मात्र त्या महामुनीला सोडून कधींहि जात नसे. तो महाभक्त, अनुरक्त, उपवासांनीं कृश झालेला, निर्बल, फळें, मूळें आणि उदक यांवर निर्वाह करणारा, शांत आणि शिष्टासारखा दिसत असे. अशा रीतीनें त्या श्वानाचें मनुष्याप्रमाणें त्या ऋषीच्या पायीं

---

१ भाग ९ वा, शांतिपर्व अ. २३, पृष्ठ ४४९, ४५० पहा.

अतिशय प्रेम जडलें. नंतर एके वेळीं एक रक्तभक्षक व सामर्थ्यवान् चित्ता आपलें भक्ष्यच पुढें असल्याचें पाहून संतुष्ट झालेला त्यावर उडी घालण्याच्या हेतूनें क्रूर कालासारखा तेथें आला. तो तृषित होऊन जिव्हेनें ओष्ठप्रांत चाटीत होता. तो जमिनीवर आपल्या पुच्छाचे सारखे आघात करीत होता. तो भुकेनें व्याकुळ झाला असून त्यानें आपलें तोंड पसरलें होतें आणि श्वानाचे मांसावर त्याचें मन फार गुंतलें होतें. हे राजा, त्यावेळीं त्या क्रूर पशूला आलेला पाहून आपले प्राण वांचविण्याची इच्छा करणारा तो कुत्रा मुनीला काय म्हणाला तें श्रवण कर. तो म्हणाला, 'भगवन्, हा चित्ता कुत्र्यांचा शत्रु आहे. ह्याच्या मनांतून माझा वध करावयाचा आहे. म्हणून हे महामुने, ह्याच्या हातून मला भय पोंचणार नाहीं, असा प्रसाद दे. हे महाबाहो, तूं निःसंशय सर्वज्ञ आहेस, म्हणून मी तुला विनवीत आहें. मला निर्भय कर.' दुसऱ्यांच्या मनांतील भाव ओळखणाऱ्या आणि सर्व प्राण्यांची भाषा जाणणाऱ्या त्या महामुनीनें त्याच्या मनांतील भयाचें कारण ओळखलें आणि म्हटलें—

मुनि—वत्सा, ह्या चित्त्यापासून आपणाला मृत्यु येईल, अशी भीति तूं बाळगूं नकोस; तुझें श्वानाचें रूप जाऊन तूंच चित्ता हो! असें मुनि म्हणतांच तो कुत्रा सुवर्णतुल्य आकाराचा, अंगावरील ठिपक्यांनीं चित्रविचित्र दिसणारा आणि लखलखित दाढांचा चित्ता होऊन निर्भयपणें त्या वनांत फिरूं लागला. तेव्हां त्यावर चालून आलेल्या त्या चित्त्याला हा आपल्याच जातीचा चित्ता आहे असें वाटून त्यानें क्षणांत त्याच्याशीं विरोध करण्याचें सोडून दिलें. पुढें एक भयंकर, जिभल्या चाटणारा, रक्ताची इच्छा करणारा, क्षुधाक्रांत व्याघ्र तोंड पसरून त्या चित्त्यावर धांवून आला. त्या भयंकर दाढांनीं युक्त व क्षुधापीडित व्याघ्राला वनांत पाहून तो चित्ता प्राणरक्षणार्थ त्या मुनीला पुनः शरण गेला. त्या मुनीनें सहवासामुळें उत्पन्न झालेल्या प्रेमामुळें त्या चित्त्याला शत्रूपेक्षांहि बलवत्तर असा व्याघ्र केलें. त्याचें तें रूप पाहून त्या व्याघ्रानें त्याला मारलें नाहीं. अशाप्रकारें व्याघ्ररूप पावून त्या चित्त्याला मांसाशनाची रुचि लागली आणि फलमूलें भक्षण करण्याची इच्छाहि त्याला होईनाशी झाली. ज्याप्रमाणें मृगपति सिंह नित्य वनांतील श्वापदांना भक्षण करण्याची इच्छा करीत असतो, त्याप्रमाणें तो व्याघ्र करूं लागला. १२. १, ११६.

## अध्याय ११७ वा.

[ १ गजाला पाहून भयभीत झालेल्या व्याघ्राला मुनीच्या वराच्या योगानें गजत्वप्राप्ति. २ सिंहभयानें गजाला सिंहत्वप्राप्ति. ३ शरभभयानें सिंहाला शरभत्वप्राप्ति. ४ दुष्टबुद्धि धारण करून आपणावर चालून येणाऱ्या त्या शरभास मुनीकडून पुनः श्वानत्वप्राप्ति. ]

( १ ) भीष्म—याप्रमाणें मारलेले पशु भक्षण करून तृप्त झालेला तो व्याघ्र आश्रमाजवळच सुखानें निजला असतां एक उन्मत्त व मेघाप्रमाणें उद्धत दिसणारा गज तेथें आला. त्याच्या गंडस्थलांतून मदस्राव होत होता. तो उंच असून त्याचें अंग कमलांनीं भरून गेलें होतें. त्याचें गंडस्थल पसरट असून पुच्छ मोठें सुंदर होतें. त्याचें शरीर धिप्पाड असून त्याचा आवाज मेघाप्रमाणें गंभीर होता. त्या बलगर्वित व मदोद्धत गजाला पाहून तो व्याघ्र भयभीत होऊन ऋषीला शरण गेला. तेव्हां त्या मुनीनें त्याला गज केलें. आपल्यासमोर मेघाप्रमाणें प्रचंड आकाराचा गज असल्याचें पाहून तो चालून आलेला गज भयभीत झाला आणि तेथून निघून गेला. नंतर तो गज कमलवनांत आणि शल्लकींच्या अरण्यांत कमलपरागांनीं विभूषित होऊन आनंदानें राहिला. असे त्याचे कित्येक दिवस त्या ऋषीच्या पर्णकुटींत गेले.

( २ ) नंतर एकदां गजकुलाचा संहार करणारा, पिंगट केसरांचा, गिरिकंदरांत उत्पन्न झालेला एक भयंकर सिंह त्या ठिकाणीं येऊन पोंचला. त्याला पाहतांच तो गज सिंहभयानें कंपित होऊन पुनः त्या ऋषीला शरण गेला. तेव्हां त्या मुनीनें त्या गजाला सिंह केलें. त्यामुळें समान कुल झाल्यामुळें तो सिंहरूपी श्वान वन्य सिंहाला जुमानीनासा झाला. तें पाहून तो अरण्यांतील सिंह व्याकुल होऊन तेथून निघून गेला. आणि त्या महावनामध्यें हा सिंह मुनीजवळ राहूं लागला. त्याच्या भीतीनें इतर पशुहि घाबरून जाऊन स्वजीवितरक्षणार्थ त्या तपोवनाजवळ मुळींच दिसेनातसे झाले.

( ३ ) पुढें कालयोगानें सर्व प्राणिहिंसक, बलवान्, रुधिराहारी, सर्व प्राण्यांना भयभीत करून सोडणारा, आठ पायांचा आणि ऊर्ध्व दृष्टि असलेला एक शरभ त्या सिंहाचा वध करण्याकरितां त्या मुनीच्या आश्रमाजवळ आला. हे अरिंदमा, तें पाहून मुनीनें त्या सिंहाला अतिसामर्थ्यवान् असा शरभ केला. पुढें त्या वन्य शरभानें आपल्यापुढें मुनीच्या त्या बलवान् शरभाला उभा असलेला

पाहून तत्काळ त्या वनांतून पलायन केलें. अशा रीतीनें मुनीनें शरभ केलेला तो श्वान मुनीच्या पार्श्वभागीं नित्य सुखानें कालक्रमण करूं लागला. त्या शरभाला पाहतांच वनांतील सर्व पशु भयग्रस्त होऊन प्राणरक्षणार्थ वन सोडून पळून गेले. इकडे हा शरभहि प्राणिसंहारांत रत होऊन मांसाहारी झाला आणि फल-मूलांकडे मुळींच लक्ष देईनासा झाला. तेव्हां रक्ताची लालसा लागून गेल्यामुळें श्वानयोनीमध्यें जन्म पावलेल्या त्या कृतघ्न शरभाला त्या मुनीच्याच वधाची इच्छा उत्पन्न झाली.

( ४ ) हा त्याचा विचार आपल्या तपःसामर्थ्यानें त्या ज्ञानदृष्टि मुनीला तत्काल समजून आला आणि त्याला तो म्हणाला, 'अरे, तूं श्वान असून तुजवरील स्नेहानें तुला मीं चित्ता केलें, पुढें चित्याचा व्याघ्र केला, व्याघ्राचा मदोन्मत्त गज केला, पुढें गजाचा बलवान् सिंह केला आणि पुनः तुला शरभ केलें; परंतु तूं मात्र आपला जातिस्वभाव सोडला नाहींस. हे पाप्या, ज्याअर्थीं निष्पाप अशा माझाहि वध तूं करूं पाहत आहेस, त्याअर्थीं तुला पुनः श्वानयोनीचीच प्राप्ति होईल !'

अशाप्रकारें त्या ऋषीनें शाप दिल्यावर तो मुनिजनांचा द्वेष करणारा दुष्टात्मा, प्राकृत आणि मूर्ख शरभ पुनः श्वान झाला. १२. १. ११७.

---

## अध्याय ११८ वा.

[ १ सचिवांचें गुणवर्णन. २ राजगुण कसे असावे ? ३ योद्ध्यांचे गुण. ]

( १ ) भीष्म—याप्रमाणें मूळपदावर आल्यावर त्या कुत्र्याची स्थिति अत्यंत दैन्याची झाली. त्या ऋषीनें एका हुंकाराबरोबर त्याला तपोवनाबाहेर घालवून दिलें. याप्रमाणें शहाण्या राजानें भृत्याचे सत्यता, शुचिर्भूतता, सरळपणा, स्वभाव, सत्त्व, वेदज्ञान, वर्तन, कुल, इंद्रियदमन, दया, बल, वीर्य, प्रभाव, नम्रता आणि क्षमा हे गुण पारखावे आणि जो ज्या कार्याला योग्य असेल, त्याची त्या ठिकाणीं सुरक्षितपणें योजना करावी. राजानें परीक्षेवांचून सचिवपदावर कधींहि कोणाची योजना करूं नये. अकुलीन लोक जवळ बाळगल्यानें राजाची सुखाभिवृद्धि होत नाहीं. राजाचा अमात्य कुलीन असून जरी संस्काररहित असला, तरी राजानें विनाकारण दोष लावला असतांहि आपल्या कुलीनतेमुळें राजासंबंधीं त्याच्या मनांत कांहीं पापबुद्धि येत नाहीं. तोच अकुलीन व संस्कृत

पुरुष मोठ्याचा आश्रय मिळवून वैभवास चढल्यावर राजानें दोष लावला असतां शत्रु होऊन राहतो. म्हणून कुलीन, सुशिक्षित, शहाणा, शास्त्रज्ञ आणि अनुभवी, सर्व शास्त्रतत्त्वें जाणणारा, सहनशील, स्वदेशांत जन्मलेला, कृतज्ञ, सामर्थ्यवान्, क्षमावान्, दमनशील, जितेंद्रिय, निर्लोभी, मिळेल त्यावर संतुष्ट राहणारा, आपल्या स्वामीच्या मैत्रीची इच्छा करणारा, सहाय्यक, देशकाल जाणणारा, सर्वांचें रंजन करण्यांत तत्पर, सर्वदा उद्योगरत, राजहितैषी, निरलस, आपल्या राष्ट्राचे आचार पाळणारा, संधि-विग्रहांत निपुण, राष्ट्रोन्नतीचे तीन पुरुषार्थ जे धर्म, अर्थ आणि काम त्यांत निष्णात, नगर व राष्ट्र यांतील लोकांना प्रिय, परसैन्याचें उन्मूलन करणारे जे व्यूह त्यांतील मर्म जाणणारा, सैन्योत्साह वाढविणारा, शत्रूचीं गूढ इंगितें आणि आकार जाणणारा, शत्रूंवर चालून केव्हां जावें ह्याचें बरोबर ज्ञान असलेला, गजशिक्षेचीं तत्त्वें जाणणारा, अहंकाररहित, प्रगल्भ, कुशल, आत्मनिग्रही, बलसंपन्न, योग्य गोष्ट करणारा, स्वतः शुद्धाचरणी असून शुद्धाचार लोकांस जवळ बाळगणारा, प्रसन्नमुख, आपल्या दर्शनानें सर्वांस संतोषविणारा, लोकांचा नायक, नीतिकुशल, गुणी असून तदनुरूप व्यापार करणारा, कोणत्याहि कार्यांत आग्रह न धरणारा, कोणतीहि सूक्ष्म गोष्ट तत्काळ जाणणारा, सभ्य वर्तनाचा, गोड बोलणारा, वीर, शूर, वैभवशाली आणि देशकालाप्रमाणें गोष्टी घडवून आणण्यांत समर्थ अशाप्रकारचा मंत्री ज्या राजाचा असून ज्याचा राजाच्या हातून कधींहि अपमान होत नाहीं, त्याचें राज्य चंद्राच्या योगानें शोभणाऱ्या चांदण्याप्रमाणें वृद्धिंगत होतें.

( २ ) या गुणांनीं युक्त असून शास्त्रविशारद, प्रजापालनतत्पर आणि धार्मिक अशा राजाची प्रजेनें इच्छा करावी. शिवाय तो शहाणा, सहनशील, शुचिर्भूत, कडक आचरणाचा, कोणत्या काळीं कोणता उद्योग करावयाचा हें जाणणारा, योग्य पुरुषांची शुश्रूषा करणारा, शास्त्रज्ञ, दुसऱ्यांचा सदुपदेश ऐकणारा, कोणत्याहि गोष्टीचा ऊहापोह करण्यांत कुशल, बुद्धिमान्, धारणायुक्त, कोणत्याहि गोष्टीचा यथान्याय शेवट लावणारा, आत्मनिग्रही, मधुर भाषण करणारा, अपकार करणाऱ्याचीहि क्षमा करणारा, दानशूर, श्रद्धाळू, दिसण्यांत चांगला, संकटावस्थेंत असणाऱ्या लोकांस हातभार लावणारा, ज्याचे अमात्य त्याचे कल्याणार्थ सर्वदा तत्पर आहेत असा, अहंकाररहित, निर्द्वंद्व, भलतें कृत्य कधींहि न करणारा, मंत्र्यांनीं चांगलें कार्य केलें असतां त्यांचा सत्कार करणारा, आपल्यावर श्रद्धा ठेवणाऱ्या लोकांचें प्रिय करणारा, लोकसंग्रह

करणारा, कधींहि ताठून न जाणारा, सर्वदा प्रसन्नमुख, सेवकाची सदा अपेक्षा करणारा, क्रोधवश न होणारा, थोर मनाचा, योग्य शिक्षा देणारा, लोकांची धर्माकडे प्रवृत्ति करणारा, हेररूपी नेत्रांनीं प्रजेवर लक्ष्य ठेवणारा, धर्म आणि अर्थ ह्या पुरुषार्थांमध्यें कुशल असावा. अशाप्रकारच्या शेंकडों गुणांनीं युक्त राजाची प्रजा इच्छा करिते.

( २ ) हे मनुष्येंद्रा, योद्धे देखील सर्व गुणांनीं युक्त असावे. ते राज्यसंरक्षणाचे कामीं मदत करणारे होतील, असे राजानें निवडून काढावे. ज्या राजाला आपली भरभराट होत जावी, अशी इच्छा असेल, त्यानें त्यांचा अवमान कधीं करूं नये. ज्या राजाचे योद्धे संग्रामचतुर, कृतज्ञ, शस्त्रविद्येंत कुशल, धर्मशास्त्रनिपुण, पदातींनीं युक्त, निर्भय, गजपृष्ठावर बसणारे, रथ चालविण्यांत चतुर, आणि धनुर्विद्येंत निष्णात असतात, त्याच राजाला ही पृथ्वी वश होते. जो राजा सर्वसंग्रह करण्यांत सर्वदा निपुण असून उद्योगशील आणि मित्रसंपन्न असतो, तोच सर्वोत्तम राजा होय. हे भारता, ज्याला अश्वारूढ अशा हजारों वीरांचें साहाय्य असतें आणि ज्याच्या पदरीं बराच लोकसमाज आहे, अशा राजाला ही पृथ्वी सहज जिंकून घेतां येण्यासारखी आहे. १२. १. ११८.

---

## अध्याय ११९ वा.

[ १ योग्यतेनुसार भृत्यांची त्या त्या ठिकाणीं योजना. २ भृत्यांचे गुण. ]

( १ ) भीष्म—याप्रमाणें जो राजा श्वानाप्रमाणें जे नीच असतील, त्यांना महत्पदावर न योजितां त्यांची योग्य अशा ठिकाणीं योजना करितो, त्यालाच राज्यफल भोगितां येतें. श्वानाचा मोठा सत्कार करून त्याला उच्चपदावर चढविलें असतां तो त्या स्थानाचा अतिक्रम करून प्रमाद करितो. म्हणून स्वजातिसिद्ध गुणांनीं जे योग्य असतील, त्यांनाच अमात्याचे जागीं नेमावें. अस्थानीं भलत्याला नेमणें कधींहि इष्ट नसतें. जो राजा भृत्यांना ज्याच्या त्याच्या योग्यतेनुसार कर्मांची वांटणी करून देतो, तो त्यामुळें राज्यसुख भोगतो. ज्याप्रमाणें शरभाच्या ठिकाणीं शरभ, बलवान् सिंहाचे ठिकाणीं बलवान् सिंह, व्याघ्राचे ठिकाणीं व्याघ्र आणि द्वीपीचे ठिकाणीं द्वीपीचीच योजना करणें इष्ट आहे, त्याप्रमाणें भृत्यांचीहि योजना त्यांना अनुरूप कर्मांच्याच ठिकाणीं केली

पाहिजे. कर्मफळाची इच्छा करणाऱ्या राजानें याच्या उलट भृत्यांची योजना कधींहि करूं नये. जो दुर्बुद्धि राजा प्रमाण सोडून भृत्यांना त्यांच्या योग्यतेविरुद्ध अधिकार देतो, तो प्रजारंजन करूं शकत नाहीं. आपल्या गुणांचें फळ मिळवूं इच्छिणाऱ्या राजानें बालिश, क्षुद्र, अप्राज्ञ, अजितेंद्रिय दुष्कुलीन लोकांस कामावर ठेवूं नये. राजाचे जवळ सतत असणारे लोक सज्जन, कुलीन, शूर, ज्ञानवान्, निर्मत्सर, क्षुद्र नसलेले, शुचिर्भूत आणि दक्ष असे असावे आणि त्याचे बहिश्चर भृत्य नम्र, तत्पर, शान्त, शुद्धशील, चांगल्या गुणाचे आणि लोकापवादास पात्र न झालेले असे असावे. सिंहाच्या पार्श्वभागीं सर्वदा सिंहानेंच असावें. स्वतः सिंह नसून समीपभागीं सिंह असेल, तर त्याला सिंहाची योग्यता येते. परंतु सिंहाचें कार्य करूं पाहणाऱ्याच्या सभोंवतीं श्वानांची मंडळी जमून त्याची उपासना करीत असेल, तर सिंहाचें कार्य त्याचे हातून होणें शक्य नाहीं.

(२) हे राजा, याप्रमाणें राजाला शूर, प्राज्ञ, बहुश्रुत आणि कुलीन भृत्यांचें साहचर्य असल्यास त्याला संपूर्ण पृथ्वीहि जिंकितां येणें शक्य आहे. राजांनीं विद्याहीन, कुटिल, निर्बुद्ध व द्रव्यशून्य भृत्यांला जवळ करूं नये. जे लोक स्वामिकार्यतत्पर असून सुटलेल्या नेमक्या बाणाप्रमाणें राजाचें कार्य तत्परतेनें करितात, अशा लोकांशीं राजानें गोडीनें वागावें. राजांनीं यत्नपूर्वक आपल्या कोशाचें रक्षण करावें. कारण, राजांच्या सुस्थितीला कोशाचाच आधार असल्यामुळें, कोशाची वृद्धि सर्वदा होणें इष्ट आहे. तुझें कोष्टागार अनेक प्रकारच्या धान्यांनीं भरलेलें असून तें चांगल्या लोकांच्या हातीं असावें. तूं धनधान्यसंपादनांत नित्य तत्पर असावें. तुझे सेवकहि उद्योगरत आणि युद्धकुशल असावे. त्याचप्रमाणें त्यांना अश्वविद्येचेंहि ज्ञान अवश्य असावें. हे कुरुनंदना, तूं ज्ञातिजन आणि बंधुवर्ग यांची नित्य काळजी घेत जा. मित्र आणि संबंधिजन यांना जवळ कर आणि पौरकार्यहिताकडे लक्ष्य देत जा. प्रजेसंबंधानें तुझें वर्तन कशाप्रकारचें असावें त्यासंबंधीं कुत्र्याचा दृष्टांत देऊन मीं सांगितलें आहे. आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे? १२. १. ११९.

---

## अध्याय १२० वा.

[ १ युधिष्ठिर भीष्माला राजधर्म साररूपानें आपणास सांगण्याविषयीं विनंति करितो. २ भीष्माकडून प्रजापालनादि प्रकारांचें कथन. ३ शत्रूवर चाल करून कसें जावें. ४ योग्य मनुष्याची योग्य कार्यावर योजना. ५ राजवर्तन कसें असावें ? ]

( १ ) युधिष्ठिर—हे भारता, पूर्वीच्या राजधर्मवेत्त्यांनीं सांगितलेले अनेक राजधर्म तूं मला निवेदन केलेस. तूं ते विस्तारानें सांगितले असल्यामुळें आतां त्यांचें विद्वानांना मान्य असें संक्षिप्त रूपानें मला कथन कर.

( २ ) भीष्म—सर्व भूतांचें रक्षण करणें हा क्षत्रियांचा परम धर्म होय. तें रक्षण कसें करावें, तें हे पृथ्वीपते ऐक. ज्याप्रमाणें मयूर चित्रविचित्र पिसें धारण करतो, त्याप्रमाणें धर्मवेत्त्या राजानें अनेक प्रकारचीं रूपें धारण करावीं. कधीं कडकपणा, कधीं कुटिलता, कधीं निर्भयता, कधीं सत्यत्व, कधीं सरलत्व, कधीं मध्यस्थपणा इत्यादि गुण अंगांत असून सात्विक वृत्तीनें वागल्यास राजास सुखप्राप्ति होते. ज्या कार्यांत जें स्वरूप हिताचें होईल असें वाटत असेल, तें धारण करावें. राजानें अनेक प्रकारचीं रूपें धारण केलीं, तरी त्याची अल्पहि हानि होत नाहीं. शरदृतूंतील मूक मयूराप्रमाणें राजानें आपला मंत्र सदैव गुप्त ठेविला पाहिजे. त्याचें भाषण स्वल्प व मृदु असावें, तसाच तो शास्त्रनिष्णातहि असावा. उदकाचा लोंढा जोरानें आला असतां ज्याप्रमाणें मनुष्यानें सावध असलें पाहिजे, त्याप्रमाणें संकटप्रसंगीं मंत्रभेदादि गोष्टींविषयीं त्यानें सावध असावें. पर्वतावरील वृष्टीनें उत्पन्न होणाऱ्या मोठमोठ्या नद्यांचा जसा लोक आश्रय करितात, त्याप्रमाणें तपःसामर्थ्ययुक्त ब्राह्मणांचा राजानें आश्रय करावा. आपला कार्यभाग साधून घेणाऱ्या राजानें मोठ्या धर्मनिष्ठाप्रमाणें आपलें वर्तन असल्याचें लोकांस दाखवावें आणि सर्वदा दंड करण्याविषयीं तत्पर रहावें. आपल्या हातून प्रमाद न होईल, अशा रीतीनें वागावें. ज्याप्रमाणें ताडाच्या झाडापासून ताडी काढणारा एखाद्याच ठिकाणीं शस्त्राघात करून रस काढून घेतो, इक्षुदंडाप्रमाणें सर्वत्र आघात करीत बसत नाहीं, त्याप्रमाणें लोकांचें उत्पन्न व खर्च पाहून त्यांपासून द्रव्यग्रहण करावें.

( ३ ) राजानें आपल्या पक्षाकडील लोकांशीं सरळपणें वागावें आणि शत्रुपक्षाचे धान्यप्रदेश आश्वादिकांच्या पायांखालीं तुडवून टाकावे. आपला पक्ष बळकट आहे, असें आढळून आल्यास शत्रूवर चाल करावी आणि आपल्यामध्यें कोठें

न्यूनता आहे, तें सर्वदा पाहून रहावें. शत्रूचे दोष उघडकीस आणावे आणि मृगयादिकांच्या मिषानें परराष्ट्रांत प्रवेश करून शत्रुपक्षीय लोकांचा नाश करावा आणि अरण्यांतील पुष्पांप्रमाणें त्यांजपासून द्रव्य काढावें. इतरांस अविज्ञात अशा स्थानाचा आश्रय करून पर्वताप्रमाणें विशाल व विभवसंपन्न राजांचा गुप्तपणें युद्ध करून नाश करावा. मयूराप्रमाणें वर्षाकालांतील रात्रींच्या वेळीं निर्जन प्रदेशांत राहून अंतःपुरांतील स्त्रियांचें त्यानें रंजन करावें. त्यानें आपलें कवच कधींहि टाकूं नये व आपणच आपलें संरक्षण करावें. शत्रूंच्या हेरांच्या तडाक्यांत सांपडूं नये. कारण पाशज्ञान नसलेल्या राजास कपट-भूमीवर नेऊन त्यांजकडून त्याचा नाश होण्याचा संभव आहे. कोणी कुटिल शत्रूंनीं विषमयी कन्या वगैरे निर्माण करून फसविण्याचा प्रयत्न केल्यास त्या विषकन्यांचा आणि त्या कुटिल शत्रूंचाहि राजानें नाश करावा.

मयूर आपले मोठमोठे पंख टाकून दृढमूल असे बळकट पंख ठेवितो. त्याप्रमाणें सैन्याचीं मोठमोठीं शिबिरें, नटनर्तक, वारवनिता इत्यादिकांचा त्याग करून हितकारक अशा अमात्य, शूरादि लोकांची योजना राजानें करावी. मयूरा-प्रमाणें कांहीं ना कांहीं स्तुत्य कार्य करीत रहावें. ज्याप्रमाणें पतंग अरण्यांत सर्वत्र फिरून तें निष्पत्र करून सोडतात, त्याप्रमाणें सर्वांनीं मिळून शत्रुराष्ट्रावर चालून जाऊन त्याची दाणादाण उडवावी. मयूराप्रमाणें सर्वत्र वागून राजानें स्वराज्यपालन करावें. जिच्या योगानें आत्मबुद्धि कार्यक्षम होईल, अशी नीति राजानें ग्रहण करावी. कोणत्याहि गोष्टीचा निश्चय आत्मविचारानें करून दुसऱ्याचे विचारानें तिला कायम स्वरूप द्यावें. आत्मविचाराला स्थिर स्वरूप शास्त्रज्ञानानेंच येत असतें. शत्रूशीं सामोपचारानें वागून विश्वास दाखवावा, आपलें सामर्थ्य विचारांत घ्यावें आणि स्वतःशींच मागील पुढील सर्व विचार करून कार्यनिश्चय करावा. राजा सामोपचारानें वागणारा, शहाणा आणि कार्याकार्यदक्ष असावा. जो शहाणा असुन ज्याचे विचार सर्वदा गुप्त असतात, त्याला कांहीं दुसऱ्यांनीं सांगण्यासारखें नसतें. बृहस्पतीसारखा शहाणा असूनहि एखाद्या वेळीं तो निर्बुद्धासारखी कृति करून लोकनिंदेस पात्र होईल,

१ प्राचीन काळीं विषमय कन्या निर्माण करून 'ही कन्या द्वीपांतराहून आणली आहे. ही जातीनें पद्मीण असून हिच्या स्पर्शानें ऐशीं वर्षांचा वृद्ध देखील सोळा वर्षांचा तरुण होतो. ही सुंदरी आपल्याकरितांच आणली असून आपण हिचा स्वीकार करावा,' असें राजे लोक आपल्या शत्रूंना सांगून त्यांना फसवीत असत.

तरी पाण्यांत टाकिलेल्या तप्त लोखंडाप्रमाणें तो युक्तीनें लवकरच थंड होऊन पूर्वस्थितीवर येईल.

(४) शास्त्रांत सांगितलेलीं कर्तव्यें आपणाकडून किंवा शत्रूकडून होत आहेत किंवा नाहींत, याची चौकशी राजानें ठेवावी. कर्तव्यज्ञानी राजानें स्वभावानें मृदु, उत्तम शीलाचे, प्राज्ञ, शूर आणि बलवान् असे लोक आपल्या कार्यांवर नेमावे. ज्याप्रमाणें तारा सुरांना योग्य जमतील अशा रीतीनें ताणून लावतात, त्याप्रमाणें लोकांच्या योग्यतेनुरूप कामें त्यांना देऊन राजानें त्यांना अनुसरून वागावें. धर्माच्या विरुद्ध न जातां सर्वांचें प्रिय करावें. ' हा राजा माझा, हा राजा माझा' असें ज्यासंबंधीं प्रजाजन म्हणत असतात, तो पर्वताप्रमाणें अचल असतो. ज्याप्रमाणें सूर्य आपले किरण लांबवर टाकितो, त्याप्रमाणें व्यवसायांत निमग्न होऊन आणि प्रिय आणि अप्रिय हीं सारखीं समजून धर्मांचें रक्षण करावें. जे कुल, प्रजा आणि देश ह्यांचे धर्म जाणणारे, मृदु भाषणें करणारे, मध्यम वयांत असणारे, निर्दोष, राजहितामध्यें उद्युक्त, निर्लोभी, कधींहि व्याकुळ न होणारे, सुशिक्षित, आत्मनिग्रही, धर्मनिष्ठ व धर्म आणि अर्थ ह्यांचें रक्षण करण्यास समर्थ असतील, अशाच लोकांची सर्व कार्यांवर योजना करावी. याप्रमाणें राजानें कार्यांचा आरंभ आणि परिणाम ह्यांकडे लक्ष देऊन आणि हेरांचें साहाय्य मिळवून सुखानें रहावें.

(५) ज्या राजाचा क्रोध आणि हर्ष हीं कधीं व्यर्थ होत नसतात, सर्व गोष्टी ज्याच्या नजरेखालीं होतात, आपल्या कोशावर ज्याची स्वतःची दृष्टि असते, त्याला पृथ्वी द्रव्य देणारी होते. ज्याची कृपा उघडपणें होत असून ज्याची शिक्षाहि यथार्थ असते आणि जो आपलें व राष्ट्राचें योग्य संरक्षण करीत असतो, तोच राजा राजधर्मवेत्ता होय. उदय पावलेला सूर्य आपल्या किरणांच्या योगानें जसें सर्वत्र पाहत असतो, त्याप्रमाणें राजानें आपल्या सर्व राष्ट्रावर नित्य नजर ठेवावी. आपले सेवक आणि हेर यांना ओळखून स्वतःच्या बुद्धीनें राजानें वागावें. काल प्राप्त झाला असतां लोकांकडून पैसा घ्यावा, परंतु तसें करण्यांत आपला हेतु काय आहे, तें लोकांना दाखवूं नये. शहाण्या राजानें, धेनूची धार जशी प्रत्यहीं काढितात, त्याप्रमाणें द्रव्यरूपानें पृथ्वीची धार काढावी. ज्याप्रमाणें भ्रमर पुष्पापासून मध गोळा करितो, त्याप्रमाणें राजानें लोकांपासून पैसा घेऊन त्याचा संग्रह करावा. प्रजेचें संरक्षण करून राहिलेल्या पैशाचा त्यानें धर्म आणि काम यांकडे उपयोग करावा. शास्त्रवेत्त्या व आत्म-

निग्रही राजानें संचय केलेल्या द्रव्यांतून कधीं खर्च करूं नये. कोणतीहि गोष्ट अत्यल्प असली, तरी तिरस्कार करून तिचा त्याग करूं नये; तसेंच शत्रूंचाहि अवमान कधीं करूं नये. स्वतःच्या बुद्धीनेंच आपल्या स्वतःची परीक्षा करावी. निर्बुद्ध मनुष्यावर कधींहि विश्वास ठेवूं नये. धृति, दक्षता, आत्मसंयम, बुद्धि, शरीरसंपदा, धैर्य, शौर्य आणि देश-काल यांसंबंधानें सावधपणा हे आठ गुण मनुष्याच्या संपत्तीची–मग ती लहान असो वा मोठी असो–वाढ होण्याचीं साधनें आहेत. अग्नि जरी अत्यल्प असला, तरी त्यावर घृत ओतल्यानें त्याची वाढ होते. एकाच बीजापासून हजारों अंकुरांची उत्पत्ति होत असते. राजाचे आय-व्यय विपुल असतात. म्हणून अल्प द्रव्याबद्दल देखील अव्यवस्थित राहूं नये.

शत्रु बाल असो, तरुण असो किंवा वृद्ध असो, आपण प्रमादशील असल्यास तो घात करण्यास चुकत नाहीं. योग्य काल आला असतां दुसरा एखादा संपन्न राजा त्याचाहि उच्छेद करील. काल कसा आहे, हें ज्याला यथार्थ रीतीनें समजतें, तोच सर्व राजांमध्यें श्रेष्ठ होय. शत्रु द्वेष करणारा असला, मग तो बलवान् असो अथवा निर्बल असो, तो आपली कीर्ति हरण करितो, आपल्या धर्माच्या आड येतो व आपल्या द्रव्यसामर्थ्याचाहि नाश करितो, म्हणून आत्मनिग्रही राजानें शत्रूसंबंधीं सर्वदा सावध असावें. आपल्या बुद्धीचें साहाय्य घेऊन ऐश्वर्याचा क्षय, वृद्धि, रक्षण आणि संचय हीं ध्यानांत आणून तसेंच आपली विजयेच्छा हिचाहि विचार करून बुद्धिमान् राजानें संधि करावा अथवा युद्धार्थ तयार व्हावें. तीव्र बुद्धीच्या योगानें बलवानाचाहि नाश होतो. बुद्धीमुळेंच बलाची वाढ होते. वाढणारा शत्रु बुद्धीच्याच योगानें नष्ट होतो. म्हणून बुद्धीच्याच विचारानें जें कार्य होतें तें प्रशस्त होय. शहाणा राजा निर्दोष असला म्हणजे वाटेल ती इच्छा अगदीं अल्प श्रमानें त्याला साध्य करून घेतां येते. ज्या राजाला स्तुतिपाठकांनीं आपली स्तुति करावी, असा लोभ सुटतो, त्याचें अकल्याण झाल्याशिवाय राहत नाहीं. म्हणून राजानें प्रजेपासून सौम्यपणानें आपल्या संपत्तीला साधनभूत अशाच वस्तु घ्याव्या. जर प्रजेला क्लेश देऊन त्यांजपासून नेहमीं द्रव्य काढण्याची राजा इच्छा करील, तर चमकणाऱ्या विजेप्रमाणें क्षणांत त्याचा नाश होईल.

विद्या, तप किंवा विपुल धन हें सर्व उद्योगानें मिळणें शक्य आहे आणि हा उद्योग मनुष्याच्या बुद्धीच्या ठिकाणीं वसत असतो. म्हणून मनुष्यानें

पुष्कळ उद्योग करावा. बुद्धिमान् आणि विचारवान् लोक ज्याचे योगानें पुढें आले आहेत, इंद्र, विष्णु, सरस्वती आणि सर्व भूतें हीं ज्यावर नित्य अवलंबून असतात, अशा देहाची सुज्ञ मनुष्यानें कधींहि अवहेलना करूं नये. लोभी मनुष्याचा त्याग करावा. लोभी मनुष्याला दुसऱ्याच्या द्रव्यानें कधींच तृप्ति होत नसते. सुखाचा लोभ सर्वांनाच असतो, परंतु द्रव्यहीन असला म्हणजे मनुष्य धर्मकामांचा त्याग करितो. लोभी पुरुष धन, उपभोग्य वस्तु, पुत्र, स्त्री, आणि ऐश्वर्य हीं सर्व दुसऱ्यापासून आपणांस मिळावीं, अशी इच्छा करीत असतो. लोभी मनुष्यामध्यें पुष्कळ दोष असतात. म्हणून राजानें लोभी मनुष्याला कधीं आश्रय देऊं नये. निकृष्ट जातीच्या मनुष्यालाहि राजानें उत्तम परीक्षा घेऊन कांहीं कार्यावर योजावें. शहाण्या राजानें शत्रूंचे सर्व उद्योग आणि हेतु ह्यांचा नायनाट करावा. हे पांडवा, जो धर्मशास्त्रामध्यें विद्वान्, मंत्रविचार गुप्त ठेवणारा, विश्वासू आणि कुलीन राजा असतो, तोच सामंतांना आपल्या ताब्यांत ठेवूं शकतो.

याप्रमाणें शास्त्रांत सांगितलेले सर्व राजधर्म मीं तुला संक्षेपानें सांगितले आहेत, ते तूं नीट लक्षांत ठेव. गुरूच्या आज्ञेनुसार जो ह्या राजधर्मांचें पालन करील, तो पृथ्वीचें पालन करूं शकेल. राजसुख दैवयोगानें प्राप्त झालेलें असो किंवा लोकांवर बळजबरी करून मिळविलेलें असो, तें जर अनीतीनें प्राप्त झालेलें असेल, तर त्या राजाला उत्तम प्रकारची गति किंवा राज्यसुखहि मिळत नाहीं. जो राजा सावध राहून संधि-विग्रहांचा योग्य विचार करून वागतो, तो धनसंपन्न, बुद्धिमान्, शीलवान्, गुणवान् आणि शौर्यवान् शत्रूंशीं भिडून त्यांचा वध करितो. राजानें वेगवेगळे कार्यसिद्धीचे मार्ग शोधून काढावे. उपाय सुचल्यावांचून कोणत्याहि बाजूला आपली बुद्धि जाऊं देऊं नये. निर्दोष मनुष्याचे ठिकाणीं दोष पाहणाऱ्या मनुष्याला पुष्कळ संपत्ति, विपुल यश किंवा पैसा मिळत नसतो. एकाच कार्यावर प्रवृत्त झालेल्या मित्रांपैकीं जो आपल्यावर मोठा कार्यभार घेऊं शकेल, तोच शहाण्या मनुष्याच्या प्रशंसेस पात्र होतो. जे हे राजधर्म मीं तुला सांगितले आहेत, त्यांप्रमाणें तूं आचरण करून प्रजेच्या पालनाकडे नित्य लक्ष्य देत जा. असें केल्यानें तुला सुखानें पुण्यफळाची प्राप्ति होईल. हे राजा, कोणताहि लोक धर्मानेंच प्राप्त होतो. १२. १. १२०.

---

## अध्याय १२१ वा.

[ १ दंडस्वरूपादिकांचें कथन. ]

( १ ) युधिष्ठिर—पितामहा, तूं मला हा सनातन राजधर्म सांगितलास. ह्या महादंडाच्या ठिकाणीं सर्व सत्ता असून त्याच्याचवर सर्व कांहीं अवलंबून आहे. हे प्रभो, देव, ऋषि, पितर, महात्मे, यक्ष, राक्षस, पिशाच, साध्य आणि विशेषेंकरून इहलोकचे तसेच तिर्यक् योनींतील सर्व प्राणी यांना हा सर्वव्यापी व महातेजस्वी दंडच श्रेयस्कर आहे, असें तूं मला सांगितलेंस. ह्या दंडावर सर्व चराचर विश्व आणि देव, दैत्य आणि मनुष्यें हीं सर्व आसक्त असल्याचें तुला कळून आलेंच आहे. म्हणून हे भरतश्रेष्ठा, मला हें सर्व तत्त्वरीत्या जाणण्याची इच्छा झाली आहे, तरी तो दंड म्हणजे काय? तो कशा प्रकारचा आहे? त्याचें स्वरूप काय? त्याला आधार कोणाचा आहे? त्याचा आत्मा कोण? तो कोठून झाला? त्याचा आकार कोणत्या प्रकारचा आहे? हे प्रभो, हा दंड प्रजेच्या विषयीं इतक्या सावधगिरीनें जागृत कां आहे? पूर्वींच्या व पुढील जगताचें परिपालन करण्यांत कोण जागृत आहे? दंड हा पूर्वीं कोणत्या नांवानें ज्ञात होता? दंड नांवाचा हा श्रेष्ठधर्म तरी कोणता? दंडाची स्थिति काय आणि याची गती कोणती–याचें फळ काय–तें सर्व मला सांग.

भीष्म—हे कुरुकुलोत्पन्ना, ऐक, दंड म्हणजेच व्यवहार होय. ह्या दंडावरच सर्व गोष्टी अवलंबून आहेत. धर्माचें प्रकाशन करणें याला व्यवहार असें म्हणत असतात. नेहमीं जागृत असणाऱ्या राजाच्या हातून धर्माचा लोप होऊं नये व धर्माचें स्वरूप रहावें, या प्रकाराला व्यवहार–ज्यामध्यें नीचमार्गानें परस्वादि हरण होत नसतें–म्हणत असतात. हे राजा, पूर्वीं मनूनेंहि म्हटलें आहे कीं, प्रिय आणि अप्रिय यांचा योग्य विचार करून व उचित दंड चालवून ज्याच्या योगानें प्रजेचें रक्षण केलें जातें, तोच धर्म होय. हे मनुष्येंद्रा, मीं हें सांगितलेलें वचन मनूचें असून तें पूर्वीं ब्रह्मदेवानें उच्चारिलेलें होतें; म्हणून त्याला प्राग्वचन ( आदिवचन ) असेंहि म्हणतात. त्यामध्यें व्यवहार सांगितला असल्यामुळें त्याला व्यवहारहि म्हणतात. दंड उत्तम प्रकारें चालविला असतां धर्मार्थ-काम सुरळीत चालतात. दंड हें मोठें दैवत असून त्याचें स्वरूप पेटलेल्या अग्नीप्रमाणें आहे. नील कमलाच्या पत्राप्रमाणें याचा श्यामवर्ण असून

याला चार दाढा आहेत, चार हात आहेत, तसेच आठ पाय असून अनेक डोळे आहेत. याचे कान शंकूसारखे असून केंस ताठ उभारलेले आहेत. याला जटा असून दोन जिभा आहेत. याचें तोंड तांबड्या रंगाचें आहे. याच्या अंगावर मृगाजिन आहे. अशा प्रकारचें उग्र स्वरूप धारण करणारा दंड असून त्याचा प्रतिकार करणें कोणालाहि शक्य नाहीं.

खड्ग, धनुष्य, गदा, शक्ति, त्रिशूल, मुद्गर, शर, मुसल, परशु, चक्र, पाश, दंड, ऋष्टि, तोमर हीं व दुसरींहि या लोकांत जीं कांहीं आयुधें आहेत, तीं सर्व मूर्तिमंत दंडाचींच स्वरूपें आहेत. या रूपांनीं दंड हा भिन्न करीत, छिन्न करीत, दुखवीत, कापीत, छाटीत, फाडीत, घात करीत आणि शत्रूवर चाल करीत जात असतो. हे युधिष्ठिरा, असि, विशसन, धर्म, तीक्ष्णवर्मा, दुराधर, श्रीगर्भ, विजय, शास्ता, व्यवहार, सनातन, इत्यादि दंडाचीं अनेक नांवें सांगितलीं आहेत. दंड हा प्रत्यक्ष भगवान् विष्णु आहे. दंड हा सर्वांस प्रभु नारायणासारखा आधारभूत आहे. तो सर्वदा विशाल स्वरूप धारण करणारा आहे, म्हणून त्याला महापुरुष म्हणत असतात. तसेंच त्याच्या पत्नीला-दंडनीतीला-ब्रह्मकन्या, लक्ष्मी, वृत्ति, सरस्वती आणि जगद्धात्री, अशीं नांवें आहेत. दंडाचींहि याप्रमाणें अनेक स्वरूपें आहेत. अर्थानर्थ, धर्माधर्म, बलाबल, भाग्याभाग्य, पुण्यापुण्य, गुणागुण, कामाकाम, ऋतु-मास, रात्रि, दिवस, क्षण, अप्रमाद-प्रमाद, हर्ष, क्रोध, शम, दम, दैव, प्रयत्न, मोक्षामोक्ष, भयाभय, हिंसा-अहिंसा, तप, यज्ञ, संयम, विषाविष, कार्याचा आदि, अंत, मध्य, व विस्तार, मद, प्रमाद, दर्प, दंभ, धैर्य, नयानय, शक्यता-अशक्यता, मान, स्तब्धता, व्ययाव्यय, विनय, दानशीलता, कालाकाल, अनृत, ज्ञान, सत्य, श्रद्धाश्रद्ध, क्लीबत्व, व्यवसाय, लाभालाभ, जयाजय, तीक्ष्णता, मृदुता, मृत्यु, आगम-अनागम, विरोधाविरोध, कार्याकार्य, बलाबल, असूया-अनसूया, धर्माधर्म, लोकलज्जा, निर्लज्जता, भीड, संपत्ति-विपत्ति, तेज, कर्म, पांडित्य, वाक्शक्ति आणि तत्त्वज्ञान हीं सर्व दंडाचीं स्वरूपें आहेत. हे कुरुकुलश्रेष्ठा, या लोकामध्यें दंडाची अशी बहुरूपता आहे. लोकांमध्यें जर हा दंड नसता, तर परस्परांनीं परस्परांचा निःपात करून टाकिला असता. हे युधिष्ठिरा, दंडाच्या भीतीमुळें लोक परस्परांचा नाश करीत नाहींत. हे राजा, दंडानें प्रत्येक दिवशीं प्रजेचें रक्षण केलें असतां तोच राजाच्या अभ्युदयास कारण होतो. म्हणून दंड हाच राज्याचा मुख्य आधार आहे.

हे नरेश्वरा, केवळ सत्यावर अवलंबून असणारा धर्म ब्राह्मणांमध्यें वास्तव्य करीत असतो. धर्मयुक्त असणारे जे श्रेष्ठ द्विज, त्यांमध्यें देवांचें वास्तव्य असतें. यज्ञाची उत्पत्ति देवांपासून आहे. यज्ञाच्या योगानें देवता संतुष्ट होत असतात. देवता संतुष्ट झाल्या असतां त्या इंद्राला कळवितात आणि मग इंद्र प्रजांवर अनुग्रह करून त्यांना अन्न देतो. सर्व भूतांचे प्राण अन्नावरच अवलंबून असतात. अन्नापासूनच सर्व भूतांचे प्राणांना नित्य स्थिरता येते आणि दंड हा त्यांच्या ठिकाणीं जागृत असतो. अशाप्रकारचा हा अविनाशी दंड क्षत्रियरूपानें नेहमीं प्रजांचें रक्षण करीत जागरूक असतो. ह्या दंडाला ईश्वर, पुरुष, प्राण, सत्त्व, चित्त, प्रजापति, भूतात्मा आणि जीव अशीं आठ नांवें आहेत. धर्म, व्यवहार, दंड, ईश्वर आणि जीव अशीं ज्याचीं पांच रूपें आहेत आणि जो सामर्थ्यसंपन्न आहे, अशा क्षत्रिय राजास ईश्वरानें आपलें ईश्वरत्व आणि दंड हीं अर्पण केलीं आहेत. कुल, विपुल धन, अमात्य आणि बुद्धि हें क्षत्रियांचें बल असून दुसऱ्या आठ गोष्टींनींहि त्यांना अधिक बल संपादन करतां येतें. गज, अश्व, रथ, पदाति, नावा, वेठीचे लोक, गांवचे लोक आणि पशु ह्या त्या आठ गोष्टी होत. हीं बलाचीं आठ अंगें होत, असें सांगितलें आहे. अथवा राज्याचें अंग असें जें सैन्य, रथदळ, गजदळ, सादी, पदाति, मंत्री, वैद्य, भिक्षुक, न्यायाधीश, मुहूर्त जाणणारे, दैवचिंतक, कोश, मित्र, धान्य व इतर साधनें, सात प्रकृति आणि पूर्वोक्त आठ अंगें मिळून राजाचें शरीरच होय. दंड (सैन्य) हें राज्याचें अंग असून त्यापासून सर्व गोष्टी प्राप्त होत असतात. ईश्वरानें क्षत्रियांच्या कार्यसिद्ध्यर्थ हा निष्पक्षपाती दंड प्रयासपूर्वक दिला आहे. हें सनातन विश्व त्या दंडाचेंच स्वरूप होय.

ब्रह्मदेवानें लोकसंरक्षणासाठीं व स्वधर्मस्थापनेसाठीं दाखविलेल्या ह्या धर्माइतकें दुसरें कांहीं राजांना पूज्य नाहीं. त्याचप्रमाणें वादि-प्रतिवादींच्या विवादापासून एक व्यवहार उत्पन्न होत असतो. त्यांत दोघांपैकीं कोणाएकाचें म्हणणें दुसऱ्यानें मान्य करणें हें त्याचें लक्षण आहे. हा व्यवहार वादिप्रति-वादींपैकीं एकाला जयावह होत असतो. तसाच वेदापासून निघणारा जो एक व्यवहार आहे, त्याला वेदप्रत्यय म्हणतात. हा वेदामध्यें सांगितलेल्या पर-दार्यादि दोषांची निवृत्ति करितो. त्याच्या निवृत्त्यर्थ धर्मसभेंत गेलें असतां शास्त्रोक्त प्रायश्चित्त सांगितलें आहे. अर्थात् त्याला वेदाचा आधार आहे. तिसरा कुलाचाराचा व्यवहार शास्त्रांत सांगितला आहे, त्याविषयींहि शास्त्रोक्त

दंड सांगितला आहे. ज्यास वादिप्रतिवादी कारणभूत होतात, असा वर सांगितलेला जो दंड, तो राजाच्या ठिकाणीं असतो. त्याला सुद्धां वेदाचा आधार आहे. आतां ज्याचें स्वरूपवर्णन वेदामध्यें आहे, तो धर्म सर्वदा गुणकारकच असतो. असा हा प्रायश्चित्तरूपी दंड चित्तशुद्ध झालेल्या मुनींनीं धर्मानुरोधानें सांगितला आहे.

युधिष्ठिरा, ब्रह्मदेवानें सांगितलेला, तिन्ही लोकांना धारण करणारा, सर्व लोकांचें रक्षण करणारा, वैभवाची वृद्धि करणारा, असा हा सत्यस्वरूपी व्यवहार आहे. दंड हा सनातन व्यवहार आहे आणि हा व्यवहार वेदांत प्रतिपादन केला आहे. वेद म्हणजे धर्मच होय आणि धर्म म्हणजे सन्मार्ग होय. पूर्वी प्रजापति पितामह ब्रह्मदेव उत्पन्न झाला. हा सुर, असुर, राक्षस, मनुष्यें, सर्प इत्यादिकांचा कर्ता आहे. त्याच्याचपासून हा वादि-प्रतिवादींच्या विवादाचा व्यवहार उत्पन्न झाला आहे. त्यानें ह्या व्यवहारासंबंधीं असें म्हटलें आहे कीं, ' जो राजा धर्मानें वागतो, त्याला आपली माता, पिता, भ्राता, भार्या आणि पुरोहित यांपैकीं कोणीहि अन्यायाचें आचरण केलें, तरी त्यांस दंड करणें उचित आहे. ' १२. १. १२१.

---

## अध्याय १२२ वा.

[ १ भीष्म वसुहोम-मांधातृसंवादाच्या रूपानें दंडोत्पत्तिकथन करितो. ]

( १ ) भीष्म—ह्यासंबंधी एक पुरातन इतिहास सांगत असतात. अंगदेशामध्यें वसुहोमनामक एक फार प्रसिद्ध आणि तेजस्वी राजा होऊन गेला. महातपस्वी व नित्य धर्मवेत्ता तो राजा आपल्या पत्नीसहवर्तमान पितर, देव आणि ऋषि यांना पूज्य अशा मुंजपृष्ठ देशाला गेला. तेथें हिमालयाच्या शिखरावरील सुवर्णाच्या मेरुपर्वतावर परशुरामानें मुंजावट नांवाच्या झाडाखालीं आपली जटा बांधिली. हे राजेंद्रा, तेव्हांपासून अत्यंत तीव्र तपश्चर्या करणाऱ्या ऋषींनीं रुद्राचें वसतिस्थान अशा त्या प्रदेशाला मुंजपृष्ठ असें नांव दिलें. तो राजा तेथें राहूं लागल्यावर आपल्या अंगच्या अनेक चांगल्या गुणांनीं ब्राह्मणांना संमत असा देवर्षिसदृश होऊन राहिला.

कोणी एके समयीं शत्रुनाशक आणि उदार अंतःकरणाचा, असा इंद्राचा मित्र राजा मांधाता त्याजकडे आला आणि मोठ्या नम्रतेनें त्या तपोनिधान राजापुढें

उभा राहिला. वसुहोमानें त्याला पाद्य, अर्घ्यादि देऊन त्याची पूजा केली आणि 'तुमचे सप्तांग राज्याचें कुशल आहेना, कांहीं हानि होत नाहींना ?' असें विचारिलें. नंतर सत्पुरुषांनीं आचरिलेल्या मार्गानुसार वागणाऱ्या त्या मांधात्यास वसुहोमानें विचारलें, 'राजा, मीं तुझें कोणतें कार्य करावें, अशी तुझी इच्छा आहे.' हें ऐकून मांधात्याला मोठा आनंद झाला आणि तो त्या महाज्ञानी राजसत्तम वसुहोमाला बोलला—

**मांधाता**—हे राजा, तूं बृहस्पतीच्या मताचें पूर्ण अध्ययन केलें आहेस. त्याचप्रमाणें हे नरोत्तमा, शुक्राचार्यांचेंहि शास्त्र तुला विदित आहेच. ह्यास्तव दंडाची उत्पत्ति कशी झाली, त्याच्यापूर्वी काय होतें, पुढें काय असतें, क्षत्रियांच्याच स्वाधीन होऊन हा कां राहिला आहे, हें सर्व, हे सुमहाप्राज्ञा, तूं मला सांग. मी तुला गुरुदक्षिणा देण्यास तयार आहें.

**वसुहोम**—हे राजा, प्रजाविनय रक्षण करण्याकरितां धर्माचा केवळ आत्मा, लोकसंग्रह करणारा व सनातन असा दंड कसा उत्पन्न झाला, तें सांगतों, ऐक. सर्वलोकपितामह जो भगवान् ब्रह्मदेव त्याला एकदां यज्ञ करण्याची इच्छा उत्पन्न झाली, परंतु आपणाला योग्य असा ऋत्विज त्याला कोणीहि मिळेना, असें आम्हीं ऐकिलें आहे. म्हणून त्यानें आपल्या मस्तकावर एक गर्भ पुष्कळ वर्षेपर्यंत धारण केला. एक हजार वर्षे झाल्यावर त्याला शिंक आली, त्यासरशीं तो गर्भ खालीं पडला. हे अरिंदमा, तो गर्भ क्षुपनामक प्रजापति झाला. त्यानें ब्रह्मदेवाचें ऋत्विज्य संपादन केलें. हे पार्थिवश्रेष्ठा, ब्रह्मदेवाचें तें सत्र सुरू असतां त्यानें यज्ञकर्त्याचें स्वरूप धारण केल्यामुळें त्याच्या जवळ असलेला लोकनियमनरूप दंड अंतर्धान पावला. तो दंड अशा रीतीनें गुप्त होतांच प्रजेमध्यें संकर उत्पन्न झाला. त्यामुळें काय करावें, काय न करावें, तसेंच भोज्याभोज्य, पेयापेय, यांसंबंधीं कांहींच निर्बंध राहिला नाहीं. मग तेथें फलप्राप्ति कोठून होणार ? लोक परस्परांची हिंसा करूं लागले, गम्यागम्यसंबंध कांहींच उरला नाहीं. आपलें आणि दुसऱ्याचें द्रव्य यांमध्यें कांहींच भेद राहिला नाहीं. सारमेय ज्याप्रमाणें मांसाच्या तुकड्याकरितां परस्परांच्या नाशार्थ उद्युक्त होतात, त्याप्रमाणें लोक परस्परांचें द्रव्य हरण करूं लागले. प्रबल लोक निर्बलांचा नाश करूं लागले. मर्यादा म्हणून कोठेंच राहिली नाहीं.

नंतर सनातन भगवान् विष्णूचें पूजन करून पितामह ब्रह्मदेव म्हणाला,

'केशवा, या प्रसंगीं तूं मजवर कृपा केली पाहिजे. जेणेंकरून या लोकांत संकर होणार नाहीं, अशी कांहीं व्यवस्था तूं कर.' हें ऐकून त्या शूलायुध देवश्रेष्ठ विष्णूनें पुष्कळ वेळ ध्यान केलें आणि तो दंडस्वरूपानें उत्पन्न झाला. त्या धर्माचरणी दंडापासून तिन्ही लोकांत विख्यात नीतिदेवी सरस्वतीला दंडनीतिनामक कन्या झाली. पुढें त्या विष्णूनें पुनरपि बराच वेळ ध्यान करून प्रत्येक वर्गावर एकेक शास्ता निर्माण केला. सहस्रनेत्र इंद्राला त्यानें देवांचा अधिपति केलें; सूर्यपुत्र यमाला त्यानें पितरांचें प्रभुत्व दिलें; धन आणि राक्षस यांचा स्वामी कुबेराला केलें; मेरूला पर्वतांवर आधिपत्य दिलें. समुद्राला नदीपति केलें; जल आणि सुरा यांचा प्रभु वरुणाला केलें; मृत्यूला प्राणांचें स्वामित्व दिलें; तेजाचें स्वामित्व अग्नीला दिलें; रुद्रांचा अधिपति विशालनयन सनातन महात्मा शंकर याला केलें; वसिष्ठाला ब्राह्मणांचें ईशत्व दिलें; त्यानें वसूंचा स्वामी जातवेदस्, ग्रहांचा स्वामी सूर्य, नक्षत्रांचा चंद्र, ओषधींचा अंशुमान् आणि भूतांचा स्वामी द्वादशभुज कुमार स्कंद याला केलें. संहार आणि वृद्धि यांना कारणीभूत होणारा काल याला सर्व प्राण्यांचा अधिपति केलें. तसेंच शस्त्र, शत्रु, यम आणि कर्म ज्याचे चार भेद आहेत त्या मृत्यूचें आणि सुखदुःखाचेंहि आधिपत्य त्या कालाकडेच दिलें. जो सर्व ऐश्वर्यसंपन्न, सर्वांचा देव, राजराज, लोकाधिपति, शूलधारी महादेव त्याला रुद्रांचा अधिपति केलें, असें वेदामध्यें सांगितलें आहे. ब्रह्मदेवापासून निर्माण झालेला जो क्षुप नांवाचा पुत्र, त्याला सर्व प्रजांचा तसाच धर्मवेत्त्यांचाहि अधिपति केलें.

पुढें ब्रह्मदेवाचा यज्ञ यथाविधि समाप्तीला गेल्यावर महादेवानें तो धर्मरक्षक दंड सत्कारपूर्वक विष्णूला दिला. विष्णूनें तो अंगिराला दिला; मुनिसत्तम अंगिरानें तो इंद्र व मरीचि यांना दिला; मरीचिनें भृगूला दिला; भृगूनें ऋषींना दिला व ऋषींनीं लोकपालांना दिला; लोकपालांनीं तो दंड क्षुपाला दिला; क्षुपानें सूर्यपुत्र मनूला दिला; श्राद्धदेव मनूनें सूक्ष्म धर्म आणि अर्थ यांसाठीं तो आपल्या पुत्रांच्या स्वाधीन केला. न्यायान्याय यांचा नीट विचार करून निर्णय देणें हेंच दंडाचें प्रयोजन आहे. वाटेल त्या रीतीनें त्याचा उपयोग करावयाचा नाहीं. दंडाचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे दुष्टांचा निग्रह करणें हें होय. द्रव्यसंपादन हा कांहीं त्याचा वास्तविक हेतु नाहीं. अल्प कारणावरून शरीर व्यंग करणें, वध करणें, शरीराला त्या त्या पीडा देणें, कड्यावरून ढकलणें, किंवा हद्दपार करणें ह्या शिक्षा देऊं नयेत.

सूर्यपुत्र मनूनें लोकांच्या संरक्षणाकरितांच हा दंड आपल्या पुत्रांस दिला असून त्यानंतर क्रमप्राप्त झालेला हा दंड प्रजेचें पालन करण्यांत सर्वदा जागृत आहे. भगवान् इंद्र अशाप्रकारें प्रजापालन करण्यांत जागृत आहे. इंद्राहून प्रभावसु अग्नि हा जागरूक असून अग्नीहून वरुण, वरुणाहून प्रजापति, प्रजापतीहून विनयात्मक धर्म हा जागरूक असतो. धर्माहून ब्रह्मदेवपुत्र सनातन व्यवसाय आणि व्यवसायाहून तेज हें प्रजापालनांत जागृत आहे. त्या तेजाहून ओषधी, ओषधींहून पर्वत, पर्वताहून रस, रसगुणांहून देवी निऋति, निऋतीहून नक्षत्रें, नक्षत्रांहून वेद, त्यांहून हयग्रीव, हयग्रीवाहून अव्यय प्रभु ब्रह्मदेव जागृत आहे. ब्रह्मदेवापेक्षां महादेव शंकर, शंकरापेक्षां विश्वेदेव, विश्वेदेवांपेक्षां ऋषि, ऋषींपेक्षां भगवान् सोम, सोमाहून सनातन देव, देवापेक्षां ब्राह्मण ह्या लोकीं जागृत आहेत, हें ध्यानांत ठेव. ब्राह्मणांहूनहि क्षत्रिय हे धर्माला अनुसरून प्रजापालन करीत असतात. अशा रीतीनें हें सनातन स्थावरजंगम विश्व क्षत्रियांकडून चालविलें जात आहे.

ह्या लोकांत प्रजा जागृत असून त्यांवर दंड हा जागरूक आहे. दंड हा पितामह ब्रह्मदेवासारखा तेजस्वी असून सर्वांचा नाश करणारा आहे. हे भारता, काल हा पूर्व, मध्य व अंत अशा तीनहि कालीं जागृत असतो. ह्याची सत्ता सर्व लोकांवर असल्यामुळें हा प्रजापति महादेव आहे. हा काल देवदेव, शिव, सर्व, कपर्दी, शंकर, रुद्र, स्थाणु, उमापति ह्या नांवांनीं प्रसिद्ध असून सर्वदा प्रजापालनांत तत्पर असतो. याप्रमाणें आरंभीं, मध्यें आणि अंतीं दंडाची स्थिति कोणती असते, तें मीं तुला सांगितलें. धर्मवेत्त्या राजानें याला अनुसरून यथान्याय वागावें.

भीष्म—जो कोणी वसुहोमाचें हें मत श्रवण करील आणि त्याप्रमाणें वागेल, त्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण होतील. हे नरश्रेष्ठा, धार्मिक लोकांचें नियमन करणारा जो दंड त्याची उत्पत्ति, तो कोण, वगैरे सर्व माहिती मीं तुला सांगितली आहे. १२. १. १२२.

---

## अध्याय १२३ वा.

[ १ कामंदकागरिष्ठसंवादरूपानें भीष्माकडून युधिष्ठिरास धर्मार्थ-कामविचार-कथन. ]

( १ ) युधिष्ठिर—ताता, धर्म, अर्थ आणि काम ह्यांविषयीं तुझें निश्चित मत ऐकण्याची माझी इच्छा आहे. ही लोकयात्रा पूर्णपणें कोणावर अवलंबून आहे ? धर्मार्थकामांचें मूळ काय, त्यांचें उत्पत्तिस्थान कोणतें, ते परस्परांशीं कसे संबद्ध असतात व ते वेगवेगळे कसे राहतात, हें मला सांग.

भीष्म—जेव्हां लोक चांगल्या मतानें धर्मपूर्वक अर्थसाधन करूं पाहतात, तेव्हां हे तीन पुरुषार्थ—अनुकूल काल, योग्य कारण आणि साजेसा प्रसंग हीं असलीं म्हणजे—एकत्र संबद्ध होतात. धर्म हा अर्थाचें मूल आहे आणि काम हा त्याचें फल आहे. या सर्वांचें मूळ संकल्प हें होय. संकल्प विषयात्मक आहे आणि सर्व विषय उपभोगासाठीं आहेत. संकल्प हा त्रिवर्गाचें मूळ असून संकल्पापासून निवृत्ति हाच मोक्ष होय. धर्मापासून शरीरसंरक्षण, अर्थापासून धर्मप्राप्ति आणि कामापासून इंद्रियसुख असल्यामुळें हे सर्व रजोगुणात्मक आहेत. हे आत्मज्ञानासाठीं निष्कामबुद्धीनें आचरावे. मनानें सुद्धां यांचा त्याग करूं नये. विवेकबुद्धीनें त्यांच्या फलावरील आसक्ति सोडून द्यावी. निष्कामबुद्धि ठेवून आचरण केलें असतां हे तिघेहि मोक्षदायक होत असतात. फलप्राप्तीच्या इच्छेनें एखादें कार्य केलें असतां तें वेळीं फलदायक होतें व कधीं होत नसतें. द्रव्यसंपादनाचीं सेवा, कृषि इत्यादि धर्माशिवाय दुसरींहि साधनें आहेत. धर्मानें द्रव्यप्राप्ति होते, याविरुद्ध दुसरींहि कित्येकांचीं मतें आहे. कित्येक लोक द्रव्य स्वभावतःच मिळतें असें म्हणणारे आहेत तर कित्येक तें दैवानें मिळतें असें म्हणणारे आहेत. म्हणून धर्मासाठीं द्रव्याची आवश्यकता नाहीं. द्रव्य मिळवून सुद्धां कित्येक वेळां त्याचा उपयोग धर्मकार्याकडे न होतां वाईट कार्याकडे होतो. अज्ञानानें निकृष्ट दशेला बुद्धि पावलेल्या मनुष्याला धर्मार्थांचें फळ मिळत नाहीं. फलाची इच्छा करणें हा धर्माचा दोष आहे आणि द्रव्याला गुप्त ठेवून दानादिकांत त्याचा व्यय न करणें हा अर्थाचा दोष होय. तसाच अत्यानंद होणें हा कामाचा दोष होय. धर्मार्थकाम हे निष्कामबुद्धीनें आचरिले असतां त्यांचे परिणाम सुखदायक होतात.

ह्या पुरुषार्थासंबंधीं कामंदक मुनि आणि आंगरिष्ट राजा यांमधील संवाद पुरातन इतिहास म्हणून सांगत असतात, तो लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. एकदां कामंदक ऋषि बसला असतां आंगरिष्ट राजानें त्यास नमन करून विचारलें, 'काममोह यांच्या तडाक्यांत सांपडून ज्या राजाचे हातून पातक घडतें, त्याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला असतां त्या पापाचा नाश कशाच्या योगानें होईल ? त्याचप्रमाणें जो कोणी प्रसिद्ध मनुष्य अज्ञानानें धर्म समजून अधर्माचें आचरण करितो, त्याचें राजानें निवारण कसें करावें ?'

कामंदक—जो कोणी धर्मार्थांचा त्याग करून केवळ कामाच्या मागें लागतो, त्याच्या बुद्धीचा लोप होतो आणि त्या बुद्धिलोपाबरोबर धर्म आणि अर्थ यांच्या नाशास कारणीभूत होणारा मोह उत्पन्न होतो. त्या मोहामुळें नास्तिकता आणि दुराचार उत्पन्न होतात. दुराचारी आणि दुष्ट लोकांचें राजानें जर नियमन केलें नाहीं, तर लोक घरांत असलेल्या सर्पाप्रमाणें त्या राजाला भितात. प्रजा, ब्राह्मण आणि साधु पुरुष हे त्याच्या कलानें वागत नाहींत. असें झालें असतां त्याचें जीवित संशयांत येऊन तोहि वधाला पात्र होतो. तो निंदा आणि अवमान यांना पात्र झाल्यामुळें त्याचें जगणें अत्यंत कष्टमय होतें. त्याचें निंद्य जीवित म्हणजे मरणेंच होय. अशा स्थितींत पाप दूर करण्याचे आचार्यांनीं उपाय सांगितले आहेत, ते असे:—वेद पठण करावे, ब्राह्मणांचा सत्कार करावा, धर्माविषयीं उदार मन ठेवावें, थोर कुलाशीं विवाहसंबंध जोडावा, क्षमाशील आणि विचारशीलवान् ब्राह्मणांची सेवा करावी, जप करावा, सर्वदा उदकावर जाऊन स्नान करावें, धार्मिक लोकांच्या संगतींत सुखानें रहावें, पापी लोकांना दूर सारावें, गोड भाषणानें सर्वांना संतुष्ट करावें, तसेंच सत्कृत्यांनीं त्यांची मर्जी संपादन करावी, सर्वदा मी तुझा आहें, असें प्रत्येकाला म्हणावें आणि दुसऱ्यांचे गुण गावे.

अशाप्रकारचें आचरण ठेवल्यानें मनुष्य निष्पाप होऊन तो लोकमान्य होतो आणि त्यायोगानें मोठमोठीं पापेंहि नाश पावतात. गुरु जो परम धर्म तुला सांगत जातील, त्याप्रमाणें वागत जा. गुरुप्रसादाच्या योगानें तुला मोठी कल्याणप्राप्ति होईल. १२. १. १२३.

---

## अध्याय १२४ वा.

[ १ शीलाचें लक्षण काय व त्याची प्राप्ति कशी करून घ्यावी, असा युधिष्ठिराचा प्रश्न. २ भीष्म दुर्योधन-धृतराष्ट्रसंवादरूपानें शीलमहत्त्व कथन करितो. ]

(१) **युधिष्ठिर**—हे नरश्रेष्ठा, ह्या भूतलावरील हे सर्व लोक धर्माच्या आधीं शील असें म्हणतात. त्यामुळें मला मोठा संशय उत्पन्न झाला आहे. म्हणून हे धर्मश्रेष्ठा, तें मला कळणें तुला योग्य वाटत असेल, तर त्याची प्राप्ति कशी करून घ्यावयाची, तें सर्व जाणण्याची माझी इच्छा आहे. हे भारता, तें प्राप्त कसें होतें व त्याचें लक्षण काय, हें मला सांग.

( २ ) **भीष्म**—हे मानदा, पूर्वी तुम्ही इंद्रप्रस्थामध्यें असतां तुमची ती मोठी संपत्ति पाहून संतप्त झालेल्या दुर्योधनानें तूं आणि तुझे बंधु यांनीं तयार केलेल्या सभेमध्यें जें सांगितलें, तें श्रवण कर. तुझी ती सभा अवलोकन करून आणि तेथील सर्व ऐश्वर्य पाहून दुर्योधनानें पित्याजवळ बसून तें सर्व वृत्त त्याला सांगितलें. तें भाषण ऐकून धृतराष्ट्र कर्णासहित दुर्योधनाला बोलला—

**धृतराष्ट्र**—हे पुत्रा, तुझा संताप कशाकरितां होत आहे, तें सर्व जाणण्याची माझी इच्छा आहे. तुझें भाषण ऐकल्यावर माझे सांगण्याप्रमाणें वागण्यास तूं तयार असशील, तर तुझी समजूत मी घालीन. हे परपुरंजया, तुला मोठें ऐश्वर्य प्राप्त झालें आहे. त्यामुळें तुझे सर्व बंधु, मित्र आणि संबंधी, तुझे सेवक होऊन राहिले आहेत. तूं उंची वस्त्रें परिधान करितोस, तसेंच मांसोदन भक्षण करीत असतोस. मोठमोठे जातिवंत अश्व तुला वाहून नेत असतात. असें असतां तूं असा फिकट व कृश कां ?

**दुर्योधन**—हे भारता, युधिष्ठिराच्या वाड्यामध्यें महात्मे दहाहजार विद्वान् ब्राह्मण सुवर्णपात्रामध्यें भोजन करीत आहेत. दिव्य पुष्पें आणि फळें, तित्तिरपक्ष्याप्रमाणें करड्या रंगाचे अश्व आणि विविध प्रकारचीं वस्त्रें यांनीं युक्त ती दिव्य सभा पाहून आणि माझे शत्रु जे पांडव त्यांची ती कुबेरतुल्य संपत्ति अवलोकन करून मला संताप झाला आहे.

**धृतराष्ट्र**—पुत्रा, तुला जर युधिष्ठिराच्या सारखी किंवा त्याहूनहि अधिक संपत्तीची इच्छा असेल तर हे नरश्रेष्ठा, तूं आधीं शीलवान् हो. शीलाच्या योगानें त्रैलोक्यहि जिंकितां येईल, यांत संशय नाहीं. शीलवान् लोकांना ह्या

लोकामध्यें असाध्य असें कांहीं नाहीं. मांधात्यानें एका रात्रींत, जनमेजयानें तीन दिवसांत आणि नाभागानें सात दिवसांत सर्व पृथ्वी मिळविली. हे सर्व राजे शीलवान् असून दयासंपन्न होते. त्यामुळें जणुंकाय त्यांच्या गुणांनींच पृथ्वी विकत घेतल्यासारखी होऊन ती आपण होऊन त्यांजकडे आली.

दुर्योधन—हे भारता, ज्या शीलाच्या योगानें त्यांनीं ही पृथ्वी मिळविली, तें शील कसें प्राप्त होतें, हें ऐकण्याची माझी फार इच्छा आहे.

धृतराष्ट्र—हे भरतकुलोत्पन्ना, ह्या शीलासंबंधीं पूर्वीं नारद ऋषींनीं सांगितलेला एक प्राचीन इतिहास सांगत असतात. दैत्य प्रल्हादानें शीलाचा आश्रय करून महात्म्या महेंद्राचें राज्य हरण केलें आणि सर्व त्रैलोक्य वश केलें. तेव्हां इंद्र बृहस्पतीकडे गेला आणि हात जोडून त्याला म्हणाला ‘ कल्याण कशांत आहे हें जाणण्याची माझी इच्छा आहे. ’ तेव्हां बृहस्पतीनें त्या इंद्राला मोक्षप्राप्तीला साधनभूत असें ज्ञान कल्याणकारक आहे, असें सांगून हीच गोष्ट सर्वश्रेष्ठ आहे असें सांगितलें. त्यावर इंद्रानें पुनः विचारिलें, ‘ त्याहूनहि विशेष कांहीं आहे काय ? ’

बृहस्पति—बाबा इंद्रा, याहूनहि सांगण्यासारखी विशेष गोष्ट आहे. तूं महात्म्या शुक्राचार्याकडे जाऊन त्याला विचार. हे सुरश्रेष्ठा, तुझें कल्याण होवो.

नंतर त्या महातेजस्वी इंद्रानें भार्गवाकडे जाऊन त्यापासून मोठ्या आनंदानें त्या ज्ञानाची प्राप्ति करून घेतली. भार्गवानें–शुक्राचार्यानें–इंद्राला अशा प्रकारें ज्ञानोपदेश केल्यावर इंद्रानें ‘ याहूनहि कांहीं विशेष आहे काय ? ’ असा त्या शुक्राचार्याला पुनः प्रश्न केला. त्यावर ‘ महात्म्या प्रल्हादाला याविषयीं विशेष ज्ञान आहे,’ असें शुक्राचार्यानें सांगितलें. तेव्हां इंद्राला अत्यानंद झाला आणि तो ब्राह्मणवेष धारण करून प्रल्हादाकडे गेला आणि त्याला म्हणाला, ‘ कल्याण कशांत आहे, तें मला सांग. ’ त्यावर प्रल्हाद म्हणाला, ‘ हे ब्राह्मणश्रेष्ठा, तिन्ही लोकांचें राज्य करण्यांत मी आसक्त असल्याकारणानें मला आतां यत्किंचित्हि तुजशीं बोलण्याला वेळ नाहीं.’ त्यावर तो ब्राह्मणरूपी इंद्र म्हणाला, ‘ आतां वेळ नसेल, तर जेव्हां तुला वेळ असेल, तेव्हां सांग.’ तें ऐकून प्रल्हाद संतुष्ट झाला आणि त्यानें शुभकाल पाहून त्या ब्राह्मणरूपी इंद्राला तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. त्या ब्राह्मणानेंहि यथान्याय मनोभावानें त्याची गुरूसारखी सेवा केली. पुढें एके काळीं हे धर्मज्ञा, त्या ब्राह्मणानें ‘ तुला हें त्रैलोक्याचें

राज्य कसें मिळालें, तें मला सांग,' म्हणून त्या प्रल्हादाला विचारलें असतां तो म्हणाला—

प्रल्हाद्—हे विप्रा, मी राजा आहें, म्हणून ब्राह्मणांचा कधींहि विरोध करीत नाहीं. ते मला शुक्रप्रोक्त नीतिशास्त्राचीं तत्त्वें सांगूं लागले असतां मी मनःसंयमन करून त्यांचें म्हणणें शिरसामान्य करितों. ते सर्वदा विश्वासपूर्वक माझ्याशीं भाषण करितात आणि मला सन्मार्गाला लावतात. मी नेहमीं शुक्राचार्यांच्या नीतिशास्त्राप्रमाणें वागत असतों, ब्राह्मणांची शुश्रूषा सदैव करितों; कोणाचाहि मत्सर करीत नाहीं; धर्मानुसार वागतों; कोणावर क्रोध करीत नाहीं; मी नियमानें वागत असतों; मीं इंद्रियें जिंकिलीं आहेत. मधमाशा ज्याप्रमाणें मोहोळामध्यें थेंबथेंब मध सांठवितात, त्याप्रमाणें ते ब्राह्मण शास्ते मजवर सदुपदेशाचा वर्षाव करितात; मीहि त्यांच्या तोंडून निघालेल्या ज्ञानामृताचा स्वाद घेत नक्षत्रांतील चंद्राप्रमाणें स्वजातीयांचा अधिपति झालों आहें. ब्राह्मणांच्या तोंडून निघालेली ही काव्यनीति-नीतिशास्त्र-म्हणजे ह्या पृथ्वीवरील अमृत आहे, इतकेंच नव्हे, तर ही उत्तम प्रकारची दृष्टि आहे. हीच कल्याणप्रद गोष्ट आहे, असें प्रल्हादानें त्या ब्राह्मणाला सांगितलें. त्या ब्राह्मणाच्या सेवेनें तृप्त झालेला तो दैत्यराज प्रल्हाद त्याला म्हणाला, 'हे द्विजश्रेष्ठा, तूं केलेल्या गुरुशुश्रूषेमुळें मी संतुष्ट झालों आहें. तर तूं मजकडून वर घे. मी तूं मागशील तें निःसंशय देईन. तुझें कल्याण होवो.' हें ऐकल्यावर तो ब्राह्मण म्हणाला, 'मला कांहीं नको.' त्यावर प्रल्हादानें संतुष्ट होऊन त्या ब्राह्मणाला 'पुनः वर माग' म्हणून सांगितलें.

ब्राह्मण—हे राजा, जर तूं प्रसन्न असशील आणि माझें प्रिय करण्याची तुझी इच्छा असेल, तर तुझें तेवढें शील मला दे. एवढाच वर मी मागत आहें. तें ऐकून-तो दैत्यराज संतुष्ट झाला; परंतु त्यानें मागितलेला वर ऐकतांच हा कांहीं यःकश्चित् ब्राह्मण नसून हा कोणी महातेजस्वी पुरुष आहे, असें वाटून त्याला मोठी भीति उत्पन्न झाली. प्रल्हादानें 'उत्तम आहे' असें म्हणून त्याला वर दिला, परंतु तो ब्राह्मण निघून गेल्यावर प्रल्हादाला मोठें दुःख झालें व तो चिंताग्रस्त होऊन बसला. त्यानें पुष्कळ विचार केला, तथापि तो ब्राह्मण कोण असावा, हें कांहीं त्याला समजेना.

अशा प्रकारें तो विचार करीत बसला असतां एक छायारूपी मूर्तिमंत तेज

त्याच्या शरीरांतून बाहेर आलें. तें पाहतांच त्या महाकाय तेजाला प्रल्हादानें विचारिलें ' तूं कोण आहेस. ' तेव्हां ' हे राजा, मी शील आहें. ज्यानें तुझें नित्य शिष्यत्व पत्करून तुझी सेवा केली, त्या ब्राह्मणश्रेष्ठाकडे मी आतां जात आहें,' असें त्या तेजानें उत्तर दिलें आणि तें अंतर्धान पावून इंद्राच्या शरीरांत प्रविष्ट झालें. तें तेज निघून गेल्यावर तशाच प्रकारचा दुसरा एक पुरुष त्याच्या शरीरांतून बाहेर पडला. त्यालाहि प्रल्हादानें ' तूं कोण ' म्हणून प्रश्न केला. त्यावर ' प्रल्हादा, मी धर्म असून त्या ब्राह्मणाकडे जात आहें. हे दैत्येंद्रा, जेथें शील तेथें मी सर्वदा असतों.' असें म्हणून तो गेल्यावर हे महाराजा, तेजानें झळकणारा तसाच एक पुरुष प्रल्हादाच्या शरीरांतून बाहेर पडला. त्यालाहि त्यानें ' तूं कोण' असा प्रश्न केला. तेव्हां ' मी सत्य असून धर्मामागून जात आहें, ' असें म्हणून तो तेथून निघून गेला. पुढें दुसरा एक धिप्पाड पुरुष त्या प्रल्हादाच्या शरीरांतून बाहेर निघाला. त्याला ' तूं कोण ' म्हणून प्रश्न करतांच ' मी वृत्त आहें. जेथें सत्य तेथें मी असतों.' असें म्हणून तो निघून गेला. तो निघून गेल्यावर त्याच्या शरीरांतून आणखी एक पुरुष मोठा शब्द करीत बाहेर आला. त्याला प्रल्हादानें ' तूं कोण ' म्हणून विचारिलें असतां त्यानें ' मी बळ आहें; जेथें वृत्त असतें, तेथें मी असतों. ' असें म्हणून तोहि तेथून गेला. त्यानंतर प्रल्हादाच्या शरीरांतून एक तेजस्वी देवी बाहेर निघाली. तिला ' तूं कोण ' म्हणून प्रश्न करितांच ती म्हणाली ' मी श्री आहें. हे सत्यविक्रमा, मी आजपर्यंत तुझ्या येथें राहिलें. तूं मला टाकिल्यानें मी आज तुला सोडून जात आहें, मी बलाचे मागून जात आहें. ' हें ऐकून महात्मा प्रल्हाद अत्यंत भयभीत झाला आणि त्यानें तिला विचारिलें, ' हे कमलालये लक्ष्मी, तूं कोठें जात आहेस ? तूं ह्या लोकाची सत्यव्रत देवी आहेस. तो ब्राह्मणश्रेष्ठ कोण होता, हें तुझ्यापासून जाणण्याची माझी इच्छा आहे. '

लक्ष्मी—ज्यानें तुझ्याकडे शिक्षण घेतलें तो ब्रह्मचारी इंद्र होता. हे प्रभो, त्रैलोक्यावरील तुझी सर्व सत्ता त्यानें हरण केली आहे. हे धर्मज्ञ प्रभो, तूं हें त्रैलोक्य केवळ शीलानें जिंकिलेंस, असें त्याला कळून आल्यामुळें इंद्रानें तें तुझें शील हरण केलें. हे महाप्राज्ञा, धर्म, सत्य, वृत्त, बल आणि मी ह्या सर्वांचें मूल कारण शील आहे, यांत संशय नाहीं.

भीष्म—असें बोलून ती श्री आणि ते सर्व तेथून इंद्राकडे निघून गेले. नंतर दुर्योधन आपल्या पित्याला पुनः म्हणाला, 'हे कौरवनंदना, शीलाचें तत्त्व

काय आहे, तें जाणण्याची माझी इच्छा आहे. शील कोणत्या उपायानें प्राप्त होईल, तें मला सांग.'

धृतराष्ट्र—हे नरेश्वरा, पूर्वींच महात्म्या प्रल्हादानें शील आणि त्याचा उपाय ह्यांविषयीं माहिती सांगितली आहे. आतां शीलाच्या प्राप्तीविषयीं थोडक्यांत कथन करितों, ऐक. कर्मानें, मनानें आणि वाणीनें कोणत्याहि प्राण्याचा द्रोह न करणें, अनुग्रह आणि दान करणें हें शील अत्यंत स्तुत्य होय. ज्याच्या योगानें दुसऱ्या कोणाचेंहि हित होणार नाहीं व जें स्वतःलाच लज्जा आणणारें असेल, अशा प्रकारचें शौर्य कधींहि दाखवूं नये. परंतु ज्या कर्माच्या योगानें जनसमाजामध्यें आपली स्तुति होईल, तेंच कर्म करावें. हे कुरुसत्तमा, शीलाचें वर्णन मीं तुला संक्षेपतः सांगितलें. जरी शीलहीन मनुष्याला एखाद्या वेळीं संपत्ति मिळाली, तरी ती त्याजजवळ चिरकाल राहत नाहीं. उलट त्याचाच समूळ नाश तीमुळें होतो. हे पुत्रा, हें जाणून तुला युधिष्ठिराहून अधिक संपत्ति प्राप्त व्हावी, अशी इच्छा असेल तर तूं शीलवान् हो.

भीष्म—धृतराष्ट्र राजानें आपल्या पुत्रास याप्रमाणें सांगितलें. हे कौंतेया, तूंहि तसें आचरण ठेवल्यास तुलाहि तसेंच फळ मिळेल. १२. १. १२४.




## अध्याय १२५ वा.

[ १ आशास्वरूपाचें निरूपण करीत असतां भीष्माकडून ऋषभ-सुमित्रसंवाद-कथन. २ मृगयासक्त सुमित्राकडून बाणविद्ध झालेला हरिण बाणासह महारण्यांत प्रवेश करितो व त्यामागून सुमित्र राजा धांवत जातो. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, पुरुषाला शील मुख्य आहे, असें तूं सांगितलें. परंतु आशा ही कोण आहे व ती उत्पन्न कशी होते, तें तूं मला सांग. ह्याविषयीं मला मोठा संशय वाटत आहे आणि त्याचा निरास करणारा हे परपुरंजया, तुझ्याशिवाय दुसरा कोणी नाहीं. हे पितामहा, युद्धाचा प्रसंग आला असतां योग्य तीच गोष्ट हा करील, अशी सुयोधनाविषयीं मला मोठी आशा वाटत होती. मनुष्याला मोठमोठ्या आशा उत्पन्न होतात आणि त्या व्यर्थ झाल्या असतां त्याला मरणप्राय दुःख होत असतें. त्या दुरात्म्या दुर्योधनानें

मला हताश आणि दुर्बुद्ध करून सोडलें आहे. हे राजेंद्रा, पहा केवढा हा माझा मूर्खपणा ! आशा ही पर्वतापेक्षां किंवा मोठ्या वृक्षापेक्षांहि फार मोठी आहे, असें मला वाटतें. आकाशाहूनहि ती विशाल आहे. तिचा अंत लागणें कोणालाहि शक्य नाहीं. हे कुरुश्रेष्ठा, हिचा विचारहि करितां येत नाहीं. ही अत्यंत दुर्लभ आहे. हिजहून दुर्लभ असें जगांत कांहींच नाहीं, असें मला वाटतें.

( २ ) भीष्म—युधिष्ठिरा, ह्याविषयीं तुला सुमित्र आणि ऋषभ या दोहोंमध्यें झालेला संवाद सांगतों, तो ऐक. हैहय कुलांत सुमित्र नांवाचा एक राजा होऊन गेला. तो एकदां मृगयेला गेला असतां त्यानें आनतपर्व बाणानें एका हरिणाला विद्ध केलें. तो हरिण अत्यंत सामर्थ्यवान् असल्यामुळें बाण घेऊन पळत सुटला. राजा सुमित्रहि वेगानें त्या मृगपतीच्या मागें लागला. तो मृग वेगानें पळत पळत एका खोल प्रदेशांत शिरला आणि तेथून क्षणांत पुनः सपाटीवरून तो बाण घेऊन पळत गेला. तें पाहून तारुण्याच्या भरांत सामर्थ्याच्या जोरावर अंगांत कवच चढवून व हातांत खड्ग-धनुष्य घेऊन सुमित्र त्याच्या मागें लागला. अशा रीतीनें अनेक नद, नद्या, सरोवरें आणि वनें यांना ओलांडून तो राजा एकटाच त्या वनामध्यें त्याच्या मागून जाऊं लागला. हे राजा, तो वेगवान् हरिणहि त्या राजाच्या अगदीं जवळ जवळ आल्यासारखें दाखवी व लगेच वेगानें दूर पळून जाई. त्या वनचर मृगावर राजाचे अनेक बाण पडत असतांहि हे राजेंद्रा, तो राजाच्या अगदीं जवळ येई. जणुंकाय तो राजाशीं क्रीडाच करीत आहे, असें दिसे. पुनः वेगानें तो मृगपति दूर पळून जाई व पुनः राजाच्या जवळ येई. तेव्हां त्या शत्रुविध्वंसक राजानें एक मर्मच्छेदक घोर व तीक्ष्ण बाण घेतला आणि धनुष्यावर चढवून त्या मृगावर सोडला. तेव्हां तो मृगपति राजाच्या बाणाचा नेम चुकवून त्यापासून दोन कोसांच्या अंतरावर जाऊन हांसत उभा राहिला आणि तो प्रज्वलित बाण जमिनीवर पडल्यावर वेगानें महारण्यांत निघून गेला. राजाहि त्याच्या मागून धांवत गेला. १२. १. १२५.

---

*

## अध्याय १२६ वा.

[ १ आपल्या आश्रमांत आलेल्या सुमित्राचा ऋषींकडून सत्कार. २ आशा आणि अंतरिक्ष ह्यांमध्यें श्रेष्ठ कोण असा सुमित्राचा ऋषींस प्रश्न. ]

( १ ) भीष्म—त्या महारण्यांत प्रवेश केल्यावर तो राजा तपस्व्यांच्या आश्रमाजवळ गेला आणि श्रांत झाल्यामुळें तेथें बसला. तो धनुर्धर राजा श्रमार्त व क्षुधित झाल्याचें पाहून सर्व ऋषींनीं एकत्र मिळून त्याचें यथाविधि पूजन केलें. ऋषींच्या पूजेचा स्वीकार करून त्या सुमित्र राजानें 'तुमचें तप उत्तम रीतीनें चाललें आहे ना ?' असें त्यांस विचारिलें. राजाला त्याच्या प्रश्नाचें उत्तर देऊन त्या तपस्व्यांनीं त्याला 'तेथें येण्याचें प्रयोजन काय ?' म्हणून विचारिलें. ते म्हणाले, 'हे राजा, तूं कमरेला खड्ग बांधून व हातांत धनुष्यबाण घेऊन कोणत्या सुखाच्या आशेनें ह्या आश्रमीं पायीं चालत आला आहेस ? मानदा, तूं कोठून आलास तें ऐकण्याची आमची इच्छा आहे. तुझा जन्म कोणत्या कुळांत झाला आणि तुझें नांव काय तें आम्हांला सांग.'

( २ ) हे पुरुषश्रेष्ठा, राजानें तेव्हां त्या सर्व ऋषींना आपण फिरत फिरत तेथें कसा आलों, तें सांगितलें. तो म्हणाला, 'मी दैत्यकुलांत जन्म घेतलेल्या मित्र राजाचा सुमित्र नांवाचा पुत्र असून बाणांनीं सहस्रावधि मृगांचा संहार करीत फिरत असतों. मोठें सैन्य माझ्या रक्षणास असतें. माझ्या बरोबर अमात्य आणि अंतःपुरहि असतें. माझ्या बाणानें एक हरिण विद्ध होऊन बाण घेऊन पळून गेला आहे. त्याचा पाठलाग करीत असतां दैवयोगानें या वनांत मी आलों आणि श्रांत, हताश व नष्टश्री होऊन तुमच्या सन्निध पावलों आहें. श्रांत होऊन, आशाभंग होऊन मी राजचिह्नहीन होत्साता तुमच्या आश्रमास आलों, याहून दुसरी दुःखकारक गोष्ट कोणती आहे ? तपोधनांनो, माझ्या आशेच्या भंगामुळें जें तीव्र दुःख मला होत आहे, त्या प्रकारचें दुःख राजचिह्नाच्या किंवा नगराच्या त्यागामुळें सुद्धां मला कधीं होणार नाहीं. हिमवान् महापर्वत किंवा महोदधि समुद्र हे आकाशाशीं ताडून पाहतां आकाशाच्या महत्त्वापुढें त्यांचें महत्व कांहींच नाहीं. आशेच्या पुढें आकाशाचाहि अंत लागेल, परंतु आशेचा अंत कधींहि लागणें शक्य नाहीं. हें सर्व ज्ञान आपणाला आहे; कारण तपोधन हे सर्वज्ञ असतात. आपण महाभाग असल्यामुळें मी एक संशय आपणाला विचारीत आहें. आशावान् पुरुष आणि आकाश ह्या दोहोंमध्यें

कोणाचें महत्त्व आपणाला अधिक वाटत आहे. तें आपणांपासून ऐकण्याची माझी इच्छा फार आहे. आपल्यापासून दुर्लभ असें काय आहे ?

द्विजसत्तम हो, ह्यांत जर कांहीं गुप्त ठेवण्यासारखें नसेल, तर मला आपण सत्वर सांगा. जर कांहीं त्यांत गुप्त असेल, तर तें ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. त्याचप्रमाणें ह्यापासून आपल्या तपाला कांहीं विघात होण्याचा संभव असेल, तर मी आपणाला आग्रह करीत नाहीं. माझ्या प्रश्नाचें उत्तर द्यावें, असें आपणांस वाटत असल्यास याचें कारण काय तें आपणापासून ऐकण्याची माझी इच्छा आहे. आपण तपस्वी असल्यामुळें सर्वांनीं मिळून हें सांगावें. १२. १- १२६.

## अध्याय १२७ वा.

[ १ ऋषभाचा तनुनामक महर्षीशीं संवाद. २ तनु-वीरद्युम्नसंवादकथन. ]

( १ ) भीष्म—त्या सर्व ऋषींमध्यें ऋषभ नांवाचा एक श्रेष्ठ ब्रह्मर्षि होता. तो आश्चर्य पावून राजाला म्हणाला, ‘ हे राजश्रेष्ठा, मी पूर्वीं तीर्थयात्रा करीत असतां एकदां दिव्य अशा नरनारायणाश्रमाला गेलों होतों. तेथें एक रम्य बदरीवृक्ष असून वैहायस नांवाचा डोह आहे. त्या ठिकाणीं अश्वशिरनामक ऋषि सर्वदा वेदपठण करीत असतो. त्या डोहामध्यें मी विधिपूर्वक पितर व देवता यांना तर्पण करून जेथें ते नरनारायणऋषी रममाण झाले होते, त्या आश्रमाला गेलों. तेथून जवळच असणाऱ्या एका आश्रमांत वसति करण्याकरितां म्हणून उतरलों. तेथें वल्कलें व कृष्णाजिन परिधान करणारा एक उंच व कृश असा तनु नांवाचा तपस्वी येतांना माझ्या दृष्टीस पडला. साधारण मानानें ताडून पाहतां त्याची उंची इतर पुरुषांच्या आठपट होती. तशा प्रकारची कृशता मात्र दुसऱ्या कोठें आढळण्यांत आली नव्हती. त्याचें शरीर अगदीं करांगुलीइतकें कृश असून त्याची मान, बाहू, पाय आणि केंस हे अत्यंत आश्चर्यकारक दिसत होते. त्याचें शिर, कर्ण आणि नेत्र हे त्याच्या शरीराला अनुरूप असे होते. हे राजसत्तमा, त्याची वाणी आणि अंगचेष्टा हीं सामान्यच होतीं. अशा त्या कृश ब्राह्मणाला पाहून मी अगदीं भिऊन गेलों व माझ्या मनाला वाईटहि वाटलें. मी त्याच्या चरणांचें वंदन केलें आणि माझें नांव, गोत्र आणि पित्याचें नांव सांगून व हात जोडून त्याच्यापुढें उभा राहिलों. नंतर त्यानें दाखविलेल्या आसनावर हळूच बसलों.

नंतर त्या धार्मिकश्रेष्ठ तनुऋषीनें धर्मार्थासंबंधानें भाषण केलें; इतक्यांत आपलें सैन्य आणि अंतःपुरासह यशस्वी कमललोचन राजा वीरद्युम्न आपल्या नष्ट झालेल्या भूरिद्युम्न पुत्राचा शोध करीत 'हा येथें सांपडेल,' 'येथें मला हा दिसेल,' अशा आशेनें अश्वावरून वेगानें तेथें आला. त्याच्या मनाला अत्यंत दुःख होत होतें. तो ऋषींना म्हणाला, 'माझा एकुलता एक धार्मिक पुत्र ह्या अरण्यामध्यें नष्ट झाला आहे. तो आतां सांपडणें कठीण आहे. त्याची मला मोठी आशा लागून राहिली आहे. ती सफल न झाल्यास मी मरणार, यांत संशय नाहीं.' तें ऐकून तो मुनिश्रेष्ठ तनु खालीं मान घालून एक मुहूर्तभर ध्यानमग्न होऊन राहिला. तें पाहून राजाचें मन अत्यंत खिन्न झालें व तो दीन होऊन म्हणाला, 'देवर्षे, दुर्लभ असें काय आहे? आणि आशेपेक्षां प्रबल असें तरी काय आहे? ही गोष्ट मजपासून गुप्त ठेवण्यासारखी नसेल, तर मला सांग!'

(२) मुनि—राजा, तुझ्या पुत्रानें दुर्दैवानें बालिश बुद्धीचा अवलंब करून एका पूज्य महर्षीचा अपमान केला होता. तो मुनि तुझ्या पुत्राकडे एक कांचनाचा कलश आणि वल्कलें मागत होता. परंतु तुझ्या पुत्रानें तीं दिलीं नाहींत, आणि त्याचा तिरस्कार केला.

हे नरसत्तमा, त्या तनूचें हें भाषण ऐकून वीरद्युम्न राजानें त्या लोकपूज्य ऋषीला प्रणाम केला आणि तुझ्याप्रमाणेंच श्रांत होऊन तो अत्यंत दुःखी दिसूं लागला. नंतर त्या महामुनीनें अर्घ्य व पाद्य आणून आरण्यविधिपूर्वक तें सर्व त्याला अर्पण केलें. नंतर ते सर्व मुनि सप्तर्षि जसे ध्रुवासभोंवतीं बसून असतात, त्याप्रमाणें त्या वीरद्युम्नाच्या सभोंवतीं बसले आणि त्यांनीं त्या अपराजित राजाला त्या आश्रमांत येण्याचें कारण विचारिलें. १२. १. १२७.

---

## अध्याय १२८ वा.

[ १ वीरद्युम्न आपल्या अरण्यागमनाचें कारण सांगतो. २ आशेच्या कृशपणाचें वर्णन ऐकून सुमित्राचा आशात्याग. ]

(१) राजा—पृथ्वीतलावर विख्यात असा वीरद्युम्न नांवाचा मी राजा आहें. माझा नष्ट झालेला पुत्र भूरिद्युम्न याचा शोध करीत मी अरण्यांत आलों.

हे विप्रश्रेष्ठा, तो माझा बाल्यावस्थेंत असलेला एकुलता एक पुत्र आहे. ह्या वनांत तो मला कोठेंहि न दिसल्यामुळें त्याच्या शोधार्थ मी फिरत आहें.

ऋषभ—राजाचें हें भाषण ऐकून तो तनुमुनि अधोमुख स्तब्ध होऊन बसला. त्यानें राजाला कांहींच उत्तर दिलें नाहीं. कारण पूर्वी तो कांहीं आशेनें राजाकडे गेला असतां त्याजकडून अपमान पावला होता आणि यामुळें कोणाहि राजाकडून अगर इतर वर्णांकडून प्रतिग्रह घ्यावयाचा नाहीं, असा निश्चय करून महातपश्चर्येला त्यानें आरंभ केला होता. 'आशा उत्पन्न झाली असतां ती मूर्खाला सुद्धां आपल्या जाळयांत ओढून क्षुब्ध करिते. अशा आशेलाच मी आतां दूर सारितों.' अशा निश्चय करून त्याप्रमाणें तो वागूं लागला. पुनरपि वीरद्युम्नानें त्या मुनीला प्रश्न केला.

राजा—आशेची कृशता किती आहे आणि पृथ्वीवर दुर्लभ असें काय आहे, हें तत्त्व तूं धर्मार्थशास्त्रसंपन्न असल्यामुळें मला सांग.

तेव्हां सर्व गोष्टी लक्ष्यांत आणून आणि राजालाहि आठवण करून देण्यासाठीं तनुविप्र बोलूं लागला.

तनु—हे राजा, आशेच्या कृशतेइतकें दुसरें कांहीं कृशत्व या जगामध्यें नाहीं. ती आशा दुर्लभ असल्यामुळें मीं तिच्या प्राप्तीसाठीं अनेक राजांकडे याचना केली.

राजा—हे ब्रह्मन्, ज्याला आशेनें जिंकिलें तो कृश आणि ज्यानें आशेला जिंकलें तो पुष्ट होय. त्याचप्रमाणें मनांतील आशा सफल होणें किती विफल आहे, हेंहि तुझें म्हणणें वेदवाक्याप्रमाणें मीं मान्य केलें. आतां माझ्या मनांत एक संशय उत्पन्न झाला आहे, तो मी विचारितों. त्याचें उत्तर तूं मला बरोबर सांगावें. हे मुने, तुझ्यापेक्षां कृशतर असें जगांत काय आहे, हें गुप्त ठेवण्यासारखें नसेल, तर मला कथन कर.

तनु—याचना करणाऱ्याचें कधीं समाधान झालें आहे, ही गोष्ट या जगांत अत्यंत दुर्मिळ होय व याचना करणारांचा अपमान न करणारा मनुष्य सांपडणें ही गोष्ट तर त्याहूनहि दुर्मिळ होय. त्याचप्रमाणें याचकाचा सत्कार करून व त्याला आशा दाखवून अंगीं शक्ति असूनहि जो ती परिपूर्ण करीत नाहीं, त्याच्या संबंधानें केली जाणारी आशा ती मजहून कृश आहे! कृतघ्न,

दुष्ट, आळशी आणि अपकार करणारे यांच्या संबंधीं उत्पन्न होणारी आशा मजहून कृश आहे ! ज्याचा एकुलता एक पुत्र नाहींसा झाला आहे किंवा प्रवासास गेला आहे, त्याचा वृत्तांत न कळला असतां त्या पित्याला होणारी आशा मजहून कृश आहे ! संततीविषयीं स्त्रियांची, पुत्रप्राप्तीविषयीं वृद्धांची व द्रव्यविषयक श्रीमंतांची आशा मजहून विशेष आहे. त्याचप्रमाणें लग्नाच्या गोष्टी चालल्या असतां त्या ऐकून उपवर झालेल्या कुमारिकांच्या मनांत उत्पन्न होणारी आशाहि मजहून अत्यंत कृश आहे !

हें ऐकून अंतःपुरांतील स्त्रियांसह त्या वीरद्युम्न राजानें त्या विप्रश्रेष्ठाच्या चरणांवर मस्तक ठेवून त्याला साष्टांग प्रणाम केला.

राजा—हे द्विजसत्तमा, मजवर कृपा कर ! मला माझ्या पुत्राची भेट पुनरपि व्हावी एवढी इच्छा आहे, ती सफल कर. तूं आतां मला जें सांगितलेंस, तें सर्व सत्य आहे, यांत संशय नाहीं.

हें ऐकून तो धार्मिकश्रेष्ठ तनुऋषि हंसला आणि आपल्या तप आणि अध्ययन यांच्या सामर्थ्यानें त्यानें त्या राजाच्या पुत्राला तत्काळ तेथें आणिलें. अशा रीतीनें राजपुत्राची आणि त्या राजाची गांठ घालून व राजाला दोष देऊन त्या धर्मवेत्त्या तनूनें आपलें धर्मरूप स्वरूप प्रकट केलें. आपलें दिव्य आणि अद्भुतदर्शन स्वरूप राजाला दाखवून तो पापहीन व क्रोधशून्य मुनि त्या वनाच्या समीपभागीं फिरूं लागला.

ऋषभ—हे सुमित्र राजा, हें मीं पाहिलें आहे आणि तसें ऐकिलेंहि आहे. म्हणून तूं ह्या अत्यंत कृश अशा आशेचा सत्वर त्याग कर.

( २ ) भीष्म—अशाप्रकारें महात्म्या ऋषभानें सांगितलें असतां सुमित्रानें अत्यंत कृश अशा आशेचा तत्काल त्याग केला. हे कौंतेया, तूंहि माझ्या ह्या भाषणाचा विचार कर आणि हिमालय पर्वतासारखा स्थिर हो. हे महाराजा, दुसऱ्यांच्या संकटकाळीं त्यांची चौकशी करून साहाय्य करणारा व आपल्यावर तें आलें असतां दुसऱ्यांची मसलत ऐकणारा तूंच आहेस. माझें भाषण ऐकून तूं आपणाला संतप्त करून घेणें योग्य नाहीं. १२. १. १२८.

---

## अध्याय १२९ वा.

[ १ यम-गौतमसंवादकथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भारता, कितीहि अमृतप्राशन केलें असतां जशी तृप्ति होत नाहीं, त्याप्रमाणें तुझें भाषण श्रवण करीत असतां मला कधींहि पुरेसें वाटत नाहीं. समाधिसुखानें तृप्त झालेल्या मनुष्याप्रमाणें धर्मामृतप्राशन करीत असतां माझी तृप्ति होत नाहीं.

**भीष्म**—याविषयीं गौतम आणि महात्मा यम यांमधील संवाद पुरातन इतिहास म्हणून सांगत असतात. पारियात्र पर्वताच्या अगदींच जवळ एक गौतममुनीचा आश्रम आहे. या आश्रमांत गौतममुनि किती काळपर्यंत राहिले तेंहि सांगतों, ऐक. या ठिकाणीं साठ हजार वर्षें राहून गौतमानें तप केलें. उग्र तपानें युक्त व ध्यानानें परमपूत अशा त्या महामुनीकडे एकदां लोकपाल यम आला आणि त्यानें त्या उत्तम प्रकारचें तप करणाऱ्या गौतमाला पाहिलें. ब्रह्मर्षि गौतमानेंहि त्याच्या तेजावरून आपल्याकडे यम आला आहे, असें ओळखलें आणि हात जोडून नम्रपणानें त्यापुढें बसून राहिला. धर्मराज यमानें त्या ब्राह्मणश्रेष्ठाचा सत्कार करून 'मी धर्म आहें, मी तुझें कोणतें कार्य करूं, तें सांग,' म्हणून त्याला विचारिलें.

**गौतम**—मातापितरांच्या ऋणांतून सुटण्याकरितां मनुष्यानें काय केलें पाहिजे आणि काय केल्यानें त्याला दुर्लभ आणि पवित्र लोकांची प्राप्ति होईल ?

**यम**—सर्वदा तप आणि पावित्र्य यांनीं युक्त होऊन सत्यधर्मामध्यें आसक्त व्हावें आणि प्रत्येक दिवशीं मातापितरांचें पूजन करावें, तसेंच बहुदक्षिणायुक्त असे अनेक अश्वमेध यज्ञ करावे. म्हणजे त्यामुळें अद्भुतदर्शन अशा लोकांची त्याला प्राप्ति होते. १२. १. १२९.

---

## अध्याय १३० वा.

[ १ संकटकालीं मुख्य साधन म्हणजे द्रव्यसंचयरूपच होय. ]

(१) **युधिष्ठिर**—हे भारता, ज्याला मित्रांनीं टाकिलें आहे, ज्याला पुष्कळ शत्रु झाले आहेत, ज्याचा कोश रिक्त झाला आहे, ज्याचें सैन्य अगदीं क्षीण होऊन गेलें आहे, ज्याचे साहाय्यक मंत्री दुष्ट आहेत, ज्याचे गुप्त विचार चारी बाजूंनीं फुटले आहेत, जो राज्यापासून भ्रष्ट होण्याच्या बेतांत आहे,

राजा हा प्रजेचा नाश करणारा व तसाच संरक्षणकर्ताहि आहे; म्हणून संरक्षणकर्त्या राजानें प्रजेपासून द्रव्य घ्यावें. हे राजा, दुसऱ्याला पीडा दिल्यावांचून या जगांत कोणाचीहि वृत्ति चालणें शक्य नाहीं. अरण्यांत राहणारा व एकटाच संचार करणारा मुनि जरी असला, तरी त्याचीहि उपजीविका दुसऱ्याला पीडा दिल्याशिवाय होणार नाहीं. केवळ दैवावर विश्वास ठेवून राहिल्यास तसेंहि राहतां येणें शक्य नाहीं. विशेषेंकरून प्रजापालन करूं इच्छिणाऱ्या राजाला तर तसें राहणें अगदीं अशक्य आहे. आपत्कालीं राजा आणि राष्ट्र यांनीं परस्परांचें रक्षण केलें पाहिजे, हा सनातन धर्म आहे. ज्याप्रमाणें राष्ट्रावर संकट आलें असतां राजा लागेल तें द्रव्य खर्चून राष्ट्राचें संरक्षण करितो, त्याप्रमाणें राष्ट्रानेंहि संकटकालीं राजाचें रक्षण करावें. कोश, शासनपद्धति, सैन्य, मित्र आणि दुसरेंहि जें कांहीं त्यानें संचय करून ठेविलें असेल, त्या सर्वांचें त्यानें रक्षण करावें. राजा क्षुधापीडित झाला म्हणून त्यानें राष्ट्राला दूर न सारितां त्याचें पोषण करावें. अन्न देऊन त्याचें बीज घ्यावें, असें धर्मवेत्त्यांचें म्हणणें आहे. बीजाचें रक्षण न केल्यास पुढें जसें अन्नाचें दौर्बल्य होतें, त्याचप्रमाणें अल्पधन राजाचें प्रजेनें रक्षण न केल्यास त्याचा व त्याबरोबर प्रजेचाहि नाश होतो. मायाशास्त्रज्ञ जो शंबरासुर त्याचें म्हणणें असें आहे कीं ज्याचें राष्ट्र लयाला जात आहे, तसेंच ज्याच्या राष्ट्रांत उपजीविकासाधन न मिळाल्यामुळें मनुष्याला परदेशाला जावें लागतें, त्या राजाचा धिक्कार असो.

राजाचा आधार म्हणजे कोश आणि सैन्य हा होय. त्याचप्रमाणें सैन्यास कोश हा आधार आहे. सैन्य हें सर्व धर्माला आधार असून धर्म हा प्रजेला आधार आहे. दुसऱ्याला पीडा दिल्यावांचून कोश संपादन करणें अशक्य आहे, मग सैन्य तरी कोठून संपादन करितां येणार ? म्हणून कोशसंचयासाठीं दुसऱ्याला पीडा द्यावी लागली, तर तो दोषास्पद होत नाहीं. यज्ञकर्मांमध्यें यज्ञासाठीं अकार्य गोष्टीहि कराव्या लागतात, त्याचप्रमाणें प्रजापालन करितांना प्रजेपासून द्रव्य संचय करणारा राजा दोषास्पद होत नाहीं. द्रव्यासाठीं योजलेल्या उपायांपैकीं एखाद्यानें द्रव्यप्राप्ति होते, एखाद्यानें होत नाहीं, तर एखाद्यानें अनर्थप्राप्ति होत असते. तरी ते सर्व द्रव्यप्राप्तीचेच उपाय होत. हें जाणून शहाण्या मनुष्यानें आपला कर्तव्यनिश्चय ठरवावा. यज्ञासाठीं ज्याप्रमाणें पश्वादिक साधनें लागतात, चित्तसंस्कारार्थ यज्ञ लागतो आणि पश्वादिक यज्ञ

भारता, सुस्थितींतील धर्म निराळा व आपत्कालांतील धर्म निराळा आहे. कोशा-वांचूनहि धर्मांची प्राप्ति होते. तरी धर्माहून चरितार्थ हा मोठा आहे. दुर्बलाला चरितार्थ द्रव्यावांचून चालविणें शक्य नसल्यामुळें त्याला धर्माचें महत्त्व वाटत नाहीं. जेणेंकरून धर्म घडूनहि अंगीं सामर्थ्य येईल असा एकहि उपाय नाहीं, त्याअर्थीं संकटकालीं अधर्माला धर्माचें स्वरूप येतें, व धर्म अधर्मरूप होतो, असें विद्वानांचें मत आहे. असें असतां संकटकाळ निघून गेल्यावर क्षत्रियानें-राजानें-काय करावें ! तर जेणेंकरून धर्माला ग्लानि येणार नाहीं व ज्याच्या योगानें त्याला शत्रूच्या स्वाधीन व्हावें लागणार नाहीं असें कांहींतरी साधन त्यानें संपादावें. आपला स्वतःचा नाश त्यानें करून घेऊं नये. संकटकालीं आपल्या किंवा परकीयांच्या धर्मांचा लोप होण्याचा प्रसंग आला असतां सर्व उपायांनीं त्या संकटांतून आपली मुक्तता करून घ्यावी.

युधिष्ठिरा, धर्माचरण हेंच सर्व धर्मवेत्त्यांचें मुख्य तत्त्व असून बाहुवीर्य धारण करून उद्योग करणें हें क्षत्रियांचें मुख्य कर्तव्य होय, असें वेदवचन आहे. हे भारता, त्याच्या वृत्तीच्या आड ही गोष्ट येत असल्यास ब्राह्मण किंवा तपस्वी यांच्या द्रव्याशिवाय दुसऱ्या कोणाचेंहि द्रव्य घेण्याचा त्याला अधिकार आहे. ज्याप्रमाणें ब्राह्मण आपत्कालांत आला असतां कोणाच्या येथेंहि यज्ञ करण्यास व अभक्ष्याचेंहि भक्षण करण्यास त्याला मोकळीक आहे, तशीच क्षत्रियाचीहि गोष्ट आहे. पीडित मनुष्याला दुर्मार्ग असा कोणताच नाहीं. कोंडून ठेविलेला मनुष्य वाट सांपडेल त्या क्षुद्र द्वारानेंहि पळून जातो. ज्याचें कोशबल क्षीण झालें आहे व जो सर्वांकडून पराजित झाला आहे, त्याला भिक्षा मागून किंवा वैश्य-शूद्रांप्रमाणें कोणताहि धंदा किंवा सेवाहि करतां येत नाहीं, तर कोणावरहि आपला भार न टाकितां त्याला स्वधर्मोचित पराक्रमानें जय मिळविणें अथवा आपल्या व परराष्ट्राकडून बलात्कारानें द्रव्य काढणें हेंच उचित होय. यांपैकीं पहिला मार्ग जरी त्याला श्रेयस्कर असला तरी आपत्कालीं दुसऱ्याहि मार्गांचें त्यानें अवलंबन केल्यास हरकत नाहीं. आपत्कालीं अन्यायमार्गानेंहि उपजीविका करणें हें धर्मलक्षणच होय. चरितार्थाच्या साधनाचा क्षय झाला असतां ब्राह्मणाला सुद्धां अधर्माचरणानें राहतां येतें. मग क्षत्रियानें अशाप्रकारचें वर्तन केल्यास हरकत कोणती? राजानें आपत्प्रसंगीं राष्ट्रांतील प्रमुख लोकांकडून द्रव्य संपादन करावें. त्यावांचून आपला नाश कधींहि करून घेऊं नये.

राजा हा प्रजेचा नाश करणारा व तसाच संरक्षणकर्ताहि आहे; म्हणून संरक्षणकर्त्या राजानें प्रजेपासून द्रव्य घ्यावें. हे राजा, दुसऱ्याला पीडा दिल्यावांचून या जगांत कोणाचीहि वृत्ति चालणें शक्य नाहीं. अरण्यांत राहणारा व एकटाच संचार करणारा मुनि जरी असला, तरी त्याचीहि उपजीविका दुसऱ्याला पीडा दिल्याशिवाय होणार नाहीं. केवळ दैवावर विश्वास ठेवून राहिल्यास तसेंहि राहतां येणें शक्य नाहीं. विशेषेंकरून प्रजापालन करूं इच्छिणाऱ्या राजाला तर तसें राहणें अगदीं अशक्य आहे. आपत्कालीं राजा आणि राष्ट्र यांनीं परस्परांचें रक्षण केलें पाहिजे, हा सनातन धर्म आहे. ज्याप्रमाणें राष्ट्रावर संकट आलें असतां राजा लागेल तें द्रव्य खर्चून राष्ट्राचें संरक्षण करितो, त्याप्रमाणें राष्ट्रानेंहि संकटकालीं राजाचें रक्षण करावें. कोश, शासनपद्धति, सैन्य, मित्र आणि दुसरेंहि जें कांहीं त्यानें संचय करून ठेविलें असेल, त्या सर्वांचें त्यानें रक्षण करावें. राजा क्षुधापीडित झाला म्हणून त्यानें राष्ट्राला दूर न सारितां त्याचें पोषण करावें. अन्न देऊन त्याचें बीज घ्यावें, असें धर्मवेत्त्यांचें म्हणणें आहे. बीजाचें रक्षण न केल्यास पुढें जसें अन्नाचें दौर्बल्य होतें, त्याचप्रमाणें अल्पधन राजाचें प्रजेनें रक्षण न केल्यास त्याचा व त्याबरोबर प्रजेचाहि नाश होतो. मायाशास्त्रज्ञ जो शंबरासुर त्याचें म्हणणें असें आहे कीं ज्याचें राष्ट्र लयाला जात आहे, तसेंच ज्याच्या राष्ट्रांत उपजीविकासाधन न मिळाल्यामुळें मनुष्याला परदेशाला जावें लागतें, त्या राजाचा धिक्कार असो.

राजाचा आधार म्हणजे कोश आणि सैन्य हा होय. त्याचप्रमाणें सैन्यास कोश हा आधार आहे. सैन्य हें सर्व धर्माला आधार असून धर्म हा प्रजेला आधार आहे. दुसऱ्याला पीडा दिल्यावांचून कोश संपादन करणें अशक्य आहे, मग सैन्य तरी कोठून संपादन करितां येणार ? म्हणून कोशसंचयासाठीं दुसऱ्याला पीडा द्यावी लागली, तर तो दोषास्पद होत नाहीं. यज्ञकर्मांमध्यें यज्ञासाठीं अकार्य गोष्टीहि कराव्या लागतात, त्याचप्रमाणें प्रजापालन करितांना प्रजेपासून द्रव्य संचय करणारा राजा दोषास्पद होत नाहीं. द्रव्यासाठीं योजलेल्या उपायांपैकीं एखाद्यानें द्रव्यप्राप्ति होते, एखाद्यानें होत नाहीं, तर एखाद्यानें अनर्थप्राप्ति होत असते. तरी ते सर्व द्रव्यप्राप्तीचेच उपाय होत. हें जाणून शहाण्या मनुष्यानें आपला कर्तव्यनिश्चय ठरवावा. यज्ञासाठीं ज्याप्रमाणें पश्वादिक साधनें लागतात, चित्तसंस्कारार्थ यज्ञ लागतो आणि पश्वादिक यज्ञ

चित्तशुद्धि हीं मोक्षासाठीं लागतात, त्याप्रमाणें दंड हा कोशाकरितां, कोश सैन्याकरितां आणि सैन्य हें शत्रुपराभवाकरितां होय.

ह्यासंबंधी धर्मतत्त्व व्यक्त करून दाखविणारा एक दृष्टांत सांगतों. यज्ञासाठीं यूप तोडीत असतात. तो तोडतांना त्याला प्रतिबंध करणारे वृक्षहि तोडावे लागतात व ते वृक्ष पडत असतांना त्यांबरोबर लहानसहान झुडपांचाहि नाश होतो. अशा रीतीनें मोठा कोशसंचय करण्याचे कामीं जे लोक अडथळा आणीत असतात, त्यांचा वध केल्याशिवाय इष्टार्थसिद्धि होणें शक्य नाहीं. द्रव्याच्याच योगानें इह-परलोक साध्य होतात, हें धर्मवचन सत्य आहे. म्हणून द्रव्यहीन मनुष्य असून नसल्यासारखाच होय. यासाठीं सर्व उपायांनीं आधीं राजानें यज्ञाकरितां धनसंचय केला पाहिजे. हे भारता, अशा आपत्प्रसंगीं कार्य तें अकार्य आणि अकार्य तें कार्य होऊन दोष लागत नाहीं. हे राजा, द्रव्यसंग्रह आणि द्रव्यत्याग ह्या दोनी गोष्टी एके ठिकाणीं संभवणें कधींहि शक्य नाहीं. अरण्यांत जाऊन राहिलेले मोठे धनसमृद्ध झाल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं. ह्या पृथ्वीवर जेवढें म्हणून द्रव्य दिसत आहे, ' तें सर्व मला मिळावें, तें सर्व मला मिळावें, ' म्हणून सर्व लोक इच्छा करीत असतात. हे परंतपा, राज्यासारखा दुसरा कोणताहि धर्म नाहीं. संकटकाळीं राजांचा धर्म याहून दुसरा आहे. कित्येक लोक दानानें, कित्येक आपल्या कर्मानें, कित्येक तपस्वी तपाच्या योगानें, कित्येक बुद्धीनें तर कित्येक आपल्या अंगच्या दक्षतेनें द्रव्यसंचय करितात. द्रव्यहीन मनुष्याला दुर्बल म्हणतात, धनाच्या योगानें पुरुष बलवान् होतो. धनवानाला सर्व प्राप्त होतें. ' कोशवान् मनुष्याला सर्व संकटांतून तरून जातां येतें. ' कोशाच्या योगानें मनुष्याला धर्म आणि काम, तसेंच इहलोक व परलोक यांची प्राप्ति होते. तो कोश धर्माच्याच योगानें मिळविण्याची आकांक्षा धरावी. अधर्मानें संपादन करण्याची इच्छा कधींहि करूं नये. १२. १. १३०.

येथें पहिलें राजधर्मपर्व समाप्त झालें.

# आपद्धर्मपर्व २.



## अध्याय १३१ वा.

[ १ विपत्कालीं राजानें सर्वस्वाचा त्याग करूनहि आपलें रक्षण करावें. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भारता, ज्या राजाचा धान्यकोशादि संग्रह क्षीण झाला असून जो दीर्घसूत्री आहे; जो बंधुवर्गावर दया करणारा असून ज्याच्या मनांत सर्वदा अमात्यांविषयीं संशय येत असतो; ज्याची मसलत फुटून गेली आहे; नगर व राष्ट्र शत्रूंनीं विभागून टाकिलें आहे; जवळ द्रव्यसंग्रह नसल्या-कारणानें ज्याला आपल्या मित्रमंडळीची संभावना करितां येत नाहीं; अमात्य-गण ज्यापासून फुटून गेला आहे; ज्याच्या समीप परचक्र येऊन ठेपलें आहे; बलवान् शत्रूनें ज्याला कांहीं सुचेनासें करून सोडलें आहे, अशा राजानें काय करावें ?

**भीष्म**—बाहेरून चालून येणारा राजा जर धर्मार्थकुशल आणि शुचिर्भूत असेल, तर राजानें त्याच्याशीं सत्वर संधि करावा आणि आपला पूर्वार्जित प्रदेश सोडवून घ्यावा. आपल्यापेक्षां बलवान् असल्यामुळें अधर्मानें व दुष्ट वासनेनें जर तो आपल्यावर येत असेल, तर त्याला कांहीं प्रांत देऊन त्याच्याशीं संधि करावा. प्रसंगीं राजधानीचाहि त्याग करून द्रव्याच्या साहाय्यानें त्या संकटांतून पार पडावें. कारण, जीवंत राहिल्यास आपल्या राजगुणांच्या योगानें त्याला पुनः द्रव्यप्राप्ति करून घेतां येईल. ज्या आपत्ति कोश-बलत्यागानें तरून जाणें आपणाला शक्य आहे, त्या ठिकाणीं कोणता धर्मार्थतत्त्ववेत्ता आपले प्राण देण्यास तयार होईल ? अंतःपुरांतील स्त्रियांना शत्रूंपासून सुरक्षित नेण्याची काळजी घ्यावी, परंतु प्रसंग आल्यास त्यांचीहि उपेक्षा करून आपल्या प्राणांचें रक्षण करावें.

**युधिष्ठिर**—आपल्या राष्ट्रांतील अमात्यादि क्षुब्ध होऊन गेले असतां, बाहेरील दुर्गादिकांना शत्रूंनीं पीडा दिली असतां, कोश क्षीण झाला असतां आणि मंत्रहि फुटून शत्रूच्या कानावर गेला असतां राजानें काय करावें ?

**भीष्म**—अशा वेळीं राजानें सत्वर संधि तरी करावा अथवा मोठा पराक्रम तरी करून दाखवावा. कांहीं झालें तरी शत्रूला बाहेर घालवून देणेंच योग्य आहे. युद्धांत मरण आल्यास तें परलोकाला हितावहच होय. आपल्यावर प्रेम कर-

णारें, इष्ट आणि सर्वदा आनंदित अशा अल्प सैन्याच्या साहाय्यानेंहि राजाला पृथ्वी जिंकितां येते. युद्धांत शत्रूकडून जर आपला वध झाला तर स्वर्गप्राप्ति होईल आणि जर आपल्या हातीं शत्रूचा वध झाला तर पृथ्वीचें राज्य प्राप्त होईल. युद्धांत प्राणत्याग करणाऱ्याला इंद्रलोकाची प्राप्ति होत असते. जेव्हां युद्ध सोडून सौम्यपणा धारण करणें इष्ट वाटत असेल, तेव्हां कोणाचाहि छळ होऊं नये म्हणून सर्व लोकांना कळेल, अशा रीतीनें शपथादिक उपाय करून व शत्रूला विश्वास दाखवून त्याच्याशीं विनयपूर्वक वागावें. आतां राष्ट्रच प्रतिकूल असून युद्ध अथवा संधि करणें अशक्य झाल्यास सामाचा स्वीकार करून कांहीं काल दुर्ग सोडून दूर निघून जावें आणि पुनः मंत्रबलाचा उपयोग करून पृथ्वी जिंकण्यास सिद्ध व्हावें. १२. २. १३१.

---

## अध्याय १३२ वा.

[ १ धर्माचा ऱ्हास होऊं लागला असतां आणि दुष्ट लोकांचें प्राबल्य झालें असतां ब्राह्मणांनीं आपली उपजीविका कोणत्या उपायांनीं करावी असा युधिष्ठिरप्रश्न. २ दुष्ट लोकांकडून द्रव्य हरण करून ब्राह्मण लोकांचें रक्षण करावें, म्हणून युधिष्ठिराचें उत्तर. ३ सज्जन-दुर्जनशील. ४ राजर्षीचें वर्तन. ]

(१) **युधिष्ठिर**—हे पितामहा, ज्यावेळीं सर्व लोकांचा कल्याणकारक असा धर्म नष्ट होऊन पृथ्वीवरील सर्व लोकांचीं चरितार्थसाधनें दुष्ट लोकांच्या हातीं जातात, अशा निकृष्ट कालीं पुत्रपौत्रादिकांचा त्याग करणाऱ्या ब्राह्मण-वर्गानें कोणत्या उपायानें आपला चरितार्थ चालवावा ?

(२) **भीष्म**—असा प्रसंग आला असतां ब्राह्मणांनीं आपल्या ज्ञानबलाचा आश्रय करून रहावें. पृथ्वीवरील सर्व कांहीं चांगल्या लोकांकरितां असून दुष्टां-करितां कांहीं नाहीं. जो कोणी दुष्टाकडील द्रव्य काढून सज्जनांना तें देतो, तोच एक आपद्धर्मवेत्ता होय. असा त्याचा प्रयत्न आपन्न स्थितींतील लोकांना दुःख तरून जाण्याचा एक प्रकारचा सेतुच होतो. आपलें राज्य शाश्वत रहावें, अशी ज्याची इच्छा असेल, त्या राजानें, राष्ट्र क्षुब्ध न होईल, अशा रीतीनें लोक द्रव्य देत नसल्यासहि ‘ द्रव्य माझेंच आहे, ’ असें म्हणून त्यांजपासून घ्यावें. चरि-तार्थ चालविण्यांत कुशल, धीर आणि शास्त्रज्ञानानें पवित्र अशा राजाला एखाद्या वेळीं निंद्य कर्महि करण्याचा प्रसंग आला, तरी कोण दोष देणार ?

युधिष्ठिरा, जे केवळ आपल्या बाहुबलावरच अवलंबून आपला चरितार्थ चालवितात, त्यांना इतर साधनें आवडत नसतात. बलवान् लोक सर्वदा आपल्या तेजावरच अवलंबून राहतात. संकटकालीं राजानें स्वराष्ट्र आणि परराष्ट्र यांमधून द्रव्य संपादन करावें आणि सामान्य नियमांचा अवलंब करून वागावें. इतकें असूनहि बुद्धिमान् राजानें यांत आपल्या इच्छेनुसार फरक करावे. ऋत्विज, पुरोहित, आचार्य आणि पूज्य ब्राह्मणांना राजानें कधीं पीडूं नये. असें केलें असतां त्याला दोष लागतो. कारण ब्राह्मण हे इतर लोकांना प्रमाणासारखे वाटत असून ते सर्वांचे जणुंकाय नेत्र आहेत. त्यांना प्रमाण समजून कोणत्याहि कार्यास, मग तें कार्य चांगलें असो अथवा वाईट असो, आरंभ करावा.

( ३ ) खेड्यांतील पुष्कळ लोक परस्परांना रोषानें वेडेंवांकडें बोलतात. त्यांच्या बोलण्यावरून राजानें कोणाचा मान करूं नये किंवा कोणाला शिक्षाहि लावूं नये. लोकांनीं केलेल्या निंदेची चर्चा करूं नये व ती श्रवणहि करूं नये. तशा प्रसंगीं राजानें कानांवर हात ठेवून तत्काल तेथून दूर निघून जावें. हे नराधिपा, दुसऱ्यांची निंदा करीत राहणें किंवा त्यांच्याशीं दुष्टपणा करणें, हा दुर्जनांचा स्वभाव असून दुसऱ्यांचे गुण सज्जनांपुढें वर्णन करणें, हें सज्जनांचें शील असतें. ज्याप्रमाणें वठणीस आणलेले बैल मानेवर जूं घेऊन सरळ चालीनें चालून सारखें ओझें वाहून नेत असतात, त्याप्रमाणें राजानें आपलें वर्तन ठेवावें. ज्याच्या योगानें आपणाला दुसरे पुष्कळ साहाय्यकर्ते मिळतील, असें वर्तन राजानें ठेवावें. धर्माचें मोठें लक्षण म्हणजे आचारच होय, असें कित्येकांचें मत आहे. कित्येकांचे मतें पूर्वीपासून चालत आलेला आचार इष्ट नसून शंख-लिखिताचारच त्यांना प्रिय असतो. मात्र मात्सर्यानें किंवा लोभानें असें करूं नये. केवळ धर्मासाठीं म्हणूनच करावें. दुर्मार्गानें जाणाऱ्या गुरूचा सुद्धां निःपातच करणें योग्य आहे, असें आर्षप्रमाण[1] आहे. परंतु त्याला सदृश प्रमाण दुसरे कोठें आढळत नाहीं. कारण, अशा दुर्मार्गानें जाणाऱ्या व राजानें ज्यांना शिक्षा करूं नये, अशा नराधमांना देव शिक्षा करितात.

( ४ ) जो कोणी कपटानें द्रव्य संपादन करितो, तो धर्मापासून भ्रष्ट होतो. जो धर्म सर्व सज्जनांना मान्य आहे, त्यालाच मनुष्य अनुसरतो. जो चतुर्गुण-

---

१ गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः । उत्पथं प्रतिपन्नस्य कार्यं भवति शासनम् ॥ २ आन्विक्षिकी, त्रयी, वार्ता आणि दंडनीति हे चार गुण होत.

संपन्न अशा धर्मासंबंधीं भाषण करील, तोच धर्मवेत्ता होय. सर्पांचीं पावलें शोधून काढणें ज्याप्रमाणें अशक्य आहे, त्याचप्रमाणें धर्माचें आश्रयस्थानहि शोधून काढणें अशक्य आहे. ज्याप्रमाणें विद्ध झालेल्या मृगाचा पत्ता भूमीवर गळणाऱ्या रक्ताच्या थेंबावरून काढितां येतो, त्याचप्रमाणें धर्माचें पदहि सज्जनांनीं दाखविलेल्या मार्गानें ओळखतां येतें. हे युधिष्ठिरा, विनयशील राजानें सर्वदा सन्मार्गानें जावें, हाच राजर्षींचा वर्तनक्रम होय. तूंहि त्याच मार्गाचें अनुकरण कर. १२. २. १३२.

---

## अध्याय १३३ वा.

[ १ आपन्न स्थितींत कोशसंग्रहाची आवश्यकता. २ लोकांशीं राजाचें कर्तव्य. ३ राजाचें दस्युलोकांशीं वर्तन. ]

( १ ) भीष्म—आपल्या व परराष्ट्रांतून राजानें द्रव्य संपादन करून कोशाची उभारणी करावी. हे कौंतेया, कोशापासूनच धर्म आणि राज्याचें मूळ ह्यांची वृद्धि होते. म्हणूनच कोश उभारून त्याचें संरक्षण योग्य रीतीनें करावें आणि नंतर त्याची योग्य कामीं योजना करावी, हा सनातन धर्म होय. निवळ शुद्ध शीलानें अथवा क्रूरपणानें केव्हांहि कोशसंचय करूं नये. तर या दोहोंमधल्या मार्गाचें अवलंबन करून कोशसंग्रह करावा. दुर्बलाला कोश कुठून असणार? आणि ज्याला कोश नाहीं, त्याला सैन्य तरी कसें उभारतां येणार? ज्याच्या जवळ सैन्य नाहीं, त्याला राज्यप्राप्ति कशी व्हावी? आणि राज्यरहिताला संपत्ति तरी प्राप्त कशी व्हावयाची? थोर मनुष्याला द्रव्यहानि म्हणजे मरणप्राय होय. म्हणून राजानें कोश, बल आणि मित्र ह्यांची वृद्धि करावी. कोशहीन राजाचा लोक अवमान करीत असतात. तो जें कांहीं थोडें देईल, त्यानें त्यांचा संतोष होत नाहीं आणि त्याचें काम करण्यासहि ते उत्सुक नसतात. संपत्तीच्याच योगानें राजाला बहुमान मिळत असतो. वस्त्रानें ज्याप्रमाणें स्त्रीचें गुह्यांग झांकलें जातें, त्याप्रमाणें संपत्तीच्या योगानें राजाचीं अनेक पापकर्में लपविलीं जातात. पूर्वीं ज्या लोकांना राजानें पीडा दिली असेल, ते लोक त्याचें वैभव पाहून खिन्न होतात आणि त्याचा नाश करण्याचा हेतु मनांत धरून कोल्ह्याप्रमाणें वाट पहात त्याजपाशीं बसून असतात.

( २ ) हे भारता, अशा स्थितींत राजाला सुख तरी कोठून मिळणार ? असें आहे तरी राजानें सर्वदा उद्योग करीत असावें. त्यानें कोणापुढें नमूं नये. उद्योग म्हणजेच पौरुष होय. पराजय होण्याचा संभव नसूनहि कदाचित् पराजय झाला तरी हरकत नाहीं, तथापि त्यानें कोणापुढेंहि कधीं वांकूं नये. प्रसंगवशात् अरण्यांत जाऊन त्यानें मृगगणांबरोबर रहावें, परंतु मर्यादा सोडून वागणाऱ्या चोरांप्रमाणें आपल्या सेवकांच्या संगतींत त्यानें कधीं राहूं नये. अरण्यवासी चोर देखील भयंकर प्रसंगांत सैन्य जमवून देत असतात. त्यांच्याशीं सुद्धां राजानें मर्यादा सोडून वागतां नये. मर्यादेचें उल्लंघन झाल्यास त्या राजाचा लोक कंटाळा करितात. ज्यांच्या मनांत किमपि दया नाहीं, अशा राजांची चोरांनाहि शंका येते. जनचित्त संतुष्ट राहण्याकरितां राजानें कांहींतरी मर्यादा ठेवली पाहिजे. अल्प गोष्टींतहि राजानें मर्यादा ठेविली असतां ती त्याच्या आदरास कारणीभूत होत असते. हा लोक म्हणजे कांहीं नाहीं व परलोकहि कांहीं नाहीं, असा मनाचा विश्वास झालेल्या नास्तिक व भयशंकित मनुष्यावर विश्वास कधीं टाकूं नये.

( ३ ) परस्वाचें केवळ हरण करून चोरट्या लोकांनीं अहिंसा व्रत धारण केलें, तर लोक मर्यादेनें वागणाऱ्या चोरट्यांवरच प्रेम करितील. युद्ध करणाऱ्याला मारणें, परस्त्रीवर बलात्कार करणें, कृतघ्नता दाखविणें, ब्राह्मणद्रव्याचें हरण करणें, एखाद्याला सर्वस्वीं बुडविणें, कुमारिकांचें कौमार्य नाहींसें करणें, गांव बळकावून त्यावर आपलें प्रभुत्व स्थापन करणें आणि परस्त्रीशीं संबंध ठेवणें हे चोरट्या लोकांच्या अंगचे दोष आहेत, त्यांचा त्यांनीं त्याग करावा. जे राजे असल्या प्रकारच्या चोरट्यांमध्यें विश्वास उत्पन्न करून सख्य करितात, ते त्यांजकडून सर्व माहिती काढून शेवटीं त्यांचा विध्वंस करितात. म्हणून असल्या लोकांचा समूळ नाश करण्यास कोणीं एकदम प्रवृत्त होऊं नये. उलट त्यांला आपल्या स्वाधीन ठेवावें. आपण बलवान् आहों, अशा समजुतीनें त्यांच्याशीं क्रूरपणानें वागूं नये. आपण जर दुसऱ्यांचा अवशेष ठेविला, तर दुसरेहि आपल्याशीं तशाच रीतीनें वागतील. त्याचप्रमाणें आपण जर दुसऱ्याचा समूळ नाश करण्याचा प्रयत्न केला तर दुसरेहि आपल्या नाशाचा प्रयत्न करितील, हेंहि भय आहे. १२. २. १३३.

## अध्याय १३४ वा.

[ १ बलप्रशंसा. २ पाप्यांचें पापमोचन. ]

( १ ) भीष्म—अशासंबंधीं इतिहासज्ञ लोक धर्मवचन सांगत असतात. तें असें कीं ज्ञानी क्षत्रियाला धर्म आणि अर्थ हे साधणें अत्यंत आवश्यक आहे. हे दोन्ही साधण्यांत त्यानें कधीं आळस करूं नये. धर्मचर्चा करीत बसण्यांत त्यानें वेळ घालविणें म्हणजे जमिनीवरील उमटलेलीं पावलें लांडग्याचीं आहेत किंवा नाहींत, ह्याचा विचार करण्यासारखें व्यर्थ आहे. धर्माधर्म यांचीं फलें या जगांत कोणीं प्रत्यक्ष पाहिलीं आहेत असें नाहीं. म्हणून राजानें सर्वदा आपलें सामर्थ्य कसें वाढेल, याचा विचार करीत असावें. बलवानाच्या आधीन सर्व कांहीं असतें. शक्तिवानाला या जगांत संपत्ति, बल आणि अमात्य यांची प्राप्ति होत असते. जो मनुष्य द्रव्यहीन असेल, तो पतित समजावा. जें कांहीं थोडकें असेल, तें उष्टयाप्रमाणेंच होय. बलवानानें पुष्कळ अन्यायाच्या गोष्टी केल्या, तरी भयामुळें कोणीहि त्याचें वाईट करूं शकत नाहीं. धर्म आणि बल हे सत्याशीं संबद्ध झाल्याकारणानें मोठ्या भयापासूनहि रक्षण करितात. असें आहे तरी धर्मापेक्षां बल श्रेष्ठ आहे आणि बलापासून धर्म प्रवृत्त होतो असें मला वाटतें. ज्याप्रमाणें जंगम पदार्थ पृथ्वीवर अवलंबून असतात, त्याचप्रमाणें धर्महि सर्वदा बलाच्याच आश्रयानें असतो. धूम ज्याप्रमाणें वायुवश असतो, त्याचप्रमाणें धर्महि बलावरच अवलंबून असतो. वृक्षाश्रित वेलीचा जसा त्या वृक्षावर अधिकार चालत नाहीं, त्याप्रमाणें धर्माचा बलावर चालत नाहीं. धर्माला बलाच्या आश्रयानें रहावें लागतें. सुख ज्याप्रमाणें भोगवान् लोकांच्या स्वाधीन असतें, त्याप्रमाणें धर्म हा बलवंतांच्या आश्रयानें असतो. बलवंतांना असाध्य असें कांहीं नाहीं. त्यांची प्रत्येक गोष्ट पवित्र असते. दुर्बल मनुष्याच्या हातून एखादें पापकर्म झाल्यास त्यांतून त्याचें संरक्षण होऊं शकत नाहीं आणि लांडग्याचा ज्याप्रमाणें सर्व लोक कंटाळा करितात, तसाच त्याचाहि करितात. तो ऐश्वर्यहीन व लोकांच्या निंदेस पात्र होऊन मोठ्या कष्टानें जीवित कंठीत असतो. आपलें निंदित जीवित त्याला मरणप्राय वाटतें. दुराचारी मनुष्याला त्याच्या बांधवांनीं सोडलें असतां त्याला सोसून घ्यावे लागणारे त्यांचे वाग्बाण तापदायक होतात.

( २ ) ह्या पापांतून मुक्त होण्याचे आचार्यांनीं उपाय सांगितले आहेत. ते हे कीं, वेदत्रयाचें पठण करावें; ब्राह्मणांचें पूजन करावें; कायावाचामनानें त्यांना

प्रसन्न ठेवावें; मन उदार ठेवावें; मोठ्या कुलाशीं संबंध ठेवावा; मी असा आहें असें बोलून दाखवावें; दुसऱ्याचे गुण सर्वदा गात रहावें; जप आणि स्नान करीत रहावें; सर्वदा सौम्य राहून फार बोलूं नये; अतिदुष्कर कार्य करून ब्राह्मण आणि क्षत्रिय या मंडळींत प्रवेश करून घ्यावा आणि लोकांनीं कांहीं म्हटलें तरी तिकडे लक्ष न देतां कार्य करीत रहावें. अशा प्रकारच्या वर्तनानें पापी मनुष्य निष्पाप होऊन लवकरच बहुमानास पात्र होतो. त्याला अनेक प्रकारचें सुख प्राप्त होतें. त्याचें दुष्कृत्य त्याच्या सत्कृतींनींच झांकलें जातें. ह्या लोकांत तो सर्वांना आदरपात्र होऊन परलोकींहि तो तसाच महत्पदास चढतो. १२. २. १३४.

---

## अध्याय १३५ वा.

[ १ दस्यु लोकांनींहि मर्यादेनें वागल्यास परलोकप्राप्ति होते, ह्याचें कायव्य-नामक क्रव्यादचरित्रदृष्टांतानें भीष्माकडून कथन. ]

( १ ) भीष्म—ह्याविषयीं एक प्राचीन इतिहास सांगत असतात. त्यावरून मर्यादेनें वागणारा दस्यु ( चोर ) मेल्यावरहि नरकाला कसा जात नाहीं, हें समजून येण्यासारखें आहे. एका निषादीला क्षत्रियापासून झालेला कायव्य नांवाचा एक निषाद होता. तो कुशल प्रहारकर्ता, बुद्धिमान् , शूर, शास्त्रज्ञ, योग्य प्रसंगींच निष्ठुरपणा दाखविणारा, आश्रम्यांच्या धर्मांचें रक्षण करणारा, गुरूचें सर्वदा पूजन करणारा, ब्राह्मणांचें कल्याणकर्ता आणि क्षात्रधर्माप्रमाणें वागणारा असा होता. तो दस्यु असूनहि त्याला सिद्धि मिळाली. तो अरण्यामध्यें सकाळसंध्याकाळीं मृगगणांना क्षुब्ध करून सोडीत असे. मृगजातींचे सर्व गुण त्याला माहीत असून त्या निषादांमध्यें तो अत्यंत चतुर होता. सर्व देशकाल यांचें त्याला उत्तम प्रकारचें ज्ञान असून त्या पारियात्रनामक पर्वतावर तो नित्य संचार करीत असे. सर्व प्राण्यांच्या धर्मांचें ज्ञान त्याला होतें. त्याचें धनुष्य बळकट असून बाण केव्हांहि फुकट जात नसे. हजारों योद्ध्यांचा पराजय करण्यास तो एकटा समर्थ होता. आपल्या वृद्ध, अंध आणि बधिर मातापितरांची त्या महाअरण्यांत शुश्रूषा करून मधु, मांस, मूळें, फळें आणि बरें-वाईट अन्न तो सत्पुरुषांना देत असे. अशा रीतीनें त्या साऱ्यांचा सत्कार करून तो त्यांची सेवा करीत असे. अरण्यांतील संन्यासी ब्राह्मणांचा नित्यशः सत्कार करून त्यांस आपण मारलेले पशु नेऊन

देत असे. जे कोणी ब्राह्मण त्याला चोर समजून त्याच्या हातचें अन्न घेत नसत, अशांच्या गृहीं मोठ्या पहांटेला जाऊन तें ठेवून तो जात असे. पुढें त्या निर्दय व निर्मर्याद रीतीनें वागणाऱ्या सहस्रशः दस्यूंनीं आपला ग्रामाधिपति तूंच हो, म्हणून त्याला विनंति केली.

दस्यु—तूं मुहूर्त, देश आणि काल जाणणारा आहेस. त्याचप्रमाणें तूं प्राज्ञ, शूर आणि दृढव्रती आहेस. म्हणून तूं आमचा मुख्य नायक हो. तूं आम्हांला जें जें करायाला सांगशील, त्याप्रमाणें आम्ही तें तें करूं. तूं माता-पितरांप्रमाणें आमचें यथान्याय पालन कर.

कायव्य—तुम्हीं कोण्या स्त्रीचा, भित्र्याचा, बालकाचा, तपस्व्याचा आणि युद्ध न करणाऱ्याचा वध कधीं करूं नये. स्त्रियांवर कधीं बलात्कार करूं नये. कोणत्याहि प्राणिवर्गांतील स्त्रीची हत्या करू नये. सर्व ब्राह्मणांचें नित्यशः कल्याण करावें आणि त्यांच्याकरितां युद्धहि करावें. सत्य कधींहि सोडून वागूं नये. विवाहादि कृत्यांत कधीं विघ्न आणूं नये. तसेंच ज्या ठिकाणीं देव, पितर आणि अतिथि यांचें पूजन चाललें असेल, तेथेंहि जाऊन कोणास पीडूं नये. सर्व प्राण्यांमध्यें ब्राह्मणांला तुम्हीं कधींहि पीडा देऊं नये. उलट आपल्या जवळील सर्व द्रव्याच्या योगानें त्यांचें पूजन करावें. ब्राह्मण एकदां रुष्ट होऊन ज्याचा पराभव करण्याचें मनांत आणतील, त्याचें संरक्षण करणारा तीनहि लोकांत कोणी मिळणार नाहीं. जो ब्राह्मणांना वाईट बोलेल किंवा त्यांचा नाश व्हावा अशी इच्छा करील, त्याचा सूर्योदयाबरोबर नाशास जाणाऱ्या अंधकाराप्रमाणें नाश होईल. येथेंच राहून तुम्ही आपल्या कर्मांचें फल मिळविण्याची इच्छा करा. जे कोणी आम्हांला द्रव्य देणार नाहींत, त्यांच्यावर तुम्हीं चालून जावें. दंड हा दुष्टांच्या शासनार्थ आहे. आपल्या अभिवृद्धीकरितां नाहीं, हें निश्चित आहे. जे कोणी शिष्टजनांना पीडा देतात, त्यांचा वध करणें हाच दंड होय. जे राष्ट्राला पीडा देऊन आपली वृद्धि करितात, ते प्रेतावरील किड्यांप्रमाणें तत्काल नाश पावतात. जे धर्मशास्त्रानुसार ह्या जगांत वागतील, ते दस्युजातीचे असले, तरी शीघ्र सिद्धि पावतील.

भीष्म—त्या सर्वांनीं कायव्याच्या सांगण्याप्रमाणें निश्चय करून तदनुरूप ते वागूं लागले. त्यामुळें त्यांची भरभराट होऊन ते पापमुक्त झाले. त्याप्रमाणें साधूंचें कल्याण करीत राहिल्याकारणानें आणि दस्यूंना पापकर्मांपासून परावृत्त

केल्यामुळें त्या कायव्यालाहि मोठी सिद्धि प्राप्त झाली. जो या कायव्यचरिताचें नित्यशः चिंतन करील, त्याला वन्य जीवांपासून कधींहि भीति प्राप्त होणार नाहीं. हे भारता, त्याला कोणत्याहि प्राण्याची अथवा दुर्जनाची भीति बाळगण्याचें कारण राहणार नाहीं. कारण, तो वनाचा अधिपतिच होऊन राहतो. १२. २. १३५.

## अध्याय १३६ वा.

[ १ कोशवृद्धीचे कामीं राजानें कोणाचें द्रव्य हरण करावें, ह्याविषयीं विवेचन. ]

( १ ) भीष्म—राजानें कोणत्या मार्गाचा स्वीकार करून आपल्या कोशाचा संचय करावा, ह्याविषयीं कांहीं ब्रह्मदेवाच्या गाथा इतिहासज्ञ सांगत असतात. त्या ह्या आहेतः—यज्ञकर्त्या लोकांचें त्याचप्रमाणें देवांचें धन, यांचें राजानें कधीं हरण करूं नये. राजानें चोरांचें, तसेंच निष्क्रिय लोकांचें द्रव्य हरण करणें योग्य आहे. हे भारता, ह्या सर्व प्रजा आणि राज्यभोग क्षत्रियांचेच आहेत. तसेंच सर्व द्रव्यहि त्यांचेंच आहे. दुसऱ्या कोणाचें नाहीं. त्या पैशाचा त्यांनीं सैन्य उभारण्याकडे अथवा यज्ञांकडे उपयोग करावा. ज्या ओषधींचा खाण्याकडे उपयोग होत नसतो, त्या तोडून त्यांचा अन्न शिजविण्याचे कामीं उपयोग करावा आणि ज्या भोग्य आहेत, त्या अन्नार्थ शिजवाव्या.

जो कोणी पितर, देव आणि मनुष्यें ह्यांचें हविर्द्रव्यानें पूजन करीत नाहीं, त्याचें धन निरर्थक होय, असें धर्मवेत्त्यांचें मत आहे. अशा लोकांकडील द्रव्य धार्मिक राजानें काढून घ्यावें. असें केल्यानें अनेक लोकांना संतोष होऊन राजाला कोणी दोष देत नाहीं. दुष्टांकडील धन हरण करून तें जो घेतो आणि साधु लोकांना देतो, तो धर्मवेत्ताच होय ! मनुष्यानें शक्त्यनुसार परलोकसाधन करीत रहावें. मुंग्या अथवा वज्रीनामक कीटक ज्याप्रमाणें अनिमित्त उत्पन्न झालेले असतात, त्याचप्रमाणें यज्ञहीन मनुष्याची उत्पत्ति होय. ज्याप्रमाणें डांस, माशा, घुंगुरडीं यांना घालवून देतात, त्याचप्रमाणें यज्ञहीन पुरुषालाहि राज्यांतून घालवून द्यावें, असें सांगितलें आहे. ज्याप्रमाणें भूमीवरील धूळ हळूहळू सूक्ष्माहून अतिसूक्ष्म होत जाते, त्याप्रमाणें धर्महि अत्यंत सूक्ष्म आहे. १२. २. १३६.

## अध्याय १३७ वा.

[ १ मत्स्योपाख्यानकथन.]

( १ ) भीष्म—दूरदर्शी, प्रसंगावधानी व दीर्घसूत्री यांपैकीं पहिल्या दोघांना सुखप्राप्ति होते आणि तिसऱ्याचा नाश होतो. ह्यासंबंधीं कार्याकार्य-निर्णयासंबंधी एक सुंदर कथा सांगतों, ती एकाग्र मनानें ऐक.

हे कौंतेया, एका उथळ पाण्याच्या सरोवरामध्यें परस्परांचे मित्र म्हणून एकत्र राहणारे असे तीन मासे होते. त्यांशिवाय दुसरेहि पुष्कळ मासे होते. त्या तीन मित्रांपैकीं एक दूरचा विचार करणारा, एक समयसूचक बुद्धीचा आणि एक दीर्घसूत्री–चेंगट स्वभावाचा–होता. कोणी एके वेळीं धीवर लोक तेथें येऊन त्यांनीं त्या सरोवराभोंवतीं अनेक छिद्रें पाडून त्यांच्या द्वारें तें पाणी सखल प्रदेशांत काढून लाविलें. सरोवरांतील पाणी कमी होत असल्याचें पाहून आणि आतां भीतीचा प्रसंग आहे, हें लक्ष्यांत आणून दूरदर्शी आपल्या दोघां मित्रांना म्हणाला, ‘ सर्व जलचर प्राण्यांवर आज मोठें संकट आलें आहे, तर आपला मार्ग बंद होण्यापूर्वींच आपण दुसऱ्या ठिकाणीं जावें. संकट येण्या-पूर्वीं जो विचारपूर्वक त्याची व्यवस्था करून ठेवतो, तो संशयांत पडत नाहीं. म्हणून माझ्या म्हणण्यास आपण मान द्या आणि आपण दुसरीकडे जाऊं या. ’

तें ऐकून दीर्घसूत्री म्हणाला, ‘ तुझें सांगणें योग्य आहे; परंतु संकटकाल येण्यापूर्वीं इतकी त्वरा करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं, असें माझें मत आहे. ’ त्यावर प्रसंगावधानी दूरदर्शीला म्हणाला, ‘ काल प्राप्त झाला असतां योग्य उपाय मला सुचलाच पाहिजे; तो सुचल्याशिवाय राहणार नाहीं. ’ हें त्याचें भाषण ऐकून तो बुद्धिमान् दूरदर्शी जलमार्गानें दुसऱ्या एका गंभीर जलाशयामध्यें निघून गेला. पुढें त्या सरोवरांतील पाणी निघून गेल्याचें पाहून ते धीवर वेगवेगळया उपायांनीं त्या मत्स्यांना बद्ध करूं लागले. त्या निर्जल सरो-वरांत अशा रीतीनें एकच खळबळ उडून गेली असतां दीर्घसूत्री दुसऱ्या मत्स्यांबरोबर त्या जाळ्यांत सांपडला. दोर सोडून जेव्हां ते धीवर मासे काढूं लागले, तेव्हां तो प्रसंगावधानी मत्स्य जाळ्याचा दोर तोंडांत धरून इतर माशांप्रमाणें मृतवत् तेथें लोंबकळत राहिला. सर्व मत्स्य जाळ्यांत सांपडले, असें वाटून त्या धीवरांनीं विपुल पाण्यांत मासे धुण्याकरितां तें जाळें नेलें, तेव्हां तो प्रसंगावधानी मत्स्य तोंडांतील दोर सोडून पाण्यांत शिरला. परंतु तो मंदात्मा,

हीनबुद्धि व आळशी दीर्घसूत्री मासा मरण पावला. याप्रमाणें मोहामुळें ज्याला काल जवळ आल्याचें समजत नाहीं, तो त्या दीर्घसूत्री मत्स्याप्रमाणें सत्वर नाश पावतो. मी चतुर आहें असें समजून जो आधींच व्यवस्था करून ठेवीत नाहीं, तो प्रसंगावधानी मत्स्याप्रमाणें थोडा काल संशयांत पडतो. दूरदर्शी व प्रसंगावधानी हे मात्र सुखी होतात आणि दीर्घसूत्री विनाश पावतो.

कला, काष्ठा, मुहूर्त, दिवस, रात्र, अंश, मास, पक्ष, षड्ऋतु, कल्प, संवत्सर असे कालाचे प्रकार आहेत. तसेंच पृथ्वी हा देश आहे. काल कधीं कोणाला दिसत नसतो. इष्टगोष्टीच्या सिद्ध्यर्थ त्यासंबंधानें मनुष्य जसें मनांत आणील, तसें घडत असतें. धर्मार्थसंबंधांत, मोक्षसंबंधांत आणि कार्यसंबंधांतहि वरील दोन प्रकारचे लोक हेच मुख्य म्हणून सांगितले आहेत. जो विचारपूर्वक उद्योगांत रत असतो आणि देश-कालांकडे नजर ठेवून वागतो, त्याला त्यांपासून फलप्राप्ति होते. १२. २. १३७.

---

## अध्याय १३८ वा.

[ १ कार्यपरत्वें मित्राशीं वैर व शत्रूशीं सख्य कसें जोडावें, याविषयीं मार्जार-मूषकचरितकथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भारतश्रेष्ठा, तूं मला संकट येण्यापूर्वींच संकट आलें असतां आपल्या श्रेष्ठबुद्धीचा उपयोग कशा प्रकारें करावा, त्याचप्रमाणें दीर्घ-सूत्रता विनाशाला कशी कारण होते, तें सांगितलेंस. आतां धर्मार्थकुशल व धर्मशास्त्रविशारद राजा शत्रूंनीं वेढिलें असतांहि ज्या योगानें मोह पावणार नाहीं, तें तुझ्यापासून ऐकावें अशी माझी इच्छा आहे, तर हे कुरुश्रेष्ठा, मी विचारीत आहें, तें मला सांग. अनेक शत्रूंनीं राजाला त्रस्त करून सोडलें असतां राजानें कसें वागावें ? राजा संकटांत सांपडला असतां व त्यानें पूर्वी पीडा दिलेले अनेक शत्रु त्याजवर उलटून पडले असतां त्या एकट्या असहाय राजानें त्यांशीं युद्धार्थ कसें उभें रहावें ? हे भरतर्षभा, अशा प्रसंगीं त्यानें मित्र कसे प्राप्त करून घ्यावे ? शत्रु समजून वैर कोणाशीं करावें ? मित्र आणि शत्रु यांसंबंधानें त्यानें कशा प्रकारें वागावें ? ज्याला आपण मित्र समजत होतों, तो एकदम शत्रुत्व धारण करून उलटून आला असतां आपण काय करावें ? काय केल्यानें आपण सुखी होऊं ? विग्रह कोणाशीं करावा, संधि कोणाशीं घडवून

आणावा, बलवान् असूनहि अनेक शत्रूंमध्यें तो सांपडला असतां त्यानें कसें वागावें ? हे परंतपा, सर्व कृत्यांमध्यें हेंच अत्यंत श्रेष्ठ असें कृत्य होय. सत्यसंध आणि जितेंद्रिय अशा शांतनव भीष्मावांचून दुसरा कोणी हें सांगणारा किंवा ऐकणाराहि मिळणार नाहीं. म्हणून हे महाभागा, ह्याचा विचार करून मला सांग.

भीष्म—हे युधिष्ठिरा, तूं विचारलेला ह्या प्रश्न अगदीं योग्य आहे. भारता, आपत्कालीं मनुष्यानें कसें वागावें, तें रहस्य तुला मी पूर्णपणें सांगतों, तें ऐक. कार्यपरत्वें शत्रु मित्र होतात व मित्रहि शत्रु होतात. अशा मनुष्याच्या वर्तनांत सर्वदा फरक पडत असतो. म्हणून देशकाल जाणून व कार्याकार्यांचा निश्चय करून मनुष्यानें एकाद्यावर विश्वास ठेवावा किंवा त्याशीं युद्धालाहि उभें रहावें. हितैषी सुज्ञ पुरुषानें सर्वदा मोठ्या प्रयत्नानें संधिच करणें योग्य आहे. शत्रूशींहि संधि करावा. कारण हे भारता, प्राणांचें रक्षण सर्वांआधीं केलें पाहिजे. जो अपंडित शत्रूशीं कधींहि संधि करीत नाहीं, त्याला हे भारता, द्रव्य किंवा इतर कांहींहि फलप्राप्ति होत नाहीं. जो कोणी केवळ अर्थप्राप्तिच लक्ष्यांत घेऊन शत्रूशीं सख्य आणि मित्राशीं वैर करितो, त्याला मोठें फल प्राप्त होतें.

ह्यासंबंधीं एक पुरातन गोष्ट सांगत असतात. एका मोठ्या अरण्यामध्यें एक मोठा वटवृक्ष होता. त्यावर असणाऱ्या मार्जार व मूषक यांचा संवाद ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. दाट लताजालांनीं तो अगदीं आच्छादून जाऊन त्यावर नाना जातींचे पक्षी राहत असत. तो मोठमोठ्या खांद्यांनीं व्याप्त असून मेघासारखा दिसत असे. त्याची छाया शीतल असून तो आकारानें अत्यंत मनोरम होता. त्याच्या सर्व बाजूंनीं अरण्य असून तो व्याघ्रादि पशूंचें वसतिस्थान होऊन गेला होता. त्याच्या मुळाशीं शेंकडो मुखांचें बीळ करून त्यांत महाप्राज्ञ असा पलित नांवाचा एक मूषक राहत असे. तसेंच त्याच्या शाखेवर पक्ष्यांचा भक्षक लोमश नांवाचा एक मार्जार सुखानें वसति करून होता. तेथें प्रत्येक दिवशीं एक चांडाळ येऊन सूर्य अस्तास गेल्यावर जाळें लावून ठेवी आणि नंतर आपल्या अरण्यांतील झोंपडींत जाऊन झोंप घेई व उजेडल्यावर पुनः तेथें येत असे. अशा रीतीनें तेथें रात्रीच्या वेळीं अनेक पशु त्याच्या जाळ्यांत सांपडत असत.

पुढें कोणे एक वेळीं तो नित्य सावध असणारा मार्जारहि त्या जाळ्यांत सांपडला. आपला नित्याचा शत्रु त्या जाळ्यांत सांपडलेला पाहून पलित उंदीर आनंदित होऊन सर्वत्र निर्भयपणें फिरूं लागला. अरण्यांत भक्ष्य शोधीत फिरत असतां पुष्कळ वेळानें त्याला त्या जाळ्यांत भक्ष्य दिसलें. तें पाहून तो जाळ्यावर चढून बसला आणि आपल्या बद्ध झालेल्या वैऱ्याकडे पाहून हंसत हंसत तें मांस खाऊं लागला. मांसभक्षणामध्यें अशा रीतीनें आसक्त होऊन गेला असतां व इकडेतिकडे पहात असतां त्याला दुसरा एक घोर शत्रु येतांना दृष्टीस पडला. ह्या बिळांत राहणारा हरिण नांवाचा मुंगूस असून शरतृणाच्या (वेताच्या) पुष्पाप्रमाणें त्याची शरीरकांति होती. तो अत्यंत चपळ असून त्याचे डोळे लाल होते. उंदराचा वास येतांच तो तेथें जिभल्या चाटीत तोंड वर करून सत्वर आला. इतक्यांत वृक्षाच्या ढोलींत राहणारा दुसरा एक चंद्रक नांवाचा घुबड त्याला दिसला. तो रात्रीच्या वेळीं संचार करणारा असून त्याची चोंच अत्यंत तीक्ष्ण होती.

याप्रमाणें मुंगूस व घुबड अशा दोन शत्रूंच्या तावडींत सांपडून तो उंदीर अत्यंत भयभीत झाला. चिंताव्याकुल होऊन त्यानें विचार केला कीं चारी बाजूंनीं भयस्थिति उत्पन्न होऊन मरणकाल जवळ येऊन ठेपला असतां हितैषी मनुष्यानें काय करावें ? याप्रमाणें सर्व बाजूंनीं बद्ध होऊन त्याला जिकडे-तिकडे भीतिच दिसूं लागली. अशाप्रकारें भयविह्वल झाला असतां त्याला एक उत्तम विचार सुचला. चारी बाजूंनीं संकटग्रस्त झालेल्या मनुष्यानें त्या संकटांतून पार पडून प्राणरक्षण करणें हेंच त्याचें अवश्य कर्तव्य होतें. माझ्या-वर ह्यासाठींच ही आपत्ति आली आहे. मी जर खालीं ज़मिनीवर गेलों, तर हा मुंगूस मला भक्षण करून टाकील. येथेंच तिष्ठत राहिलों, तर घुबड खाऊन टाकील आणि जाळ्याचे पाश तुटले तर मार्जाराच्या भक्ष्यस्थानीं पडेन. माझ्यासारख्या शहाण्यानें मोहांत सांपडणें योग्य नाहीं. तरी आतां कांहींतरी युक्ति योजून प्राणरक्षणाविषयीं उपाय योजिला पाहिजे. बुद्धिमान् व नीति-शास्त्रकुशल अशा शहाण्यानें कितीहि भयंकर संकट आलें तरी त्यांतून पार पडलें पाहिजे. सांप्रत मला ह्या मार्जारावांचून दुसरी कांहीं गति दिसत नाहीं. हा मार्जार जरी माझा शत्रु आहे तरी आज संकटांत सांपडला आहे. माझ्या हातून याचें मोठें कार्य होणार आहे. तीन शत्रु माझ्या प्राणांची इच्छा करीत असतां मी जीविताची आशा तरी कशी धरावी ? म्हणून आतां मी ह्या शत्रूचा–मार्जाराचाच–आश्रय करितों. मी आतां नीतिशास्त्राच्या आधारें त्याचें

हित कशांत आहे, हें त्याला दाखवून माझ्या बुद्धिबलानें ह्या माझ्या तीन शत्रूंला फसवीन. हा मार्जार जरी माझा वैरी आहे, तरी सांप्रत मोठ्या संकटांत सांपडला आहे. हा मूढ आपल्या स्वार्थाकरितां माझ्याशीं सख्य करील, तर पहावें. बलवंतानेंहि संकटकालीं जीविताशेनें जवळच्या शत्रूशीं सख्य करावें असें आचार्य सांगतात. शहाणा शत्रु उत्तम समजावा, परंतु मूर्ख मित्र असूनहि उपयोगाचा नाहीं. माझें जीवित आतां ह्या मार्जारावरच अवलंबून आहे. तेव्हां मी याला स्वसंरक्षणाचा उपाय सांगतों. माझ्या संगतीनें हा कदाचित् शहाणा झाल्यास पहावें. ह्याप्रमाणें शत्रूशीं आपण कसें वागावयाचें, हें त्या उंदरानें निश्चित केलें.

नंतर त्या अर्थशास्त्रतत्त्वज्ञ व संधि-विग्रहकाल जाणणाऱ्या उंदरानें सांत्वनपूर्वक त्या मार्जाराला म्हटलें, "हे मार्जारा, मी तुला स्नेहानें विचारीत आहें कीं, तूं खुशाल आहेस ना? तूं जीवंत असावेंस, अशी माझी इच्छा आहे. कारण आपणां दोघांचेंहि कल्याण सारखेंच आहे. मित्रा, तुला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. तूं या संकटांतून सुखानें पार पडशील. जर तूं मला मारणार नाहींस, तर मी तुला या विपत्तींतून मुक्त करीन. ह्या कामीं एक उपाय आहे. तो दुष्कर आहे, तथापि तो केल्यानें तुझी सुटका होऊन माझेंहि कल्याण होणार आहे. मीं विचार करून हा उपाय आपणां दोघांकरितां योजिला आहे. कारण, आम्हां दोघांचेंहि यांत हित सारखेंच होणार आहे. हें मुंगूस आणि घुबड हीं पापबुद्धीनें माझ्या वधार्थ जवळ येऊन ठेपलीं आहेत. त्यांनीं अजून मजवर उडी घातली नाहीं, म्हणूनच मी सुखरूप आहें. वृक्षाच्या शाखेवर बसून हा घुबड आपले चंचल नेत्र मजकडे लावून शब्द करीत बसला आहे पहा! त्याची मला फार भीति वाटत आहे. साधूंची मैत्री सात पावलें बरोबर चालल्यानें होत असते. तूं पंडित असून माझा आज मित्र झाला आहेस. म्हणून तुला मी साहाय्य करीन. तुला आतां मरणाची भीति नाहीं. हे मार्जारा, माझ्या साहाय्यावांचून हे पाश तोडणें तुला कधीं शक्य नाहीं. जर माझा वध करणार नाहींस, तर मी तुझे पाश तोडून टाकीन. तूं ह्या वृक्षाच्यावर आणि मी त्याच्या मुळाशीं वास करीत आहें. फार दिवसांपासून आपण ह्या वृक्षाचा आश्रय करून राहिलों आहों, हें तुला ठाऊक आहे. दोघांपैकीं एक दुसऱ्यावर विश्वास ठेवितो; परंतु तो दुसरा त्यावर कधीं विश्वास टाकीत नाहीं, असें झाल्यामुळें दोघेहि सर्वदा उद्विग्न असतात व अशांना कोणी शहाणेहि चांगले म्हणत नसतात. म्हणून

आपण यापुढें प्रेमानें वागूं आणि सर्वदा मैत्रीनें राहूं या; कोणतीहि वेळ घालविणें शहाण्यांना पसंत नसतें.

"आतां ही युक्ति कशी योजावयाची तेंहि सांगतों, ऐक. तूं जीवंत रहावें, अशी माझी इच्छा आहे आणि तूंहि माझ्या जीविताची इच्छा करणारा आहेस. कोणी एखादा काष्ठाच्या आश्रयानें अतिखोल नदी तरून जाण्यास समर्थ होतो, तो त्या काष्ठाला नदीच्या पैलपार पोहोंचवितो व तें काष्ठहि त्याला पलीकडे तारून नेतें. याप्रमाणें आमचा हा समागम दोघांनाहि हितकारक होईल. मी तुला तारीन व तूंहि मला तारशील." याप्रमाणें दोघांनाहि हितप्रद आणि त्याला पटेल असें सयुक्तिक भाषण त्या उंदरानें केलें आणि आतां हा मार्जार काय बोलतो त्याची वाट पाहत तो राहिला.

आपल्या शत्रूचें तें पटणारें, सयुक्तिक आणि मान्य करण्यास योग्य असें उत्कृष्ट भाषण ऐकून तो शहाणा मार्जार बोलला. प्रथमतः त्या बुद्धिमान् मार्जारानें त्याच्या भाषणाची प्रशंसा केली व मोठ्या प्रेमानें त्याचा बहुमान केला. नंतर त्या उंदराकडे हळूच पाहून तो लोमश मार्जार म्हणाला, "हे सौम्या, मीं जीवंत रहावें, अशी तुझी इच्छा आहे, हें ऐकून मला फार आनंद वाटत आहे. तुझें कल्याण होवो. जर तुला कांहीं कल्याणाचा मार्ग दिसत असेल, तर तो त्वरित कर. विचार करीत बसूं नकोस. मी विपन्नावस्थेंत पडलों असून तूं तर मजपेक्षांहि अधिक भयंकर दुःखावस्थेंत सांपडला आहेस. म्हणून संकटावस्थेंत असलेल्या आम्हां दोघांचेंहि कल्याण तूं कर; वेळ काढीत बसूं नकोस. हे प्रभो, तुला जें कांहीं या प्रसंगाला उचित असें माझ्या हातून होण्यासारखें असेल, तें मी करीन. मी या संकटांतून मुक्त झाल्यावर तुझे उपकार व्यर्थ जाणार नाहींत. माझा सर्व गर्व नाहींसा होऊन मी तुझा भक्त झालों आहें. मी तुझा शिष्य, तुझा हितकर्ता असून तुझ्या सांगण्याप्रमाणें करण्यास तयार आहें. मी तुला शरण आलों आहें."

ह्याप्रमाणें त्या मार्जाराचें भाषण ऐकून त्या पलित उंदरानें हा आतां आपणाला वश झाला आहे, असें पाहून मोठें अर्थप्रचुर व हितप्रद भाषण केलें. तो म्हणाला, 'तूं जें आतां उदारपणाचें भाषण केलेंस, तें तुजसारख्यानें करणें यांत नवल करण्यासारखें कांहीं नाहीं. आतां मीं जो हितप्रद उपाय योजिला आहे, तो ऐक. ह्या मुंगुसाची मला फार भीति वाटत असल्यामुळें मी तुझ्या

पोटाखालीं बसून राहतों. तूं माझें रक्षण कर; माझा वध करूं नकोस; तुझें रक्षण करण्यास मी समर्थ आहें. त्याचप्रमाणें ह्या घुबडापासूनहि तूं माझें रक्षण कर. तो क्षुद्र माझ्यावर सारखा टपून बसला आहे. तुझे पाश मी तोडून टाकीन, हें सत्याची शपथ घेऊन मी सांगत आहें.'

हें सयुक्तिक, संगत आणि अर्थयुक्त भाषण ऐकून त्या लोमश मार्जाराला आनंद झाला आणि त्यानें त्या उंदराकडे पाहून त्याचा स्वागतपूर्वक बहुमान केला. असा त्याचा मान केल्यावर तो शहाणा मार्जार कांहीं विचार करून आपल्या मित्राला त्वरित प्रेमपूर्वक म्हणाला, "मित्रा, तूं शीघ्र मजजवळ ये, तुझें कल्याण असो, तूं माझा प्राणसम मित्र झाला आहेस. तुझ्या प्रसादानेंच आज मला जीवित मिळणार आहे. असें असतां मीं जें जें कांहीं करणें शक्य आहे, असें तुला वाटत असेल, तें तें सर्व सांग, मी करण्यास तयार आहें. मित्रा, आमच्यामध्यें मित्रत्व राहूं दे. ह्या संकटांतून मुक्त होऊन माझे मित्र आणि बांधव जेव्हां मला मिळतील, तेव्हां तुला ज्या ज्या गोष्टी हितप्रद व प्रिय असतील, त्या त्या सर्व करीन. ह्या संकटांतून एकदां मुक्त झालों म्हणजे हे सौम्या, मी तुझा सत्कार करून तुला आनंदित करीन. प्रत्युपकार करणारानें आपल्या उपकारांची फेड जरी पुष्कळ प्रकारें केली, तरी प्रथम उपकारकर्त्याची बरोबरी करितां येत नाहीं. कारण प्रत्युपकार करणारा दुसऱ्याच्या उपकारांची फेड म्हणून तें करीत असतो आणि दुसरा कारणावांचून तें करितो."

भीष्म—याप्रमाणें त्या उंदरानें आपलें म्हणणें त्याच्याकडून कबूल करविलें आणि आपल्या त्या पूर्ववैऱ्याकडे तो गेला. नंतर त्या मार्जारानें त्याला आश्वासन दिल्यावर आईबापांकडे जसें मूल मजेंत असतें, त्याप्रमाणें तो त्याच्या वक्षःस्थलावर बसून खुशाल निद्रावश झाला. मार्जाराच्या उरःस्थलावर उंदीर पडला आहे, असें दृष्टीस पडतांच मुंगूस आणि घुबड अगदीं निराश तशींच भयग्रस्त व ग्लान होऊन गेलीं. त्या मार्जार-मूषकांचें परस्परांवर अतिशय प्रेम जडलेलें पाहून त्यांना विस्मय वाटला. ते बलवान् व मतिमान् असूनहि त्या उंदराच्या नीतिबलामुळें बलात्कारानें त्याला तेथून नेतां येणें त्यांना अशक्य झालें. अशा रीतीनें परस्परांच्या कार्यार्थ सख्य करून राहिलेल्या त्या मार्जार-मूषकांस पाहून तें घुबड आणि मुंगूस आपापल्या ठिकाणीं निघून गेलीं.

हे नृपते, त्या मार्जाराच्या अंगावरील देश-कालवेत्ता तो पलित मूषक कालाची वाट पाहत सावकाशपणें त्याचे पाश तोडूं लागला. तेव्हां तो बंधनग्रस्त

मार्जार त्याला पाश तोडण्याचे कामीं घाई करूं लागला. तो म्हणाला, ' हे सौम्या, माझे पाश तोडण्याचे कामीं तूं त्वरा कां करीत नाहींस ? आपण कृतार्थ झालों, असें समजून माझा अपमान करूं नकोस. मित्रा, तो शत्रूंचा वध करणारा चांडाळ येण्याआधीं हे पाश तोडून टाक. ' हें त्याचें भाषण ऐकून तो बुद्धिमान् मूषक त्या मूर्ख मार्जाराला हितकारक व पथ्याचें बोलला कीं, " हे सौम्या, स्वस्थ रहा, त्वरा किंवा धांदल करूं नकोस. ह्या कामीं योग्य वेळाचें ज्ञान मलाच आहे. मी वेळ व्यर्थ कधीं जाऊं देणार नाहीं. अकालीं आरंभिलेलें कृत्य कर्त्याला कधीं लाभदायक होत नसतें. तेंच वेळीं आरंभिल्यास फायदेशीर होतें. अकालीं तुला मुक्त केलें असतां तुझ्यापासूनच मला भय उत्पन्न होईल. म्हणून तूं कालाची वाट पाहत रहा. मित्रा, उगीच घाई करण्यांत काय फायदा ? जेव्हां हातांत शस्त्र घेऊन त्या चांडाळाला येतांना मी पाहीन, तेव्हां दोघांनाहि सारखीच भयप्रद वेळ उत्पन्न होऊन मी तुझे पाश तोडीन. त्यावेळीं तुझी सुटका केली असतां तूं त्वरित झाडावर जाऊन बसशील. कारण तेव्हां प्राणरक्षणावांचून दुसरें कांहीं कर्तव्य तुला असणार नाहीं. हे लोमशा, तूं भयभीत आणि त्रस्त होऊन निघून गेल्यावर मीहि आपल्या बिळांत त्वरित जाईन व तूंहि वृक्षाच्या शाखेवर जाऊन बसशील."

अशा रीतीनें त्या मूषकानें आपलें हित लक्षांत आणून त्याप्रमाणें मार्जाराला सांगितलें. तें ऐकून त्याच्या भाषणांतील रहस्य जाणणारा तो बुद्धिमान् मार्जार आपला जीव वांचविण्याकरितां अगदीं उतावीळ होऊन आपल्या कार्याकरितां मोठ्या नम्रतेनें त्या विलंब करणाऱ्या मूषकास बोलला कीं, " सज्जन पुरुष अशाप्रकारें विलंब लावून मित्राचें काम कधीं करीत नसतात. मीं जसें त्वरेनें तुला संकटमुक्त केलें, त्याचप्रमाणें तूंहि त्वरा करून माझें हित केलें पाहिजे. हे महाप्राज्ञा, अजूनहि महाप्रयत्न करून आम्हां दोघांचेंहि रक्षण होईल, असें कर. किंवा पूर्ववैर लक्ष्यांत आणून जर तूं वेळ घालवीत असशील, तर मात्र हे पाप्या, तुझ्या आयुष्याचा क्षय झाला, असें समज. जर पूर्वी अज्ञानानें माझ्या हातून तुझ्यासंबंधीं कांहीं वाईट कृति घडली असेल तर ती मनांत आणूं नकोस. तीबद्दल मी तुझी क्षमा मागतों. माझ्यावर अनुग्रह कर."

याप्रमाणें त्या मार्जारानें भाषण केल्यावर शास्त्रवेत्त्या त्या शहाण्या मूषकानें त्याला म्हटलें, " आपला कार्यलाभ साधण्यासाठीं तूं जें बोललास, तें मीं ऐकिलें,

आणि स्वकार्यासाठीं मी जें कांहीं बोललों, तेंहि तूं ऐकिलें आहेस. ज्याच्या मैत्रींत भय आहे, अशाला भीतीमुळेंच जर आपण मित्र करून घेतलें, तर त्याशीं, ज्याचा हात सर्पाच्या तोंडांत सांपडला आहे, अशा पुरुषाप्रमाणें फार सावधगिरीनें वागलें पाहिजे. बलवानाशीं संधि करून जो आपलें संरक्षण सावध राहून करीत नाहीं, त्याचें तें कृत्य अभक्ष्य भक्षण केल्यासारखें असून त्यापासून कार्यसिद्धि होत नाहीं. कोणी कोणाचा मित्र नसतो किंवा शत्रुहि नसतो. जगांत मित्र किंवा शत्रु होतात, ते कांहींना कांहीं कारणानें होत असतात. गजांच्या योगानें वनगज पकडले जातात, त्याचप्रमाणें मनुष्यहि आपल्या कार्यास्तव दुसऱ्याच्या कार्यांनीं बद्ध होतो. कोणाचेंहि कार्य एकदां तडीस गेलें, म्हणजे मग तें करणाराची कोणी ओळखहि ठेवीत नाहीं. म्हणून कोणतेंहि कार्य करितांना तें निःशेष करूं नये. तूं त्या चाडाळाच्या भीतीनें त्रस्त झाल्यामुळें तुझें लक्ष्य त्यावेळीं पळून जाण्याकडेच विशेष गुंतलें असल्यामुळें मला धरून ठेवणें तुला शक्य नाहीं. तुझ्या जाळ्याचे बहुतेक तंतु मीं तोडले आहेत. आतां एकच तोडावयाचा राहिला आहे. तोहि मी लवकरच तोडून टाकीन. हे लोमेशा, तूं स्वस्थ रहा.”

अशाप्रकारें आपन्न स्थितींत असलेले ते बोलत आहेत, इतक्यांत रात्र निघून गेली आणि तो लोमश भयग्रस्त होऊन गेला. नंतर प्रभातकालीं शस्त्र हातांत घेऊन एक परिघ नांवाचा चांडाळ तेथें आलेला त्याच्या दृष्टीस पडला. तो दिसण्यांत भयंकर असून त्याचा वर्ण काळसर व पिंगट होता. त्याचा जघन-भाग अत्यंत स्थूल असून तो दिसण्यात विक्राळ व रूक्ष दिसत होता. त्याच्या सभोंवतीं अनेक कुत्रे होते. त्याचे कान शंक्वाकार असून त्याचा जबडा मोठा होता. तो अत्यंत मलिन आणि घोर स्वरूपाचा होता. यमदूताप्रमाणें त्याला पाहतांच मार्जार अगदीं गडबडून गेला. तो भयभीत झाला आणि त्यानें ‘तूं आतां काय करणार,’ म्हणून त्या मूषकाला विचारलें. इतक्यांत त्या मूषकानें मार्जाराचा पाश तोडून टाकतांच तो मार्जार एकदम त्या वृक्षावर चढून गेला व व मूषकहि त्या भयंकर शत्रूच्या हातून सुटून आपल्या बिळांत शिरला. इकडे चांडाळानें तें जाळें घेऊन पाहिलें, तों तें रिकामें असल्याचें दृष्टीस पडतांच त्याची निराशा झाली व तोहि तेथून निघून गेला. तेव्हां तो भयमुक्त झालेला व दुर्लभ जीवित मिळवून वृक्षाग्रावर असलेला मार्जार त्या बिळांतील मूष-काला बोलला.

" मित्रा, तुझ्याशीं कांहींहि न बोलतां मी सहसा वृक्षावर चढून बसलों, याबद्दल माझी तुला शंका तर येत नाहींना ? तूं मोठा कृतज्ञ असून माझा कल्याणकर्ता आहेस. तूं मजवर विश्वास ठेवून मला जीवदान दिलेंस, तेव्हां माझ्याशीं मित्रभावानें मजा मारावीस, तें सोडून तूं आतां मजकडे येतहि नाहींस, हें कसें ? जो पूर्वी मित्र जोडून पुढें त्यांना सोडून देतो, त्या दुर्मतीला संकटकाळीं मोठ्या कष्टानेंहि मित्र मिळत नाहींत. हे मित्रा, तूं आपल्या सामर्थ्यानें माझा सत्कार करून मला मित्र करून घेतलेंस, त्याअर्थीं माझाहि पाहुणचार घेणें तुला योग्य आहे. जे माझे मित्र, तसेच संबंधी आहेत, ते सर्व प्रियगुरूचा शिष्यवर्ग मान ठेवितात, त्याप्रमाणें सर्वदा तुझें पूजन करितील. मी तुझा सर्व आप्तेष्टांसह नित्य बहुमान करीन. कोणता कृतज्ञ पुरुष आपणाला जीवदान देणाऱ्याचा सत्कार करणार नाहीं ? माझ्या शरीररूप देव्हाऱ्यांत तूं देवासारखा रहा. माझ्या सर्व गोष्टींत तूंच माझा उपदेशक हो. हे प्राज्ञा, तूं माझा अमात्य हो आणि पित्याप्रमाणें मला आज्ञा कर ! आमच्यापासून तुला किमपि भिण्याचें कारण नाहीं, हें प्राणांची शपथ घेऊन मी सांगतों. तूं बुद्धीनें साक्षात् शुक्राचार्य असून आमच्या अंगीं बळ आहे. आपल्या मंत्रबलाच्या योगानें तूं आज मला जीवित दिलें आहेस. "

याप्रमाणें त्या मार्जाराचें शांत करून सोडणारें भाषण ऐकून त्या परमंत्रज्ञ मूषकानें मधुर शब्दांनीं आपल्या हिताचें भाषण केलें. तो म्हणाला, " हे लोमशा, तूं जें भाषण केलेंस, तें सर्व मीं ऐकिलें आहे. आतां मलाहि जें वाटतें, तें सांगतों, ऐक. मित्रांना आणि शत्रूंनाहि ओळखून असावें. ही गोष्ट ह्या लोकांत अत्यंत नाजूक आहे, असें विद्वानांचेंहि मत आहे. प्रसंगानुरूप मित्रहि शत्रु होतात व शत्रुहि मित्र होतात. कामक्रोधांच्या आधीन होऊन जाणाऱ्यांशीं जरी संधि केला, तरी तो फार दिवस टिकत नाहीं. जगांत कोणी मित्र नाहीं किंवा कोणी कोणाचा शत्रु नाहीं. रिपु अथवा मित्र हे सामर्थ्याच्या योगानें होत असतात. जो जीवंत राहिल्यानें आपल्या स्वार्थाला हानि न पोंचतां आपण सुखानें राहूं असें ज्याला वाटत असतें, तो दुसऱ्याचा मित्र होतो. ही मैत्री याच्या उलट स्थिति येईपर्यंतच असते. जगांत मैत्री किंवा शत्रुत्व हीं कोणाचीं कायमचीं नसतात. मित्र किंवा शत्रु हे स्वार्थपरत्वें होत असतात. कालपरत्वें मित्रांचे शत्रु होतात आणि शत्रु मित्र होतात. एकंदरींत स्वार्थ हाच बलवत्तर आहे. जो प्रसंग न ओळखतां मित्रांवर विश्वास ठेवितो,

शत्रूवर ठेवीत नाहीं आणि मोठ्या सुखांत राहतो, त्याचें चित्त चळलें असलें पाहिजे. अविश्वस्तावर विश्वास कधीं ठेऊं नये व विश्वस्तावर देखील अति-विश्वास ठेवूं नये. विश्वासापासून जें संकट उद्भवतें तें पाळें-मुळेंहि खणून टाकितें. पिता, माता, पुत्र, मामा, भाचा, संबंधी आणि बांधव हे सर्व संबंध स्वार्था-मुळेंच जडत असतात. आपला प्रिय पुत्र पतित झाला असतां आईबापहि त्याचा त्याग करीत असतात व दुसरे लोक स्वार्थदृष्टीनेंच त्याचें रक्षण करितात. यावरून स्वार्थाची योग्यता केवढी आहे, तें पहा !

"हे प्राज्ञा, ज्यानें तुझी संकटापासून सोडवणूक केली, अशा आपल्या शत्रूवर प्रत्युपकार करून त्याचे उपकार फेडण्याची इच्छा करणें हें अगदीं योग्य आहे. याच ठिकाणीं तूं पूर्वी वटवृक्षावरून खालीं उतरलास. तुझ्या चंचल स्वभावा-मुळें त्या वेळीं तेथें लावून ठेवलेलें जाळें तुझ्या लक्ष्यांत आलें नाहीं. चंचल मनुष्य स्वतःच्या कार्याविषयीं सावध नसतो, मग दुसऱ्याच्या कार्याविषयीं कितपत असणार ? चंचल चित्ताचा मनुष्य निःसंशय सर्व कार्यविघातक होतो. आतां तूं मला प्रिय आहेस, म्हणून जें तूं म्हणत आहेस, त्याचेंहि कारण सांगतों, ऐक. कोणी कोणाचा मित्र होतो, तो कारणामुळेंच होत असतो व द्वेष्यहि होण्यास कारणच लागत असतें. हा सर्व जीवलोक स्वार्थपर आहे. येथें कोणी कोणाचा प्रिय नाहीं. सख्या बंधूंचें किंवा पतिपत्नींचें परस्पर प्रेमहि स्वार्थामुळेंच घडत असतें. कोणी कोणावर निष्कारण प्रेम करितो, असें मला वाटत नाहीं. जरी बंधु किंवा भार्या कांहीं कारणानें परस्परांवर क्रुद्ध झालीं, तरी स्वभावानेंच तीं पुनः एकमेकांवर प्रेम करितात, इतर लोक करीत नाहींत. कोणी दान केल्यानें प्रिय होतो, कोणी गोड भाषणानें होतो; मंत्र, होम, जप इत्यादिकांनीं कोणी होतो. सारांश, कांहींना कांहीं कार्यामुळेंच मनुष्य प्रेम करीत असतो. आमचें दोघांचें प्रेम अशाच कांहीं कारणामुळें जडलें होतें. तें कारण नाहींसें होतांच आमचें प्रेमहि नाहींसें झालें. असें असूनहि तुला मी अजून प्रिय वाटत आहें, तेव्हां तूं मला खाऊन टाकावें, याशिवाय याचें दुसरें कारण मला दिसत नाहीं. याविषयीं मलाहि बरोबर ज्ञान आहे, हें समजून ठेव.

"काल मूळ हेतूला वेगळें स्वरूप देतो आणि स्वार्थहि त्याला अनुसरतो. स्वार्थाचें खरें ज्ञान शहाण्या मनुष्यालाच असतें आणि म्हणूनच सर्व लोक शहाण्याच्या मार्गानें जात असतात. विद्वान् आणि स्वार्थवेत्त्या मजपुढें तूं असलें

भाषण करूं नये. तूं मजपेक्षां बलवान् असल्यामुळें मजबरोबर तूं स्नेह करणें ही गोष्ट अकालीं आहे. संधि-विग्रह केव्हां करावयाचा, याचें ज्ञान मला बरोबर असल्याकारणानें स्वार्थापासून मी कधींहि ढळत नसतों. आकाशांतील मेघां-प्रमाणें संधि-विग्रहांचें स्वरूप बदलत असतें. आज तूं माझा शत्रु होतास, तो आजच माझा मित्र आणि पुनरपि आजच माझा शत्रु झाला आहेस हें युक्तीचें चपलपण कसें आहे तें पहा! जोंपर्यंत पूर्वीं कारण होतें, तोंपर्यंत आम्हां-मध्यें मैत्री होती, परंतु कालनिर्मित मैत्रीचें कारण नष्ट होतांच त्याबरोबर त्या मैत्रीचाहि नाश झाला. तूं जात्याच माझा शत्रु असून तुला संकटांतून बचावण्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं असल्यामुळें माझा मित्र झाला होतास. तो प्रसंग नाहींसा झाल्याकारणानें पुनः आम्ही पूर्ववत् शत्रु झालों आहों. तेव्हां हीं सर्व शास्त्रतत्त्वें मला पूर्णपणें ठाऊक असल्यामुळें तूं टाकिलेल्या पाशांत मी कसा बरें सांपडेन, तें मला सांग. तुझ्या सामर्थ्यानें मी मुक्त झालों व माझ्या सामर्थ्यानें तुझी सुटका झाली आहे. अशा रीतीनें परस्परांचे उपकार एक-मेकांनीं फेडून टाकिले असतां फिरून समागमाची गोष्ट बोलूं नकोस. हे मित्रा, तूं कृतार्थ झाला आहेस, तसेंच माझेंहि कार्य झालें आहे. तेव्हां मला खाऊन टाकण्यापलीकडे दुसरें तुझें कांहीं कार्य असेल, असें वाटत नाहीं. मी तुझें अन्न असून तूं भोक्ता आहेस. मी दुर्बल असून तूं बलवान् आहेस. तेव्हां आम्ही एकमेकांपासून वेगळे आहों आणि आमच्या बलामध्येंहि बरोबरी नाहीं, अशा स्थितींत आमची मैत्री होणें शक्य नाहीं.

"आतां तुझी सुटका झाली असतां सुखानें भक्ष्य मिळावें, म्हणून तूं माझी स्तुति करीत आहेस, त्यावरून तुझा विचार मला कळलाच आहे. तूं पूर्वीं भक्ष्यासाठींच बद्ध झाला होतास, तो मुक्त झाल्यावरहि क्षुधेनें पीडित आहेस. म्हणून तूं मला शास्त्रज्ञानाच्या गोष्टी सांगून आज मला खाऊन टाकणार आहेस. तूं क्षुधित झाला आहेस, तें मला ठाऊक आहे आणि आतां तुझा भोजनकालहि प्राप्त झाला आहे, तेव्हां मला फसवून तूं आपलें भक्ष्य मिळवीत आहेस, असें मला वाटतें. मजशीं संधि करून तूं आपल्या स्त्री-पुत्रांसमवेत माझी सेवा करण्याची इच्छा करीत आहेस, हीहि गोष्ट योग्य दिसत नाहीं. तुझ्याबरोबर मला पाहून तुझी प्रिय स्त्री आणि पुत्र मोठ्या आनंदानें मला खाऊन टाकणार नाहींत कशावरून? तुझ्या मैत्रीचें कारण नाहींसें झालें असल्यामुळें मी तुझ्याशीं संगति करूं इच्छित नाहीं. जर माझ्या

उपकारांचें तुला स्मरण होत असेल, तर तूं स्वस्थपणें माझें कल्याण चिंतीत रहा. कोणता सुज्ञ मनुष्य अनार्य, क्लिष्ट, क्षुधित आणि भक्ष्यार्थ सर्वत्र हिंडणाऱ्या शत्रूच्या प्रदेशांत जाऊं इच्छील? तुझें कल्याण असो. मी आतां जातों. दुरून देखील तुझी भीति मला वाटते. विश्वासामुळें किंवा चुकीमुळें असलें, तरी अशा रीतीनेंच वागण्याचा माझा निश्चय झाला आहे. कारण बलिष्ठांचें सान्निध्य कधींहि प्रशस्त नाहीं. लोमशा, तुझ्याशीं माझी मैत्री होणें आतां शक्य नाहीं. तूं येथून निघून जा. माझ्या उपकारांचें जर तुला ज्ञान असेल, तर सख्याला अनुसरून वाग म्हणजे पुरे. बलाढ्य दुष्ट शत्रु जरी प्रशांत दिसत असला, तरी त्याला सदैव भ्यालेंच पाहिजे.

"हे लोमशा, तुला जर स्वार्थबुद्धि नसेल, तर मी तुझें कोणतें कार्य करूं तें सांग. मी तुला स्वतःच्या प्राणांखेरीज सर्व कांहीं देईन. संतति, राज्य, रत्नें आणि धन यांच्या त्यागानेंहि आत्म्याचें रक्षण करावें. प्रसंगीं सर्वहि अर्पण करून मनुष्यानें आपले प्राण रक्षण करून घ्यावे. ऐश्वर्य, धन आणि रत्नें हीं जेव्हां जेव्हां शत्रु येतो, तेव्हां तेव्हां नष्ट होतात, परंतु जीवित असल्यास त्यांची पुनः प्राप्ति होत असल्याचें आढळून येतें. धन-रत्नांप्रमाणें शरीर अर्पण करणें कधींहि इष्ट नाहीं! स्त्रिया किंवा द्रव्य यांचा त्याग करूनहि मनुष्यानें आपल्या प्राणांचें रक्षण करावें. योग्य प्रकारें विचार करणारे आणि आत्मरक्षणाविषयीं काळजी घेणारे जे लोक आहेत, त्यांवर स्वतःच्या दोषानें आपत्ति केव्हांहि कोसळत नसते. जे दुर्बल असून बलिष्ठ शत्रूला उत्तमप्रकारें ओळखत असतात, त्यांची बुद्धि शास्त्रार्थाला धरून निश्चित झाली असल्या-मुळें केव्हांहि चळत नसते." अशाप्रमाणें पलित मूषकानें निर्भर्त्सना केली असतां त्या मार्जारानें लज्जित होऊन उत्तर केलें.

मार्जार—तुझी शपथ घेऊन मी सत्य सांगतों कीं मित्रद्रोह हा अत्यंत निंद्य आहे. तूं माझें हित पाहणारा आहेस, ही गोष्ट मला मान्य आहे. नीति-तत्त्वानुरोधानें आम्हांमध्यें भिन्नता आहे, म्हणून तूं म्हटलेंस. परंतु हे साधो, तूं मजसंबंधानें भलताच ग्रह करणें, हें तुला शोभत नाहीं. तूं मला प्राणदान दिलें आहेस, त्यामुळें तुजवर माझें प्रेम जडलें आहे. मी धर्मज्ञ, गुणज्ञ आणि विशेषतः कृतज्ञ आहें. मी मित्रांच्या ठिकाणीं प्रेम करणारा असून विशेषतः तुझ्यावर माझी भक्ति आहे. म्हणून हे साधो, तूं माझ्याशीं पूर्वींप्रमाणेंच वागावें,

हें योग्य आहे. तूं जर माझी अशी निंदा करणार असशील, तर मी बांधवांसह प्राणत्याग करीन. माझ्यासारख्या ज्ञानसंपन्न प्राण्यावर विद्वानांनींहि विश्वास टाकिला आहे, म्हणून हे धर्मतत्त्वज्ञा, तूं मजविषयीं शंका घेणें तुला शोभत नाहीं.

याप्रमाणें त्या मार्जारानें स्तुति केली असतां तो दृढनिश्चयी मूषक पुनः त्याला म्हणाला, "तूं साधु आहेस. मी नीतितत्त्वज्ञ आहें. माझें तुजवर प्रेम आहे. तथापि तुझ्यावर मी विश्वास ठेवूं इच्छीत नाहीं. तूं माझी पुष्कळ स्तुति केल्यानें अथवा धनाच्या राशि अर्पण केल्यानेंहि मी तुला आतां वश होईन, हें समजूं नकोस. कारण हे मित्रा, सुज्ञ लोक शत्रूला निष्कारण कधींहि वश होत नसतात. ह्यासंबंधीं शुक्राचार्यांच्या दोन गाथा आहेत, त्या सांगतों, ऐक. आपण व आपला बलाढ्य शत्रु या दोघांवर एकच प्रसंग आला असतां त्या बलवान् शत्रूशीं संधि करावा, मोठ्या सावधगिरीनें त्याच्याशीं वागावें आणि आपला कार्यभाग होतांच त्यावर विश्वासून राहूं नये. जो विश्वासास पात्र नाहीं, त्याजवर विश्वास टाकूं नये व विश्वासाला योग्य असला तथापि त्यावर अतिविश्वास ठेवूं नये. नेहमीं दुसऱ्याचा विश्वास आपणावर बसेल, असें वागावें, परंतु आपण दुसऱ्यावर विश्वास ठेवूं नये. सर्व अवस्थांमध्यें आपल्या जीविताचें प्रथमतः रक्षण केलें पाहिजे. जीवंत असल्यास द्रव्य, संतति ह्या सर्वांची प्राप्ति होईल. कोणावरहि विश्वास न ठेवणें हें नीतिशास्त्राचें संक्षिप्त स्वरूप आहे. मनुष्यांवर विश्वास न ठेवणें, यांत आपलें बरेंचसें हित आहे. विश्वास न ठेवून राहिल्यानें दुर्बल लोकहि शत्रूकडून वध पावत नाहींत. उलट विश्वास ठेविल्यानें बलवान् लोक सुद्धां दुर्बलांच्या हातून वध पावतात. हे मार्जारा, तुझ्यासारख्यांच्या हातून मला माझे प्राण रक्षण केले पाहिजेत. तूंहि स्वभावतःच दुष्ट अशा त्या चांडाळापासून आपलें रक्षण कर."

याप्रमाणें त्या मूषकाचें भाषण ऐकतांच आणि त्यांत त्या चांडालाचें नांव निघतांच तो मार्जार भयग्रस्त होऊन ती वृक्षांची फांदी सोडून तत्काळ तेथून निघून गेला. इकडे तो शास्त्रार्थतत्त्वज्ञ पलित मूषक आपलें बुद्धिसामर्थ्य त्या मार्जाराला दाखवून दुसऱ्या बिळांत तत्काल राहण्यास गेला. अशा रीतीनें त्या दुर्बल परंतु सुज्ञ मूषकानें आपल्या बुद्धिबलानें अनेक बळवंत शत्रूंना दाद दिली नाहीं. म्हणून शहाण्या मनुष्यानें आपल्या प्रबळ शत्रूंशीं सर्वदा संधि करूनच

वागावें. परस्परांशीं संधि केल्यामुळेंच ते मार्जार आणि मूषक संकटमुक्त झाले. त्याप्रमाणें मीं तुला सर्व क्षत्रियधर्म विस्तारपूर्वक सांगितला आहे. त्याचें आतां संक्षिप्त रूपानें कथन करितों तेंहि ऐक.

जेव्हां परस्परांचें पूर्ववैर असलेले दोघे पुरुष कांहीं कारणामुळें उत्तम प्रकारचें सख्य करून वागतात, तेव्हां त्यांचें कार्य झालें असतां एकमेकांना फसविण्याचा विचार त्यांच्या मनांत येऊन शहाणा मनुष्य आपल्या बुद्धिबलाच्या जोरावर दुसऱ्याला फसवितो. एखाद्या वेळीं शहाणा मनुष्य सुद्धां आपल्या दुर्लक्ष्यामुळें दुसऱ्या शहाण्याकडून फसविला जातो. म्हणून भिऊन न भ्याल्यासारखें वागावें व विश्वास दाखवून कोणावरहि विश्वास ठेवूं नये. सावध मनुष्याच्या हातून कधींहि प्रमाद होत नाहीं आणि कदाचित् झाल्यास त्याचा घात होत नाहीं. हे नराधिपा, कालानुसार शत्रूशीं संधि करावा व प्रसंगीं मित्राशींहि युद्ध करावें, असें संधिशास्त्रज्ञ लोकाचें म्हणणें आहे. हें जाणून आणि शास्त्रार्थ लक्ष्यांत आणून सावध व प्रसन्न रहावें आणि संकट येण्यापूर्वीं भ्याल्यासारखें रहावें व एकमेकांशीं संधि करावा. भयप्रद प्रसंगींहि सावधपणें वागल्यानें बुद्धि सुचते. संकट येण्यापूर्वीं जो भीति बाळगून वागत असतो, त्यावर संकट ओढवत नाहीं. परंतु जो विश्वास ठेवून निर्धास्तपणें वागतो, त्यावर मोठें संकट कोसळतें. जो निर्भयतेनें वागत असतो, त्यालाच मसलत द्यावी. शहाण्या मनुष्यानें जी गोष्ट आपणाला समजत नसेल, ती दुसऱ्या सुज्ञ मनुष्याकडून घ्यावी. म्हणून भीति बाळगून आपण निर्भय असल्यासारखें दाखवावें व विश्वास दाखवून कोणावरहि विश्वास टाकूं नये. कार्याचें महत्त्व लक्ष्यांत आणून असत्य वर्तन कधीं करूं नकोस.

हे युधिष्ठिरा, ह्याप्रमाणें मीं सांगितलेला इतिहास ऐकून व त्यापासून उत्तम ज्ञान मिळवून शत्रु कोण, मित्र कोण, संधि करण्याचा उत्तम काल कोणता, विग्रह केव्हां करावा, सुटकेचा उपाय काय, ह्यांचा विचार करावा. एकच कार्य दोघांनाहि करावयाचें असल्यास बलवान् शत्रूशीं संधि करावा, त्याच्याशीं युक्तीनें वागावें आणि आपला कार्यभाग तडीस गेल्यावर त्यावर विश्वासून राहूं नये. हे महीपाला, धर्म, अर्थ आणि काम ह्या त्रिवर्गाला धरूनच ही नीति सांगितली आहे. हे पांडवा, हिचा आश्रय करून तूं प्रजांचें पुनः पालन कर आणि अभ्युदयानें वाग. तुझ्याबरोबर ब्राह्मणांचाहि चरितार्थ चालेल. हे

भारता, ब्राह्मण हे इहलोक व परलोक अशा दोन्ही ठिकाणच्या श्रेयाला कारण होणारे असतात. हे प्रभो, ब्राह्मण हे धर्मवेत्ते असून सर्वदा कृतज्ञ असतात. त्यांचा मान ठेविल्यास ते कल्याणकर्ते होतात. म्हणून हे नराधिपा, तूं त्यांचा सत्कार कर. असें केल्यानें तुला राज्य, कल्याण, यश आणि कीर्ति यांची प्राप्ति होईल; तसेंच तुझ्या कुलामध्यें यथान्याय व यथाक्रम संतति होईल. हे राजन्, अशाप्रकारें संधिनिग्रहानें उत्तम ज्ञान करून देणारें मूषक-मार्जारांचें भाषण मीं वर्णन करून सांगितलें आहे, तें लक्ष्यांत ठेवून राजानें शत्रुमंडळामध्यें तद्नुसार सर्वदा वागावें. १२. २. १३८.

---

## अध्याय १३९ वा.

[ १ कोणावरहि विश्वास न ठेवितां राजानें कसें वागावें, असा युधिष्ठिरप्रश्न. २ त्यावर पूजनी-ब्रह्मदत्तसंवादाचें युधिष्ठिराला भीष्माकडून कथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**–हे महाबाहो, शत्रूंवर विश्वास कधींहि ठेवूं नये, परंतु कोणावरहि विश्वास न ठेविल्यास राजानें वागावें तरी कसें ? हे राजा, विश्वासामुळें राजांना मोठें भय उत्पन्न होतें, असें तूं म्हणतोस, परंतु कोणावरहि राजानें विश्वास न ठेविल्यास त्याला शत्रूंना कसें जिंकितां येईल ? हा माझा संशय तूं दूर करून टाक. माझी बुद्धि मोहग्रस्त झाली आहे.

( २ ) **भीष्म**–हे राजा, ह्यासंबंधी ब्रह्मदत्त राजाच्या मंदिरांत झालेला त्याचा आणि पूजनीनामक पक्षिणीचा संवाद मी सांगतों तो तूं ऐक. कांपिल्यनगरीमध्यें ब्रह्मदत्त राजाच्या अंतःपुरामध्यें राहणारी पूजनी नांवाची एक पक्षीण होती. ती दीर्घकालपर्यंत त्याच्या सहवासांत होती. चकोर पक्ष्याप्रमाणें सर्व प्राण्यांची भाषा तिला समजत होती. नीच योनींत जरी ती जन्मास आली होती, तरी ती सर्वज्ञ अर्थात् प्रत्येक गोष्टींतील तत्त्व समजणारी होती. तेथें तिला एक सुंदर तेजस्वी पुत्र झाला व त्याच वेळीं राजाच्या राणीलाहि पुत्र झाला. त्या दोन्ही पुत्रांच्या पुष्टीकरितां ती कृतज्ञ पूजनी सर्वदा समुद्रतीरावर जाऊन दोन फळें घेऊन येत असे. त्यांपैकीं एक फळ आपल्या पुत्राला देऊन दुसरें ती राजपुत्राला देत असे. त्या प्रत्येक फळाची गोडी अमृतासारखी असून तें बल आणि तेज वाढविणारें होतें. अशा रीतीनें ती फळें आणून तीं त्यांना

वरेचवर देत असे. त्या फलभक्षणानें राजपुत्राचे शरीराची वाढ चांगलीच झाली. पुढें कोणी एके वेळीं दाईच्या कडेवरून तो राजपुत्र फिरत असतां त्यानें त्या पक्ष्याच्या पोराला पाहिलें आणि बालस्वभावामुळें तो त्याच्याकडे जाऊन त्याशीं खेळूं लागला. हे राजेंद्रा, पुढें आपल्या बरोबरच जन्मास आलेल्या त्या पक्ष्याचा एकांतांत वध करून तो राजपुत्र पुनः आपल्या दाईच्या कडेवर जाऊन बसला.

हे राजा, नंतर ती पूजनी फळें घेऊन आली, तेव्हां राजपुत्रानें आपल्या पुत्राला मारून जमिनीवर टाकिलें आहे असें तिनें पाहिलें. तेव्हां तिचे डोळे पाण्यानें भरून आले. ती अगदीं दीन होऊन गेली आणि पुत्रशोक करूं लागली. मग दुःखसंतप्त होऊन रडत रडत ती पूजनी म्हणाली, "क्षत्रियाबरोबर संगति, प्रीति किंवा मैत्रीहि करणें योग्य नाहीं. स्वकार्यासाठीं हे सामोपचाराच्या गोष्टी करितात, परंतु कृतार्थ झाले असतां तत्काळ त्याग करितात. अपकार करणाऱ्या क्षत्रियावर कोणींहि विश्वास ठेवूं नये. अपकार करूनहि हे निरर्थक गोड भाषणानें सांत्वन करीत असतात. या कृतघ्न, दुष्ट आणि अत्यंत विश्वासघातकी अशा राजपुत्राचा मी चांगलाच सूड घेतें. आपल्या बरोबरच उत्पन्न होऊन वाढलेला, बरोबरच भोजन करणारा आणि शरणागत आलेला ह्यांचा वध करणें हे पातकाचे तीन प्रकार आहेत आणि हें त्रिविध पातक ह्या राजपुत्राच्या हातून घडलें आहे." असें म्हणून तिनें आपल्या पायांनीं त्या राजपुत्राचे डोळे फोडले आणि आकाशांत जाऊन ती बोलली कीं, 'ह्या लोकीं जो बुद्धिपूर्वक पाप करीत असतो, त्याला त्याचें फळ तत्काळ मिळतें. एकाद्यानें एकादें कृत्य केलें आणि त्याची फेड म्हणून दुसऱ्यानें तसेंच कृत्य केलें, तरी कर्त्याला त्याचें शुभाशुभ फल भोगावें लागतें. पापकर्म करून त्याचें फल जर कर्त्याला मिळालें नाहीं, तर तें त्याचे पुत्र, नातू अथवा पणतू यांना भोगावें लागतें.'

आपल्या पुत्राचे डोळे पूजनीनें फोडल्याचें ब्रह्मदत्तानें पाहून आणि पुत्राच्या अपराधाचें हें प्रायश्चित्तच होय, असें जाणून तो पूजनीला बोलला—

ब्रह्मदत्त—हे पूजनि, आमच्या हातून अन्याय झाला आहे आणि तूंहि त्याचें प्रायश्चित्त आम्हांला दिलें आहेस. तेव्हां दोघांचीहि बरोबरी झाली आहे. आतां तूं आमच्या येथें रहा, जाऊं नकोस.

**पूजनी**—एकदां ज्याचे हातून अपराध घडला आहे, त्याचे येथें पुनः लोंबत राहणें, ही गोष्ट शहाण्यांना प्रशस्त वाटत नाहीं. तेथून निघून जाणें हेंच श्रेयस्कर होय. ज्याच्याशीं आपलें वैर एकदां जडलें आहे तो कितीहि सामोपचारानें वागला तरी त्याच्यावर कधीं विश्वासून राहूं नये. तो मूर्ख त्वरित बद्ध होतो; कारण वैराचें कधींहि शमन होत नाहीं. ज्या पुरुषांमध्यें वैर उत्पन्न झालें आहे, त्यांचे पुत्र-पौत्रांचा मृत्यु नाश करितो; इतकेंच नव्हे, तर त्यांना परलोकालाहि मुकावें लागतें. ज्यांमध्यें वैर उत्पन्न झालें आहे, त्यांनीं परस्परांवर अविश्वासानें राहणें, हेंच त्यांना सुखावह होय. विश्वासघातक्यावर तर पूर्ण विश्वास कधींहि ठेवूं नये. ज्याचा आपल्यावर विश्वास नाहीं, त्यावर आपण विश्वास ठेवूं नये आणि विश्वास ठेवल्यावर देखील अतिविश्वास ठेवूं नये. कारण विश्वास ठेविल्यानें जें भय उत्पन्न होतें तें त्या विश्वास ठेवणाऱ्याचा उच्छेद करितें. आईबाप हे बांधवांत श्रेष्ठ प्रतीचे होत. भार्या म्हणजे वृद्धावस्थेला कारण होय, पुत्र हा केवळ बीजमात्र होय, बंधु हा शत्रु होय आणि मित्र हात भिजेपर्यंत होय. सुख-दुःख हें आपलें आपणालाच भोगणें प्राप्त आहे. एकदां वैर उत्पन्न झालें असतां मग त्यामध्यें संधि होणें कधींहि शक्य नाहीं. आणि ज्याकरितां मी येथें राहिलें होतें तें कारणहि सरलें आहे. ज्यानें पूर्वी आपला अपकार केला आहे, त्याचा सत्कार आणि मान पुष्कळ केला तरी त्याचा तेथें विश्वास बसत नाहीं आणि दुर्बलांना त्यापासून फार त्रास होतो. पूर्वी जेथें मान मिळत होता आणि मागाहून अवमान होऊं लागला तर त्या ठिकाणाचा सत्त्ववान् पुरुषानें त्याग करावा. तुझ्या येथें मीं दीर्घकाल वास्तव्य केलें व तूं माझा मानहि उत्तम प्रकारें राखलास. परंतु आतां हें वैर उत्पन्न झालें. म्हणून मी येथून शीघ्र जातें.

**ब्रह्मदत्त**—जो कोणी दुसऱ्यानें अपराध केल्यास त्याचा सूड घेतो, त्याला दोष लागत नाहीं. म्हणून हे पूजनि, तूं माझ्या येथें रहा, जाऊं नकोस.

**पूजनी**—अपराध करणारा व त्याला प्रायश्चित्त देणारा यांमध्यें पुनः सख्य कधींहि घडत नसतें. कारण, त्या दोघांचे मनाला परस्परांचा संबंध ठाऊक असतो.

**ब्रह्मदत्त**—अपराध करणारा व त्याचा सूड घेणारा यांमध्यें पुनः सख्य होण्याला कांहीं अडचण नाहीं. कारण येथें वैराचा उपशम झाल्याचें स्पष्ट दिसत आहे. वैराचा सूड घेणाऱ्याला यांत कांहींच पाप लागत नसतें.

पूजनी—वैराचें शमन कधींहि होत नसतें आणि शत्रूनें कितीहि समाधानाच्या गोष्टी सांगून सांत्वन केलें, तरी त्यावर विश्वासूं नये. कारण, विश्वासामुळेंच मनुष्य बद्ध होतो. म्हणून शत्रूला दर्शन न देणें हेंच श्रेयस्कर होय. बलानें अथवा उत्तम प्रकारच्या तीक्ष्ण शस्त्रांनींहि ज्यांना बद्ध करितां येणें शक्य नाहीं, ते लोक हत्तिणींकडून गज जसे बद्ध केले जातात, त्याप्रमाणें गोड गोड सांत्वनपर शब्दांनीं धरिले जातात.

ब्रह्मदत्त—जीविताचा नाश करणाऱ्यांच्या ठिकाणीं देखील सहवासाच्या योगानें स्नेह उत्पन्न होतो. ह्याचें उत्तम उदाहरण म्हणजे श्वान आणि श्वानमांसाहारी चांडाळ यांच्यामधील स्नेह हें होय. परस्परांमधील वैर एकमेकांच्या सहवासानें मृदु पडतें आणि कमलपत्रावरील उदकाप्रमाणें फार वेळ राहत नाहीं.

पूजनी—पंडितांच्या मतानें वैराची उत्पत्ति पांच प्रकारें होत असते. ते पांच प्रकार म्हणजे स्त्रीमुळें, जमिनीमुळें, वाणीमुळें, जातींतील शत्रुत्वामुळें आणि कांहीं अपराधामुळें उत्पन्न होणारें वैर, हे होत. विशेषेंकरून दात्याचा वध क्षत्रियानें उघड किंवा चोरून कधीं करूं नये. त्याच्या अपराधाचें बलाबल मात्र नीट ध्यानांत आणावें. एकदां वैर उत्पन्न झालें असतां आपल्या मित्रावर देखील विश्वास ठेवणें योग्य नाहीं. लांकडामध्यें अग्नि जसा लपून असतो, त्याप्रमाणें प्राणिशरीरांत वैर गुप्तपणें असतें. हे राजा, वित्तानें, कठोरपणानें, सामोपचारानें किंवा दुसऱ्या कोणत्याहि उपायाच्या आश्रयानें समुद्रांतील वडवाग्नीप्रमाणें मनुष्याचा कोपाग्नि कधींहि शांत होत नसतो. हे राजा, वैराग्नि एकदां उत्पन्न झाला म्हणजे तो दग्ध केल्याशिवाय राहत नाहीं आणि अपराधापासून उत्पन्न झालेलें पातकहि दोहोंपैकीं एकाद्याचा क्षय झाल्याशिवाय नष्ट होत नाहीं. आजपर्यंत मीं तुझा कांहीं अपराध केला नाहीं व तूंहि माझा केला नाहींस, म्हणूनच मी तुझ्या येथें राहत होतें. आतां तुझ्यावर माझा विश्वास नाहीं.

ब्रह्मदत्त—सर्व कांहीं काल करीत असतो. सर्व प्रकारच्या क्रिया कालाच्याच योगानें घडून येत असतात. मग ह्या जगांत कोण कोणाचा अपराध करितो? जन्म आणि मरण यांनाहि प्रवृत्त करणारा कालच होय. काल येतो, तेव्हांच मनुष्य जन्माला येतो आणि काल आला म्हणजेच तो मृत्युहि

पावतो. एखादा एकटाच कित्येकांना बद्ध करूं शकतो, त्याला दुसऱ्यांना बद्ध करितां येत नाहीं, हा सर्व कालाचाच प्रभाव होय. इंधनाची प्राप्ति होतांच जसा अग्नि त्याला जाळून खाक करितो, त्याप्रमाणें काल हा सर्व प्राण्यांना दग्ध करून टाकीत असतो. माझ्या दुःखाला तूं किंवा तुझ्या दुःखाला मी कारण नसून मनुष्यांचीं सुख-दुःखें कालाच्याच योगानें येत असतात. म्हणून तूं येथें स्नेहपूर्वक तुझ्या इच्छेला येईल त्या रीतीनें रहा. तुला कोणापासूनहि त्रास होणार नाहीं. तुझ्या हातून कांहीं अन्याय झाला असल्यास मीं त्याची क्षमा केली आहे आणि हे पूजनि, माझ्या अपराधाची तूंहि तशीच क्षमा कर.

पूजनी—जर तुला काल हाच प्रमाण वाटत आहे, तर कोणाशींच कोणाचें वैर होणार नाहीं. मग आपल्या बांधवांचा वध झाल्याबद्दल लोकांनीं सूड कां घ्यावा? जर सुख-दुःख, जन्म-मरण, हीं कालाच्याच योगानें घडून येणारीं असतील, मग पूर्वीं देवासुरांनीं एकमेकांचा वध करण्याचें तरी कारण काय? मग वैद्यांनीं तरी रोग्यांकरितां औषध करण्याची कां इच्छा करावी? जर कालानेंच सर्व शिजत आहे, मग औषधांची तरी जरूरी काय? शोकानें मूर्च्छित होऊन लोक तरी इतका आकांत कशाकरितां करितात? जर तुला काल हाच कर्ता वाटत आहे, तर मग कोणतेंहि कृत्य करणाऱ्यास पाप-पुण्यफल तरी कां मिळावें? हे नराधिपा, तुझ्या पुत्रानें माझ्या पुत्राचा वध केला, त्याला मीं शिक्षा दिली. आतां मला तूं मारावेंस हें अगदीं योग्य आहे. मी पुत्रशोकानें तुझ्या पुत्रासंबंधीं पाप आचरिलें, याबद्दल तूंहि माझा वध कां करावा, याचें तत्त्व सांगतें, ऐक. मनुष्य पक्ष्यांची खाण्याकरितां किंवा क्रीडेकरितां म्हणून इच्छा करीत असतात. त्यांना मारणें किंवा त्यांचा वध करणें ह्यावांचून तिसरा कोणताच हेतु मनुष्यांच्या मनांत असणें शक्य नाहीं. ह्या दोन भीतींमुळेंच ते पक्षी सुटकेची इच्छा करीत असतात. वेदवेत्ते लोक जन्ममरणापासून उत्पन्न झालेलें दुःख फार मोठें असतें, असें म्हणतात.

प्राण आणि पुत्र हे सर्वांना प्रिय असतात. दुःख हें सर्वांना नकोसें वाटतें आणि सुख हें सर्वांना इष्ट असतें. हे ब्रह्मदत्ता, म्हातारपण, द्रव्यनाश, अनिष्टाशीं सहवास, इष्टाचा वियोग ह्या सर्व गोष्टी दुःखाला कारण आहेत. तसेंच वध, बंधन, स्त्री, कांहीं स्वाभाविक गोष्टी आणि नष्ट किंवा दुष्ट पुत्र यां-

योगानेंहि दुःख होतें. कित्येक मूर्ख लोक दुसऱ्याला होणारें दुःख हें दुःख नव्हे, असें म्हणतात. ज्याला दुःखानुभव मुळींच नाहीं, असा मनुष्य लोकसमुदाया-पुढें अशी बडबड करीत असतो. ज्याला दुःखाकुल होऊन शोक करण्याचा प्रसंग आला आहे, तो असें कसें म्हणेल? ज्याला सर्व प्रकारच्या दुःखांचा अनुभव आहे, तो आपल्याप्रमाणेंच दुसऱ्याचें दुःख समजतो. हे राजा, मीं जें तुझें केलें आहे व तूं जें माझें केलें आहेस, तें शंभर वर्षांनीं सुद्धां नष्ट केलें जाणार नाहीं. आमची कृतिच अशी आहे कीं यापुढें आमचें सख्य होऊं नये. मुलाची जेव्हां जेव्हां तुला आठवण होईल, तेव्हां तेव्हां तुझ्या मनांतील मज-विषयींचें वैर अगदीं ताजें होईल. वैर जवळ बाळगून जो पुनः प्रीति करण्याची इच्छा धरितो, त्याचा संधि फुटक्या मातीच्या भांड्याप्रमाणें कधींहि होत नसतो. विश्वासामुळेंच दुःखोत्पत्ति होत असते, असें नीतिशास्त्राचें म्हणणें आहे. यासंबंधीं शुक्राचार्यानें प्रल्हादाला पूर्वी दोन गाथा सांगितल्या आहेत. त्यांत जे कोणी शत्रूच्या खऱ्या अथवा खोट्या बोलण्यावर विश्वास ठेवितात, त्यांची स्थिति मधावर दृष्टि ठेवून चाललेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें शुष्कतृणाच्छादित कड्यावरून पडून मरण येतें, तद्वत् होते, असें सांगितलें आहे. दुःखामुळें उत्पन्न झालेल्या वैराची शांति कुलाचा नाश झाल्यानेंहि होत नसते. कारण कुलांत एखादा पुरुष जरी जीवंत असला, तरी त्याला मागील वैराचा संबंध सांगणारे लोक अनेक भेटतात. हे नराधिपा, वैराला मनांत ठेवून राजे लोक गोड भाषण करितात आणि नंतर दगडावर आपटलेल्या पूर्ण घटाप्रमाणें त्याचा चुराडा करून टाकितात. राजानें कोणाचा अन्याय केला असतां त्याच्यावर कधीं विश्वास टाकूं नये. असा विश्वास ठेवल्यावर त्याला पुढें दुःख भोगावें लागतें.

ब्रह्मदत्त—विश्वास कोणावर न ठेवल्यानें अर्थसिद्धि होत नाहीं आणि कोणती इच्छाहि करितां येत नाहीं. सर्वदा भयभीत होऊन ते मेल्यासारखे असतात.

पूजनी—पायाला इजा झाली असतां जो आपल्या पायांनींच सर्वत्र फिरतो, त्यानें चालतांना कितीहि काळजी घेतली, तरी त्याच्या पायाला इजा झाल्याशिवाय राहत नाहीं. नेत्र रुग्ण झाले असतां जो वाऱ्यासमोर दृष्टि ठेवून राहतो, त्याचे डोळ्याला वायुरोग होतोच. आपली शक्ति मनांत न आणतां जो चुकीच्याच मार्गानें जातो, त्याचे आयुष्याचा नाश झाला म्हणून समजावें. जो शेतकरी पावसाचा विचार न करितां शेत नांगरितो, त्याचा प्रयत्न व्यर्थ

जाऊन त्याच्या हातीं धान्य कांहींच पडत नाहीं. जो नेहमीं हितकारक अन्न— मग तें तिखट असो, कडू असो अथवा मधुर किंवा गोड असो—खातो, तें त्याला अमृतासमान होतें. परंतु पथ्यकारक अन्नाचा त्याग करून मोहानें अपथ्याचें अन्न जो खातो, त्याचा त्यांतच अंत झाल्याशिवाय राहत नाहीं. दैव आणि उद्योग हीं परस्परांच्या आश्रयानें राहत असतात. थोर लोक उद्योगाला महत्त्व देतात आणि दुर्बल दैवावर विश्वास ठेवून राहतात. आपणाला हितकारक असें जें कर्म तें करीत रहावें, मग तें अत्यंत अवघड असो अथवा सोपें असो. कांहींहि उद्योग न करणारा मनुष्य सर्वदा दरिद्री व संकटांनीं ग्रस्त असतो. म्हणून मनुष्यानें सर्व गोष्टी बाजूला सारून पराक्रम दाखवीत रहावें. सर्वस्वाचाहि त्याग करावा, परंतु मनुष्यानें आत्महित केल्याशिवाय राहूं नये.

विद्या, शौर्य, दक्षता, बल आणि धैर्य हे पांच आपले स्वाभाविक मित्र असून त्यांच्या तंत्रानेंच शहाणे लोक वागत असतात. घर, जवाहीर, भूमि, भार्या आणि आप्तलोक हीं उपसाधनें असून त्यांची प्राप्ति वाटेल तेथें होते. शहाणा मनुष्य वाटेल तेथें रमतो आणि सर्वत्र शोभतो. तो कोणाला भिववीत नाहीं व दुसऱ्यांनीं भिवविलें असतां भीत नाहीं. बुद्धिमान् मनुष्याजवळ जरी पैसा थोडा असला, तरी तो सर्वदा वाढत जातो. जो दक्षपणानें आपलें काम करितो व आत्मनिग्रहानें वागतो त्याची कीर्ति होते. जे अल्पबुद्धि लोक घरावर प्रेम ठेवून घरालाच चिकटून राहतात, त्यांचें मांस त्यांच्या कजाग स्त्रिया, खेंकडीला तिच्या पोरांप्रमाणें, नित्य भक्षण करितात. दुसरे कित्येक बुद्धिभ्रंश होऊन गृह, शेतें, मित्र आणि स्वदेश यांवरील प्रेमानें त्यांचा त्याग न करितां दीन दशा भोगीत असतात. व्याधि आणि दुर्भिक्ष यांनीं पीडित अशा आपल्या देशाला टाकून दुसऱ्या देशाला जावें किंवा स्वदेशांत राहून जर आपला बहुमान होत असेल, तर रहावें. म्हणून मी आतां दुसरीकडे रहायाला जातें. येथें राहण्यांत मला उत्साह वाटत नाहीं. हे राजा, तुझ्या पुत्राचा मीं महान् अपराध केला आहे. वाईट स्त्री, वाईट पुत्र, वाईट राजा, वाईट सख्य, वाईट संबंध, वाईट देश हीं सोडून मनुष्यानें तत्काल दूर जावें. वाईट पुत्रावर विश्वास बसत नाहीं. वाईट स्त्रीवर प्रेम कुठून जडणार? वाईट राज्यांत सुख होत नाहीं आणि वाईट देशांत उपजीविका चालत नाहीं. ज्याची प्रीति सर्वदा अस्थिर आहे, अशा वाईट मित्राशीं संगति टिकत नाहीं. वाईट संबंध जडला असतां संकटकाळ येतांच अपमान होतो.

जी सर्वदा गोड भाषण करिते तीच स्त्री होय. ज्याच्यापासून सुखप्राप्ति होते, तोच पुत्र होय. ज्याच्यावर आपण विश्वास टाकितों, तोच मित्र होय. जेथें उत्तम प्रकारें चरितार्थ चालतो, तोच देश होय. ज्याचें शासन कडक असून प्रजेवर कोणत्याच प्रकारें बलात्कार होत नाहीं व भीतीचें कारण नसतें, तोच राजा होय आणि जेथें दरिद्री लोकांचेंहि पालन होतें तोच संबंध होय. राजा गुणवान् आणि धर्मदृष्टि असला म्हणजे भार्या, देश, मित्र, पुत्र, संबंधी आणि बांधव हे सुखांत असतात. अधर्मज्ञ राजाच्या निग्रहामुळें प्रजांचा नाश होतो. राजा हा धर्म, अर्थ आणि काम ह्या त्रिवर्गाचें मूळ आहे. त्यानें मोठ्या दक्षतेनें प्रजेचें पालन करावें. त्यानें उत्पन्नाचा सहावा भाग कर म्हणून घेऊन त्यावर आपला चरितार्थ चालवावा. जो प्रजेचें योग्य रीतीनें पालन करीत नाहीं, तो राजा चोर होय. जो राजा प्रजेला अभय देऊन धनलोभानें आपलें वचन पाळीत नाहीं, तो सर्व लोकांचें पातक घेऊन नरकाला जातो. जो राजा प्रजेला अभय देऊन वचनाप्रमाणें वागतो, आणि धर्मानें प्रजापालन करितो, तो सर्व प्रजेला सुख देणारा होय, असें समजावें. माता, पिता, गुरु, पालक, अग्नि, कुबेर आणि यम ह्या सातांचे गुण राजामध्यें असावेत असें मनु म्हणतो. जो प्रजेवर दया करून वागतो, तो राजा राष्ट्राचा पिताच होय. अशा राजाशीं खोटेपणानें वागणारास तिर्यग्योनीची प्राप्ति होते. राजा हा मातेप्रमाणें सर्वांचें कल्याण करून दीनाची काळजी घेतो. अग्नीप्रमाणें तो शत्रूंना दग्ध करून टाकितो. तो यमाप्रमाणें दुष्टांचें नियमन करितो. कुबेराप्रमाणें तो आपल्या प्रिय लोकांस द्रव्य देतो, प्रजेला धर्मोपदेश करून त्यांचा गुरु होतो आणि त्यांचें परिपालन करून पालक होतो.

जो राजा आपल्या गुणांनीं राष्ट्रांतील लोकांचें रंजन करितो, त्याचें राज्य त्याच्या धर्मरक्षणामुळें कधींहि डळमळत नाहीं. ज्याला प्रजेचा मान कसा ठेवावा, याचें उत्तम ज्ञान असतें, त्याला इहपर सुख मिळतें. ज्याची प्रजा कर-भारानें पीडित होऊन अनर्थांत पडली असतां सर्वदा उद्विग्न असते, त्याचा सर्वत्र मोड होतो. सरोवरांतील कमलांप्रमाणें ज्याच्या प्रजेची वाढ होत असते, त्या राजाला सर्व सुख प्राप्त होऊन स्वर्गलोकींहि मान मिळतो. हे राजा, बलवं-ताशीं विग्रह करणें केव्हांहि योग्य नाहीं. जो बलवंताशीं विग्रह करितो, त्याला राज्य तरी कोठून व सुख तरी कोठून मिळणार?

भीष्म—ती पक्षीण ब्रह्मदत्त राजाला असें बोलून व त्याची अनुज्ञा घेऊन

इष्ट दिशेला निघून गेली. ह्याप्रमाणें ब्रह्मदत्त राजा व पूजनी यांचा संवाद मीं तुला सांगितला. आतां आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे? १२. २. १३९.

---

## अध्याय १४० वा.

[ १ युगक्षयाचे वेळीं धर्मलोप होऊन सर्वत्र दस्यूंची पीडा होत असतां राजानें कसें वागावें, म्हणून युधिष्ठिराचा प्रश्न. २ भीष्माकडून भारद्वाज-शत्रुंजयसंवादरूपानें आपद्धर्मकथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भारता, युगक्षय होऊन लोकांमध्यें धर्म क्षीण झाला असतां व दस्यूंकडून प्रजेला पीडा होत असतां राजानें कसें वागावें?

( २ ) **भीष्म**—युधिष्ठिरा, प्रसंगविशेषीं राजानें दयेचाहि त्याग करून वागलें पाहिजे, ही आपत्काळची नीति आहे. ती मी तुला सांगतों. ह्यासंबंधीं शत्रुंजय राजा आणि भारद्वाज ऋषि यांचा पुरातन संवाद इतिहासरूपानें सांगत असतात. तो असा आहे:—

पूर्वी सौवीर देशामध्यें शत्रुंजय नांवाचा एक महारथी राजा होऊन गेला. भारद्वाज मुनीकडे जाऊन त्यानें कांहीं शंका विचारून त्यांचा अर्थ त्याला विचारला. त्या शंका ह्या होत्या. अलब्ध मिळविण्याची इच्छा कोणत्या प्रकारें करावी? प्राप्त झालेल्याची वृद्धि कशी करावी? वृद्धि केल्यानंतर त्याचें पालन कसें करावें? आणि पालनानंतर त्याचा उपयोग कसा करावा?

असें त्या राजानें विचारलें असतां तो मुनि त्याला म्हणाला, 'राजानें नेहमीं दंड उभारून आपला पराक्रम दाखवावा. आपल्यामध्यें कांहीं छिद्रें ठेवूं नये आणि शत्रूमधील छिद्रें पाहात रहावें आणि तीं दृष्टीस पडल्यावर त्याजवर चालून जावें. जो सर्वदा दंड करण्यांविषयीं तयार असतो, त्याला लोक भिऊन वागतात. म्हणून सर्व प्राण्यांना दंडाच्याच योगानें ताब्यांत ठेवावें. अशा रीतीनें तत्त्वदर्शी लोक दंडाची प्रशंसा करीत असतात आणि म्हणूनच सामादिक चार उपायांमध्यें दंडाचीच प्रमुख उपाय म्हणून गणना केली आहे. आधारस्थान अशा मूळाचा छेद झाला असतां त्याच्या आश्रयानें राहणाऱ्या सर्व प्राण्यांचाहि तत्काळ नाश होतो. झाडाचें मूळच जर छिन्न केलें, तर त्याच्यावरील सर्व

शाखांचें जीवित तरी कसें रहावें ? म्हणून शहाण्यानें शत्रुपक्षाचें मूळच प्रथमतः उपटून टाकावें आणि नंतर त्याचे मदतकर्ते आणि तो सर्व पक्ष यांना जिंकावें.

आपत्कालीं योग्य मसलत घ्यावी, चांगला पराक्रम गाजवून दाखवावा, नेटानें युद्ध करावें आणि प्रसंगीं पलायनहि करावें. विचार करीत बसूं नये. वाणीमध्यें नम्रता असावी, पण अंतःकरण वस्तऱ्यासमान तीक्ष्ण असावें. सामोपचाराचें भाषण असावें आणि काम-क्रोधांचा त्याग करावा. शत्रूचें आणि आपलें समान हित असल्यास त्याशीं संधि करावा, परंतु त्यावर विश्वास ठेवूं नये आणि कार्यभाग होतांच त्यापासून त्वरित दूर व्हावें. वरून मित्रसमान शत्रूचें सांत्वन करीत रहावें, परंतु सर्पयुक्त गृहाप्रमाणें नेहमीं त्याला भिऊन असावें. गोष्ट होऊन गेल्यावर गोड शब्दांनीं त्याच्या मनाला भुरळ पडेल, असें शत्रूचें सांत्वन करावें. तो मूर्ख असल्यास पुढच्या गोड गोड गोष्टींनीं त्याचें मन वेधावें. तसाच तो शहाणा असेल तर प्रसंगावधान ठेवून व लाभ दाखवून त्याचे मनाचें सांत्वन करावें. ज्याला आपले कल्याणाची इच्छा असेल, त्यानें प्रसंगानुसार शत्रूपुढें हात जोडावे, शपथ घ्यावी, सांत्वनपर बोलावें, साष्टांग नमस्कारपूर्वक गोड भाषण करावें व अश्रुमार्जनहि करावें. जोंपर्यंत आपला काल उलट आहे, असें वाटत असेल, तोंपर्यंत शत्रूला खांद्यावर देखील वहावें. परंतु आपलें काम झालें आहे, असें समजतांच दगडावर आपटलेल्या मडक्याप्रमाणें त्याचा निःपात करून टाकावा.

हे राजेंद्रा, टेंभुरणीच्या कोलिताप्रमाणें राजानें आपला कोपाग्नि क्षणभर प्रज्वलित केलेला चांगला. त्यानें ज्वालेशिवाय धुमसत राहिलेल्या कोंड्याप्रमाणें मनांत चिरकाल पिचत रहावें, हें बरें नव्हे. मनुष्यानें कृतघ्नाबरोबर सहसा कधींहि व्यवहार करूं नये. गरजू मनुष्याची आवश्यकता असेपर्यंत तो त्याचा उपयोग करून घेतो, परंतु काम झाल्यावर अवमान करूं लागतो. म्हणून मनुष्यानें कोणाचेंहि काम पूर्णपणें न करितां त्यांतील अवशेष ठेवून तें करावें. कोकिल, वराह, मेरु, शून्यगृह, नट आणि भक्तिमान् मित्र यांप्रमाणें राजानें श्रेयस्कर असेल तेंच करावें.

---

१ स्वपोष्य असतील, त्यांचें पोषण दुसऱ्याकडून करविणें हें जसें कोकिलाला श्रेयस्कर वाटतें, त्याप्रमाणें राजानेंहि स्वतः रक्षणीय लोकांचें संरक्षण इतरांकडून करवावें. शेतकरी शंभर बिघे जमीन नांगरीत असतां राजाचीहि दहा बिघे जमीन

शत्रूचें क्षेम नसलें तरी उद्योगशील राजानें वरचेवर त्याचे गृहीं जाऊन क्षेम विचारावें. आळशी, दुर्बल, अभिमानी, लोकांच्या निंदेला भिणारे व सर्वदा विचारांत वेळ घालविणारे लोक यांना आपली कार्यसिद्धि करून घेतां येत नाहीं. आपलें छिद्र शत्रूला कळूं देऊं नये, परंतु शत्रूंचीं मात्र आपणाला ठाऊक असावीं. कूर्माप्रमाणें आपलें अंग लपवून ठेवावें व आपलें छिद्र रक्षण करावें. बगळ्याप्रमाणें पुढील कार्यांचा विचार करावा, सिंहाप्रमाणें पराक्रम गाजवावा, लांडग्याप्रमाणें शत्रूवर तुटून पडावें आणि बाणाप्रमाणें त्याचा चुराडा करावा. मद्य, द्यूत, स्त्रिया, मृगया आणि गीतवादित्र यांमध्यें विशेष आसक्ति दाखवूं नये. ह्यांमध्यें आसक्ति ठेवणें हानिकारक आहे. प्रसंग पडल्यास तृणाचें देखील धनुष्य करावें आणि मृगाप्रमाणें सावधगिरी ठेवून सर्वदा शयन करावें. प्रसंगीं अंध झाल्यासारखें दाखवावें व बधिरत्वहि पत्करावें. देशकाल ओळखून शहाण्या मनुष्यानें पराक्रम गाजवावा, वेळ निघून गेला असतां पराक्रम व्यर्थ जातो. कालाकाल, तसेंच आपलें बलाबल यांचा योग्य विचार करून आणि शत्रूचेंहि बल ध्यानांत घेऊन मग कामाला प्रवृत्त व्हावें. दंडानें विनम्र झालेल्या शत्रूचा जो राजा नियमन करूं शकत नाहीं, तो खेकडीच्या गर्भाप्रमाणेंच मृत्यूला कंवटाळीत आहे असें समजावें.

युधिष्ठिरा, वृक्ष जरी सुपुष्पित असला तरी त्याचें फल कोणास दाखवूं नये. फलें दृष्टीस पडलीं, तरीं तीं हातास लागणार नाहींत, अशी व्यवस्था ठेवावी. फल अपक्व-कडक-असलें, तरी पक्वसमान असल्याचें भासवावें. असें वागून कोणाकडूनहि आपला उच्छेद होऊं देऊं नये. लांबलांबच्या आशा शत्रूला दाखवाव्या. त्यां-

---

वेठ या नात्यानें नांगरून देतो, त्या जमिनीचें रक्षण करितो आणि उत्पन्न राजाला आणून देतो, त्याप्रमाणें हेंहि होय. वराह मुळें खणून काढितो, त्याप्रमाणें राजानेंहि शत्रूंचीं पाळेंमूळें खणून काढावीं. मेरूप्रमाणें राजानेंहि अचल राहून दुसऱ्याला अतिक्रम करितां येणार नाहीं, अशाप्रकारें वागावें. शून्य गृहाचा उपयोग द्रव्य संचयार्थ केला जात असतो, तसा लोकांनीं राजाचाहि करावा. नट ज्याप्रमाणें वेगवेगळीं रूपें धारण करितो, त्याप्रमाणें राजानेंहि प्रसंगानुसार नानास्वरूपें धारण करावीं. भक्तिमान् मित्र आपली आराधना करणाऱ्या मनुष्यांच्या अभ्युदयाची जशी इच्छा करितो, त्याप्रमाणें राजानेंहि सर्वदा प्रजेचा उदय कसा होईल, हें चिंतन करीत असावें.

मध्येंहि कांहीं अडचणी असल्याचें दाखवावें. त्या अडचणींचीं कारणें सांगावीं आणि त्या कारणांलाहि कांहींतरी हेतु जोडून द्यावा. जोंवर भय येऊन ठेपलें नाहीं, तोंवर भ्याल्यासारखें दाखवावें, परंतु संकट आलें असतां भीति बाजूला सारून त्यावर एकदम प्रहार करावा. संकटांत पडल्याशिवाय मनुष्याला चांगले दिवस येत नसतात. संकट येऊन त्यांतून वांचल्यास त्याला चांगले दिवस दिसतात. पुढें येणाऱ्या संकटांसंबंधानें राजानें आधींच माहिती मिळवावी व तीं आली असतां त्यांचा प्रतीकार करावा आणि प्रतीकार केल्यावरहि तीं दूर झालींच नाहींत, अशा समजुतीनें सावध रहावें. जें सुख पुढें आलें आहे, त्याचा त्याग करून अप्राप्त सुखाची इच्छा करणें हा शहाण्या लोकांचा नीतिमार्ग नव्हे. जो शत्रूबरोबर संधि करितो आणि त्याजवर विश्वास ठेवून सुखानें झोंप घेतो, तो वृक्षाग्रावर निद्रिस्त झालेल्या मनुष्याप्रमाणें खालीं पडून जागा होतो. संकट आलें असतां सौम्य अथवा कडक उपायांची योजना करून त्या हीनदशेंतून आपला उद्धार करावा व मग सामर्थ्य आलें असतां धर्म करावा. जे आपल्या शत्रूंचे शत्रु असतील, त्यांच्याशींहि आपण विनयानें वागावें आणि आपले हेर शत्रूंनीं वश केले आहेत, असें धरून चालावें. हेरांची योजना अशारीतीनें करावी कीं ते आपणाला किंवा शत्रूलाहि ओळखतां येऊं नयेत. पाषंडी किंवा तपस्वी यांचा वेष देऊन त्यांना परराष्ट्रांत पाठवावें. उपवनें, विहारस्थळें, पाणपोया, मठ, मद्यपानगृहें, नगराच्या वेशी, तीर्थांचीं स्थलें आणि सभास्थानें यांमधून जे धर्मविघातक, पापी, चोरटे आणि कंटकप्राय लोक जमतात, त्यांना ओळखून त्यांचें नियमन करावें अथवा त्यांचा नाश करावा.

जो आपल्यावर विश्वास ठेवीत नाहीं, त्याजवर आपणहि कधीं विश्वास ठेवूं नये आणि विश्वास ठेवणाऱ्यावरहि अतिविश्वास ठेवूं नये. विश्वास ठेवल्यानें भय उत्पन्न होतें. परीक्षा केल्यावांचून कोणावर विश्वास टाकूं नये. शत्रूला अगदीं प्रामाणिकपणें आपल्या विश्वासांत घ्यावें, परंतु त्याचें पाऊल उलट पडत आहे, असें दृष्टीस पडतांच त्यावर प्रहार करावा. ज्याची शंका घेण्याचें कारण नाहीं, त्याविषयींहि शंकित असावें आणि संशयित मनुष्याविषयीं तर सर्वदाच साशंक रहावें. कारण एखाद्याविषयीं यत्किंचितूहि शंका न घेतल्यास उत्पन्न होणारें भय समूळ नाश करितें. सावधानतेनें, मौनानें, काषायवस्त्रें, जटा, अजिन धारण करून शत्रूचा विश्वास उत्पन्न करून घ्यावा आणि मग

लांडग्याप्रमाणें अकस्मात् त्याचा घात करावा. ज्याला वैभवाची इच्छा असेल, त्यानें आपल्या हेतूच्या आड येणाऱ्या, मग तो पुत्र असो, बंधु असो, पिता असो अथवा दुसरा कोणी आप्त असो, त्याचा वध करावा. गुरु देखील जर गर्वानें वागणारा, कार्याकार्य न समजणारा आणि आडमार्गानें जाणारा असेल, तर त्याचेंहि शासन करावें. ज्याप्रमाणें तीक्ष्ण चंचु असलेला पक्षी वृक्षांवर फळें आणि फुलें आलीं कीं तीं तोडून टाकितो, त्याप्रमाणें अभ्युत्थान, अभिवादन, तसेंच कांहींतरी दान यांच्या योगानें शत्रूला वश करून त्याच्या आशेचा नाश करावा. दारुण कर्म करून मर्मस्थलांचा छेद किंवा हिंसा न करितां मत्स्यघाती धीवराप्रमाणें मनुष्य वैभवाला कधीं चढत नाहीं.

स्वभावतः कोणी कोणाचा शत्रु नसतो किंवा मित्रहि नसतो, तर मित्र आणि शत्रु सामर्थ्ययोगानेंच होतात. शत्रूनें दीनपणा दाखवून कितीहि करुणा भाकिली तरी त्याला सोडूं नये. पूर्वापकाऱ्याचा वध करण्यांत दुःख करण्याचें कारण नाहीं. विभवेच्छु राजानें निर्मत्सरपणानें प्रजाजनांला मिळवून घेऊन त्यांवर अनुग्रह करण्याचा सर्वदा प्रयत्न करावा, आणि निग्रह करण्यांतहि त्यानें दक्ष असावें. शत्रूवर प्रहार करतांना त्याच्याशीं प्रिय भाषण करावें आणि प्रहार केल्यावरहि त्याच्या संबंधीं गोड बोलावें. खड्गानें त्याचें मस्तक तोडल्यावर सुद्धां त्याबद्दल शोक करून रडावें. ऐश्वर्येच्छु राजानें सामोपचारानें, सन्मानपूर्वक आणि सहिष्णुतेनें लोकांना जवळ बाळगावें. कोणाशीं शुष्क वैर करूं नये व बाहूंनीं नदी तरून जाण्याची इच्छाहि केव्हां करूं नये. असें केल्यानें गाईचें शिंग भक्षण करण्यासारखें निरर्थक होऊन अनर्थकारक होतें. त्यापासून दांत दुखून रसहि किंचित् मिळत नाहीं. धर्मार्थकाम हे तीन पुरुषार्थ, त्यांच्या त्रिविध पीडा—धर्मानें अर्थाला, अर्थानें धर्माला आणि कामानें धर्मार्थांना येणारी पीडा—व धर्मादिकांचीं फळें हीं समजून घ्यावीं आणि त्यांचें फल संपादून पीडेच्या अवगुणांचा त्याग करावा.

ऋणशेष, अग्निशेष आणि शत्रुशेष हीं मागें राहिल्यास सारखीं वाढत जातात. म्हणून त्यांचा शेष मागें ठेवूं नये. वाढणारें कर्ज, अवशिष्ट राहिलेले पराभूत शत्रु आणि ज्यांची उपेक्षा केली आहे असे व्याधि मोठें भय उत्पन्न करणारे असतात. कोणतीहि गोष्ट योग्यप्रकारें करावी. सर्वदा सावध असावें.

कांटा सुद्धां समूल उपटून काढला नाहीं, तर तो बराच वेळ त्रास देतो. मनुष्यांचा वध करून, मार्ग बिघडवून व मंदिरांचा नाश करून परराष्ट्राचा नाश करावा. दृष्टि गृध्रासारखी ठेवावी, बगळ्यासारखें टपून बसावें, श्वानासारखें सावध रहावें, सिंहासारखें पराक्रमी व्हावें, कधींहि उद्विग्न असूं नये, कावळ्याप्रमाणें नेहमीं साशंक रहावें आणि सर्पाप्रमाणें आचरण ठेवावें. शूर पुरुषाला हात जोडून, भिऱ्याला भीति दाखवून, लोभ्याला द्रव्यदान करून वश करावें आणि बरोबरीच्याशीं युद्ध करावें. नानाजातींतील मुख्यांमध्यें भेद पडत असतील तर ते मिटवावे, आपले आवडते असतील त्यांना संतुष्ट ठेवावें, अमात्य आपणावर न उठतील अशी सर्वदा काळजी घ्यावी, तसेंच त्या सर्वांचें एकमत कधीं होणार नाहीं, याविषयींहि राजानें सावध असावें.

राजा मृदु असला म्हणजे तो लोकांच्या अनादरास पात्र होतो आणि तीक्ष्ण असला म्हणजे लोक उद्विग्न होतात. म्हणून त्यानें तीक्ष्णकालीं कठोर असावें व सौम्यकालीं मृदु असावें. सौम्य उपायांनीं सौम्य शत्रूचा नाश करतां येतो, तसाच सौम्य उपायांनीं दारुण शत्रूचाहि उच्छेद करितां येतो. सौम्य उपायाला असाध्य असें कांहींच नाहीं आणि म्हणूनच सौम्य उपाय हा तीक्ष्णाहून तीक्ष्ण समजला आहे. जो राजा योग्यकालीं सौम्य व योग्य कालीं कठोर असतो, त्याचीं सर्व कार्यें सिद्धीस जातात व शत्रूवरहि तो सत्ता गाजवितो. बुद्धिमंताशीं विरोध केला असतां मी दूर आहें, असें समजून कोणीं विश्वासून राहूं नये. कारण बुद्धिमंताचे बाहू फार लांब असून त्यांचे योगानें तो आपणास दुखविणाऱ्याचा वध करितो. ज्यांतून पैल तीराला जातां यावयाचें नाहीं, अशा प्रवाहांत तरण्याचा यत्न कधीं कोणीं करूं नये. जी वस्तु आपणाकडून दुसऱ्याला पुनः हरण करितां येईल, ती वस्तु घेण्याचा यत्न आपण केव्हांहि करूं नये. ज्याचें मूळ कधीं खणून काढितां येणार नाहीं, तें खणण्याच्या भानगडींत पडूं नये आणि ज्याचा शिरच्छेद करितां येणें शक्य नाहीं, अशावर कधीं शस्त्राघात करूं नये. ह्या वर सांगितलेल्या गोष्टींत पाप असल्यामुळें आपत्कालींच करण्यासारख्या आहेत. त्या मनुष्यानें सर्वदा करण्यासारख्या नाहींत. परंतु शत्रूकडूनच ह्या गोष्टींचा प्रयोग झाला असतां कसें वागावें हें समजावें, म्हणून तुझ्या कल्याणाकरितां मीं ह्या सांगितल्या आहेत.

भीष्म—याप्रमाणें त्या कल्याणेच्छु ब्राह्मणाचें भाषण ऐकून त्या सुवीरराष्ट्राधिपतीनें तसें आचरण ठेविलें. त्यामुळें त्याला आपल्या बांधवांसह अपरा व दिव्य संपत्तीचा उपभोग घेतां आला. १२. २. १४०.

---

## अध्याय १४१ वा.

[ १ आपत्कालीं अभक्ष्य भक्षण करूनहि आत्म्याचें रक्षण करणें योग्य आहे. ह्याचें विश्वामित्र आणि चांडाल यांमधील संवादरूपानें युधिष्ठिराला कथन. ]

( १ ) युधिष्ठिर—सर्व लोकांनीं उल्लंघन केल्यामुळें जेव्हां श्रेष्ठ धर्म नष्ट होतो, अधर्माला धर्माचें आणि धर्माला अधर्माचें स्वरूप येतें, सर्व मर्यादा नाहींशा होतात, धर्मनिश्चय डळमळीत होतो, राजे आणि शत्रु यांकडून लोक पीडिले जातात, सर्वांना आधार असे लोक मूढ होऊं लागतात, सर्व कर्मांचा लोप होऊं लागून काम, क्रोध आणि लोभ यांचा पगडा बसल्यामुळें लोकांना सर्वत्र भय दिसूं लागतें. कोणाचा कोणावर विश्वास नाहीं, अशी स्थिति उत्पन्न होऊन जिकडेतिकडे सर्व लोक भयग्रस्त होऊन जातात, दुष्टपणानें लोकांचा वध होतो, लोक परस्परांना फसवूं लागतात, सर्व देशांमध्यें आगी लागतात, ब्राह्मण लोकांना अत्यंत पीडा होते, पर्जन्य पडत नाहींसा होतो, परस्परांमध्यें फूट पडून राहते, सर्वत्र दस्यूंचें प्राबल्य माजून सर्व उपजीविकेचीं साधनें त्यांच्याच हातांत जाऊन निकृष्ट स्थितीचा काळ येतो, तेव्हां दयेमुळें पुत्रपौत्रांचा त्याग करण्यास असमर्थ अशा ब्राह्मणांनीं आपला चरितार्थ कसा चालवावा? त्यांनीं आपत्काळीं कसें वागावें तें सर्व मला सांग! तसेंच लोक बिघडून गेले असतां राजानें कसें वागावें कीं धर्म आणि अर्थ यांपासून तो कधींहि भ्रष्ट होणार नाहीं?

भीष्म—हे महाबाहो, प्रजेचा योगक्षेम उत्तम न चालणें, चांगला पाऊस न पडणें आणि प्रजेमध्यें व्याधि, मरण आणि भय उत्पन्न होणें ह्या सर्व गोष्टींना कारण राजाच होय. हे भरतर्षभा, कृत, त्रेता, द्वापर आणि कलि या चारी युगांच्या उत्पत्तीला देखील कारण राजाच आहे, असें निःसंशय मला वाटत आहे. प्रजेला अशा प्रकारचा वाईट काळ आला असतां तिनें आपल्या ज्ञानबलाचा आश्रय करून जीवित धारण केलें पाहिजे. त्याविषयीं चांडालाच्या झोंपडींत चांडाल आणि विश्वामित्र ह्यांमध्यें झालेला एक पुरातन संवाद इतिहासरूपानें सांगत असतात. तो असा आहे—

त्रेता आणि द्वापर या युगांच्या संधिकालीं दैवयोगानें बारा वर्षेंपर्यंत पाऊस नांवाला सुद्धां पडला नाहीं आणि प्रजांची वृद्धि फार झाली. इंद्रानें वृष्टि केली नाहीं. गुरूची गति उलट झाली. चंद्र आपलीं सर्व लक्षणें टाकून देऊन दक्षिण मार्गाला गेला. धुकेंहि पडेनासें झालें, मग मेघ तरी कोठून दिसणार ? नद्यांचें पाणी आटून त्यांचे ओहोळ झाले. अशा प्रकारच्या दैविक आपत्तीनें सरोवरें, नद्या, विहिरी आणि ओढे ह्यांचें सौंदर्य नष्ट होऊन तीं कोठेंहि दिसे-नाशीं झालीं. भूमीवरील सर्व जलस्थानें आटून शुष्क झालीं, सभा आणि पाणपोया ह्यांचीं स्थानें उठलीं. सर्वत्र यज्ञ व अध्ययन बंद होऊन वषट्कारादि मंगलकार्यें नष्ट झालीं. शेती आणि गोरक्षण यांचा नाश होऊन बाजार व दुकानेंहि नाहींशीं झालीं. यज्ञस्तंभ व इतरहि यज्ञसाहित्य कोठें दिसेनासें झालें. मोठमोठे सर्व उत्सव बंद पडले. जिकडेतिकडे अस्थींचे ढीग दृष्टीस पडूं लागले आणि मोठमोठ्या प्राण्यांचे आक्रोश ऐकूं येऊं लागले. बहुतेक नगरें अगदीं शून्यवत् होऊन गेलीं आणि गांवांतील घरें दग्ध होऊन खाक झालीं. कोठें घोर प्राण्यांनीं, कोठें आयुधांनीं, कोठें दुर्बल राजांनीं, तर कोठें परस्प-रांच्याच भीतीमुळें लोकांचा नाश झाला. सर्व देवालयें शून्याकार झालीं. वृद्ध लोकांचा उच्छेद झाला. गाई, बकऱ्या, मेंढ्या आणि महिषी यांचा विध्वंस झाला, परस्परांनीं एकमेकांचा निःपात उडविला, ब्राह्मण मरूं लागले, संरक्षक कोणी उरला नाहीं व नरपतींचा संग्रह नाहींसा झाला आणि सर्व प्राण्यांना प्रेतकळा आली. हे युधिष्ठिरा, अशी भयंकर वेळ येऊन धर्माचा लोप झाला असतां लोक क्षुधित होऊन परस्परांना खाऊं लागले. ऋषींनीं सर्व नियम सोडून, अग्निदेवतेचा त्याग केला आणि ते आश्रम सोडून इतस्ततः पळूं लागले.

अशा स्थितींत भगवान् विश्वामित्र ऋषि क्षुधापीडित होत्साता आश्रम सोडून बायकापोरांना टाकून वनामध्यें सर्वत्र फिरत होता. त्यावेळीं सर्व भक्ष्याभक्ष्यविचार बाजूला ठेवून आणि अग्नि व आश्रम यांचा त्याग करून तो एका चांडाळाच्या झोंपडीकडे आला. त्या ठिकाणीं सर्वत्र फुटकीं मडकीं पडून राहिलीं होतीं, तसेंच कुत्र्यांचीं चर्में, वराह आणि गाढवें यांचीं हाडें व मस्तकाच्या भग्न करोट्या हीं पसरलीं होतीं. तेथें मेलेल्यांच्या अंगावरील वस्त्रें चोहोंकडे पडलीं होतीं. तेथें झोंपड्यांसभोंवतीं निर्माल्याच्या माळा लावून ती जागा सुशोभित केली होती. कित्येक झोंपड्यांना सर्पांच्या कांतींनीं विभूषित केलें होतें. तेथें कुक्कुटांचें आरवणें आणि गर्दभांचें ओरडणें सतत



चांडाळ—चांडाळवाड्यातील सर्व लोक झोंपी गेले असतां कुत्र्याचे मांसाची दोरी कोण ओढीत आहे?
मी जागा आहें. निद्रिस्त झालों नाहीं. हे घोरकर्म्या, तूं मेघासच म्हणून समज. [ पृष्ठ २९७

चाललें होतें. कर्कश शब्द ऐकूं येत होते आणि लोकांचीं भांडणेंहि मोठ्यानें चाललीं होतीं. तेथील देवालयांवर घुबडपक्षी ओरडत होते. तेथें लोखंडी घंटा टांगल्या असून सभोंवतीं श्वानांचे घोळके लागून राहिले होते.

क्षुधापीडित झालेला तो महामुनि विश्वामित्र त्या झोंपडीमध्यें शिरून खाण्याला कांहीं सांपडेल, म्हणून प्रयत्नपूर्वक शोध करूं लागला; परंतु भिक्षा मागूनहि त्याला मांस, अन्न, फलमूलें किंवा दुसरें कांहींहि खाद्य मिळालें नाहीं. तेव्हां ' हाय हाय, काय हें संकट मजवर ओढवलें,' असें मनांत आणून तो निर्बल ऋषि त्या चांडाळाच्या झोंपडींतच पडला आणि हे पार्थिवश्रेष्ठा, ' आतां काय करावें ? काय केल्यानें मी मृत्यूच्या तावडींत व्यर्थ सांपडणार नाहीं, ' असा विचार करूं लागला. इतक्यांत नुकतेंच मारून टाकिलेल्या कुत्र्याचें मांस बांधून लोंबत ठेवलेली एक दोरी त्याच्या दृष्टीस पडली. त्यावेळीं विश्वामित्रानें विचार केला, " आतां येथें चोरी केल्याशिवाय प्राणधारणेचा दुसरा कांहीं उपाय दिसत नाहीं, तेव्हां चोरीच करावी हें बरें. आपत्कालीं चौर्यकर्म विहित आहे व तें मोठ्या वर्णाच्या लोकांनीं प्रसंग पडल्यास करावें. ब्राह्मणानें तर प्राणरक्षणार्थ अवश्य चौर्य करावें, असें सांगितलें आहे. प्रथमतः हीन जातींतील लोकांच्या गृहीं चोरी करावी. तेथें न जमल्यास आपल्या बरोबरीच्या मनुष्याकडे करावी आणि तेथेंहि न साधल्यास आपल्यापेक्षां विशिष्ट अशा धार्मिकाकडे करावी. आतां मी ह्या चांडाळाच्या गृहांतून ही कुत्र्याची जांघ हरण करितों. ह्यांत प्रतिग्रहाहून दुसरा कांहीं दोष मला दिसत नाहीं. "

हे भारता, असा विचार करून त्या विश्वामित्रानें त्याच चांडाळाच्या येथें शयन केलें. ती रात्र अंधाराची असून त्या झोंपडींतील सर्व चांडाळ झोंपीं गेले असतां विश्वामित्र हळूच उठला आणि झोंपडींत शिरला. आंत चांडाळ नेत्रमलानें डोळे चिकटून पडून राहिला होता. विश्वामित्राची चाहूल लागतांच तो रुक्ष व अप्रियदर्शन चांडाळ भिन्न स्वरानें म्हणाला—

चांडाळ—चांडाळवाड्यांतील सर्व लोक झोंपीं गेले असतां कुत्र्याचें मांस टांगून ठेवलेली दोरी कोण ओढीत आहे ? मी जागा आहें. निद्रिस्त झालों नाहीं. हे घोरकर्म्या, तूं मेलासच म्हणून समज.

चांडाळाचें बोलणें ऐकून विश्वामित्र भयभीत होऊन गेला. ह्या कर्मानें त्याचें मुख लज्जायुक्त आणि दुःखग्रस्त झालें. तो भीतभीत त्या चांडा-

ळाला म्हणाला, ' हे आयुष्मन्, मी विश्वामित्र आहें. क्षुधापीडित होऊन मी येथें आलों आहें. हे सुबुद्धे, तुला योग्यायोग्यविचार असल्यास माझा वध करणें योग्य नाहीं. ' शुद्धाचरण विश्वामित्राचें भाषण ऐकून तो चांडाळ गडबडीनें शयनावरून उठला आणि आदरबुद्धीनें हात जोडून डोळयांतून आंसवें गाळीत म्हणाला, ' हे ब्राह्मणा, रात्रीच्या वेळीं हें तूं काय आरंभिलें आहेस ? ' ह्यावर विश्वामित्र त्या चांडाळाचें सांत्वन करीत म्हणाला, " मी अत्यंत क्षुधित झालों असून माझे प्राण जाण्याची वेळ आली आहे. म्हणून कुत्र्याची ही जांघ चोरण्याचें मीं योजिलें आहे. क्षुधाक्रांत झाल्यामुळेंच हें पापकर्म करण्यास मी सिद्ध झालों आहें. क्षुधापीडिताला लाज नसते. ही क्षुधाच मला पापप्रवृत्त करीत आहे. आज मी कुत्र्याचें हें मांस हरण करून नेणार ! माझे प्राण जाऊं पहात आहेत. ह्या क्षुधेनें माझें वेदज्ञान अगदीं नष्ट झालें आहे. मी दुर्बल झालों आहें आणि ज्ञानलोपाबरोबरच माझा भक्ष्याभक्ष्याचा विचारहि नाहींसा झाला आहे. कुत्र्याचें मांस हरण करणें हें अधर्माचें काम आहे, हें जाणत असूनहि मी तें करण्यास सिद्ध झालों आहें. ह्या तुमच्या चांडाळवाड्यांत मी पुष्कळ फिरलों, तथापि मला भक्ष्यार्थ कांहीं मिळेना, तेव्हांच मीं हें पापकर्म करण्याचें योजिलें. आतां मी ही श्वानाची जांघ नेणार ! अग्नि हा देवांचें मुख असून तो शुचिद्रव्यांचा भोक्ता आहे. त्याचप्रमाणें ब्रह्मरूपी मलाहि धर्मदृष्ट्या सर्वभक्षक समज. "

तें ऐकून चांडाळ म्हणाला, " हे महर्षे, माझें भाषण ऐक. आणि तें ऐकिल्यावर जेणेंकरून धर्मलोप होणार नाहीं, तें कर. हे विप्रर्षे, मी तुला धर्म म्हणजे काय तें सांगतों, ऐक. विद्वान् लोक कोल्ह्यापेक्षां कुत्र्याला नीच समजतात आणि त्यांतहि त्याची जांघ हा भाग तर अत्यंत नीच समजला आहे. विप्रर्षे, ही धर्मानें निंद्य गोष्ट करण्याचें तूं स्वीकारलेंस, हें योग्य नाहीं. चांडाळाच्या घरीं चौर्य करणें आणि तेंहि विशेषतः अभक्ष्य वस्तूचें चौर्य ही तर अत्यंत निंद्य गोष्ट होय. प्राणधारणेचा तूं दुसरा एखादा चांगला उपाय पहा. हे महामुने, मांसलोभानें तुझ्या तपाचा नाश होऊं नये. विहित धर्म कोणता हें तुला माहीत असल्यामुळें धर्मसंकर करणें तुला योग्य नाहीं. तूं धर्माचा त्याग करूं नकोस. कारण, तूं धार्मिकांमध्यें श्रेष्ठ आहेस. "

हे भरतर्षभा, त्या चांडाळाचें असें भाषण ऐकून क्षुधाक्रांत विश्वामित्र पुनरपि त्याला म्हणाला, " मी निराहार स्थितींत भक्ष्यार्थ फिरत असतां आजवर

माझे बरेच दिवस गेले. प्राणधारणेचा मला कोणताच उपाय दिसत नाहीं. अशा वेळीं जें करणें योग्य दिसेल, तें करून प्रथमतः प्राणांचें रक्षण करावें आणि मग सामर्थ्य आल्यावर धर्माचरण करावें. क्षत्रियांचा पालन करणें हा ऐंद्र धर्म असून अग्नीप्रमाणें सर्व भक्षण करणें हा ब्राह्मणांचा धर्म आहे. वेदरूपी अग्नि हा माझें बल आहे. तरी हें मांस भक्षण करून मी क्षुधेचें शमन करितों. जीविताचें जेणेंकरून रक्षण होईल, त्या उपायाची योजना आधीं केली पाहिजे. मरणापेक्षां जीवित श्रेयस्कर आहे. जगल्यास मनुष्याला धर्म आचरण करितां येईल. म्हणून मी जीविताशेनें बुद्धिपूर्वक अभक्ष्यभक्षणाविषयींहि तयार झालों आहें. तेव्हां या कृत्याला तूं अनुमति दे. या रीतीनें मी आपणाला बलसंपन्न करीन आणि अंधकाराचा ज्याप्रमाणें तारे नाश करितात, त्याप्रमाणें तप आणि विद्या यांच्या योगानें मी या पापाचा नाश करीन."

**चांडाळ**—हें भक्षण केल्यानें दीर्घायुष्याची किंवा बलाची प्राप्ति होत नाहीं अथवा अमृताप्रमाणेंहि तृप्ति होत नाहीं. दुसरी कांहींतरी भिक्षा तूं माग. तुझें मन कुत्र्याचें मांस खाण्यामध्यें आसक्त होऊं नये. कुत्रा हा ब्राह्मणांना अभक्ष्य आहे.

**विश्वामित्र**—हे चांडाळा, ह्या दुष्काळांत दुसरें मांस मिळणें सुलभ नाहीं आणि मजजवळ द्रव्यहि नाहीं. त्यामुळें मी क्षुधापीडित होऊन अगतिक व निराश झालों आहें आणि म्हणूनच ह्या श्वानाच्या मांसामध्यें षड्रस उत्तम प्रकारानें आहेत, असें मला वाटत आहे.

**चांडाळ**—ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांनीं पांच[1] नखांच्या शश-शल्यकादि प्राण्यांवांचून इतरांचें मांस खाणें ह्याला शास्त्रप्रमाण नाहीं; म्हणून तूं अभक्ष्य कुत्र्याच्या मांसाची इच्छा करूं नकोस.

**विश्वामित्र**—अगस्त्य मुनीनें क्षुधापीडित होऊन वातापिनामक राक्षसहि भक्षण केला. मीहि तसाच या आपत्तींत क्षुधापीडित झालों असतां कुत्र्याचें मांस भक्षण करणार!

**चांडाळ**—तूं दुसरी एखादी भिक्षा मागून क्षुधानिवारण कर. परंतु असलें

---

१ पंच पंचनखा भक्ष्या ब्रह्मक्षत्रेण राघव ।
शशकः शल्यको गोधा कूर्मः खड्गी तु पंचमः ॥—**रामायण.**

काम करूं नकोस. तुला वाटेल तर ह्या कुत्र्याचें मांस नेण्यास माझी हरकत नाहीं.

विश्वामित्र—अगस्त्यादिक शिष्टांनींच धर्म ठरविला असून मीहि त्यांचेंच अनुकरण करून वागणारा आहें. ही श्वानाची जांघ म्हणजे अत्यंत पवित्र अन्नापेक्षांहि श्रेष्ठ असून भक्षण करण्यास योग्य आहे, असें मला वाटतें.

चांडाळ—असज्जनांनीं आचरलेला तो धर्म सनातन धर्म नव्हे. ह्या जगांत अकार्य करणें हें केव्हांहि योग्य नाहीं. कोणत्याहि मिषानें अशुभ गोष्ट करूं नये.

विश्वामित्र—जो म्हणून ऋषि आहे, त्याच्या हातून पातक किंवा एखादें निंद्य कर्म कधींहि होणें शक्य नाहीं. माझ्या मतें श्वान आणि हरिण या दोघांचीहि योग्यता सारखीच आहे. म्हणून मी श्वानाचें मांस भक्षण करणार.

चांडाळ—ब्राह्मणांनीं प्रार्थना केल्यावरूनच अगस्त्यानें त्या प्रसंगीं जें कांहीं केलें, तो धर्मच होय. ज्यांत पाप नाहीं, तो धर्म आहे. ब्राह्मणगुरूंचें संरक्षण सर्व उपायांनीं आधीं केलें पाहिजे.

विश्वामित्र—हा माझा ब्राह्मणदेह माझा मित्र असून मला अत्यंत पूज्य व प्रिय आहे. त्याचें रक्षण करण्यासाठींच मी हें श्वानाचें मांस. हरण करूं इच्छीत आहें. त्यामुळें असल्या पापकर्मांची भीति मला वाटत नाहीं.

चांडाळ—हे विद्वन्, या लोकीं मनुष्यें आपलें जीवितहि टाकितात, परंतु अभक्ष्य भक्षण करण्याची त्यांना कधीं बुद्धि होत नाहीं. त्यामुळें त्यांच्या सर्व इच्छा तृप्त होतात. तूंहि त्याचप्रमाणें क्षुधा आंवरून आपल्या इच्छा तृप्त करून घे.

विश्वामित्र—मेल्यावर मनुष्याच्या इच्छा तृप्त होत असतील, तर निराहारानें मरणें हें श्रेयस्कर होय. परंतु जीवंतपणीं निराहार राहून कर्म न केल्यानें धर्मलोप होतो, हें निःसंशय आहे. मी व्रतनिष्ठ असून शमशील आहें. मूळ शरीराचें रक्षण करणें हें अगदीं योग्य आहे आणि म्हणूनच मी हें अभक्ष्य अन्न भक्षण करणार आहें. विचार करून पाहिलें असतां यांत पुण्य आहे, हें स्पष्ट दिसत आहे. कुत्र्याचें मांस भक्षण करून मी तुजसारखा चांडाळ होणार नाहीं, तर तें पाप तपाच्या योगानें दूर करण्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं आहे.

चांडाळ—हें पापी कृत्य तूं करूं नये, असें माझें निश्चित मत आहे. मी पापी असून तुझ्यासारख्याला दोष लावणें हेंहि मोठें पातकच आहे.

विश्वामित्र—बेडकांनीं कितीहि ओरड केली, तरी गाई स्वस्थपणें पाणी पीत असतात. धर्माच्या विषयीं बोलण्याचा तुला कांहींहि अधिकार नाहीं. विनाकारण आपलीच प्रशंसा करीत बसूं नकोस.

चांडाळ—हे द्विजा, तूं माझा मित्र आहेस म्हणून मी तुला असा उपदेश करीत आहें. माझें म्हणणें कल्याणावह आहे, असें जर तुला वाटत असेल, तरच त्याप्रमाणें कर. लोभामुळें पातक करणें तुला योग्य नाहीं.

विश्वामित्र—तूं जर माझा मित्र आहेस आणि मीं सुखी व्हावें अशी जर तुझी इच्छा असेल, तर तूं या संकटांतून मला वर काढ. माझा धर्म मला माहित आहे. एवढें कुत्र्याचें मांस मला दे, म्हणजे झालें.

चांडाळ—ही कुत्र्याची जांघ तुला देण्याचा मला धीर होत नाहीं. शिवाय तूं माझें अन्न नेत असतां मुकाट्यानें स्वस्थ बसून पाहणेंहि मला योग्य वाटत नाहीं. कारण ती जांघ दिल्यानें देणारा मी व घेणारा तूं ब्राह्मण असे दोघेहि पापलोकाला जाऊं.

विश्वामित्र—आज जर मी हें पापकर्म करून जीवंत राहिलों, तर मी अत्यंत पुण्याचरण करून पवित्र होईन आणि पवित्र झाल्यावर मग धर्मसाधन करीन. तेव्हां हें मांस भक्षण न करणें आणि भक्षण करून पुनः शुद्ध होऊन धर्मसाधन करणें यांत चांगलें कोणतें तें तूंच सांग !

चांडाळ—कुलांतील धर्माचरणासंबंधानें तुझें मनच तुला साक्षी आहे व यांत पातक काय आहे, हेंहि तुला माहीत आहे. श्वानाचें मांस खावयास योग्य असें समजून जो तें घेतो, त्याला टाकण्यासारखें कांहींच नाहीं, असें मला वाटतें.

विश्वामित्र—अशा प्रकारें वाईट गोष्टीचा स्वीकार करणें आणि अभक्ष्याचें भक्षण करणें, यांत दोष आहे, परंतु प्रसंगानुसार त्यालाहि अपवाद आहे. अशा वेळीं हिंसा किंवा अनृत भाषण यांना दोष येत नसून असें करणारा मनुष्य लोकनिंदेस थोडासा पात्र होतो. याहून याला विशेष कांहीं महत्त्व नाहीं.

चांडाळ—अभक्ष्य भक्षण करण्यांत तुझा एवढाच हेतु असेल, तर वेद

किंवा आर्यधर्म हे प्रमाण नाहींत, असेंच मानणें भाग आहे. हे द्विजेंद्रा, भक्ष्याभक्ष्यसंबंधानें तुझ्या मतें कांहीं दोष आहे, असें मला वाटत नाहीं.

विश्वामित्र—अभक्ष्य भक्षण केल्यानें महापातक लागतें, असें मला वाटत नाहीं. मद्यप्राशन केल्यानें पाप लागतें म्हणून सांगितलें आहे, परंतु त्यांत पापहेतु नसल्यामुळें त्या कृत्याचा प्रतिबंध व्हावा, एवढ्याचकरितां तसें सांगितलें आहे. करूं नये म्हणून सांगितलेल्या दुसऱ्या कित्येक गोष्टी आहेत, त्याहि अशाच आहेत. एखादें पातक आपल्या हातून घडलें, म्हणून त्यामुळें पूर्वींच्या पुण्याचरणाचा नाश होतो, असें नाहीं.

चांडाळ—निंद्य ठिकाणाहून, निंद्य कर्मानें आणि नीच मनुष्याकडून मिळविलेलें अभक्ष्य भक्ष्य सदाचारी व विद्वान् मनुष्याला बाधक होतें. अशा रीतीनें अभक्ष्य श्वानाच्या मांसाच्या ठिकाणीं आसक्ति ठेवून जो तें हरण करीत आहे, त्यालाच त्याचा दोष लागेल.

भीष्म—असें बोलून चांडाळ तेथून निघून गेला आणि तो महामुनि विश्वामित्र कुत्र्याचें मांस घेऊन तें आपल्या पत्नीसह भक्षण करण्याकरितां वनांत निघून गेला. इतक्यांत ही कुत्र्याची जांघ विधिपूर्वक देवतांना प्रथम संतर्पण करून नंतर आपण भक्षण करावी, असें त्यास वाटलें. त्याप्रमाणें त्यानें ब्राह्मविधीनें अग्नि सिद्ध करून ऐंद्राग्नेय विधीनें चरू तयार केला आणि हे भारता, त्यानें इंद्रादि देवांना आह्वान करून विधिक्रमानें त्यांना एकेक भाग देऊन नंतर देवांना व पितरांना भाग अर्पण करण्यास आरंभ केला. असें होत आहे, तों इंद्रानें सर्वत्र पर्जन्याची वृष्टि केली. त्यामुळें प्रजांमध्यें जीव आला आणि जिकडेतिकडे वनस्पतिहि सजीव दिसूं लागल्या. इकडे विश्वामित्रऋषीनेंहि तपश्चर्येच्या योगानें आपलें सर्व पातक दग्ध करून मोठी सिद्धि प्राप्त करून घेतली. त्या कर्माची समाप्ति केल्यावर विश्वामित्रानें त्या हविर्द्रव्याचा आस्वाद न घेतां देव व पितर यांना तोषविलें. ह्याप्रमाणें विद्वान् जीवितेच्छु मनुष्यानें धीर न सोडतां संकटकाळीं वाटेल त्या उपायानें आपल्या आत्म्याचें रक्षण करावें. मनुष्य जीवंत राहिल्यास त्याला पुण्य संपादन करितां येतें व त्या पुण्याच्या योगानें त्याचें कल्याण होतें. म्हणून हे कौंतेया, विद्वानानें धर्माधर्मांचा बुद्धीनें निश्चय करून ह्या जगांत वागावें. १२. २. १४१.

---

## अध्याय १४२ वा.

[ १ युधिष्ठिरसंशयनिरसन. २ केवळ शास्त्रानें अथवा बुद्धीनें धर्मनिर्णय होत नाहीं. ३ ब्राह्मणसेवा हें अत्यंत पवित्र कृत्य होय. ]

( १ ) **युधिष्ठिर**—अश्रद्धेय व असत्यासारखी गोष्ट कर्तव्य म्हणून मोठमोठे लोक जर सांगत असतील तर मला टाळतां येईल, अशी दस्युमर्यादा तरी कोणती ? मी अगदीं वेडा होऊन गेलों आहें, मला अत्यंत दुःख होत आहे, आणि माझी धर्मबुद्धिहि शिथिल झाली आहे. माझें सांत्वन पुष्कळ रीतींनीं मीं करून पाहिलें, तथापि माझें कर्तव्य कोणतें तेंच मला समजेनासें झालें आहे.

**भीष्म**—मीं तुला केलेला धर्मोपदेश वेदाच्या आधारानें केला आहे असें तूं समजूं नकोस. हा विद्वान् लोकांनीं सांठवून ठेवलेला मधुतुल्य ज्ञानाचा संचय आहे. राजानें अनेकांकडून ज्ञान संपादन करावयाचें असतें. एकपक्षीय धर्मानें कांहीं चालत नाहीं. हे कुरुकुलोत्पन्ना, ज्ञान आणि सदाचार यांच्या योगानें धर्म ठरविला जात असतो. म्हणून मी सांगतों, तें लक्ष्यांत घे जे बुद्धीनें श्रेष्ठ आहेत, असेच राजे विजय संपादन करितात. राजानें सर्वत्र मिळविलेल्या बुद्धियोगानें धर्म ठरवावयाचा असतो. एकपक्षीय धर्मानें राजधर्म कधीं होऊं शकत नाहीं. ज्यानें प्रथमतः अध्ययनकालींच एकदेशीय ज्ञान संपादन केलें आहे, अशा दुर्बल राजाला हें ज्ञान कोठून असणार ? हे भारता, धर्माधर्मस्वरूप ज्याला समजत नाहीं, तो धर्मांचें भिन्न स्वरूप दृष्टीस पडतांच सहजच संशयांत पडतो. म्हणून धर्माधर्मस्वरूप आधीं समजून घ्यावें. हें ज्ञान संपादन केल्यावर राजानें आपल्या बुद्धिबलानें इष्ट वाटेल तें करावें. ह्या त्याच्या आचरणास ज्ञानी लोक धर्म समजतात, तर सामान्य लोक अधर्म समजतात, कांहीं लोकांना खरें तत्त्व कळलेलें असतें, तर कित्येकांना खरें ज्ञान नसतें. म्हणून हें जाणून शहाणे लोक सज्जनांकडून ज्ञानप्राप्ति करून घेत असतात. धर्माच्या विरुद्ध असणारे लोक शास्त्रतत्त्वांचा उपयोग योग्य रीतीनें करूं देत नाहींत आणि नीतिशास्त्र हें धर्मशास्त्राविरुद्ध असल्यामुळें ग्राह्य नाहीं, तें अप्रमाण आहे, असें प्रसिद्ध करितात.

( २ ) हे राजा, विद्या, यश आणि काम ह्यांवर आपला चरितार्थ चालवूं पाहणारे लोक पापी असून धर्मांच्या आड येणारे असतात. त्यांची बुद्धि

परिपक्व नसल्यामुळें त्या मंदांना बरोबर ज्ञान नसतें. त्याचप्रमाणें जे शास्त्रकुशल नाहींत, शास्त्रांतील गोष्टी युक्तीला धरून नाहींत अशी ज्यांची निश्चित बुद्धि झाली आहे आणि शास्त्रांत दोष आहेत अशा समजुतीचे जे लोक आहेत, ते सर्व शास्त्रांचा अपहार करणारे होत. शास्त्रांचा अर्थ कळत असूनहि तो अयोग्य आहे असें ते समजतात. दुसऱ्याच्या विद्येची निंदा करून आपल्या विद्येचें महत्त्व ते सांगत असतात, वाणी हेंच आपलें अस्त्र आणि वाणी हाच आपला बाण असें समजून व सर्व विद्या आपणाला अवगत आहेत, असा बाणा बाळगून ते वागत असतात. विद्येचा व्यापार करणाऱ्या या लोकांस राक्षस म्हणावें. दांभिकपणें आचरिलेला धर्महि तुला त्याज्य होय. केवळ शास्त्रवचनानें अथवा तर्कानें धर्मनिर्णय करितां येणें कधीं शक्य नसतें, असें बृहस्पतीचें मत प्रत्यक्ष इंद्रानें सांगितलें आहे. शास्त्रांत कोणतेंहि वचन निरर्थक सांगितलेलें नाहीं. परंतु कित्येक लोक अहिंसाशास्त्राला अनुसरून शास्त्रांत युक्तीनें सिद्ध केलेल्या गोष्टींचा स्वीकार करून तदनुरूप वागत नसतात. या लोकीं लोकांचा चरितार्थ योग्य रीतीनें चालविणें, हाच धर्म होय. तो चरितार्थ चोरादिकांचा वध केल्याशिवाय चालणें शक्य नाहीं, म्हणून हिंसा अवश्य केलीच पाहिजे, असें कित्येक विद्वानांचें मत आहे. म्हणून ज्ञानी मनुष्यानें कोणता धर्म सज्जनांना मान्य होईल, हें स्वतःच विचार करून शोधून काढावें.

हे भारता, क्रोधाच्या भरांत, शास्त्रसंबंधानें वृत्ति संशयित झाली असतां अथवा अज्ञानानें एखादा शहाणा मनुष्यहि सभेमध्यें भाषण करण्याला उठला असतां त्याचें तें भाषण ग्राह्य धरिलें जाणार नाहीं. श्रुतीला अनुकूल असें तर्कसिद्ध जें वचन त्याच्याच योगानें शास्त्राची प्रशंसा होत असते. कित्येक लोक ज्ञानाला कारण म्हणून शास्त्रवचनालाच मान देणारे असतात, तर कित्येक तर्काला पटत नाहीं, म्हणून शास्त्रच निरर्थक होय असें मानणारे असतात. परंतु या दोन्ही ठिकाणीं अज्ञान आहे, म्हणून शास्त्रानें तर्काला अथवा तर्कानें शास्त्राला बाध न आणतां उभयतांना संमत होईल अशा रीतीनें व्यवहार करावा. असें संशयच्छेदक वचन पूर्वी शुक्राचार्यानें दैत्यांना सांगितलें होतें. संशयरूप ज्ञान असून नसल्यासारखेंच होय. म्हणून त्याचा तूं समूळ उच्छेद करून टाक. माझ्या या नीतिवाक्यांचा तूं स्वीकार करीत नाहींस, ही गोष्ट अगदीं अयोग्य होय. उग्र कर्में करण्याकरितांच तुझा जन्म झाला आहे, हें तुला कळत नाहीं.

हे युधिष्ठिरा, माझ्याकडे पहा! स्वहित न जाणतां इहलोकाची इच्छा करणाऱ्या ऐश्वर्येच्छु राजसमूहाला मीं स्वर्गाला पाठविलें तें त्यावर उपकार करण्यासाठींच होय. माझ्या स्वार्थाकरितां नव्हे. ब्रह्मदेवानें अज, अश्व आणि क्षत्रिय यांना सारख्याच कामाकरितां निर्माण केलें आहे. अज हा यज्ञाकडे नेतात, त्यांत जसें त्याचेंच हित असतें, तसेंच अश्व आणि क्षत्रिय यांना देखील त्यांच्या हिताकरितांच संग्रामांत नेलें जातें. अवध्याचा वध करण्यांत जो दोष आहे, तोच वध्याचा वध न करण्यांत सांगितला आहे. हीच धर्ममर्यादा होय. तिचें उल्लंघन कोणीं करूं नये. राजानें तीक्ष्णपणा स्वीकारून प्रजांला स्वधर्मामध्यें ठेवावें. नाहींतर लांडग्याप्रमाणें त्या एक-मेकांचें भक्षण करीत राहतील. ज्याप्रमाणें कावळे पाण्यांतून मत्स्य हरण करून नेतात, त्याप्रमाणें ज्याच्या राष्ट्रामध्यें दस्युलोक परस्वापहरण करितात, तो राजा क्षत्रियाधम होय. हे राजा, तूं कुलीन आणि वेदविद्यानिष्णात अशा लोकांना सचिव करून धर्मानें प्रजांचें पालन करून पृथ्वीवर राज्य कर. जो राजा न्यायमार्ग सोडून प्रजेपासून अन्यायानें कर ग्रहण करीत असतो, तो दुबळा होय. राजानें अत्यंत कडक किंवा अत्यंत मृदुहि असूं नये. त्यानें दोहोंचेंहि अतिक्रमण करूं नये, म्हणून तूं उग्र व मृदुहि हो. हा क्षत्रियधर्म अत्यंत कष्टकारक आहे. तथापि तुजवर माझें जें प्रेम आहे त्यामुळें मी तुला सांगत आहें, तूं उग्र कर्माकरितांच निर्माण केला आहेस. म्हणून प्रजांचें योग्य रीतीनें पालन कर. हे भरतर्षभा, आपत्कालांत दुष्ट लोकांचा निग्रह करून शिष्ट लोकांचें पालन करावें, असें शुक्राचार्यांचें म्हणणें आहे.

युधिष्ठिर—हे पितामहा, ह्या कामीं इतरांनीं लंघन करूं नये, अशी कांहीं मर्यादा असेल, तर मी विचारीत आहें. तूं सज्जनांमध्यें श्रेष्ठ आहेस. तरी ती मला कथन कर.

( ३ ) भीष्म—विद्यावृद्ध, तपस्वी आणि सदाचारनिष्ठ अशा ब्राह्मणांची सेवा करणें हें अत्यंत पवित्र कृत्य होय. देवांच्या ठिकाणीं तुझी वृत्ति आहे, तशीच ब्राह्मणासंबंधींहि तूं ठेव. हे राजा, ब्राह्मण क्रुद्ध झाले असतां त्यांनीं अनेक प्रकारचीं घोर कर्में केलीं आहेत. ब्राह्मणांवर प्रेम ठेवल्यानें कीर्ति होते; तसेंच त्यांचा द्वेष केल्यानें मोठी भीति उत्पन्न होत असते. ब्राह्मण संतुष्ट असल्यास,

अमृताप्रमाणें आनंददायक व रुष्ट झाले असतां विषाप्रमाणें प्राणहारक होत असतात. १२. २. १४२.

---

## अध्याय १४३ वा.

[ १ शरणागतरक्षकाचा धर्म कोणता, म्हणून युधिष्ठिरप्रश्न. २ भीष्माकडून युधिष्ठिराला कपोताख्यानप्रस्ताव. ]

( १ ) **युधिष्ठिर**—महाप्राज्ञ पितामहा, तूं सर्वशास्त्रविशारद आहेस, तरी शरणागतांचें रक्षण करण्यामध्यें काय पुण्य आहे, तें मला सांग.

( २ ) **भीष्म**—शरणागताचें रक्षण करण्यांत मोठें पुण्य आहे. हे भारत-सत्तमा, हा प्रश्न करण्याला तूंच योग्य आहेस. हे राजा, शिबिप्रभृति राजांनीं शरणागतांचें पालन करूनच मोठी सिद्धि मिळविली. याविषयीं एका कपोत पक्ष्यानें आपला शत्रु शरण आला असतां त्याचा सत्कार करून आपलें मांसहि त्याला भक्षण करण्यास सांगितलें, असें ऐकण्यांत आहे.

**युधिष्ठिर**—हे भारता, शत्रु शरण आला असतां कपोतानें त्याला आपलें मांस कसें दिलें आणि त्यामुळें त्याला कोणती गति मिळाली ?

**भीष्म**—हे राजा, भार्गवमुनीनें मुचुकुंदाला सांगितलेली व सर्व पापांचा नाश करणारी ही दिव्य कथा तूं ऐक. हे पुरुषश्रेष्ठा, ह्यासंबंधीं पूर्वीं मुचुकुंद राजानें भार्गवऋषीला प्रश्न केला होता. तेव्हां त्यानें त्या श्रवणोत्सुक मुचुकुंदाला कपोताला सिद्धि कशी मिळाली, तें सांगितलें.

**मुनि**—धर्मसिद्धांतांनीं युक्त आणि अर्थ व काम या पुरुषार्थांनीं संबद्ध अशी ही कथा तुला मी आतां सांगतों, तर हे महाबाहो राजा, ती तूं लक्ष्य-पूर्वक ऐक.

ह्या पृथ्वीतलावर कोणी एक क्षुद्राचरण करणारा काळासारखा भयंकर व्याध एका अरण्यामध्यें फिरत असे. त्याचा शरीरवर्ण डोमकावळ्याप्रमाणें काळा असून डोळे लाल होते. त्याच्या मांड्या लांब, पाय आंखूड आणि तोंड व हनुवटी हीं पसरट होतीं. तो साक्षात् मृत्युच कीं काय असा भासत असे. त्याला कोणी मित्र, संबंधी किंवा कोणी आप्त नसून त्याच्या भयंकर कृत्यां-मुळेंच त्यांनीं त्याचा त्याग केला होता. ज्याचें वर्तन पापाचाराचें आहे, अशाला

शहाण्या मनुष्यांनीं दूर टाकावें. जो स्वतःचीच प्रतारणा करितो, तो दुसऱ्याला हितकारक कोठून होणार ? जे दुराचारी लोक प्राण्याचे प्राण हरण करीत असतात, ते लोकांना सर्पाप्रमाणें भीतिदायक वाटत असतात. तो व्याध सर्वदा जाळें घेऊन फिरे आणि त्या वनामध्यें पक्ष्यांना मारून त्यांचा विक्रय करीत असे. अशाप्रकारें तो व्याध आपला चरितार्थ चालवीत असतां बरेच दिवस निघून गेले. परंतु आपल्या हातून अधर्माचरण होत आहे, हें कांहीं त्याला समजलें नाहीं. दैवयोगानें मूढ होऊन गेल्यामुळें आणि आपल्या पत्नीच्या संगतींत नित्य रममाण झाल्यामुळें त्याला दुसरी कोणतीच वृत्ति रुचेनाशी झाली.

अशारीतीनें तो आपला चरितार्थ चालवीत असतां एके वेळीं मोठी वावटळ सुटून तिच्या योगानें मोठमोठे वृक्ष कोसळून पडूं लागले. आकाश मेघांनीं व्याप्त होऊन विजा सर्वत्र चमकूं लागल्या आणि तें नावांनीं आच्छादित सागराप्रमाणें दिसूं लागलें. इकडे पर्जन्यवृष्टीनें क्षणांत सर्व पृथ्वी जलमय करून सोडली. याप्रकारें सर्व सृष्टि पर्जन्यानें व्याप्त झाली असतां तो अगदीं गोंधळून गेला आणि शुद्धि नष्ट होऊन थंडीनें कुडकुडत त्या वनामध्यें इतस्ततः भ्रमण करूं लागला. त्या पक्षिघातक्याला त्यावेळीं कोठेंहि आश्रयाकरितां म्हणून यत्किंचितहि जागा सांपडेना. त्या अरण्यांतील त्याचा मार्ग पाण्यानें अगदीं भरून गेला होता. पर्जन्यवेगानें सर्व पक्षी गारठून जाऊन मृतवत् होऊन पडले होते. मृग, सिंह आणि वराहादि पशु जागा सांपडेल, तेथें पडून राहिले होते. प्रचंड पर्जन्यवृष्टीनें आणि सोसाट्याच्या वायुवेगानें त्या अरण्यांतील सर्व प्राणी भुकेनें व भयानें पीडित होऊन त्या वनामध्यें भ्रमण करूं लागले. परंतु तो व्याध थंडीनें गारठून गेल्यामुळें त्याला कोठें जाववेनासें व तेथेंहि राहवेनासें झालें. त्यावेळीं त्याला एक कपोती शीतार्त होऊन जमिनीवर पडलेली दृष्टीस पडली. त्यावेळीं तो स्वतः शीतार्त होता तरी देखील त्या दुष्टानें तिला उचलून आपल्या पिंजऱ्यांत फेंकून दिलें. अशारीतीनें स्वतः दुःखाकुल असतांहि त्यानें दुसऱ्याला दुःख दिलें. त्या दुष्टाला पाप करण्याची नित्य संवय असल्यामुळें ह्यावेळींहि त्यानें पाप केलें.

इतक्यांत वृक्षसमूहामध्यें त्याला मेघाप्रमाणें नील कांतीचा एक वृक्ष दिसला. त्यावर अनेक पक्षी छाया, आश्रय आणि फळें यांची इच्छा करून

राहत असत. ब्रह्मदेवानें परोपकारी साधूप्रमाणेंच निर्माण केल्यासारखा तो वृक्ष दिसत होता. थोड्या वेळानें आकाशांतील तारे स्पष्टपणें दिसूं लागले आणि चंद्रविकासी कमळांनीं आच्छादित महासरोवराप्रमाणें तें आकाश दिसूं लागलें. आकाश मेघरहित झाल्यावर त्यानें दिशांकडे पाहिलें, तों रात्र बरीच झाली आहे व आपलें घर येथून फार दूर आहे असें त्याला आढळून आलें. म्हणून त्यानें त्या रात्रीं तेथेंच राहण्याचा विचार केला. त्यानें हात जोडले आणि त्या वृक्षाला नमस्कार करून बोलला कीं, ' ह्या वृक्षामध्यें ज्या देवता राहत आहेत, त्या सर्वांना मी शरण आलों आहें. असें म्हणून त्यानें वृक्षाचीं पानें भूमीवर आंथरिलीं आणि शिळेवर मस्तक ठेवून तो दुःखग्रस्त पक्षिघातक झोंपीं गेला. १२. २. १४३.

---

## अध्याय १४४ वा.

[ १ वृक्षावरील कपोताचा आपली चरावयास गेलेली स्त्री परत आली नाहीं, म्हणून प्रशंसापूर्वक शोक. ]

( १ ) भीष्म—हे राजा, त्या वृक्षाच्या फांदीवर फार दिवसांपासून आपल्या सुहृज्जनांसह एक कपोत पक्षी रहात असे. त्याची स्त्री प्रभातकाळीं चरावयास गेली होती, ती रात्र झाली तरी पुनः आली नाहीं, हें पाहून तो अत्यंत कष्टी झाला. तो म्हणाला, " पाऊस आणि वारा जोराचा सुटला असून आपली स्त्री परत आली नाहीं ! तेव्हां ती माझी प्रिय स्त्री अरण्यांत खुशाल असेल का ? तिजवांचून हें माझें घर आज मला अगदीं ओसाड झाल्यासारखें वाटत आहे. पुत्र, पौत्र, सुना, सेवक जन यांनीं जरी गृह फुलून गेलें असलें, तरी भार्या नसल्यास तें गृहस्थाश्रम्याचें घर ओसाडच होय. गृह हें गृह नव्हे, तर गृहिणी हेंच गृह होय. गृहिणीविरहित जें गृह तें अरण्यसदृश होय. आरक्त नेत्र, चित्रविचित्र अंग आणि मधुर स्वर असलेली ती माझी प्रिया आज जर आली नाहीं, तर हें जीवित ठेवून तरी मला काय करावयाचें आहे ? ती एवढी पतिनिष्ठ आहे कीं मी अभुक्त असलों, तर ती अभुक्त राहते; मीं स्नान केलें नाहीं, तर ती स्नान करीत नाहीं; मी उठलों नाहीं, तर ती उठत नाहीं आणि मीं शयन केलें तरच ती शयन करिते; मी हृष्ट असलों, तर ती हृष्ट असते; तसेंच मी दुःखी असलों तर ती दुःखी होते; मी प्रवासाला गेलों असतां ती

दीनवदन होते आणि मी कितीहि रागावलों तरी प्रिय भाषणानें ती माझें सांत्वन करिते. पति हेंच तिचें व्रत आणि पति हीच तिची गति आहे. ती सर्वदा पतीचें प्रिय आणि हित करण्यांत तत्पर असते. ज्याला अशा प्रकारची स्त्री असेल, तो पुरुष पृथ्वीतलावर धन्य होय. त्या बापडीला मी श्रांत किंवा क्षुधार्त झालों असतां समजतें. ती मजवर अनुरक्त असून, स्थिरबुद्धीची, भक्तियुक्त, प्रेमळ आणि कीर्तिरूप आहे. अशा प्रकारची स्त्री ज्याला लाभली आहे, तो वृक्षाच्या मूळाशीं जरी राहत असला, तरी तें त्याचें गृहच होय. तिजवांचून जरी तो राजवाड्यांत असला, तरी तें अरण्यच होय.

"धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ संपादन करण्याचे कामीं भार्या हीच पुरुषाला सहायिनी होत असते. परदेशगमनकालीं पुरुषाला विश्वासपात्र म्हणजे भार्याच होय. भार्या म्हणजे पुरुषाची एक मोठी संपत्तीच होय, असें म्हटलें आहे. ज्याला कोणी आधार नाहीं, अशा पुरुषाला ह्या लोकीं संसारांत साहाय्य करणारी एक भार्याच आहे. त्याचप्रमाणें रोगपीडित आणि नित्य संकटग्रस्त अशा आर्त मनुष्याला भार्येसारखें दुसरें औषधच नाहीं; भार्येसारखा बंधु नाहीं; भार्येसारखा आधार नाहीं आणि धर्मसंग्रहाचे कामीं भार्येसारखा कोणी सहायहि नाहीं. ज्याच्या गृहांत साध्वी आणि प्रियवादिनी भार्या नाहीं, त्यानें अरण्यांत जाऊन वास करावा. कारण त्याचें तें गृह म्हणजे अरण्य होय." १२. २. १४४.

---

## अध्याय १४५ वा.

[ १ पतिविलाप ऐकून व्याधाच्या पिंजऱ्यांत असलेल्या कपोतीकडून विधिपूर्वक त्या व्याधाचाच सत्कार करण्याविषयीं पतीस प्रेरणा. ]

(१) भीष्म—अशाप्रकारें शोक करणाऱ्या त्या कपोताचें करुण भाषण ऐकून व्याधाच्या जाळयांत सांपडलेली ती कपोती त्याला म्हणाली—

कपोती—किती थोर माझें भाग्य म्हणून सांगूं कीं माझा प्रिय पति माझ्या अंगीं असलेले तसेच नसलेलेहि गुण अशाप्रकारें वर्णन करून सांगत आहे! जिच्या योगानें पति संतुष्ट होत नसतो, तिला स्त्री असें मानणें कधींहि योग्य नाहीं. पति संतुष्ट असला तरच स्त्रियांवर सर्व देवता प्रसन्न होत असतात. अग्नीच्या साक्षीनें पतिरूप परम दैवत स्त्रियांनीं वरिलेलें असतें. जिच्या

योगानें पति संतुष्ट होत नाहीं, ती स्त्री दावानलानें दग्ध झालेल्या पुष्पस्तबकयुक्त लतेप्रमाणें भस्म होऊन जाते !

असा विचार करून ती दुःखाकुल कपोती आपल्या दुःखी पतीला म्हणाली, " कांता, मी तुला आतां तुझ्या कल्याणाची गोष्ट सांगत आहें, त्याप्रमाणें तूं कर ! ह्यावेळीं शरणागताचें संरक्षण करणें हाच आपला परम धर्म होय. तुझ्या घरट्याच्या जवळच हा व्याध निद्रा घेत राहिला आहे. तो क्षुधा आणि थंडी यांच्या योगानें अत्यंत व्याकुल होऊन गेला आहे. तरी ह्याचा आधीं सत्कार कर. जो कोणी ब्राह्मणांचा, लोकांची केवळ माताच अशा धेनूंचा किंवा शरणागत आलेल्यांचा वध करितो, त्या तिघांचेंहि पातक सारखेंच आहे. ज्ञातिधर्मानुरोधानें आम्हांला कपोतवृत्तिच विहित आहे. म्हणून तुझ्यासारख्या शहाण्यानें त्याच न्याय्यवृत्तीचें सर्वदा अनुकरण करावें. जो गृहस्थ यथाशक्ति धर्माचरण करीत असतो, त्याला मरणानंतर अक्षय्य लोकांची प्राप्ति होते, असें ऐकण्यांत आहे. हे कपोता, तुला आज संततिसौख्य आहे, तसाच तूं पुत्रवानूहि आहेस. म्हणून आपल्या देहावरील ममत्व सोडून दे आणि धर्मार्थांचें अवलंबन करून जेणेंकरून ह्याचें मन संतुष्ट होईल, असा ह्याचा सत्कार कर. हे विहंगमा, आपल्या शरीरासाठीं तूं दुःखी होऊं नये. शरीरयात्रेसाठीं तुला दुसरीहि स्त्री प्राप्त होईल !"

ती पिंजऱ्यामध्यें असलेली बिचारी कपोती अत्यंत दुःखाकुल होऊन आपल्या पतीला असें बोलून त्याजकडे पाहूं लागली. १२. २. १४५.

---

## अध्याय १४६ वा.

[ १ कपोतीचें भाषण श्रवण करून कपोतानें आत्मदानानें केलेलें अतिथिसंतर्पण. २ कपोताची ती स्थिति पाहून व्याधाचा आपल्या निंद्य कर्माबद्दल विलाप. ]

( १ ) भीष्म—कपोतीचें तें धर्मयुक्त भाषण श्रवण करून कपोताला मोठा हर्ष झाला. त्या आनंदानें त्याचे डोळे भरून येऊन त्या पक्षिघातक व्याधाला पाहून आणि त्याचा यथाविधि सत्कार करून तो त्याला बोलला, " व्याधा, तुझें स्वागत असो. तुझें कोणतें कार्य मीं करावें तें सांग. तूं मनाला यत्किंचित्हि वाईट वाटूं देऊं नकोस. आपल्याच गृहीं तूं आहेस, असें समज आणि

मीं काय करावें, अशी तुझी इच्छा आहे, तें मला शीघ्र सांग. मी तुला प्रेमानें विचारीत आहें. तूं आज माझ्या येथें आश्रयार्थ आला आहेस. आपल्या गृहीं आलेल्या शत्रूचेंहि यथोचित आतिथ्य करावें. आपणाला तोडण्यासाठीं कोणी आला तरी वृक्ष त्याजवरची आपली छाया कधीं मागें घेत नसतो. आपल्या गृहीं आलेल्याचें प्रयत्नपूर्वक आतिथ्य करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. विशेषतः पंचयज्ञ करण्याविषयीं तत्पर अशा गृहस्थानें तर तें अवश्य केलें पाहिजे. जो कोणी गृहस्थाश्रमी पुरुष अज्ञानानें पंचमहायज्ञ करीत नाहीं, त्याला धर्मदृष्ट्या इहलोकाची किंवा परलोकाचीहि प्राप्ति होत नाहीं. तर तूं मजवर विश्वास ठेवून तुझी इच्छा असेल, ती सांग. तूं जें कांहीं सांगशील, तें सर्व मी करीन. तूं मनांत शोक करूं नकोस.

तें त्या कपोताचें भाषण ऐकून व्याध बोलला, ' मला थंडीमुळें फार बाधा होत आहे, तर तीपासून माझें संरक्षण होईल असें कांहीं कर. ' व्याधाचें असें बोलणें ऐकून त्या कपोतानें यथाशक्ति भूमीवर वृक्षाचीं पानें पसरलीं आणि एका पानावरून अग्नि आणण्याकरितां तो निघून गेला. लोहाराच्या घरून अग्नि घेऊन तो शीघ्र परत आला आणि शुष्कपर्णांवर अग्नि ठेवून त्यानें तो प्रज्वलित केला. नंतर तो त्या गृहागत व्याधाला बोलला कीं, ' कशाचीहि भीति न बाळगतां तूं आतां निःशंकपणें आपला देह शेकून घे.' त्यावर 'ठीक आहे,' असें उत्तर देऊन त्या व्याधानें आपलें सर्व शरीर शेकून घेतलें. त्या शेकानें जीवित पुनः प्राप्त झाल्यासारखें होऊन त्याचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले आणि त्या पक्ष्याकडे पाहून तो म्हणाला कीं, ' तूं मला यथाविधि कांहीं आहार द्यावास, अशी माझी इच्छा आहे. क्षुधेनें मी फार पीडित झालों आहें !'

(२) हें व्याधाचें भाषण ऐकून तो पक्षी म्हणाला, 'तुझी क्षुधा शमन करितां येईल, एवढें माझें वैभव नाहीं. आम्ही अरण्यांत वास करून, नित्य जें मिळतें, त्यावरच निर्वाह करीत असतों. मुनिजनांप्रमाणें आमच्याजवळ भोजनाचा संग्रह केलेला नसतो. ' असें त्या व्याधाला बोलून तो कपोत खिन्नमुख होऊन बसला. हे भारतश्रेष्ठा, आतां पुढें काय करावें, याची त्याला मोठी चिंता पडली, तो आपल्या वृत्तीलाहि दोष लावूं लागला. क्षणभरानें त्याला कांहीं विचार

---

१ अध्यापनं ब्रह्मयज्ञः पितृयज्ञस्तु तर्पणम्। होमो दैवो भूतयज्ञो नृयज्ञोऽतिथिपूजनम् । मनु. ३.

सुचला आणि तो त्या पक्षिघातक्याला म्हणाला, 'व्याधा, थोडा वेळ थांब, तुझी तृप्ति मी करितों.' असें म्हणून शुष्कपर्णांनीं त्यानें अग्नि प्रज्वलित केला आणि अति आनंदित होऊन बोलला, 'पूर्वीं ऋषि, देवता, पितर आणि महात्मे यांच्या तोंडून अतिथिपूजनानेंच महाधर्माची प्राप्ति होत असते, असें मीं ऐकिलें आहे. म्हणून हे सौम्या, तूं मजवर कृपा कर. अतिथीचा सत्कार करण्याचा माझा निश्चय झाला आहे. असा निर्धार करून त्या बुद्धिवंत पक्ष्यानें हास्य-मुखानें अग्नीला तीन प्रदक्षिणा केल्या आणि त्यामध्यें प्रवेश केला. पक्ष्यानें अग्नीमध्यें प्रवेश केल्याचें पाहून 'मीं हें काय केलें,' असा विचार मनांत येऊन तो व्याध चिंतामग्न झाला. 'हाय हाय' मीं दुष्टानें हें निंद्य कर्म करून काय घोर परिणाम आपणावर ओढून आणिला! माझ्या हातून भयंकर अधर्म झाला, यांत संशय नाहीं!' अशाप्रकारें तो व्याध पक्ष्याची ती स्थिति पाहून आपल्या कर्माला दोष देत अत्यंत शोक करूं लागला. १२. २. १४६.

---

## अध्याय १४७ वा.

[ १ कपोतानें अग्निप्रवेश केल्याचें पाहून अनुतप्त झालेल्या त्या व्याधानें आपली काठी, जाळें वगैरे टाकून दिलीं, कपोतीला बंधमुक्त केलें आणि परलोक-गमनाच्या मार्गास लागला. ]

(१) भीष्म—तो व्याध जरी क्षुधापीडित होता, तरी आपल्यापुढें अग्नींत पडलेल्या त्या कपोत पक्ष्याला पाहून म्हणाला, 'क्रूर आणि मूर्ख अशा मजकडून हें काय कर्म झालें? ज्या कपोतानें आपलें स्वतःचें मांस देऊन मजवर उपकार केला, त्याचें भक्षण करून प्राण वांचविल्यास मला मोठेंच पाप लागेल!' अशारीतीनें आपली निंदा करीत तो पुनः पुनः म्हणाला, "मी अत्यंत दुष्टबुद्धि असून कोणाच्याच विश्वासास पात्र नाहीं. पापकर्मांचा निश्चय करून मीं शुभकर्मांचा त्याग केला आणि पक्षी मारण्याचें काम पत्करून व्याध झालों. आपलें मांस दहन करणाऱ्या त्या महात्म्या कपोत पक्ष्यानें मज दुष्टाचा धिक्कार करून मला चांगलाच उपदेश केला आहे. मी आतां माझे प्रिय प्राण, पुत्र आणि स्त्री यांचा त्याग करीन आणि क्षुधा, तृषा आणि ऊन हीं सहन करून शरीराचा सांपळा करून घेईन आणि अनेक उपास करून परलोकसाधन करीन! आजपासून मी सर्व प्रका-

रचे शरीरभोग टाकून ग्रीष्म ऋतूंतील अल्प सरोवराप्रमाणें आपलें शरीर सुकवून घेईन. आपला देह अर्पण करून ह्या कपोतानें अतिथिपूजनाचें महत्त्व मला उत्तम प्रकारें शिकविलें आहे. म्हणून यापुढें मी धर्माचरण करून राहीन. धर्म हाच मनुष्याचा मोठा आधार आहे. या पक्षिश्रेष्ठाचे ठिकाणीं मला उत्तम प्रकारचा धर्म दिसून आला आहे."

असें बोलून आणि मनाचा निश्चय करून तो घोरकर्मी व्याध कडक नियमांचे आचरणानें परलोकसाधनाचा विचार करून तेथून निघून गेला. जाण्याआधीं त्यानें आपली काठी, सळई, जाळें आणि पिंजरा हीं फेंकून दिलीं आणि त्या कपोतस्त्रीला देखील बंधमुक्त करून सोडून दिलें. १२. २. १४७.

---

## अध्याय १४८ वा.

[ १ पतिशोकानें कपोतीचा अग्निप्रवेश. २ कपोत व कपोती यांचें विमानांत बसून स्वर्गगमन. ]

( १ ) भीष्म—हे राजा, पुढें तो व्याध तेथून गेला असतां कपोती दुःखाकुल होऊन व पतीचें वरचेवर स्मरण करून शोक करूं लागली. ती म्हणाली, "प्रिया, तुझे मनाविरुद्ध केव्हांहि आचरण केल्याचें मला आठवत नाहीं. विधवा स्त्रीला जरी अनेक पुत्र असले, तरी पतिदुःख हें तिला होतेंच. गरीब बिचाऱ्या पतिहीन स्त्रीबद्दल तिचे आप्तहि हळहळतात. तूं सर्वदा माझें लालन-पालन केलेंस, माझा उत्तम आदर केलास आणि मधुर, प्रेमळ, सरळ आणि गोड शब्दांनीं मला सुख दिलेंस. पर्वतांवरील गुहांमध्यें, नद्यांच्या झऱ्यांवर आणि वृक्षांच्या शेंड्यांवर मी तुझ्यासह अत्यंत सुखांत राहिलें! आकाशांतहि मी तुझ्यासह मोठ्या आनंदांत विहार केला. कांता, त्या सर्व सुखाला आज मी मुकल्यें आहें. पिता, बंधु आणि पुत्र ह्यांनीं जरी दिलें, तरी तें नियमित असतें; अमित देणारा असा एक भर्ताच होय. मग कोणती स्त्री त्याचा आदरपूर्वक सत्कार करणार नाहीं? भर्त्यासारखा कोणी नाथ नाहीं व भर्त्यासारखें दुसरें सुखहि नाहीं. धनसर्वस्वाचाहि त्याग करून स्त्रियांचें रक्षण करणारा एक भर्ताच होय. हे नाथा, तुझ्यावांचून ह्या जीविताशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. कोणती पतिव्रता स्त्री पतिविरहित होऊन जीविताची इच्छा करील?"

( २ ) अशा रीतीनें पुष्कळ शोक करून त्या दुःखाकुल पतिव्रता कपोतस्त्रीनें तेथील प्रदीप्त अग्नीमध्यें उडी घेतली, तों तिला विमानांत बसलेला तिचा पतिच पुढें दिसला. त्यानें चित्रविचित्र बाहुभूषणें धारण केलीं होतीं. मोठमोठे महात्मे आणि पुण्य पुरुष त्याचें पूजन करीत होते. त्याच्या अंगावर अनेक शोभिवंत पुष्पमाला आणि वस्त्रें होतीं, तसेंच त्यानें अनेक अलंकार घालून आपलें शरीर सुशोभित केलें होतें. तो पुण्यकर्मै आचरण करण्यांत निमग्न दिसत होता. शेंकडो कोटि विमानें त्याच्या सभोंवतीं होतीं. नंतर तो पक्षी उत्तम प्रकारच्या विमानांत स्त्रीसह आरूढ होऊन स्वर्गाला गेला. तेथें स्वकर्माच्या योगानें बहुमान पावून स्वस्त्रीसहवर्तमान तो सुखांत राहिला. १२. २. १४८.

---

## अध्याय १४९ वा.

[ १ विमानांत बसलेल्या कपोताला व कपोतस्त्रीला पाहून त्या व्याधानें महारण्यांत प्रवेश केला आणि तेथें अग्निदग्ध होऊन तोहि स्वर्गाला गेला. ]

( १ ) भीष्म—हे राजा, तो कपोत आणि त्याची ती स्त्री हीं आकाशांतून विमानांत बसून जातांना व्याधाच्या दृष्टीस पडलीं. त्या स्थितींत त्यांना पाहून आपणालाहि ह्यांसारखीच गति प्राप्त व्हावी, अशी इच्छा त्या व्याधाला झाली आणि अशाच प्रकारें तप करून मीहि अशीच परम गति मिळवीन, असा त्यानें निश्चय केला आणि महाप्रस्थानाला जाण्याची इच्छा करून तो पक्षिघातकी व्याध स्वर्गाच्या इच्छेनें सर्व व्यवहार बंद करून व सर्व वस्तूंवरील ममत्व टाकून देऊन वायुभक्षण करीत राहिला. याप्रमाणें तो वनांतून जात असतां एक अत्यंत विस्तीर्ण, मनोहर, प्रफुल्लित कमळांनीं सुशोभित, अनेक पक्षिगणांनीं व्याप्त आणि गार पाण्यानें युक्त, असें सरोवर त्याच्या दृष्टीस पडलें. तृषाकुल मनुष्याच्या दृष्टीस पडतांच त्याची तृषा शमन व्हावी, असें तें सरोवर होतें. तो पारधि उपवासांनीं अगदीं कृष होऊन गेला होता, तरी त्या सरोवराकडे नजरहि न फेंकतां निश्चयपूर्वक तो श्वापदांनीं वसती केलेल्या अरण्यामध्यें मोठ्या आनंदानें शिरला. त्या वनांत तो जातो, तोंच त्याच्या अंगाला कांटे रुतून तें रक्तबंबाळ झालें. तरीहि त्या निर्जन व पक्षिगणांनीं व्याप्त अरण्यामध्यें तो फिरत राहिला. इतक्यांत भयंकर वारा

सुटून व मोठमोठे वृक्ष परस्परांशीं घर्षण पावून त्या अरण्यामध्यें अग्नि उत्पन्न झाला. युगांतकालच्या अग्नीप्रमाणें तो वडवाग्नि वृक्षांनीं भरगच्च भरलेलें व लताविटपांनीं व्याप्त झालेलें तें वन दग्ध करूं लागला. त्या अग्निज्वालांनीं व वायूनें सर्वच उत्पन्न झालेल्या ठिणग्यांनीं पशु-पक्ष्यादिकांनीं व्याप्त असें तें सर्व वन क्षणांत दग्ध होऊन गेलें. तेव्हां तो व्याध अत्यंत आनंदित होऊन आपला देहत्याग करण्याच्या इच्छेनें त्या वाढत जाणाऱ्या वणव्याकडे धांवत गेला आणि त्या अग्नीनेंहि त्या व्याधाला दग्ध करून सोडलें.

हे भरतसत्तमा, अशारीतीनें तो व्याध अग्निदग्ध होऊन त्याचें सर्व पातक नष्ट झालें आणि त्या व्याधाला उत्तम गति मिळाली. त्याची सर्व काळजी दूर होऊन आपण स्वर्गामध्यें यक्षगंधर्व आणि सिद्ध यांमध्यें इंद्राप्रमाणें विराजमान झालों आहें, असें त्याला दिसून आलें. याप्रमाणें, तो कपोत, पतिव्रता कपोती आणि तो व्याध हीं सर्व आपल्या पुण्यकर्मानें स्वर्गाला गेलीं. जी कोणी स्त्री अशाप्रकारें आपल्या पतीच्या मताप्रमाणें वागते, ती त्या कपोतस्त्रीप्रमाणें स्वर्गांत विराजमान होऊन राहते.

याप्रमाणें त्या महात्म्या व्याधाची कथा आहे. त्या कपोताला आपल्या पुण्यकर्मानें उत्तम धर्मफळ मिळालें. जो कोणी ही कथा नित्य श्रवण करील, अथवा दुसऱ्याला कथन करील, त्याच्या मनांत चुकूनहि कधीं अशुभ गोष्ट येणार नाहीं. हे युधिष्ठिरा, तूं धर्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आहेस. ह्या धर्माची योग्यता फार मोठी आहे. ह्या लोकीं गोवध करणाऱ्या पाप्याच्या पातकाचीहि निष्कृति सांपडेल, परंतु जो शरणागतांचा वध करितो, त्याच्या पापाची मात्र निष्कृति कोठें आढळत नाहीं. हा इतिहास अत्यंत पुण्यदायक आणि पाप-प्रणाशक आहे. जो ह्याचें श्रवण करील, त्याला दुर्गति कधीं प्राप्त न होतां तो स्वर्गलोकाला जातो. १२. २. १४९.

---

## अध्याय १५० वा.

[ १ युधिष्ठिराचा अबुद्धिपूर्वक झालेल्या ब्रह्महत्येच्या प्रायश्चित्तासंबंधीं प्रश्न. २ शौनककुलोत्पन्न इंद्रोत आणि जनमेजय यांच्या संवादाचा उपक्रम. ]

**युधिष्ठिर**—हे भरतसत्तमा, अबुद्धिपूर्वक जर कोणाच्या हातून पाप घडलें, तर त्यापासून तो मुक्त कसा होईल, तें मला सांग.

(२) भीष्म—ह्यासंबंधीं पूर्वी शौनककुलांत जन्म पावलेल्या इंद्रोत ब्राह्मणानें राजा जनमेजयास सांगितलेली व ऋषींनीं प्रशंसा केलेली एक कथा सांगतों. पूर्वी परिक्षित् राजाचा पुत्र जनमेजय हा मोठा वीर्यशाली राजा होऊन गेला. त्याच्या हातून कोणी एके वेळीं चुकून ब्रह्महत्या घडली. तेव्हां त्याच्या पुरोहितांसह सर्व ब्राह्मणांनीं त्याचा त्याग केला. त्यामुळें रात्रंदिवस दुःखसंतप्त होऊन तो राजा अरण्यवासाला निघून गेला. त्याच्या प्रजेनेंहि त्याचा त्याग केला होता. परंतु अशा स्थितींतहि त्यानें आपलें कल्याण करून घेतलें. शोकसंतप्त त्या राजानें फार मोठी तपश्चर्या केली. अनेक ब्राह्मणांना त्यानें ब्रह्महत्येचें पाप नाहींसें कसें होईल, तें विचारिलें. सर्व पृथ्वीवर नाना देशांमधून तो फिरला. असा फिरत फिरत असतां अखेर तो शौनककुलोत्पन्न इंद्रोत मुनीकडे गेला. तेथें जाऊन त्या राजानें त्याचे पाय घट्ट धरिले. इंद्रोत मुनि म्हणजे अत्यंत कडक तपस्वी होता. ऋषीनें जनमेजय राजा आल्याचें पाहून भ्रूणहत्या करणारा हा महापातकी येथें कशाला आला आहे, असें म्हणून त्याची पुष्कळ निंदा केली.

मुनि—तुला आमच्या येथें काय कर्तव्य आहे ? तूं मला स्पर्श करण्याचें कारण नाहीं. तूं येथें राहिल्यानें मला संतोष होत नाहीं. जा, जा. तुझ्या शरीराला रक्तासारखी दुर्गंधि येत आहे, त्याचप्रमाणें तुझें दर्शनहि शवदर्शनाइतकेंच अशुभ आहे. तूं स्वतः अशुभ असून शुभ असल्याचें लोकांस भासवीत आहेस ! तूं मृत असून जीवंत असल्याप्रमाणें जनांत फिरत आहेस ! तुझ्या हातून ब्रह्महत्या घडली आहे, तुझें मन अशुद्ध आहे आणि तुझे विचारहि पापमय आहेत. तूं जागा होतोस आणि पुनः गाढ झोंपेंत मग्न होतोस असा तूं परमसुखामध्यें आहेस. हे राजा, तुझें आयुष्य व्यर्थ आहे. तुझें जीवित क्लेशयुक्त आहे. तुझा जन्म हीन आणि पापी कर्मांकरितांच झाला आहे. अनेक प्रकारच्या कल्याणकारक गोष्टी करून वडील पुत्राची आशा करितात आणि त्याकरितां तपश्चर्या, देवतापूजन, वंदन आणि सहिष्णुता ह्यांचें आचरण करितात, परंतु तुझ्याकडे पाहिलें असतां तुझा पितृवंश नरकाला गेला आहे. तुझ्या संबंधीं त्यांच्या सर्व आशा निरर्थक झाल्या आहेत. ज्यांचें पूजन केलें असतां स्वर्ग, आयुष्य, यश आणि संतति यांची प्राप्ति होते, त्या ब्राह्मणांचा तूं विनाकारण द्वेष्टा झाला आहेस! ह्या पापाच्या योगानें तूं मृत्यु पावल्यावर शाश्वत किंवा कांहीं कालपर्यंत तरी खालीं मस्तक करून

नरकांत पडून राहशील. त्या ठिकाणीं तुला कृष्ण कंठाचे आणि लोहमय मुखांचे गृध्र त्रास देतील आणि तेथून तुला पुनः पापयोनींत जावें लागेल. राजा, हें जगच जर मिथ्या, तर परलोक तरी कोठून, असें जर तुला वाटत असेल, तर यमगृहीं यमदूत त्याचीहि आठवण तुला पटवून देतील! हें ध्यानांत ठेव १२. २. १५०.

---

## अध्याय १५१ वा.

[ १ जनमेजयाची प्रार्थना ऐकून शौनक ब्रह्महत्येच्या पातकाची निष्कृति कशी करितां येईल, तें सांगतो. ]

( १ ) भीष्म—शौनक मुनीचें तें भाषण ऐकून जनमेजय म्हणाला, "आधींच गर्ह्य व निंद्य अशा माझी पुनः तूं निंदा करीत आहेस! मी धिक्कारार्ह आहें, म्हणूनच तूं माझा धिक्कार करीत आहेस! मी तुझ्या कृपेची इच्छा करीत आहें. माझ्या दुष्कर्मांमुळें अग्नींत पडल्याप्रमाणें मी जळत आहें. स्वतःच्या पापकर्मांची आठवण होऊन माझ्या मनाला आनंद होत नाहीं. यमापासून मला भयंकर शिक्षा होणार, अशी भीति मला वाटत आहे. तेव्हां माझ्या हृदयांतील हें शल्य काढून टाकिल्याशिवाय मी जगणार तरी कसा? हे शौनका, मजवरील सर्व क्रोध टाकून दे आणि मला कांहींतरी उपाय सांग. ब्राह्मणांचा मी मोठा भक्त होतों. मी पुनः तुला सांगतों कीं, ह्या माझ्या कुलाचा समूळ नाश न होतां त्याचा अवशेष तरी रहावा, अशी माझी इच्छा आहे. ज्याच्या हातून ब्रह्महत्या घडली आहे, असा माझा वंश चालावा, हें योग्य नाहीं, तथापि मी अगदीं दीनतेनें तुला सांगत आहें कीं योगी ज्याप्रमाणें अनाथांचें रक्षण करितात, त्याप्रमाणें तूं माझें रक्षण कर. यज्ञ न करणाऱ्या लोकांस स्वर्ग न मिळतां ते पुलिंद, शबरांप्रमाणें केवळ नरकाला जातात. म्हणून माझी बुद्धि लहान मुलाच्याप्रमाणें मूढ आहे, असें समजून पित्याप्रमाणें तूं मजवर प्रेम करावें."

शौनक—ब्राह्मणाला क्रोध आला असतां त्याच्या हातून दुष्कर्म घडावें, यांत आश्चर्य तें कसलें? म्हणूनच विचारी लोक दुसऱ्यावर कोप करीत नसतात. शहाणा मनुष्य आपल्या प्रज्ञाबलानें ज्ञानप्रासादावर आरोहण करून लोकांबद्दल शोक करीत असतो. पर्वतावरील मनुष्याला ज्याप्रमाणें भूमीवरील सर्व

वस्तूंचें ज्ञान होतें, त्याप्रमाणें तो सर्व लोकांचे बरेवाईट व्यवहार जाणतो. जो साधुजनांवर प्रेम करीत नाहीं, त्यांना सर्वदा टाळतो आणि त्यामुळें त्यांच्या धिक्कारास पात्र होतो, त्याला कधीं ज्ञान होत नसतें आणि त्याबद्दल कोणाला आश्चर्यहि वाटत नसतें. म्हणूनच सत्संगतीवांचून ज्ञानप्राप्ति होणें दुर्लभ होय. वेदांत व शास्त्रांत सांगितलेलें ब्राह्मणांचें वीर्य आणि माहात्म्य हीं तुला ठाऊकच आहेत. तेव्हां जेणेंकरून तुझ्या मनाला शांति प्राप्त होईल, असें कर. असें केल्यानें ब्राह्मण तुझें रक्षण करितील. ब्राह्मणांचा संतोष झाल्यास तुला परलोकप्राप्ति होईल. नाहींतर पापामुळेंच तुला सर्वदा दुःख भोगावें लागेल. सर्वदा धर्माचें चिंतन करीत रहा !

जनमेजय—हे शौनका, माझ्या पापामुळें मला ताप होत आहे. माझ्या हातून कधीं धर्मलोप होऊं नये, आणि माझें कल्याण व्हावें, अशी माझी इच्छा आहे. म्हणून तुला शरण आलों आहें, तर हे शौनका, मजवर प्रेम कर.

शौनक—हे राजा, दंभ आणि मान सोडून देऊन तूं भूतमात्रावर प्रेम करावेंस अशी माझी इच्छा आहे. प्राणिमात्राला हितकारक अशा धर्माचें सर्वदा चिंतन करीत रहा. भीतीमुळें, कृपणतेमुळें अथवा लोभामुळें तुला उपदेश करण्यास मी सिद्ध झालों आहें, असें समजूं नकोस. माझें दिव्य आणि सत्य भाषण तूं ब्राह्मणांसह ऐकावें, अशी माझी इच्छा आहे. मी तुला धर्माचा उपदेश करीत आहें, यांत कांहीं अभिलाष आहे, असें मुळींच नाहीं. केवळ धर्मबुद्धीनेंच तुला उपदेश करण्यास मी सिद्ध झालों आहें. ब्रह्महत्या करणाऱ्या तुला आश्रय दिल्यानें सर्व लोक माझा धिक्कार करितील, मला अधर्मज्ञ म्हणतील आणि माझे आप्त माझा त्यागहि करितील. मी तुला जें सांगणार आहें, तें ऐकून माझे आप्त मजवर अत्यंत कोप करतील. त्यांत जे कोणी महाप्राज्ञ असतील, त्यांनाच माझे भाषणाचा अर्थ बरोबर समजून येईल. हे भारता, ब्राह्मणांसंबंधीं काय करावयाचें, तें मी सांगतों, ऐक. जेणेंकरून त्यांचें कल्याण होईल, तें तूं मजसाठीं कर आणि हे राजा, ब्राह्मणांशीं आपण द्रोह करणार नाहीं, अशी प्रतिज्ञा कर.

जनमेजय—हे विप्रा, मी तुझ्या चरणांना स्पर्श करून सांगतों कीं वाणीनें, मनानें किंवा कर्मानें ब्राह्मणांचा द्रोह मी कधीं करणार नाहीं. १२. २. १५१.

---

## अध्याय १५२ वा.

[ १ शौनक जनमेजयाकडून अश्वमेध यज्ञ करवितो. २ त्यामुळें तो पापमुक्त होतो आणि त्याला पुनः राज्यप्राप्ति होते. ]

( १ ) **शौनक**—मी विद्यावान् आणि सामर्थ्यवान् असून सर्वदा संतुष्ट आहें. तूं स्वतः धर्म जाणणारा असून धर्मविचार गुप्त ठेवणारा आहेस. त्यामुळें मी आतां तुला धर्म कथन करीत आहें. प्रथमतः कठोर असून पुढें दयाळू होणें ही आश्चर्याची गोष्ट होय. कठोर राजा जगताला दग्ध करून सोडतो, असें म्हणतात. तूं तर प्रथमपासून तशा प्रकारचा कठोर असून तुझें मन सांप्रत धर्माकडे वळलें आहे. तूं भक्ष्य-भोज्यादिकांचा त्याग करून तप करूं लागला आहेस. हे जनमेजया, ही गोष्ट अधार्मिक लोकांना आश्चर्यकारक वाटत आहे. श्रीमंत मनुष्यानें दान करणें किंवा तपस्व्यानें कृपण होणें, ह्यांत आश्चर्यावह कांहीं नाहीं. कारण त्या दोन्ही गोष्टी परस्परांशीं अगदीं संबद्ध आहेत असें ज्ञाते म्हणतात. पूर्वापारविचार केल्याशिवाय कोणत्याहि कार्याला आरंभ करणें, हें दैन्याचें लक्षण होय. तसेंच जी गोष्ट विचारानें केलेली असते, ती सर्वदा कल्याणकारक होत असते.

हे राजा, यज्ञ, दान, दया, वेद, सत्य हीं पांच आणि त्यांबरोबरच उत्कृष्ट आचरिलेलें तप या सहा गोष्टी मनुष्याला पावन करणाऱ्या आहेत. जनमेजया, राजे लोकांना ह्यांच्या योगानें परम पावित्र्य येत असतें. ह्यांचा तूं विचारपूर्वक उपयोग केल्यास तुला मोठी धर्मप्राप्ति होईल. त्याचप्रमाणें तीर्थांच्या ठिकाणीं जाणें हीहि गोष्ट पुण्यकारक असल्याचें सांगितलें आहे. ह्याविषयीं ययातीनें सांगितलेली गोष्ट उदाहरण म्हणून सांगत असतात. ययाति सांगतो कीं ज्या मनुष्याला बरीच आयुष्यप्राप्ति झाली असेल, त्यानें यत्नपूर्वक यज्ञ करून नंतर त्यांचा त्याग करावा आणि तप करावें. कुरुक्षेत्र हें पुण्यकारक समजतात. कुरुक्षेत्राहून सरस्वती, तीहून तीर्थें आणि त्या तीर्थांहूनहि पृथूदक तीर्थ हें परम पवित्र होय, असें सांगितलें आहे. त्या ठिकाणीं स्नान, जलपान करणाऱ्या मनुष्याला लवकर मरण येईल, अशी भीति बाळगण्याचें कारण राहत नाहीं. त्या ठिकाणाहून तूं पुढें महासर, पुष्कर तीर्थें, प्रभासतीर्थ, उत्तर मानस व कालोदक या तीर्थांना जा, म्हणजे तुला दीर्घायुष्याची प्राप्ति होईल. सरस्वती आणि दृषद्वती यांच्या संगमावर

मानस सरोवर आहे. या सर्व ठिकाणीं वेदाध्ययनशील राहून स्नान करावें. सर्वांत पुण्यकारक असा दानधर्म आहे व त्याहूनहि संन्यास हा श्रेष्ठ धर्म होय, असें मनूचें म्हणणें आहे.

ह्यासंबंधानें सत्यवानानें सांगितलेल्या कांहीं गाथा उदाहरण म्हणून सांगत असतात. त्या अशा आहेत–ज्याप्रमाणें एखादें बाल्यावस्थेंतील मूल सत्यनिष्ठ असतें, त्याला पुण्य किंवा पाप कांहीं लागत नसतें. तसेंच प्राणिमात्राच्या ठिकाणीं स्वाभाविकपणें दुःख नसतें, मग सुखतरी कोठून असणार ? सुखदुःख हीं दोन्ही कल्पित असतात. याप्रमाणें ब्रह्मरूप झालेल्या लोकांना कोणत्याहि संसर्गानें सुखदुःख भोगावें लागत नाहीं. म्हणून पुण्यपापांची निवृत्ति झाली असतां जीवितत्याग केलेला चांगला होय.

हे राजा, आतां राजाचें श्रेष्ठ कर्तव्य कोणतें तें तुला सांगतों. आपल्या सामर्थ्यानें आणि दानगुणानें तूं स्वर्गप्राप्ति करून घे. ज्याच्या अंगीं बल आणि तेज हीं आहेत, तोच मनुष्य धर्मप्राप्ति करून घेतो. हे राजा, तूं ब्राह्मणांसाठीं आणि आपल्या सुखासाठीं पृथ्वीचें राज्य कर. ज्याप्रमाणें पूर्वीं तूं ब्राह्मणांना तुच्छ लेखिलेंस, त्याचप्रमाणें आतां तूं त्यांना प्रसन्न करून घे. ब्राह्मणलोकांनीं नीच समजून जरी तुझा त्याग केला, तरी तूं त्यांना आपल्या-प्रमाणेंच समजून त्यांचा वध करावयाचा नाहीं, असा निश्चय कर. कोणतेंहि कार्य करीत असतांना ज्यांत आपलें कल्याण होईल, तेंच करीत जा. हे परंतपा, एखादा राजा हिमाप्रमाणें अत्यंत शीतल, अग्नीप्रमाणें क्रूर, यमाप्रमाणें गुणदोषांचा विचार करणारा असतो, तर दुसरा कोणी नांगराप्रमाणें दुष्टांना उखळून टाकणारा आणि विजेप्रमाणें त्यांना अकस्मात् भाजून काढणारा असतो. दुष्ट लोकांचे ठिकाणीं जरी विद्वत्तादि गुण किंवा ब्राह्मणांसारखे कांहीं धर्म दिसून आले, तरी त्यांशीं कधीं मिसळूं नये. पापकर्म एकदांच हातून घडलें असतां मनुष्य पश्चात्तापानें मुक्त होतो. दुसऱ्या वेळीं झालें असतां पुनः मीं असलें कर्म करणार नाहीं, असा निश्चय केल्यास त्यापासून मुक्त होतो. तिसरे वेळीं पापकर्म घडल्यास कांहीं धर्मनियम पाळण्याचा निश्चय केल्यास मुक्त होतो आणि अनेकवार पापाचरण घडलें असल्यास पवित्र तीर्थयात्रा केल्यानें मुक्त होतो.

ज्याला आपलें कल्याण व्हावें, अशी इच्छा असेल, त्यानें चांगलें कर्म



कपोतपक्षी व त्याची स्त्री विमानांतून स्वर्गांत जातांना पाहून तीच गति स्वतःला मिळावी म्हणून तो व्याध वायुभक्षण करीत राहिला. पुढें अरण्यांत वणवा लागल्याचें दिसतांच त्या अग्नींत उडी घेण्यास तो धांवून गेला व स्वर्गाला गेला. [पृ. ३१५

करीत रहावें. जे सुगंधी पदार्थ जवळ ठेवतात, त्यांच्या अंगाला सुगंध येतो, व ज्यांजवळ दुर्गंधी पदार्थ असतात, त्यांच्या अंगाला दुर्गंध येत असतो. तपश्चर्या करण्यांत आसक्त झालेल्या मनुष्याला पापापासून सत्वर मुक्ति मिळते. एक वर्षभर अग्नीची आराधना केल्यास मनुष्य लोकनिंदेपासून मुक्त होतो व तीन वर्षे अग्नीची सेवा केल्यास भ्रूणहत्येच्या पापापासून मुक्त होतो. महासर, पुष्करतीर्थे, प्रभास आणि उत्तरमानस यांपैकीं कोणत्याहि तीर्थांच्या वाटेवर शंभर योजनें गेला असतां त्या पातकापासून मुक्त होतो. ज्या जातीचे जितके प्राणी मनुष्याच्या हातून मारले गेले असतील, त्या जातीच्या तितक्या प्राण्यांना मनुष्यानें मरणांतून सोडविल्यास तो त्या प्राणिवधपापापासून मुक्त होतो. तसेंच अघमर्षणाचा तीन वेळां जप करून जलामध्यें उडी मारल्यानें अश्वमेधसमयीं अवभृथस्नान केल्याचें पुण्य मिळतें, असें मनु म्हणतो. त्याच्या योगानें तत्काळ पाप नाहींसें होतें आणि मनुष्यलोकांमध्यें तो मानपात्र होतो. सर्व प्राणी जड व मूक होऊन त्याला वश होतात.

हे राजा, एकदां देव आणि दैत्य मिळून देवगुरु बृहस्पतीकडे गेले आणि त्याला म्हणाले कीं, ‘ तुला धर्मफल आणि परलोकीं नरकांत मिळणारें पापफल हीं पूर्णपणें विदित आहेत. म्हणून ज्याचें पापपुण्य समान आहे, असा योगी ह्या दोहोंतून मुक्त होतो किंवा नाहीं, तसेंच हे महर्षे, पुण्याचें फल काय आणि धर्मशील मनुष्य पापाचा निरास कसा करितो, तें आम्हांला सांग.’

बृहस्पति—अबुद्धिपूर्वक मनुष्याच्या हातून पाप घडलें असलें आणि पुढें त्यानें बुद्धिपूर्वक पुण्य केलें, तर ज्याप्रमाणें क्षारानें धुतलेल्या मलिन वस्त्राचा मल निघून जातो, त्याप्रमाणें त्या कर्मनिष्ठ पुरुषाचें पाप नाहींसें होतें. पाप करून ज्या पुरुषाला आपण जगांतून नाहींसे झालों असें वाटत असतें, तो श्रद्धा ठेवून निर्मत्सरपणें आपलें कल्याण करून घेण्याच्या मार्गे लागतो. जो उघडपणें दृष्टोत्पत्तीस येणारे सत्पुरुषाचे दोष आच्छादून ठेवितो, तो पापी असला तरी कल्याण पावतो. ज्याप्रमाणें सूर्य प्रभातकालीं उदय पावून सर्व अंधकार नाहींसा करितो, त्याप्रमाणें तो आपलें पाप नाहींसें करितो.

( २ ) भीष्म—याप्रमाणें त्या जनमेजय राजाला शौनक इंद्रोतानें सांगितलें आणि त्याजकडून अश्वमेध यज्ञ करविला. त्यामुळें त्या राजाचे सर्व पात-

कांचा नाश होऊन त्याचें कल्याण झालें. त्याची कांति प्रज्वलित अग्नीप्रमाणें शोभायमान दिसूं लागली. नंतर जसा पौर्णिमेचा चंद्र आकाशांत प्रविष्ट होतो, तसा त्या शत्रुविघातक जनमेजय राजानें मोठ्या थाटानें आपल्या राजधानींत प्रवेश केला. १२. २. १५२.

---

## अध्याय १५३ वा.

[ १ मृत मनुष्याचें पुनरुज्जीवन झाल्याचें तूं कधीं पाहिलें किंवा ऐकिलें आहेस काय, असा युधिष्ठिरप्रश्न. २ त्यावर गृध्र-जंबूकसंवादाचें युधिष्ठिराला भीष्माकडून कथन. ३ करुणार्द्र शंकराकडून त्या मृतपुत्राला पुनर्जीवदान. ]

( १ ) युधिष्ठिर—हे राजा, एकदां मनुष्य मृत झाला असतां तो पुनः जीवंत झाल्याचें तूं कधीं पाहिलें किंवा ऐकिलें आहेस काय ?

( २ ) भीष्म—यासंबंधानें पूर्वी नैमिषारण्यांत एक गृध्र आणि एक कोल्हा यांमध्यें झालेला संवाद इतिहास म्हणून सांगत असतात, तो ऐक. कोणी एका ब्राह्मणाला मोठ्या सायासानें एक पुत्र झाला. परंतु तो लहानपणींच बालग्रहांनीं पीडित होऊन मृत झाला. आपल्या सर्व कुलाला आधारभूत अशा त्या एकुलत्या एक बालकाला घेऊन त्याचे शोकविह्वल आप्त रडत रडत स्मशानभूमीकडे निघाले. त्यावेळीं त्या मृत बालकाला मांडीवर घेऊन व त्याचे गुण आठवून त्यांनीं अत्यंत विलाप केला. त्याचीं लहानपणचीं भाषणें फिरून फिरून आठवून त्यांनीं सारखा शोक केला, परंतु त्याला जमिनीवर ठेवून तेथून त्यांच्यानें जाववेना. त्यांचा तो रोदनशब्द ऐकून एक गृध्र तेथें आला आणि म्हणाला, "ह्या तुमच्या एकुलत्या एक पुत्राला येथें सोडून तुम्ही मागें फिरा, विलंब लावूं नका. हजारों पुरुष आणि हजारों स्त्रिया कालवश झाल्यामुळें त्यांचे बंधुजन त्यांना येथें टाकून गेले आहेत. हें सर्व जगत् सुखदुःखांनीं व्याप्त आहे, हें ध्यानांत घ्या. संयोग आणि वियोग हे एकामागून दुसरा असे मनुष्याच्या मागें लागलेले आहेत. मेलेल्या मनुष्यांबरोबर जे जातात किंवा जे त्यांच्या बरोबर जात नाहींत, त्या सर्वांनाहि त्यांच्या त्यांच्या आयुर्मर्यादेनुसार मरण हें आहेच. तर आतां गृध्र, जंबुक इत्यादि प्राण्यांनीं व्याप्त, सर्वत्र अस्थि पडल्यामुळें दिसण्यांत भयप्रद आणि सर्व

प्राण्यांच्या मनांत भीति उत्पन्न करणाऱ्या ह्या स्मशानांत तुम्ही राहूं नका. कोणी कोणाला प्रिय असो अथवा द्वेष्य असो, कालधर्मानुरूप तो एकदां मरण पावला असतां पुनः जीवंत होत नसतो. प्राणिमात्राची अशीच गति आहे. ह्या मर्त्यलोकामध्यें जन्मास आलेल्या प्रत्येकाला मरावयाचें हें आहेच. कालानें हा मार्ग ठरविला असतां मृताला कोण बरें उठविणार? लोकांनीं आपापलीं कामें संपविलीं असून सूर्य अस्ताला गेला आहे. म्हणून तुम्ही आतां सुतस्नेह सोडून आपापल्या वसतिस्थानाकडे निघून जा!"

हे राजा, गृध्राचें तें भाषण ऐकून सर्व बांधव त्या प्रेताला भूतलावर टाकून मोठ्यानें आक्रोश करीत तेथून जाऊं लागले. हा मुलगा मृत झाला असून त्याची पुनः भेट होणें शक्य नाहीं, अशा निराशेनें त्यांनीं आक्रोश चालविला आणि ते मोठ्या दुःखानें त्या मुलाचा त्याग करून जाण्याकरितां रडत परतले. इतक्यांत कावळ्यासमान वर्णाचा एक कोल्हा बिळांतून बाहेर आला आणि त्या स्मशानांतून जाणाऱ्या लोकांस म्हणाला, "मनुष्यें म्हटलीं म्हणजे खरोखर निर्दय असतात! मूर्खांनो, सूर्य अजून अस्ताला गेला नाहीं; तर भय सोडा, पुत्रस्नेह धरा, वेळ कदाचित् बदलून हा मुलगा अजूनहि जीवंत होईल! पुत्रस्नेह सोडून ह्या पुत्राला जमिनीवर टाकून निर्दयतेनें तुम्ही कोठें चाललां? ज्याच्या गोड भाषणानें तुम्हांला एवढा आनंद होत असे, त्या पुत्रावरील तुमचा स्नेह देखील आज नाहींसा व्हावा ना? पशुपक्ष्यांचें आपल्या पुत्रांवर प्रेम कसें असतें तें पहा? त्यांना सांभाळून ठेवण्यांत त्यांना कांहीं फलप्राप्ति होत असते असें नाहीं. परलोकगतीची इच्छा करणाऱ्या मुनीच्या निष्काम यज्ञक्रियांप्रमाणें चतुष्पाद पशु, पक्षी, कीटकादि प्राणी यांचें आपल्या मुलांवरील प्रेमहि तितकेंच निष्काम असतें. त्या प्रेमाबद्दल त्यांना इहलोकीं किंवा परलोकींहि कांहीं फळ मिळतें असें नाहीं. तथापि ते आपल्या संततीचें उत्तम पालन करीत असतात. आपलीं प्रिय मुलें दिसेनाशीं झालीं म्हणजे त्यांना अनावर शोक होतो. तीं मुलें पुढें मोठीं झालीं म्हणजे त्यांजबद्दल कोणी शोक करीत नसतो आणि मग तीं मुलें आईबापांचें पोषणहि करीत नाहींत.

"पण मनुष्यांना इतका स्नेह तरी कोठचा असणार? स्नेहच नाहीं, तेथें शोक कोठून असणार? अहो, कुलाला आधारभूत अशा ह्या मुलाला येथें टाकून

तुम्ही चाललां तरी कोठें ? ह्याजवळ बसून चिरकाल अश्रू ढाळा आणि पुष्कळ वेळपर्यंत प्रेमानें त्याजकडे पाहत रहा. अशाप्रकारें आपल्या अत्यंत इष्टाचा त्याग करणें ही गोष्ट अतिशय कठीण आहे. मनुष्य क्षीण झाला असतां, द्रव्यासंबंधानें अडचणींत आला असतां किंवा मेल्यावर स्मशानाकडे निघालें असतां· बांधवच बरोबर येतात, दुसरा कोणी येत नसतो. प्राण हे सर्वांना प्रिय आहेत आणि प्रेमहि सर्व ठिकाणीं असतें. तिर्यग्योनीमध्यें सुद्धां प्रेम किती असतें तेंहि पहा ! अशा प्रकारच्या कमलपत्राप्रमाणें विशाल नयन असलेल्या आणि स्नान घालून व पुष्पमालांनीं सुशोभित केलेल्या, नुकतेंच लग्न करून दिल्याप्रमाणें शोभणाऱ्या मुलाला सोडून तुमच्यानें जाववतें तरी कसें ?'' याप्रमाणें त्या कोल्ह्याचें कळकळीचें भाषण ऐकून ते सर्व प्रेताच्या संरक्षणाकरितां म्हणून परत मागें फिरले.

गृध्र—अहो, तुम्ही सत्त्वशून्य मनुष्यें आहां. दुष्ट, अल्पबुद्धि आणि क्षुद्र कोल्ह्याच्या सांगण्याप्रमाणें करण्यास सिद्ध होऊन तुम्ही मागें कां फिरलांत ? पंचभूतांनीं टाकिलेल्या, लांकडाप्रमाणें झालेल्या आणि चैतन्यहीन होऊन पडलेल्या या मृत बाळाबद्दल शोक करितां, याला म्हणावें तरी काय ? तुम्ही तुम्हांकरितांच शोक कां करीत नाहीं ? ज्याच्या योगानें तुम्ही पापमुक्त व्हाल, असें कांहीं तीव्र तप करा, तपानें सर्व कांहीं मिळत असतें. हा विलाप काय करणार ? मनुष्य जन्माला येतो, तेव्हांच त्याबरोबर त्याचें सर्व अनिष्ट जन्माला येत असतें. म्हणूनच हा बालक तुम्हांला चिरकालिक दुःख देऊन गेला आहे. धन, गाई, सुवर्ण, मणि, रत्नें आणि संतति हीं सर्व तपामुळें मिळत असतात. ज्याप्रमाणें पूर्वजन्मीं इतरांच्या ठिकाणीं मनुष्यानें बरें किंवा वाईट कर्म केलें असेल, त्याचप्रमाणें त्याला येथेंहि सुखदुःख प्राप्त होत असतें. प्राणी हा सुख-दुःखें बरोबर घेऊन आलेला असतो. आपापल्या शुभाशुभ कर्मांनीं बद्ध असल्यामुळें पित्याच्या पूर्वकर्मानुसार पुत्र किंवा पुत्राच्या पूर्वकर्मानुसार पिता कधीं अन्यमार्गानें जाऊं शकत नाहीं. म्हणून यत्नपूर्वक धर्माचरण करीत जा. अधर्माच्या ठिकाणीं कधींहि मन ठेवूं नका. देवता व ब्राह्मण यांचें योग्य वेळीं सेवन करीत जा. शोक व दैन्य हीं टाकून द्या आणि पुत्रस्नेहहि सोडून द्या ! ह्या बालकाला येथें सोडून देऊन तुम्ही शीघ्र मागें फिरा. प्राणी जें शुभ अथवा अशुभ कर्म करीत असतो, त्याचें फल त्यालाच भोगणें प्राप्त आहे.

तेथें बांधवांचा काय संबंध आहे? येथें एकदां आपल्या प्रिय बांधवाला आणून सोडलें म्हणजे ते डोळयांत अश्रू आणून व स्नेह टाकून मार्गे फिरतात. शहाणा असो अथवा मूर्ख असो, सधन असो अथवा निर्धन असो, आपापल्या शुभाशुभ कर्मानुसार प्रत्येक प्राण्याला कालवश झालेंच पाहिजे. आतां शोक करून काय करणार? मृताबद्दल शोक तरी कशाकरितां करायचा? काल हा सर्वांचा प्रभु असून त्याची सर्वांवर सारखी दृष्टि आहे. तरुण, बाल, वृद्ध अथवा गर्भस्थ प्राणी असो, ह्या सर्वांच्या मार्गे मृत्यु लागलेला आहे. हें सर्व जग अशाच प्रकारें चाललें आहे.

जंबुक—अहो, पुत्रस्नेहानें मोहित होऊन तुम्ही मोठ्यानें शोक करीत असतां ह्या अल्पबुद्धि गृध्रानें तुमचा स्नेह शिथिल केला आहे आणि त्यामुळेंच प्रत्ययास येणाऱ्या त्याच्या गोड शब्दांनीं भुलून जाऊन सोडून देण्यास अशक्य असें आपलें प्रेमहि टाकून तुम्ही जात आहां. पुत्राच्या वियोगानें शून्य दिसणाऱ्या गृहामध्यें गेल्यावर मनुष्यें वत्साचा वियोग झालेल्या धेनूप्रमाणें हंबरडा फोडून शोक करीत असावेत, असें मला वाटत होतें. परंतु पृथ्वीतला-वर मनुष्याचा शोक किती असतो, तें आज मला कळून आलें. यांवरील स्नेहानें यांच्या शोकाबरोबर माझ्याहि डोळयांतून अश्रू आले. मनुष्यानें सर्वदा प्रयत्न करीत रहावें, मग दैवानें त्याला फळ मिळतें! कर्म आणि दैव हीं जुळलीं असतां कर्माप्रमाणें फल मिळतें. मनुष्यानें केव्हांहि कष्टी होऊन राहूं नये. सारख्या खेद करणाऱ्या मनुष्याला सुख कोठून मिळणार? प्रयत्नानें अर्थसिद्धि होत असते. असे निर्दय होऊन कां चाललांत? आपल्याच मांसापासून झालेला, आपलेंच अर्धशरीर व पितृवंश चालविणारा जो हा पुत्र त्याला असा वनांत टाकून तुम्ही कोठें चाललांत? अथवा सूर्य अस्तास गेला असतां व संध्याकाळ प्राप्त झाली असतां पाहिजे तर तुम्ही पुत्राला घेऊन चला अथवा येथेंच बसून रहा!

गृध्र—अहो मनुष्यांनो, माझ्या वयाला आज बरोबर एक हजार वर्षें झालीं आहेत. या मुदतींत कोणीहि पुरुष, स्त्री किंवा क्लीब मृत झाल्यावर पुन्हां जीवंत झाल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं. कांहीं गर्भामध्येंच मृत होतात, कित्येक जन्माला येतांच मृत्यु पावतात, कितीएक चालूं लागून मरण पावतात, तर कित्येक तारुण्यावस्थेंत येऊन मरण पावत असतात. चतुष्पाद प्राणी आणि पक्षी यांचेंहि भाग्य असेंच अनिश्चित आहे. सर्व

जंगम व स्थावरांची आयुर्मर्यादा आधींच ठरलेली आहे. इष्ट जन, पत्नी यांचा वियोग झालेले, तसेच पुत्रशोकानें विव्हल झालेले, किती तरी लोक ह्या ठिकाणीं त्या मृतांना सोडून शोकदग्ध होऊन प्रत्यहीं गृहीं जातात. हजारों लोकांना–मग ते प्रिय असोत अथवा अप्रिय असोत—येथें सोडून त्यांच्या बांधवांना दुःखाकुल होऊन गृहाकडे जावें लागत असतें. हा तुमचा बालक निस्तेज व चैतन्यहीन होऊन लांकडासारखा शुष्क होऊन गेला आहे. त्यांतील प्राण दुसऱ्या देहांत गेला असून हें प्रेत होऊन काष्ठतुल्य झालें आहे. निर्जीवाला टाकून तुम्ही कां जात नाहीं ? तुमचें त्याजवरील प्रेम व्यर्थ असून तुमचा परिश्रमहि फुकट आहे. ह्याला डोळयांनीं दिसत नाहीं किंवा कर्णांनींहि ऐकूं येत नाहीं. अशाला येथें टाकून तुम्ही आपल्या गृहीं शीघ्र निघून कां बरें जात नाहीं ? मोक्षधर्माला अनुसरून मी निष्ठुर, परंतु हेतुयुक्त वाक्यांनीं तुम्हांला सांगत आहें कीं, तुम्ही आपापल्या गृहीं निघून जा. मला प्रज्ञा आणि अनुभवजन्य ज्ञान उत्तम प्रकारचें असून मी माझी बुद्धि आणि ज्ञान हीं दुसऱ्यालाहि देत असतों आणि म्हणूनच माझें भाषण मीं तुम्हांला ऐकविलें आहे. तुम्ही आतां मागें फिरा. मृत मनुष्याला पाहून मला त्याच्या पूर्व कृत्यांचें स्मरण करून शोक मात्र दुप्पट होत आहे.

त्या गृध्राचें हें भाषण ऐकून तीं मनुष्यें मागें फिरूं लागलीं. हें पाहून तो कोल्हा तेथें आला आणि पडलेल्या त्या बालकाकडे पाहून म्हणाला—

जंबुक—सुवर्णासमान कांति असलेल्या, भूषणांनीं अलंकृत व पित्यास पिंड देणाऱ्या ह्या बालकाला त्या गृध्राच्या बोलण्यावरून सोडून तुम्ही कोठें जातां ? अशा रीतीनें त्याजवरील तुमच्या प्रेमाचा, तुमच्या शोकाचा किंवा रोदनाचा शेवट होईल, असें नसून ह्या मृताचा त्याग केल्यानें तुमचें दुःख मात्र वाढेल. पूर्वी शूद्र शंबूक सत्यपराक्रमी रामाकडून मारला गेला असतां एक ब्राह्मणपुत्र जीवंत झाल्याचें आम्हीं ऐकिलें आहे. त्याचप्रमाणें राजर्षि श्वेत याचे पुत्राचें आयुष्य भरून तो मृत झाला असतां त्या धर्मनिष्ठ श्वेतानें त्याला पुनः जीवंत केलें. अशाच रीतीनें कोणी सिद्ध, मुनि अथवा एखादी देवता तुम्ही दीनपणें रोदन करीत असतां तुम्हांवर दयाहि करील !"

हें जंबुकाचें भाषण ऐकून ते शोकार्त पुत्रवत्सल लोक पुनः परतले आणि अंकावर त्या मृत बालकाचें शव ठेवून मोठमोठ्यानें विलाप करूं लागले. त्यांचा तो रोदनशब्द ऐकून गृध्र तेथें येऊन पुनः बोलला—

गृध्र—तुमच्या अश्रुपातानें भिजून गेलेला आणि तुमच्या करस्पर्शानें पीडित झालेला हा बालक यमराजाच्या आज्ञेवरून दीर्घ निद्रा घेत आहे. मोठमोठे तपस्वी, धनवान् आणि महाबुद्धिमान् असे सर्व लोक मृत्युवश होत असतात. असें हें जगत् म्हणजे प्रेतांचें पत्तनच होय. हजारों मृत बाल-वृद्धांना टाकून त्यांचे बांधव रात्रंदिवस भूतलावर शोक करीत असतात. हट्ट धरून शोक करण्यांत अर्थ नाहीं. आतां ह्याला पुनरपि जीवित प्राप्त होईल, ही गोष्ट अगदीं अविश्वसनीय आहे. मृत होऊन एकदां देहत्याग केल्यानें मनुष्याला पुनः देहप्राप्ति होत नसते. शेंकडो जंबुकांनीं ह्याच्या करितां आपलें प्राण शेंकडो वर्षें अर्पण केले तरी हा आतां जीवंत होणें शक्य नाहीं. आतां रुद्र, कार्तिकस्वामी, ब्रह्मदेव किंवा विष्णु, ह्यांपैकीं जर कोणी येऊन ह्याला वर देईल, तर मात्र हा बाल जगेल ! केवळ आंसवें गाळल्यानें, सुसकारे टाकिल्यानें किंवा दीर्घ काल रोदन केल्यानें हा पुनः जीवंत होणें कधींहि शक्य नाहीं ! मी, हा जंबुक आणि हे तुम्ही सर्व याचे बांधव धर्माधर्म बरोबर घेऊन याच मार्गाला लागले आहों. दुसऱ्याचें वाईट करणें, कठोर बोलणें, परद्रोह, परस्त्री, अधर्म आणि अनृत भाषण हीं सुज्ञ मनुष्यानें वर्ज्य करावीं. धर्म, सत्य, विद्या, न्याय्य गोष्ट, प्राणिमात्रावर दया, सरळपणा आणि खरेपणा यांचा यत्नपूर्वक शोध करावा. माता, पिता, बांधव आणि सुहृज्जन यांकडे ते जीवंत असतां जे पहात नाहींत, ते अधार्मिक होत. मृत्यु आल्या-मुळें डोळयांनीं पाहण्याची क्रिया ज्याची बंद झाली आहे, तसेंच ज्याची सर्व हालचाल नाहींशी झाली आहे, अशा प्राण्यासाठीं रडून तुम्ही काय करणार ?

असें त्या गृध्राचें भाषण ऐकतांच त्या दुःखाकुल बांधवांनीं बालकाला ज़मिनीवर ठेविलें आणि शोकग्रस्त होऊन ते सर्व रडत गृहाकडे जाण्यास निघाले. तेव्हां जंबुक पुनः त्यांना म्हणाला—

जंबुक—हा मृत्युलोक मोठा भयंकर आहे ! हा सर्व प्राण्यांचा विनाशक आहे ! येथें आप्तेष्टांचा वियोग होऊन आपलें जीवितहि अल्प असतें. कपट, असत्य, कटु व अप्रिय भाषण हीं सर्वत्र भरलेलीं असून दुःख आणि शोक हींच जिकडेतिकडे वृद्धीस आल्याचें दिसून येतें. हा मनुष्यलोक मला एक घटकाभरहि आवडत नाहीं. हाय हाय ! धिक्कार असो तुम्हांला ! त्या

गृध्राच्या बोलण्यावर विश्वास ठेवून मूर्खांसारखें सर्व पुत्रप्रेम विसरून व निःस्नेह होऊन त्याला टाकून कोठें चाललां ? पुत्रप्रेमानें तुमचीं अंतःकरणें दग्ध होऊन गेलीं आहेत. हे मनुष्यांनो, त्या मूर्ख पापी गृध्राचें भाषण ऐकून तुम्ही मागें फिरलांत हें काय ? सुखाच्या मागोमाग दुःख आणि दुःखाच्या मागोमाग सुख हें ठेवलेलेंच आहे. ह्या लोकीं सुख आणि दुःख ह्यांवाचून दुसरें कांहीं नाहीं. सर्वदा एकच कांहीं मिळणारें नाहीं. ह्या रूपसंपन्न व कुलाला भूषणभूत बालकाला येथें भूतलावर टाकून तुम्ही कोठें निघालांत ? हा रूप-यौवनसंपन्न व कांतीनें शोभणारा बालक अजून जीवंत आहे, असें मला वाटत आहे, यांत संशय नाहीं ! ह्याचा नाश झालेला नाहीं ? मनुष्यांनो, तुम्हांला खचीत सुखप्राप्ति होणार आहे ! पुत्रशोकानें संतप्त अशा तुम्हांलाच त्याच्याकरितां मृत्यु आल्यास योग्य होणार आहे ! ह्याच्यापासून आपणाला सुख होईल, ह्या बुद्धीनें त्याचें तुम्हीं आजपर्यंत सुखानें पालन केलें आणि आज मूर्खांसारखे त्याला टाकून कोठें चाललांत ?

भीष्म—हे राजा, याप्रमाणें धर्मविरोधी, परंतु प्रिय आणि मिथ्या भाषण करणाऱ्या त्या स्मशानवासी व रात्र केव्हां येईल, याची वाट पाहत राहणाऱ्या त्या कोल्ह्यानें आपल्या अमृतप्राय भाषणानें स्वकार्यार्थ त्यांचें मन पुनः बदलून टाकलें आणि ते तेथेंच बसून राहिले.

गृध्र—अहो, हा वनप्रदेश प्रेतांनीं भरलेला असून यक्ष आणि राक्षस यांची येथें वसति आहे. येथें घुबडांचा सारखा नाद भरून राहिला आहे. हा देश नील मेघांप्रमाणें दिसत असून घोर व भयंकर झाला आहे. तर आतां तुम्ही त्या प्रेताला जोंपर्यंत सूर्य अस्तास गेला नाहीं आणि जोंपर्यंत दिशा विमल आहेत, तोंपर्यंत त्याला येथें ठेवून प्रेतकार्य करूं लागा. हा पहा श्येन पक्ष्यांचा कठोर नाद सुरू झाला ! ही कोल्ह्यांची दारुण ओरड ऐका ! तसेंच हे सिंहहि गर्जना करूं लागले आहेत पहा ! कारण सूर्यास्त होऊं लागला आहे ! चितांच्या नीलवर्ण धूमानें हे वृक्षहि रंगून गेले आहेत आणि स्मशानांत त्या निराहार देवता मोठ्यानें गर्जना करीत आहेत. ह्या अत्यंत भयंकर देशामध्यें विक्राळ रूपाचे अनेक प्राणी आहेत. ते मांसाहारी तुम्हांला पाहतांच भिववून सोडतील. हा वनप्रदेश असा भयंकर असून तुमच्यावर

कांहींतरी संकटप्रसंग गुदरणार असें वाटत आहे. ह्या काष्ठासारख्या निर्जीव झालेल्या पुत्राचा त्याग करा आणि जंबुकाच्या त्या शब्दांकडे किमपि लक्ष्य देऊं नका. जर तुम्ही तीं निष्फल आणि असत्य अशीं जंबुकवाक्यें ऐकत येथें बसाल, तर ज्ञानभ्रष्ट होऊन तुम्हां सर्वांचाहि नाश मात्र होईल !

जंबुक—जोंपर्यंत सूर्य अस्तास गेला नाहीं, तोंपर्यंत येथें रहा, भिण्याचें कांहीं कारण नाहीं. सूर्य असेपर्यंत ह्या पुत्रासंबंधीं तुम्ही प्रेमानें वागा ! त्याजसंबंधीं तुम्ही स्वैरपणें शोक करा ! त्याला प्रेमपूर्वक पाहून घ्या ! सूर्य असेपर्यंत तुम्ही येथेंच रहा ! या मांसाहारी गृध्राच्या भाषणांनीं काय होणार आहे ! जर तुम्ही या गृध्राचीं तीव्र आणि मूर्खपणाचीं भाषणें ऐकून त्यां-प्रमाणें वागाल, तर मोहांत मात्र पडाल आणि पुत्राला मुकाल !

भीष्म—अशा रीतीनें सूर्य अस्ताला गेला, असें गृध्रानें म्हणावें आणि तो अस्ताला गेला नाहीं, असें जंबुकानें म्हणावें, असें सारखें चाललें होतें. आपल्या कार्याविषयीं तत्पर अशा त्या क्षुधा-तृषाक्रांत गृध्र-जंबुकांनीं त्या मृतबालकाच्या बांधवांना शास्त्रानुसार उपदेश केला. त्या त्यांच्या अमृततुल्य भाषणांनीं त्यांना एकदां तेथून जावेंसें वाटे, तर लगेच रहावेंसें वाटत असे. असे ते शोकसंतप्त होऊन तेथेंच दीनपणें रडत बसले आणि स्वकार्यकुशल असतां ते दोघे गृध्र-जंबुक आपापल्या नैपुण्यानें त्यांना भ्रमांत पाडीत होते.

( ३ ) याप्रमाणें ते दोघे शास्त्रकुशल वाद करीत आहेत व ते मृताचे बांधव सभोंवतीं बसून राहिले आहेत, इतक्यांत देवी पार्वतीच्या प्रेरणेवरून भगवान् शंकर तेथें प्रकट झाला. त्यावेळीं त्याचे डोळे करुणेनें पाण्यानें भरून आले होते. श्रीशंकर त्या मनुष्यांना म्हणाला, ‘ मी वरदायी शंकर आहें, तुम्हांला वाटेल तो वर मागा !’ तेव्हां ते सर्व दुःखी बांधव मोठ्या नम्रतेनें त्याच्यापुढें उभे राहिले आणि म्हणाले कीं, ‘ आमचा एकुलता एक मुलगा मृत झाला आहे, तो पुनः जीवंत व्हावा ! त्याला जीवदान दिल्यानें आम्हांलाहि जीवित दिल्यासारखें होणार आहे !’

असें त्यांचें भाषण ऐकून भगवान् शंकराचे डोळे पाण्यानें भरून आले आणि त्यानें त्या कुमाराला शंभर वर्षांचें आयुष्य दिलें. तसेंच त्या पिनाकी व प्राणिमात्राच्या हिताविषयीं तत्पर शंकरानें त्या गृध्र-जंबुकांनाहि ‘यापुढें तुम्हांला क्षुधा लागणार नाहीं,’ असा वर दिला. नंतर त्या सर्वांनीं मोठ्या

आनंदानें शंकराला प्रणाम केला आणि हर्षपूर्ण व कृतकृत्य होऊन तेथून निघून गेले. सर्वदा समाधानवृत्ति, दीर्घ निश्चय आणि परमेश्वरी कृपा यांच्या योगानें सत्वर फलप्राप्ति होत असते. हा दैवयोग, बांधवांची निश्चयबुद्धि आणि दीनपणें विलाप करणाऱ्या त्या बांधवांचें अश्रुप्रमार्जन पहा! अल्प कालांत निश्चयबुद्धीच्या योगानें शंकराची कृपा संपादन करून त्या दुःखितांनीं सुखप्राप्ति करून घेतली. हे भरतश्रेष्ठा, शंकराच्या प्रसादानें पुत्रप्राप्ति होऊन त्यांना मोठा विस्मय आणि आनंद झाला. नंतर हे राजा, पुत्रशोक टाकून व त्या बालकाला घेऊन मोठ्या आनंदानें त्यांनीं नगरांत प्रवेश केला. अशाप्रकारें चारहि वर्णांना योग्य असें हें ज्ञान सर्वांनीं घेण्यासारखें आहे. हे राजा, धर्म, अर्थ आणि मोक्ष यांनीं युक्त असलेला हा इतिहास तूं श्रवण कर. हा ऐकिल्यानें मनुष्याला इहलोकीं व परलोकीं सर्वदा आनंद प्राप्त होत असतो. १२. २. १५३.

## अध्याय १५४ वा.

[ १ दुर्बलानें बलाढ्याचा द्रोह केला आणि त्या दुर्बलावर बलिष्ठ चालून आला असतां त्यानें कसें वागावें असा युधिष्ठिरप्रश्न. २ भीष्माकडून शाल्मलिवृक्ष व वायु यांच्या कथेचा उपक्रम. ३ नारदाकडून शाल्मलिवृक्षाचें रमणीयत्ववर्णन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, बलाढ्य, उपकार किंवा अपकार करण्याविषयीं समर्थ, सर्वदा सज्ज अशा राजापुढें एखाद्या दुर्बल राजानें अज्ञानानें आपली प्रौढी मिरवून त्याचा द्रोह संपादन केला आणि तो राजा क्रोधाविष्ट होऊन त्याजवर चालून आला असतां आपल्याच बलाचा आश्रय करून त्यानें कसें वागावें!

( २ ) **भीष्म**—हे भरतश्रेष्ठा, यासंबंधीं शाल्मलिवृक्ष आणि वायु यांमधील एक पुरातन संवाद इतिहास म्हणून सांगत असतात. तो असा आहेः—हिमालय पर्वतावर एक मोठा शालमलिवृक्ष होता. त्याला हजारों वर्षें झालीं असून, खांद्या, स्कंध आणि पर्णें यांनीं तो भरगच्च भरलेला होता. हे महाबाहो, ह्या वृक्षाखालीं मदोन्मत्त गज व इतर पशु दमून जाऊन व श्रमपीडित होऊन विश्रांति घेत असत. त्या वृक्षाचा घेर चारशें हात असून छाया अत्यंत दाट होती. त्यावर सारिका, पोपट यांची सर्वदा वसति असून पुष्प-फलांनीं तो

नित्य भरून गेलेला होता. व्यापाऱ्यांचे तांडे, वणिग्जन, तपस्वी आणि दुसरे वनवासी लोक रस्त्यानें जातांना त्या अत्यंत रमणीय वृक्षाखालीं वास्तव्य करीत असत.

( ३ ) हे भरतश्रेष्ठा, एकदां नारदमुनि तेथें आला आणि त्याच्या विपुल शाखा आणि बुंध पाहून तो आश्चर्यचकित होऊन त्याला म्हणाला, 'हे शाल्मले वृक्षा, काय तुझें हें रमणीयत्व ? तूं किती मनोहर आहेस, म्हणून सांगूं ? तरुश्रेष्ठा शाल्मले, तुला पाहून मला अतिआनंद होत आहे ! बा मनोहर वृक्षा, अनेक मनोरम पक्षी, हरिणें आणि गज हे मोठ्या आनंदानें येऊन तुझ्या छायेखालीं राहत असतात. तुझे विपुल स्कंधप्रदेश आणि मोठमोठ्या खांद्या कितीहि जोराचा वायु सुटला, तरी त्याच्या योगानें भग्न झालेल्या मला दिसत नाहींत. तरी तो वायु तुझा मित्र आहे किंवा त्याचें तुजवर प्रेम आहे काय, कीं जेणेंकरून तो या वनांत तुझें सदा रक्षण करितो ? भगवान् वायु हा सर्व लहानमोठ्या वृक्षांना समूळ उपटून टाकितो; तसेंच तो वेगवान् पर्वतांचीं शिखरेंहि हालवून सोडतो; तो शुचिर्भूत वायु वाहूं लागला म्हणजे पाताळ, सरोवरें, नद्या आणि समुद्र या सर्वांना सुकवून सोडतो. यावरून हा वायु तुजवरील स्नेहामुळेंच तुझें संरक्षण करीत आहे, यांत संशय नाहीं. त्यामुळेंच तुला अनेक शाखा असून पत्र-पुष्पांनींहि तूं तसाच भरून गेला आहेस. हे वनस्पते, हे सारे पक्षी मोठ्या आनंदानें तुझ्यावर रममाण होऊन राहिले आहेत. ही तुझी रमणीयता किती म्हणून सांगावी ? तुझा पुष्पें उत्पन्न होण्याचा काल आला असतां ह्या समस्त पक्ष्यांचे मधुर स्वर वेगवेगळे ऐकूं येतात. तसेंच हे शाल्मले, हे अनेक कळपांनीं शोभणारे गज घर्मार्त होऊन तुजपाशीं गर्जना करीत येतात आणि तुझ्या छायेखालीं आनंद पावतात. दुसऱ्याहि पशूंच्या जाति तुझ्या आश्रयाखालीं येऊन राहतात. त्यांच्या योगानेंहि तुला शोभा येते. हे वृक्षा, तुझ्या आश्रयानें सर्वच प्राणी राहत असल्यामुळें तूं मेरुपर्वता-प्रमाणें शोभत आहेस.' ब्राह्मण, तपस्वी, सिद्ध, श्रमण इत्यादिकांनीं तुझा आश्रय केल्यामुळें हें तुझें स्थान मला केवळ स्वर्गसमान वाटत आहे. १२. २. १५४.

---

## अध्याय १५५ वा.

[ १ पर्वतादिकांनाहि उपटून टाकण्याचें सामर्थ्य वायूमध्यें असून तो तुझ्या शाखांचें रक्षण करितो. याचें कारण काय म्हणून शाल्मलीला नारदप्रश्न. २ आपल्या शाखांचा भंग करण्याचें सामर्थ्य वायूमध्यें नाहीं, असें वायुनिर्भर्त्सनापूर्वक शाल्मलीचें कथन. ]

( १ ) **नारद**—हे शाल्मले, तुझ्या बंधुत्वामुळें अथवा सख्यामुळें हा सर्वसंचारी भयंकर वायु तुझें पालन करीत असला पाहिजे, यांत संशय नाहीं. शाल्मले, तूं वायूपुढें अगदीं नम्र होऊन 'मी तुझाच आहें' असें म्हणून सर्वदा राहतोस, त्यामुळेंच तो तुझें रक्षण करीत आहे. या पृथ्वीवर वायूच्या बलानें भग्न होऊन गेला नाहीं, असा एकहि वृक्ष किंवा पर्वत, तसेंच एकादें गृहहि सांपडणार नाहीं. परंतु हे शाल्मले, तुला तुझ्या परिवारासह कांहीं ना कांहीं कारणामुळें हा वायु रक्षण करीत आहे आणि म्हणूनच तूं असा निर्भय होऊन राहिला आहेस.

( २ ) **शाल्मलि**—हे ब्रह्मन्, वायु माझा मित्र नाहीं, बंधु नाहीं किंवा सुहृदहि नाहीं. तसाच तो ब्रह्मदेवहि नाहीं, कीं त्यानें माझें रक्षण करावें! हे नारदा, माझें तेज आणि माझें बल हीं वायूपेक्षां भयंकर आहेत. माझ्या सामर्थ्याच्या अठराव्या हिश्शानेंहि वायूच्या अंगीं सामर्थ्य नाहीं. वृक्ष, पर्वत किंवा दुसरेंहि जें कांहीं त्याच्या मार्गांत येईल, त्याचा भंग जरी वायु करितो, तथापि माझ्यापुढें त्याचें कांहीं चालत नाहीं. कितीहि सोसाट्यानें तो आला, तथापि माझ्या सामर्थ्यानें मी त्याचा प्रतिबंध करीत असतों. सर्वांचा भंग करणाऱ्या त्या वायूचा मी अनेकदां भंग केला आहे. म्हणून हे देवर्षे, तो वायु क्रुद्ध झाला तरी त्याची भीति मला वाटत नाहीं.

**नारद**—हे शाल्मले, तुझी दृष्टि फिरली आहे, यांत संशय नाहीं. वायूच्या बरोबरीचें सामर्थ्य कोणत्याहि प्राण्याचे अंगीं नाहीं. इंद्र, यम, कुबेर, जलेश्वर वरुण यांसारखे देवहि वायूशीं बरोबरी करूं शकणार नाहींत. मग हे वनस्पते, तुझी ती कथा तेथें काय? भगवान् वायु हा सर्वांचें चलन व प्राणधारण करणारा असल्यामुळें हे शाल्मले, ह्या पृथ्वीतलावर प्राण्याचे हातून जे कांहीं व्यापार होत असतात, ते सर्व ह्या वायूच्याच योगानें होत असतात. हा योग्य प्रमाणांत वाहत असतो, तेव्हां सर्व प्राण्यांचे व्यवहार उत्तम चालत

असतात; परंतु ह्या अयोग्य प्रकारें वाढूं लागल्यास त्यांचे ते सर्व व्यापार उध्वस्त होतात! सर्व बलसंपन्नांमध्यें जो श्रेष्ठ त्या पूज्य वायूचा तूं मान ठेवीत नाहींस, तेव्हां तुझ्या क्षुद्र बुद्धीला म्हणावें तरी काय? हे शाल्मले, तुझ्या अंगांत कोणत्याच प्रकारची शक्ति नसून तुला बुद्धिहि नाहीं, म्हणून तूं अशी बडबड चालविली आहेस. तूं क्रोधादिकांनीं व्याप्त होऊन तूं हें मिथ्या भाषण करण्यास प्रवृत्त झाला आहेस. तुझ्या ह्या बोलण्यानें माझाहि तुजवर कोप झाला आहे. म्हणून मी स्वतः जाऊन तुझें हें दुर्भाषण वायूला सांगतों. हे दुर्बुद्धे, चंदन, स्यंदन, शाल, सरल, देवदारु, वेत यांसारख्या बलवत्तर वृक्षांना सुद्धां वायूचें बल काय आहे व आपलें बल काय आहे हें उत्तम समजतें. त्या शहाण्यांनीं वायूची अशाप्रकारें कधींहि निंदा केली नाहीं. ते तरु-श्रेष्ठ वायूपुढें सर्वदा नमतात. परंतु तूं मात्र अज्ञानानें वायूचें बल किती अमर्याद स्वरूपाचें आहे, तें जाणत नाहींस. म्हणूनच आतां मी त्या वायूजवळ जातों व त्याला सर्व सांगतों. १२. २. १५५.

---

## अध्याय १५६ वा.

[ १ नारदाच्या सांगण्यावरून शाल्मलीचा भंग करीन अशी वायूची प्रतिज्ञा. २ बुद्धिबळाचा अवलंब करून मी उद्यां वायूची प्रतिज्ञा खोटी करीन, असा शाल्मलीचा निश्चय. ]

( १ ) भीष्म—राजश्रेष्ठ युधिष्ठिरा, तो ब्रह्मज्ञश्रेष्ठ नारदमुनि त्या शाल्मलीला असें सांगून वायूकडे गेला आणि त्यानें शाल्मलीचें सर्व भाषण त्या वायूला सांगितलें.

नारद—हे वायो, हिमाचलाच्या पृष्ठभागावर एक शाल्मलि वृक्ष आपल्या परिवारासह राहत असून तो तुझी सर्वदा निंदा करीत असतो. त्याचें मूळ मोठें असून त्याची छायाहि पुष्कळ आहे. जी त्यानें तुझी निंदा केली, ती तुजपुढें समग्र सांगणें अयोग्य आहे. तूं सर्व बलवंतांमध्यें श्रेष्ठ असून अत्यंत थोर आणि तुझा क्रोध म्हटला म्हणजे प्रत्यक्ष यमधर्मासारखा आहे.

भीष्म—हें नारदाचें भाषण ऐकून तो वायु शाल्मलीकडे गेला आणि क्रोधाविष्ट होऊन त्याला बोलला—

वायु—हे शाल्मले, नारदमुनि तुजकडे गेला असतां तूं माझी निंदा केलीस. मी वायु असून माझा प्रभाव आणि बल हीं केवढीं आहेत, तें तुला मी दाखवितों! हे वृक्षा, मी तुला चांगला ओळखतों, तुझी मला पूर्ण माहिती आहे. सृष्टि उत्पन्न करण्याचे वेळीं पितामह प्रभु ब्रह्मदेवानें तुझ्यावर विश्रांति घेतली होती, त्यामुळें आजवर मीं तुझ्यावर कृपा केली. हे नीच वृक्षा, त्याचमुळें तुझें रक्षण होत आहे, तुझ्या वीर्यामुळें नव्हे. तूं एखाद्या सामान्याप्रमाणें मला समजून माझी निंदा केलीस, त्याअर्थीं माझें बल केवढें आहे, हें तुला मी आतां दाखवितों.

(२) भीष्म—वायूचें हें भाषण ऐकून शाल्मलि हंसत हंसत म्हणाला, 'वायो, तूं मजवर रागावला आहेस, तरी तूं आपलें स्वरूप मला दाखव पाहूं! तूं मजवर क्रोध करणें बरोबर नाहीं, तूं रागावून माझें काय करणार आहेस? हे वायो, तूं जरी सामर्थ्यवान् आहेस, तथापि मला तुझी यत्किंचित्‌हि भीति वाटत नाहीं. माझें बल तुझ्यापेक्षां अधिक आहे, म्हणून तुला मीं भिणें योग्य नाहीं. जे बुद्धीनें श्रेष्ठ आहेत तेच जगांत खरे बलवंत होत. ज्यांचें शरीरसामर्थ्य थोर आहे, ते बलवान् नव्हेत, असें विद्वानांचें मत आहे.

शाल्मलीचें हें भाषण ऐकून 'माझें तेज तुला उद्यां दाखवितों,' असें वायु म्हणाला. इतक्यांत रात्र पडली. इकडे त्या शाल्मलीला वायूचें सामर्थ्य आपल्यापेक्षां जास्त असून त्यानें केलेली प्रतिज्ञा खरी होणार आणि वायूच्या तोडीचा आपण खास नाहीं, अशी खात्री पटली. तो म्हणाला, 'आपण नारदाकडे केलेलें भाषण खोटें आहे. वायूपेक्षां मी खरोखरच असमर्थ असून तो मजपेक्षां बलानें अधिक आहे. वायु हा सर्वांपेक्षां बलवान् आहे, म्हणून नारदानें जें सांगितलें तेंच बरोबर आहे. दुसऱ्याहि वृक्षांपेक्षां मी कमी बलवान् आहें, यांत संशय नाहीं. परंतु बुद्धिमत्तेचा विचार केला असतां माझ्याइतका दुसरा कोणीहि वृक्ष नाहीं. तर आतां त्या बुद्धीचा आश्रय करून मी वायुसंबंधीं भीति सोडून देईन. माझ्या बुद्धीचा इतरहि वृक्ष जर आश्रय करून राहतील तर, तेहि या वायूच्या तडाक्यांतून निःसंशय सुटतील. ते मूर्ख असल्यामुळें वायु क्रुद्ध होऊन आपला नाश कसा करितो, हें पाहण्याचें ज्ञान मजप्रमाणें त्यांना नसतें. १२. २. १५६.

---

## अध्याय १५७ वा.

[ १ प्रातःकाळीं येऊन वायु पाहतो, तों शाखा-स्कंध-पर्णरहित शाल्मलिवृक्ष त्याच्या नजरेस पडला. २ अत्यंत बलाढ्याशीं मूर्खानें कधीं वैर करूं नये, म्हणून भीष्माचा युधिष्ठिरास उपदेश. ]

( १ ) भीष्म—शाल्मलीनें मनाचा निश्चय करून स्वतःच मोठ्या क्रोधानें आपल्या शाखा, प्रशाखा आणि स्कंध यांना तोडून टाकिलें. असा शाखा, पत्रें आणि फुलें यांचा त्याग केल्यानंतर प्रभातकाळीं वायु येतांना त्याच्या दृष्टीस पडला. वायु क्रुद्ध होऊन महावृक्षांना उपटून टाकीत व मोठ्यानें सुसकारे देत जेथें तो शाल्मलि होता, त्या ठिकाणीं आला. येऊन पहातो तों पर्णें गळून पडलीं आहेत, मोठमोठ्या शाखा मोडून पडल्या आहेत आणि पुष्पांचा नाश झाला आहे, असें पाहून तों हंसतहंसत आनंदानें त्या शाल्मलीला म्हणाला—

वायु—हे शाल्मले, तूं क्रोधवश होऊन व आपल्या शाखा स्वतःच तोडून जी ही दुःखदायक दशा आपणावर ओढून आणली आहेस, तशी तुझी स्थिति मीच क्रोधानें करणार होतों. पुष्पें, शेंडे, अंकुर, पानें यांना तूं आपल्या कुत्सित विचारांनींच मुकला असून आतां माझ्या वीर्याच्या स्वाधीन झाला आहेस !

( २ ) भीष्म—हें वायूचें बोलणें ऐकून तो शाल्मलि अतिलज्जित झाला आणि पूर्वीं नारदानें म्हटलें होतें, त्याची आठवण होऊन त्याला मोठा पश्चात्ताप झाला. हे राजश्रेष्ठा, अशाप्रकारें जे स्वतः दुर्बल असून बलवंतांशीं वैर करूं पाहतात, त्यांना ह्या मूर्ख शाल्मलीप्रमाणें पश्चात्ताप होतो. म्हणून दुर्बलानें बलवानाशीं कधींहि वैर करूं नये. त्यानें बलवंताशीं वैर केल्यास पुढें शाल्मलीप्रमाणें शोक करण्याचा प्रसंग येईल. महात्मे लोक आपला अपकार करणाऱ्यावर एकाएकीं आपलें वैर दाखवीत नसतात. तर ते आपलें सामर्थ्य हळूहळू शत्रूच्या प्रत्ययाला आणीत असतात. मूर्ख मनुष्यानें बुद्धिमंताशीं कधींहि वैरभाव धरूं नये. कारण बुद्धिवानाची बुद्धि ही तृणाचा उच्छेद करणाऱ्या अग्नीप्रमाणें त्या मूर्खांचा नाश केल्याशिवाय रहात नाहीं. हे राजा, मनुष्याला बुद्धीसारखें श्रेष्ठ दुसरें कांहीं नाहीं. त्याचप्रमाणें हे राजेंद्रा, आपल्या बलाशीं समबल असाहि दुसरा कोणी पुरुष येथें दिसून नाहीं. म्हणून बाल, मूर्ख,

अंध आणि बहिरे यांना क्षमा करावी आणि आपल्यापेक्षां जे बलानें अधिक असतील, त्यांचेहि अपराध निमूटपणें सहन करावे. हे राजा, तुझें वर्तन अशाच प्रकारचें आहे. अठरा अक्षौहिणी सैन्य मिळूनहि बलामध्यें त्या महात्म्या अर्जुनाची बरोबरी करणारें नव्हतें. त्या यशस्वी अर्जुनानें रणभूमीवर आपल्या बलाच्या जोरावर अनेक वीरांना मारलें आहे व अनेकांना पराजित करून सोडलें आहे. हे भारता, तुला राजधर्म, तसेंच आपद्धर्महि विस्तारपूर्वक सांगितले आहेत. आतां ह्यापुढें आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे ? १२. २. १५७.

---

## अध्याय १५८ वा.

[ १ पापाचें अधिष्ठान कोणतें, असा युधिष्ठिरप्रश्न. २ प्रवृत्ति लोभापासूनच होय, असें भीष्माचें उत्तर. ३ शिष्टलक्षण. ]

( १ ) युधिष्ठिर—हे भरतर्षभा, पापाचें अधिष्ठान कोणतें, तसेंच पापाची प्रवृत्ति कशापासून होत असते, हें तुजपासून नीट ऐकावें, अशी माझी इच्छा आहे.

( २ ) भीष्म— हे नराधिपा, पापाचें अधिष्ठान कोणतें आहे, तें सांगतों, ऐक. एकटा लोभ हा मोठ्या मकराप्रमाणें आहे. लोभापासूनच पापाची प्रवृत्ति होत असते. ह्या लोभापासून पाप व अधर्म घडत असून ह्यापासूनच अत्यंत दुःख होत असतें. कपटाचें मूळ हाच लोभ आहे. याच्याचमुळें लोकांचीं मनें पापप्रवृत्त होत असतात. लोभापासून क्रोध उत्पन्न होतो, लोभापासून कामोत्पत्ति होते, लोभापासूनच माया, अभिमान, ताठा, हे उत्पन्न होतात. त्याच्यामुळें मनुष्याच्या प्राणावरहि कधीं कधीं येत असतें. असहनशीलता, लज्जात्याग, संपत्तिविनाश, धर्मक्षय, चिंता आणि अपकीर्ति या सर्वांची प्रवृत्ति लोभापासूनच होत असते. कंजूषपणा, अतितृष्णा, सर्व पापक्रिया, कुल, विद्या, रूप, ऐश्वर्य ह्यांविषयीं मद, सर्व भूतांसंबंधीं द्रोहबुद्धि, सर्वांविषयीं तिरस्कारभाव आणि अविश्वास इत्यादि दुर्गुणांची उत्पत्ति लोभापासूनच आहे. सर्व प्रकारचीं साहसें आणि दुष्कर्में हींहि लोभापासूनच होत असतात. जन्मकाळीं, बालपणीं, कौमार्यावस्थेंत, तारुण्यांत केव्हांहि लोभ जडो, एकदां जडला म्हणजे तो कधींहि सुटत

नसतो. हे कुरुकुलश्रेष्ठा, मनुष्य कितीहि क्षीण झाला, तरी लोभ क्षीण होत नसतो. पुष्कळ पाण्याच्या अनेक नद्या आल्या, तरीहि ज्याप्रमाणें समुद्राची कधींहि तृप्ति होत नाहीं, त्याप्रमाणें लोभी मनुष्याची कितीहि भर केली तरी त्याचें समाधान होत नाहीं. वासनातृप्तीनेंहि त्याची शांति होत नाहीं. त्याचें ज्ञान देव, गंधर्व, असुर, मोठमोठे सर्प किंवा प्राणिसमूह ह्यांना होत नाहीं. या लोभाला आणि मोहाला आत्मनिग्रही मनुष्यानें जिंकावें.

हे कुरुकुलोत्पन्ना, दंभ, द्रोह, निंदा, पिशुनता आणि मत्सर हे दुर्गुण ज्यांनीं आत्मसंयमन केलें नाहीं, अशा लोभ्यांच्याच ठिकाणीं दिसून येतात. अल्पबुद्धीचे लोक मोठमोठ्या शास्त्रांत प्रवीण असले, बहुश्रुत असले किंवा लोकांच्या शंका दूर करण्याची शक्तिहि त्यांच्या अंगीं असली, तरी ह्या लोभाच्या पायीं दुःख पावतात. ते द्वेष आणि क्रोध यांनीं भरलेले, शिष्टाचार सोडलेले, मनानें क्रूर, परंतु वाणीनें मधुर असतात. ते तृणाच्छादित विहिरीप्रमाणें बाहेरून सुंदर परंतु आंतून भयंकर असतात. धर्माचें मिष करून हे क्षुद्र लोक धर्मध्वजा उभारून जगताला लुबाडीत असतात आणि नानाप्रकारचे पंथ स्थापितात. स्वार्थाचा आश्रय करून लोकांना आवडेल अशीं नानातत्त्वें काढून हे सन्मार्गाचा नाश करितात. हे लोभग्रस्त दुरात्मे धर्माचा लोप करूं लागले असतां पूर्वींच्या संस्थांचें रूपांतर होतें आणि मग त्या संस्था नवीन स्वरूपांत चालूं लागतात. दर्प, क्रोध, मद, निद्रालू-पणा, हर्ष, शोक आणि अत्यंत मानीपणा हे गुण लोभी मनुष्याचे ठिकाणीं दिसून येतात. हे अशिष्ट लोक सर्वदा लोभग्रस्त असतात, हें तूं ध्यानांत ठेव. आतां शुद्धशील शिष्ट कसे जाणावे, असें तूं विचारलें आहेस, तर ते पुरुष कसे असतात, तें तुला सांगतों.

( ३ ) ज्यांना पुनर्जन्माची किंवा परलोकाची किमपिहि भीति नसते, कोणत्याहि आमिषानें ज्यांची वृत्ति कधीं ढळत नाहीं, कोणाचेंहि प्रिय किंवा अप्रिय करण्याकडे ज्यांची मनःप्रवृत्ति नसते, ज्यांना सर्वदा शिष्टाचारच मान्य असतो, आत्मनिग्रह ज्यांचे ठिकाणीं सर्वदा आढळून येतो, ज्यांना सुखदुःखांची सारखीच किंमत वाटत असते, ज्यांचा सत्य हाच मोठा आधार असतो, जे सर्वदा दानशील असतात, जे प्रतिग्रह कधींहि घेत नाहींत, जे दयाशील असतात, पितर, देव आणि अतिथि यांचें पूजन करण्यांत जे नित्य तत्पर

असतात, जे नेहमीं उद्योगरत असून सर्वांवर उपकार करणारे असतात, जे सर्व धर्मांचें पालन करणारे, तसेंच सर्व प्राण्यांचे हिताविषयीं तत्पर असतात जे प्रसंगीं सर्वस्वहि अर्पण करण्यास तयार असतात, तेच हे भारता, शिष्ट होत. सदैव धर्मक्रिया करीत असतां त्यांना त्यांपासून कोणीहि परावृत्त करूं शकणार नाहीं. पूर्वीच्या सत्पुरुषांच्या वर्तनाचाच अवलंब करून ते वागत असतात, त्यापासून ते यत्किंचितहि ढळत नसतात. ते कोणाला त्रास देत नाहींत. त्यांची वृत्ति चंचलपणाची कधींहि नसते. ते केव्हांहि उग्रपणा धारण करीत नाहींत, तर सर्वदा सन्मार्गानें जाणारे असतात. त्यांचें साधुजन सर्वदा सेवन करीत असतात. त्यांच्या ठिकाणीं अहिंसा सदा वसत असते. कामक्रोध, ममत्व, अहंकार ह्यांचा त्यांनीं त्याग केलेला असतो. ते सुव्रती असून धर्ममर्यादेचें कधींहि उल्लंघन करीत नाहींत. त्यांच्या धर्मक्रिया किंवा शरीरक्रिया पैशासाठीं किंवा कीर्तीसाठीं नसतात. युधिष्ठिरा, तूं त्यांची उपासना कर आणि जें कांहीं विचारावयाचें असेल, तें त्यांनाच विचार. भय, क्रोध, चापल्य किंवा शोक ह्यांपैकीं कांहींहि त्यांच्या ठिकाणीं नसतें. ते धर्माचें अवडंबर कधीं माजवीत नाहींत. त्यांच्यापाशीं गुप्त म्हणून कांहींच नसतें. त्यांच्या ठिकाणीं लोभ व मोह हे मुळींच नसून ते सत्यानें आणि सरळपणें वागणारे असतात. हे कौंतेया, ज्यांचा बुद्धिभ्रंश होत नाहीं, त्यांच्याच ठिकाणीं तूं प्रेम कर. ज्यांना लाभ झाला असतां मुळींच आनंद होत नाहीं किंवा नुकसान झालें असतांहि व्यथा होत नाहीं; ज्यांना ममत्व, अहंकार हीं नसतात; जे सत्त्ववृत्तीचे असून समदर्शी असतात; सात्विक मार्गानें जाणारे असून ज्यांस लाभालाभ, सुखदुःख, नित्यानित्य, मरण आणि जीवित हीं सारखींच वाटत असतात, त्या धर्मप्रिय व महानुभावी लोकांचा तूं आत्मनिग्रह करून मोठ्या काळजीपूर्वक बहुमान करीत जा. हे कल्याणा, हे सर्व लोक गुणवंत असून बाकीचे सर्व दुष्कर्मी व केवळ वाक्प्रलाप करणारे असतात. १२. २. १५८.

---

## अध्याय १५९ वा.

[ १ अज्ञानमहत्त्वकथन. २ अज्ञान आणि अतिलोभ हे एकच आहेत. ]

( १ ) युधिष्ठिर— हे पितामहा, लोभ हा सर्व अनर्थांचें अधिष्ठान असल्याचें सांगितलें आहे. आतां अज्ञानाचें स्वरूप कशाप्रकारचें असतें, तें सर्व ऐकण्याची माझी इच्छा आहे.

भीष्म— जो अज्ञानानें पाप करितो आणि त्यामुळें होणारा आपला क्षय ज्याच्या लक्ष्यांत येत नाहीं, जो साधुशील लोकांचा द्वेष करितो तो लोकनिंदेला पात्र होतो. अज्ञानाचे योगानें मनुष्य नरकाला जातो, अज्ञानानें मनुष्याला दुर्गतीची प्राप्ति होत असते, अज्ञानानें मनुष्य क्लेश भोगीत असतो आणि अज्ञानानेंच मनुष्यावर संकटें येत असतात.

युधिष्ठिर— हे पार्थिवा, अज्ञानाची प्रवृत्ति, त्याचें स्थान, वृद्धि, क्षय, मूळ, प्राप्ति, गति, काळ, कारण आणि हेतु हीं यथावत् तुझ्यापासून श्रवण करावीं, अशी माझी फार इच्छा आहे. कारण, मनुष्याला जें दुःख होत असतें, तें सर्व अज्ञानजन्यच होय.

(२) भीष्म—प्रेम, द्वेष, मोह, हर्ष, शोक, अभिमान, काम, क्रोध, दर्प, तंद्री, आळस, इच्छा, ताप दुसऱ्याच्या अभ्युदयानें होणारा संताप आणि इतर पापक्रिया यांनाच अज्ञान म्हटलें आहे. हे महाराजा, या अज्ञानाची प्रवृत्ति, वृद्धि यासंबंधी तूं विचारीत आहेस, तर विस्तारानें तेंच सांगतों, नीट ऐक. हे राजा, अज्ञान आणि अतिलोभ हे एकच असून या दोघांचें फल सारखेंच आहे. तसेंच दोघांचे दोषहि सारखेच आहेत. अज्ञानाची उत्पत्ति लोभापासून होते आणि लोभाबरोबरच अज्ञानाची वृद्धि व क्षय होतो. लोभाबरोबर त्याच्या दुःखसंतापमोहादि विविध अवस्था उत्पन्न होतात. लोभाचें मूळ मोह हें असून कालाचेंहि मूळ तोच आहे. लोभ छिन्नभिन्न होण्याला देखील काल हाच कारण होत असतो. या कालाच्या अज्ञानामुळेंच लोभ उत्पन्न होतो व लोभामुळें अज्ञान उत्पन्न होतें. सर्व दोष या लोभापासूनच उत्पन्न होत असतात. म्हणून लोभाचा त्याग करावा. जनक, युवनाश्व, वृषादर्भि, प्रसेनजित् तसे अन्यहि राजे हे लोभनाशामुळेंच स्वर्गाला गेले. ह्या लोभाचें फळ प्रत्यक्ष असल्यामुळें हे कुरुश्रेष्ठा, तूं त्या लोभाचा मनःपूर्वक त्याग कर. लोभाला टाकून दिल्यानेंच तुला या लोकीं आणि परलोकींहि सुखाची प्राप्ति होईल. १२. २. १५९.

---

## अध्याय १६० वा.

[ १ आत्मनिग्रहप्रशंसा. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, वेदाध्ययनांत ज्यानें बराच काळ घालविल्यामुळें ज्याच्या मनांत धर्मवासना उत्पन्न झाली आहे, त्यानें इहलोकीं कसें

वागावें कीं जेणेंकरून त्याचें कल्याण होईल? हे पितामहा, धर्माचे मार्ग अनेक लोकांमध्यें अनेक आहेत, तरी त्यांत जो इह-परलोकीं श्रेयस्कर असा तुला वाटत असेल, तो तूं मला सांग. हा धर्ममार्ग मोठा असून हे भारता, त्याच्या शाखाहि पुष्कळ आहेत. तर ह्यांपैकीं कोणता धर्ममार्ग मीं आदरावा असें तुझें मत आहे? हे राजा, ज्याला अनंत शाखा आहेत, अशा त्या महाधर्माचें जें मुख्य मूल, तें मला कथन कर.

भीष्म—अरे, तुला मी आतां तें सर्व सांगतों. त्याच्या योगानें तुझें कल्याण होईल. अमृतप्राशनानें जशी तृप्ति होते, त्याप्रमाणें ह्या ज्ञानानें प्राज्ञ अशा तुझें समाधान होईल. धर्माचे जे अनेक विधि निरनिराळ्या ऋषींनीं आपापल्या ज्ञानानुसार सांगितले आहेत, त्या सर्वांना दम-आत्मनिग्रह-हाच आधार आहे. निश्चितज्ञानी अशा वृद्धांनीं ह्या आत्मनिग्रहालाच मोक्ष म्हटलें आहे. विशेषेंकरून आत्मनिग्रह हा ब्राह्मणांचा सनातन धर्म आहे. ह्या आत्मनिग्रहाच्याच योगानें ब्राह्मणांची क्रियासिद्धि होत असते. आत्मनिग्रह हा दान, यज्ञ आणि वेदाध्ययन यांहून अधिक आहे. ह्याच्या योगानें तेजाची अभिवृद्धि होत असते. आत्मनिग्रह हा परम पवित्र आहे. पुरुष आत्मनि-ग्रहाच्या योगानें पापमुक्त होऊन तेजस्वी बनतो. त्याच्या योगानें तो परब्रह्मालाहि पोंचतो. आत्मनिग्रहासारखा श्रेष्ठ धर्म त्रिभुवनांतहि कोठें नाहीं, असें आमच्या ऐकण्यांत आहे. सर्व धार्मिकांचा आत्मनिग्रह हाच श्रेष्ठ व प्रशस्त धर्म होय. ह्याच्या योगानें मनुष्याला इह-परलोकीं सुखप्राप्ति होत असते. आत्मनिग्रही मनुष्य परम धर्मसंपन्न होत असतो. त्याला सुखानें निद्रा घेतां येते, तो सुखानें जागृत होतो, तो लोकव्यवहार सुखानें करितो आणि त्याचें मनहि सर्वदा प्रसन्न असतें.

आतां जो मनुष्य आत्मनिग्रही नाहीं, त्याला वारंवार क्लेश भोगावे लागतात आणि त्याच्याच दोषामुळें दुसरेहि अनेक प्रकारचे अनर्थ उत्पन्न होतात. चारी आश्रमांना उत्तम व्रत म्हटलें म्हणजे आत्मनिग्रह हेंच होय. आतां त्या दमाचीं—आत्मनिग्रहाचीं—लक्षणें सांगतों. त्या सर्वांचा समुदाय म्हणजेच दम होय. क्षमा, धृति, अहिंसा, समता, सत्य, सरलता, इंद्रियजय, दक्षता, मृदुपणा, लज्जा, स्थैर्य, दानशीलत्व, विचारस्थिरता, संतोष, गोड भाषण, अविहिंसा आणि अनसूया या सर्वांच्या समुदायाला आत्मनिग्रह म्हणतात. तसाच

आत्मनिग्रही मनुष्य गुरूंचा सर्वदा सत्कार करितो आणि सर्वांवर दया करितो. दुष्टता, लोकनिंदा, खोटें भाषण, स्तुति, निंदा, काम, क्रोध, लोभ, दर्प, उद्धटपणा, आत्मस्तुति, रोष, ईर्ष्या आणि अपमान ह्या गोष्टी आत्मसंयमी मनुष्याच्या ठिकाणीं कधींहि आढळावयाच्या नाहींत. आत्मसंयमी मनुष्याची निंदा कोठेंहि होत नाहीं, त्याला कशाचीहि इच्छा नसते, ब्रह्मलोकाच्या लाभानेंहि त्याची तृप्ति होत नाहीं. तो कोणाचाहि मत्सर करीत नाहीं. समुद्राप्रमाणें त्याचें कशानेंहि समाधान होत नाहीं. मी तुझा आहें, तूं माझा आहेस, ते माझे आहेत, तसा मीहि त्यांचा आहें, अशाप्रकारचें द्वैतमूलक ज्ञान आत्मनिग्रही मनुष्याला लागत नाहीं. सर्व ग्राम्य किंवा वन्य प्रवृत्तींपासून वेगळा राहून निंदा किंवा स्तुति यांचा तो कधीं आश्रय करीत नाहीं. त्यामुळें त्याची मुक्तता होते. तो सर्वांशीं मित्रत्वानें वागतो. तसाच तो शीलवान्‌हि असतो. तो सर्वदा प्रसन्नचित्त असून आत्मज्ञानानें सर्वसंगांपासून मुक्त झालेला असतो. त्यामुळें त्याला परलोकीं मोठें फल मिळत असतें. सदाचारी, शीलवान्, प्रसन्नात्मा आणि आत्मज्ञानी अशा विद्वानाचा ह्या लोकीं उत्तम सत्कार होऊन पुढेंहि त्याला सद्गति मिळते. ह्या लोकीं जें कांहीं शुभ कर्म आहे आणि ज्याचें आचरण आजवर सज्जन करीत आले आहेत, तें हा ज्ञानसंपन्न मुनि कधींहि सोडीत नसतो. गृहस्थाश्रमानंतर वानप्रस्थाश्रम स्वीकारून जो ज्ञानी इंद्रियांचा निग्रह करून याप्रमाणें कालाची वाट पाहत राहतो, त्याला ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति होते. त्याला कोणाहि प्राण्यापासून भीति नसते व त्यापासून कोणाहि प्राण्याला भय नसतें. हा आपल्या देहापासून सर्वदा मुक्त असल्यामुळें ह्याला कोठूनच भीति नसते. तो कर्मांचा भोगानें क्षय करीत असतो, त्यांचा संग्रह कधीं करीत नसतो. सर्व भूतांचे ठिकाणीं समदृष्टि ठेवून त्यांना अभयदान देतो.

ज्याप्रमाणें आकाशांतील पक्ष्यांची किंवा जलांतील जलचर प्राण्यांची गति मनुष्याला दिसत नाहीं, त्याप्रमाणें या आत्मनिग्रही लोकांचा क्रम कोणालाहि निःसंशय कळत नसतो. हे राजा, गृहदारादि सोडून जो केवळ मोक्षाकडे नजर ठेवून राहतो, त्याला चिरकाल तेजोमय लोकांची प्राप्ति होत असते. जो सर्व कर्मांचा, विधिवत् आचरण केलेल्या तपाचा, विविध विद्यांचा, इतकेंच नव्हे, तर सर्व गोष्टी सकाम बुद्धीनें करण्याचा त्याग करितो, तो सत्यकाम, प्रसन्नचित्त, आत्मवेत्ता आणि शुचि पुरुष ह्या लोकीं सत्कार

पावून अंतीं स्वर्ग मिळवितो. मुनिजनांना तपानें मिळणारें असें जें गुप्त ब्रह्मलोकाख्य स्थान, त्याची प्राप्ति आत्मनिग्रहानें होत असते. ज्ञानाच्या ठिकाणीं रममाण झालेला, ज्ञानी, सर्व भूतांशीं विरोध टाकून वागणारा, अशा पुरुषाला पुनर्जन्माची भीति नसते. मग परलोकाची तरी कुठून असणार ? आत्मनिग्रहामध्यें केवळ एकच दोष आहे, त्याशिवाय दुसरा कोणताहि नाहीं. तो हा कीं आत्मनिग्रही मनुष्य सदा क्षमायुक्त असतो, त्यामुळें लोक त्याला अशक्त समजतात. हे महाप्राज्ञा युधिष्ठिरा, लोकांच्या दृष्टीनें हा जरी एक दोष असला, तरी तो मोठा गुणच समजला पाहिजे. ज्या क्षमेच्या योगानें पुष्कळ लोकांची प्राप्ति होते, ती क्षमा आत्मनिग्रहानेंच मिळणारी असते. हे भारता, आत्मनिग्रही मनुष्याला अरण्याची काय आवश्यकता आहे ? त्याचप्रमाणें जो आत्मनिग्रही नाहीं, त्याला अरण्य तरी काय कामाचें ? आत्मनिग्रही पुरुष जेथें कोठें वसति करील, तेंच त्याचें अरण्य व तोच त्याचा आश्रम.

वैशंपायन—हें भीष्माचें भाषण ऐकून राजा युधिष्ठिराला अमृतप्राशन केल्याप्रमाणें तृप्ति झाली व त्यामुळें तो अत्यंत आनंदित झाला. त्यानें भीष्माला पुनः प्रश्न केला आणि त्याचेंहि उत्तर त्या कुरुश्रेष्ठ भीष्मानें मोठ्या आनंदानें दिलें. १२. २. १६०.

---

## अध्याय १६१ वा.

[ १ युधिष्ठिराला भीष्माकडून तपोनिरूपण. ]

( १ ) भीष्म—हें सर्व तपोमूल आहे, असें विद्वान् लोकांचें म्हणणें आहे. तप न करणाऱ्या मूढाला क्रियाफलाची प्राप्ति होत नसते. प्रजापति ब्रह्मदेवानें हें सर्व जगत् तपाच्या योगानें निर्माण केलें, त्याप्रमाणें ऋषींनींहि तपानेंच वेद मिळविले आहेत. तपाच्याच योगानें ब्रह्मदेवानें अन्न आणि फल-मूलें निर्माण केलीं. तपानें सिद्धि मिळविलेले लोक समाधीच्या योगानेंच त्रैलोक्य पाहूं शकतात. औषधें, वनस्पति आणि विविध क्रिया हीं सर्व तपाच्याच योगानें सिद्ध होतात. कोणतीहि सिद्धि म्हटली म्हणजे तपावरच अवलंबून आहे. जगांत जें कांहीं मिळविण्यास कठीण आहे, तें सर्व तपापासून मिळतें. ऋषींना जें एवढें मोठें ऐश्वर्य प्राप्त झालें आहे, तें सर्व त्यांच्या

तपामुळेंच होय, यांत संशय नाहीं. सुरापान करणारा, परस्वापहरण करणारा, भ्रूणहत्या करणारा आणि गुरुपत्नीशीं संबंध ठेवणारा हे सर्व मोठ्या तीव्र तपाच्याच योगानें त्या त्या पापापासून मुक्त होत असतात. तप अनेक प्रकारचें असतें आणि लोक निरनिराळ्या मार्गांनें तें आचरितात. सर्व सोडून मनुष्य तपाला प्रवृत्त झाला असतां त्या तपाला अन्नत्यागासारखें दुसरें उत्तम साधन कोणतेंच नाहीं.

हे महाराजा, अहिंसा, सत्यवचन, दान आणि इंद्रियनिग्रह यांच्या योगानें आचरिलेलें तपहि उपवासापेक्षां श्रेष्ठ नाहीं. दानापेक्षां दुष्कर कांहीं नाहीं, मातृसेवेहून दुसरा मोठा आश्रम नाहीं, तीन विद्या ( वेद ) जाणणें यासारखें श्रेष्ठ कांहीं नाहीं, तसेंच सर्वत्यागासारखें दुसरें तप नाहीं. या लोकांत स्वर्ग व धर्म यांचें रक्षण इंद्रियें करीत असतात, म्हणून धर्मार्थाकरितां उपवासासारखें दुसरें तप नाहीं. ऋषि, पितर, देव, मनुष्यें, पशु, पक्षी आणि इतरहि चराचर भूतमात्र तपाच्या आश्रयानें सिद्धि पावतात. देवांना मिळालेलें महत्व देखील तपःसामर्थ्यानेंच होय. ग्रहनक्षत्रादि लोकांची प्राप्ति देखील तपाचेंच फल होय. देवत्व देखील तपाच्या योगानें मिळविणें शक्य आहे, यांत संशय नाहीं. १२. २. १६१.

---

## अध्याय १६२ वा.

[ १ भीष्माकडून सत्यप्रशंसन. ]

(१) युधिष्ठिर—हे पितामहा, ब्राह्मण, ऋषि, पितर आणि देवता हे सर्वदा सत्यधर्माची प्रशंसा करीत असतात, तर सत्याविषयीं तुझ्या मुखानें ऐकण्याची माझी इच्छा आहे. म्हणून तें तूं मला सांग. हे राजा, सत्याचें लक्षण काय, त्याची प्राप्ति कोणत्या उपायानें होत असते, सत्याची प्राप्ति झाली असतां काय होतें आणि तें कसें होतें, हें सर्व तूं मला सांग.

भीष्म—हे भारता, चातुर्वर्ण्याच्या धर्मांचा संकर होणें कधींहि प्रशस्त नाहीं. परंतु सत्य हा धर्म सर्व वर्णांना सारखाच आहे. सत्य हा सत्पुरुषांचा नित्याचा धर्म आहे, तसाच सत्य हा सनातन धर्म आहे. सत्याला नेहमीं नमन करावें, कारण सत्य ही परम गति आहे. सत्य हा धर्म, तप, योग आणि सनातन ब्रह्म असून तो श्रेष्ठ यज्ञ असल्याचें सांगितलें आहे. सर्व कांहीं

सत्याच्या ठिकाणीं अवलंबून आहे. आतां सत्याचे आचार आणि त्याचीं लक्षण हीं मी तुला क्रमवार सांगतों. तसेंच सत्यप्राप्ति कशी होते, हेंहि तुला सांगणें योग्य आहे.

हे भारता, सर्व लोकांमध्यें सत्याचे तेरा प्रकार सांगितले आहेत. सत्य, म्हणजे समता, दम, अमात्सर्य, क्षमा, न्ही, सहनशीलता, अनसूया, त्याग, ध्यान, आर्यता, धृति, दया आणि अहिंसा, असे हे राजेंद्रा, सत्याचे तेरा प्रकार आहेत. सत्य हें सर्वदा अव्यय व अविनाशी असून नित्य आहे. त्याचप्रमाणें तें अविकारीहि आहे. कोणत्याहि धर्मांचा विरोध न केल्यानें ह्याची प्राप्ति होते. आपणाला जे इष्ट, अनिष्ट, तसेंच जे आपले शत्रु आहेत, त्यांजवर समदृष्टि ठेवणें, ह्यालाच समता म्हणतात. ही समता इच्छा, द्वेष, काम, क्रोध नाहींसे झाल्यानें प्राप्त होत असते. दुसऱ्याच्या विषयाची इच्छा न धरतां मोठ्या गंभीरतेनें, धैर्यानें व निर्भयपणें वागणें ह्याला दम म्हणतात. ह्याच्या योगानें सर्व क्लेशांचा परिहार होत असून ह्याची प्राप्ति ज्ञानयोगानें होत असते. दान आणि धर्म ह्यांविषयीं जी संयमबुद्धि तिलाच पंडित लोक अमात्सर्य म्हणत असतात. सदा सत्यानें वागत असल्यानें मनुष्य अमत्सरी होतो. क्षमा आणि अक्षमा यांच्या योगानें प्रिय आणि अप्रिय गोष्टी घडत असतात. सत्पुरुषाला प्रियाप्रिय सहन करणें हीं दोन्ही सारखींच वाटत असतात. सत्यवक्त्या पुरुषाला क्षमेची उत्तम प्रकारें प्राप्ति होत असते. बुद्धिमान् पुरुष मन शांत ठेवून व सौम्य भाषण करून अनेकांचें पुष्कळ कल्याण करितो आणि त्यामुळें त्याला पुढें केव्हांहि वाईट वाटण्याचा प्रसंग येत नाहीं. त्या गुणाला न्ही म्हणतात. हा गुण धर्मांच्या योगानें प्राप्त होतो. ज्या गुणानें धर्माकरितां मनुष्य अप्रियहि गोष्टी सहन करितो, त्याला तितिक्षा–सहनशीलता–म्हणतात. हिला शांति असेंहि नांव आहे. ह्या गुणाची प्राप्ति धैर्यानें होत असून हा लोकसंग्रह करण्याचे कामीं आवश्यक आहे. स्नेह आणि विषय टाकून देणें याला त्याग म्हणतात. ज्यांचा राग, द्वेष सुटला आहे, त्यांनाच या गुणाची प्राप्ति होते; इतरांस होत नाहीं.

ज्याच्या योगानें मनुष्य वैराग्ययुक्त होऊन प्रयत्नपूर्वक सर्वांचें कल्याण करीत असतो, ज्याची आसक्ति कशावरहि नसते, त्या गुणाला आर्यता म्हणतात. ज्यामुळें सुखदुःखांत ज्याचें मन यत्किंचित्हि चळत नसतें,

त्या गुणाला धृति-धैर्य-म्हणत असतात. ज्याला आपलें कल्याण व्हावें, अशी इच्छा असेल, त्यानें हा गुण अवश्य अंगीं ठेवावा. मनुष्यानें नेहमीं क्षमाशील आणि सत्यपर असावें. हर्ष, भय आणि क्रोध यांचा त्याग केल्यानें शहाण्या मनुष्याच्या अंगीं दया येते. कर्मानें, मनानें किंवा वाणीनें कोणाचाहि द्रोह न करणें याला अहिंसा म्हणतात. लोकांवर अनुग्रह करणें तसेंच दान देणें हा सत्पुरुषांचा सनातन धर्म होय. हे सत्याचे निरनिराळे प्रकार आहेत. ते सर्व सत्यामध्येंच समाविष्ट होतात. त्यांचा आधार सत्याला असून त्याच्याच योगानें सत्याची वृद्धि होत असते. हे पार्थिवा, सत्याचे गुण सांगतां येणें कोणालाहि शक्य नाहीं. म्हणूनच विप्र, पितर आणि देवता सत्याची प्रशंसा करीत असतात. सत्याहून श्रेष्ठ असा दुसरा धर्म नाहीं व अनृताहून दुसरें मोठें पातक नाहीं. सत्य ही धर्माची स्थिति आहे. म्हणून सत्य कधींहि नाहींसें करूं नये. दान, दक्षिणायुक्त यज्ञ, त्रेताग्निहोत्र, वेद आणि दुसरे धर्मसिद्धांत हे सर्व सत्याच्याच योगानें घडत असतात. हजारों अश्वमेधयज्ञ आणि सत्य हीं ताजव्यांत घालून पाहिलीं असतां सत्याचेंच वजन अधिक भरेल, यांत संशय नाहीं. १२.२.१६२.

---

## अध्याय १६३ वा.

[ १ युधिष्ठिरास भीष्माकडून लोभादिकांचें निरूपण. ]

( १ ) युधिष्ठिर—हे भरतर्षभा, क्रोध, काम, शोक, मोह, वासना, परासुता, लोभ, मात्सर्य, ईर्ष्या, कुत्सितपणा, असूया, कृपा, भय ह्या सर्वांची उत्पत्ति कोणापासून होत असते, तें मला सविस्तर निवेदन कर.

भीष्म—हे क्रोधादिक तेरा विकार प्राणिमात्राचे मोठे बलिष्ठ शत्रु आहेत, असें समजलें आहे. ते सर्वदा मनुष्याच्या सन्निध मोठ्या दक्षतेनें राहून त्याच्या हातून जरा प्रमाद झाला कीं त्याला क्लेश देतात. पुरुषाला पाहतांच हे लांडग्याप्रमाणें त्यावर जोरानें धांवून येतात व त्याचा नाश करितात. त्यांच्यापासून दुःख उत्पन्न होतें तसेंच त्यांपासून पापहि उद्भवतें. हे पुरुषश्रेष्ठा, ही गोष्ट मनुष्यानें नित्य लक्षांत ठेवावी. हे राजा, ह्यांचा उदय, स्थान आणि क्षय ह्यासंबंधीं तुला सांगतों. प्रथम क्रोधाची उत्पत्ती सांगतों. एकाग्र मनानें ऐक. क्रोध हा लोभापासून उत्पन्न होतो. दुसऱ्याचे दोष पाहून हा वृद्धिंगत होतो.

क्षमेच्या योगानें याची वाढ खुंटून क्षमेनेंच तो नाहींसा होतो. कामाची उत्पत्ति संकल्पापासून होते आणि जों जों त्याचें सेवन करावें, तों तों त्याची वाढ होते. शहाणा मनुष्य ह्यापासून निवृत्त झाला म्हणजे तत्काळ त्याचा नाश होतो. असूया ही क्रोध—लोभांपासून उत्पन्न होत असून सर्व भूतांवरील दया व वैराग्य यांच्या योगानें तिचा नाश होतो. दुसऱ्याचे दोष पाहून तिचा उदय होतो आणि ज्ञानानें ती नाहींशी होते. मोहाची उत्पत्ति अज्ञानापासून होत असून पापाभ्यासानें तो वृद्धि पावतो. सत्पुरुषांच्या संगतीनें त्याचा तत्काळ नाश होतो.

हे कुरुकुलश्रेष्ठा, जे कोणी श्रुतिविरुद्ध शास्त्रांचा विचार करितात, त्यांना दुसऱ्यांच्या वाइटाची इच्छा होते; परंतु तत्त्वज्ञान झालें असतां ती लयाला जाते. एखाद्या वस्तूवरील प्रीतीनें, तिचा वियोग झाल्यास, शोक उद्भवतो, परंतु त्याची निरर्थकता जेव्हां लक्ष्यांत येते, तेव्हां त्याचा नाश होतो. परासुता-अत्यंताधीनताही क्रोधलोभ आणि अभ्यास यांच्या योगानें उत्पन्न होते. ती सर्वभूतांवर दया केल्यानेंआणि विषयवैराग्यानें नष्ट होते. सत्यत्यागामुळें आणि अहित वस्तूंच्या सेवनामुळें मात्सर्य उत्पन्न होतें. परंतु साधूंच्या सेवनानें त्याचा लय होतो. कुल, ज्ञान आणि ऐश्वर्य यांच्या योगानें मनुष्यांना मोह उत्पन्न होतो; परंतु त्याचें ज्ञान झाल्यानें त्याचा क्षय होतो. ईर्ष्या ही कामापासून व दुसऱ्याचें वाईट करण्याच्या इच्छेपासून उत्पन्न होते. ती शहाणपणाच्या योगानें नाश पावते. लोकबाह्य वर्तनानें आणि द्वेष्य व असंमत अशा भाषणानें हे राजा, कुत्सितपणा उत्पन्न होतो. व लोकांचें निरीक्षण उत्तम केल्यानें शमन होतो. आपल्या बलिष्ठ अपकाऱ्यांशीं विरोध करतां येत नसल्याकारणानें तीव्र असूया उत्पन्न होते. ती कारुण्यानें लुप्त होते. दीन लोकांना सदैव पाहिल्यानें त्यांजविषयीं कृपा उत्पन्न होते, ती धर्मतत्त्व समजलें असतां नाहींशी होते. भय हें अज्ञानामुळें सर्वदा उत्पन्न होत असतें आणि भोग हे अस्थिर आहेत, हें बरोबर समजून त्यांचें ज्ञान झाल्यानें तें नाहींसें होतें.

हे तेराहि दोष शमानें जिंकितां येतात, असें म्हणतात. हे सर्व तेराहि दोष धृतराष्ट्राच्या पुत्रांमध्यें वसत होते. तूं थोर पुरुषांच्या सेवनानें आणि सत्याच्या आश्रयानें या तेरांनाहि जिंकिलें आहेस. १२.२.१६३.

## अध्याय १६४ वा.

[ १ नृशंसधर्मकथन. ]

( १ ) युधिष्ठिर—हे भारता, सर्वदा सत्पुरुषांचे दर्शनानें दया म्हणजे काय, हें मला बरोबर कळलें आहे. परंतु दुष्ट पुरुष आणि त्याचें कर्म ह्याचें ज्ञान मला नीट झालेलें नाहीं. ज्याप्रमाणें लोक कंटक, कूप आणि अग्नि यांचा त्याग करितात, त्याचप्रमाणें ते दुष्टांचाहि त्याग करितात. हे भारता, दुष्ट पुरुष मनुष्याला इहलोकीं व परलोकींहि जाळून दग्ध करीत असतो, म्हणून हे कुरुकुलोत्पन्ना, त्यासंबंधीं धर्मसिद्धांत तूं मला सांग.

भीष्म—त्याची आवड आणि कर्मवासना हीं दोन्ही गर्ह्य असतात. तो सर्वदा लोकांची निंदा करितो व आपणहि लोकनिंदेस पात्र होतो. दैवानें आपणाला फसविलें आहे, असें त्याला वाटत असतें. आपण यत्किंचित् दान केलें, तरी त्याची जो फुशारकी मारीत असतो, तो सर्वदा इतरांचा द्वेष करणारा, नीच कर्में करणारा, स्नेह दाखवून वंचना करणारा, कृपण, दुसऱ्यास कांहींहि न देणारा, मानी, विषयी, बडबड्या, सर्वांविषयीं शंकेखोर, कावळ्याप्रमाणें वंचक, कृपण, आपल्या मित्रमंडळीची प्रशंसा करणारा, अश्रमांचा द्वेष करणारा आणि सर्वदा संकराची इच्छा बाळगणारा असतो. हिंसेमध्यें ज्याला मोठा आनंद वाटत असून गुणावगुणांची त्याला योग्यता नसते, त्याचें वर्तन खोडसाळपणाचें असून, तो विचारहीन व अत्यंत लोभी असतो. त्याचीं सर्व कृत्यें दुष्टपणाचीं असतात. धर्मशील व गुणवान् मनुष्याला तो पापी समजतो. आत्मशीलाला अनुसरून तो कोणावरहि विश्वास ठेवीत नाहीं. तो दुसऱ्यांचा दोष असेल अशी गुप्त गोष्ट प्रसिद्धीला आणितो. आपला आणि दुसऱ्यांचा जेथें सारखाच दोष असेल, तेथें आपल्या चरितार्थांकरितां दुसऱ्याचा घात करूं इच्छितो. आपणावर उपकार करणाऱ्याला आपण उत्तम फसविलें, असें तो समजतो. आपल्यावर उपकार करणाऱ्याला एकाद्या वेळीं धन देण्याचा प्रसंग आला असतां ती गोष्ट त्याला संतापदायक होते. भक्ष्य, पेय, लेह्य व दुसरेहि उत्कृष्ट भक्ष्य पदार्थ घेऊन दुसरे लोकांसमक्ष खात बसतो, त्यांना कांहीं देत नाहीं, तो दुष्ट पुरुष होय.

जो ब्राह्मणांना आधीं अन्न घालून नंतर इष्टमित्रांसह भोजन करितो तो मरणानंतर स्वर्गाला जातो आणि इहलोकींहि अनंत सुख भोगतो. हे भरतश्रेष्ठा,

मीं तुला नृशंस–दुष्ट मनुष्य–कसा असतो, याची माहिती सांगितली. ज्ञानवान् मनुष्यानें अशा पुरुषाचा सर्वदा त्याग करावा. १२. २. १६४.

---

## अध्याय १६५ वा.

[ १ यज्ञाकरितां कोणतें द्रव्य संपादन करावयाचें, त्याचें भीष्माकडून युधिष्ठिराला विवेचन. २ पापविशेष आणि त्यांचीं प्रायश्चित्तें. ]

(१) भीष्म—ज्यांचें द्रव्य चोरांनीं हरण केलें आहे, तरी ज्यांना यज्ञ करण्याची इच्छा आहे, जे सर्ववेदपारंगत आहेत, गुरुकार्य आणि पितृकार्य करून वेदाध्ययन करण्याची ज्यांची इच्छा आहे, असे सर्व धार्मिक वृत्तीनें भिक्षा मागणारे ब्राह्मण सत्पात्र असतात. अशा गरीब ब्राह्मणांना हे भारता, विद्यादान व द्रव्यदान करावें. हे भरतसत्तमा, इतरहि ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. अब्राह्मणांना वेदिकेच्या बाहेर अपक्क अन्न अर्पण करावें. राजानें ब्राह्मणांना त्यांच्या योग्यतेनुसार सर्व प्रकारचीं रत्नें अर्पण करावीं. कारण, ब्राह्मण हेच साक्षात् वेद व बहुदक्षिणायुक्त यज्ञ आहेत. परस्परांचें वैभव आणि आचार यांना अनुसरून धार्मिक बुद्धीनें ते यज्ञ करितात. ज्याच्याजवळ तीन वर्षें सेवकाच्या उदरनिर्वाहाला पुरेल इतकें किंवा त्याहूनहि अधिक धान्य असेल, त्यानें सोमपान करणें योग्य आहे. राजा धार्मिक बुद्धीचा असला आणि यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणांना कांहीं अंशानें त्या कामीं प्रतिबंध होत असला, तर अनेक पशु जवळ बाळगणाऱ्या, कधींहि यज्ञ न केलेल्या व त्यामुळें सोमपान न झालेल्या वैश्यापासून त्यानें तितकें द्रव्य घ्यावें. शूद्रांच्या गृहांमधून त्यानें यज्ञाकरितां कांहींहि हरण करून आणूं नये. कारण, यज्ञांमध्यें शूद्रांना कांहींहि परिग्रह नसतो. शंभर गाई असून ज्यानें अग्न्याधान केलें नाहीं किंवा हजार गाई असून ज्यानें कधीं यज्ञ केला नाहीं, अशाकडून राजानें कांहींहि विचार न करितां द्रव्य घ्यावें. जे कधींहि दान करीत नाहींत, अशांना राजानें सांगून त्यांजकडून यज्ञार्थ द्रव्य घ्यावें. अशा रीतीनें वागणाऱ्यांनाच पूर्ण धर्म घडत असतो. आतां धान्यासंबंधानें सांगतों, ऐक.

ज्याला सहा वेळ भोजन न मिळून उपोषण घडलें असेल, त्या ब्राह्मणानें एका दिवसाच्या निर्वाहापुरतें कोणा हीनकर्मी पुरुषाकडून, एकाद्या दुष्टाकडून,

शेतांतून, बागेंतून, अथवा जेथून आणतां येईल, तेथून धान्य हरण करून आणावें आणि मग राजा विचारो अथवा न विचारो, त्याला ती गोष्ट सांगावी. धर्मवेत्त्या राजानेंहि त्याला त्या कर्माबद्दल दंड करूं नये. असें करणें हा त्याचा धर्म आहे. क्षत्रियाच्या मूर्खपणानेंच ब्राह्मणाला क्षुधेचे क्लेश सहन करावे लागतात. राजानें ब्राह्मणाचें अध्ययन आणि शील यांची परीक्षा घेऊन त्याच्या चरितार्थाची व्यवस्था करावी आणि ज्याप्रमाणें पिता पोटच्या पुत्राचें पालन करितो, त्याप्रमाणें त्याचें रक्षण करावें. प्रतिवर्षीं आग्रयणादि विधि करायाचे असतात, ते न केल्यास वैश्वानरीनामक इष्टि करावी. असा अनुकल्प केल्यानें धर्माला कोणत्याहि रीतीनें बाध येत नाहीं, असें धर्मज्ञ लोकांनीं सांगितलें आहे. विश्वेदेव, साध्य आणि मोठमोठे ऋषि ह्यांनीं मृत्युभयानें आपत्कालीं आचरावयाचे म्हणून कांहीं वैकल्पिक धर्म सांगितले आहेत. मुख्य विधीप्रमाणें वागण्याचें सामर्थ्य अंगीं असूनहि जो अनुकल्पानें वागतो, त्या दुर्मतीला पारलौकिक फळ कधीं प्राप्त होत नसतें. वेदवेत्त्या ब्राह्मणानें चरितार्थासाठीं ‘ मी ब्राह्मण आहें,’ असें कधीं राजाला सांगूं नये. कारण, त्याचें वीर्य आणि राजाचें वीर्य यांमध्यें त्याचें वीर्य बलवत्तर आहे. म्हणून ब्रह्मवादी पुरुषाचें तेज हें राजतेजापेक्षां सर्वदा दुःसह असतें. ब्राह्मण हा कर्ता व शास्ता असल्यामुळें त्याला ब्रह्मदेव म्हटलें आहे. त्याच्या संबंधानें कधीं अकुशल किंवा शुष्कपणाचें भाषण करूं नये.

क्षत्रियानें बाहुवीर्यानें संकटामध्यें आपलें रक्षण करावें. वैश्य व शूद्र यांनीं द्रव्याच्या बलावर संकटांतून तरावें आणि ब्राह्मणानें मंत्र आणि होम यांच्या योगानें आपला उद्धार करावा. कन्या, युवति, अमंत्रज्ञ पुरुष, मूर्ख आणि संस्काररहित अपवित्र मनुष्य यांना अग्नीमध्यें आहुति देण्याचा अधिकार नाहीं. यांपैकीं जे कोणी आहुति देतात ते व ज्यासाठीं होम केला असतो, तो असे सर्व नरकांत पडतात. म्हणून वेदपारंगत व यज्ञकुशल पुरुषानेंच होम करावा. अग्न्याधान केल्यावर प्राजापत्य अश्वरूपी दक्षिणा न दिल्यास त्या पुरुषाला धर्मवेत्ते अनाहिताग्नि समजतात. श्रद्धाळु आणि जितेंद्रिय पुरुषानें पुण्य कर्में करावीं. दक्षिणा दिल्यावांचून यज्ञ कधींहि करूं नये. ज्यामध्यें दक्षिणा दिली जात नाहीं, असा यज्ञ केल्यानें मनुष्याची प्रजा, पशु आणि स्वर्ग हीं नाहींशीं होतात, इतकेंच नव्हे, तर इंद्रियें, पशु, कीर्ति व आयुष्य हींहि नष्ट होतात.

( २ ) जे ब्राह्मण रजस्वलेशीं समागम करितात, अग्न्याधान करीत नाहींत, ज्यांच्या येथें वैदिकावांचून होम होतो, ते सर्व पातकी होत. ज्या गांवांत एकच विहीर असून तिजवर सर्वांचा निर्वाह चालतो, अशा ठिकाणीं बारा वर्षें शूद्र स्त्रीशीं समागम करून राहणारा ब्राह्मण कर्मानें शूद्रच होय. जी आपली पत्नी नाहीं, अशा स्त्रीशीं संबंध ठेवणारा, शूद्राला थोरपणा देणारा, ब्राह्मणावांचून इतरांचा मान ठेवणारा आणि तृणाला पाठ लावून बसणारा ब्राह्मण ह्यांची शुद्धि कोणत्या रीतीनें होत असते, तें आतां सांगतों, ऐक. निकृष्ट वर्णांची सेवा करण्यांत अयोग्य प्रकारें बसणें उठणें यांमुळें एका रात्रींत जें पातक घडतें, तें तीन वर्षें व्रतशील राहिल्यानें नष्ट होतें. थट्टेमध्यें बोललेलें, स्त्रियांच्या समागमांत किंवा लग्नाच्या बाबतींत, गुरूसाठीं किंवा आपल्या जीवासाठीं केलेलें असें पांच प्रकारचें खोटें भाषण पातकांमध्यें गणिलें जात नाहीं. शुभकारक विद्या हीनवृत्तीच्या मनुष्यापासूनहि श्रद्धेनें घ्यावी. अपवित्र पदार्थांपासून सुवर्ण वगैरे विचार न करितां काढून घ्यावें. दुष्कुलांत झालेल्या स्त्रीरत्नाचा स्वीकार करावा आणि विषापासूनहि अमृत घेऊन घ्यावें. स्त्रिया, रत्नें आणि उदक हीं धर्मानें अदूष्य आहेत.

गाई, ब्राह्मण यांच्या व आपल्या हितासाठीं आणि वर्णसंकर झाला असतां वैश्यानें शस्त्र धारण करावें. सुरापान, ब्रह्महत्या आणि गुरुस्त्रीगमन हीं पातकें बुद्धिपूर्वक घडलीं असतां त्याला प्रायश्चित्त कांहीं नसून प्राणत्याग हेंच एक प्रायश्चित्त आहे. तसेंच सुवर्णचौर्य, ब्राह्मणस्वाचें अपहरण, सुरापानांत आनंद मानणें, संबंध ठेवण्याला अपात्र अशा स्त्रीकडे गमन करणें, पतिताशीं संबंध करणें आणि ब्राह्मणस्त्रीसमागम ठेवणें यांनीं मनुष्याला तत्काळ पतितत्व येतें. पतिताचा समागम एक वर्ष घडला, तरीहि मनुष्य पतित होतो. याजन, अध्यापन आणि विवाहादि यौनसंबंध हेच या पतित्वाला कारण आहेत. त्यांच्यांशीं गमन, आसन किंवा भोजन केलें असतां तो पतित होत नाहीं.

हे भारता, वरील पांच पातकें सोडून बाकींच्याकरितां प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. तीं प्रायश्चित्तें यथाविधि करून पुनः त्या पापकर्मांकडे प्रवृत्ति होऊं देऊं नये. ह्या पातक्यांपैकीं पहिले तीन अर्थात् सुरापानी, ब्रह्मघ्न, आणि गुरुस्त्रीगमन करणारे पतित हे मृत झाले असतां त्यांचें प्रेतकार्य होण्याआधीं सपिंडांकडून त्यांना अशौच नसल्यामुळें अन्न आणि सुवर्ण हीं घेऊन संबंध ठेवावा. पतित अमात्य किंवा गुरु असला तरी धार्मिक मनुष्यानें त्याशीं संबंध सोडावा.

प्रायश्चित्त घेण्याला सुद्धां ते अधिकारी नसल्यामुळें त्यांच्यांशीं कोणत्याच प्रकारचा संबंध ठेवूं नये. अधर्मकर्त्या पुरुषाला धर्मानें आणि तपानें पापाचा नाश करितां येतो. चोराला चोर म्हटल्यास म्हणणाराला त्याच्याइतकेंच पाप लागतें आणि चोरी न करणाराला चोर म्हटलें असतां त्याच्या दुप्पट पाप लागतें. दुसऱ्याशीं संबंध ठेवूं इच्छिणारी कन्या ब्रह्महत्येच्या एकतृतीयांश पातकाला अधिकारी होते व तिला दूषित करणाऱ्याला बाकीचें दोन तृतीयांश ब्रह्महत्येचें पाप लागतें. ब्राह्मणांची निंदा केल्यानें किंवा त्यांना मारहाण केल्यानें त्याहूनहि अधिक पातक लागतें. त्यांचा अपमान केल्यानें शंभर वर्षें-पर्यंत त्याची प्रेतत्वापासून मुक्ति होत नाहीं व पुढेंहि एक हजार वर्षेंपर्यंत तो नरकांत पडून राहतो. म्हणून मनुष्यानें ब्राह्मणांचा कधींहि अपमान करूं नये किंवा त्यांना मारहाणहि करूं नये.

हे राजा, ब्राह्मणाच्या रक्तानें जितके भूमीचे रजःकण भिजून जातात, तितकीं वर्षें तो पापी नरकांत पडून राहतो. भ्रूणहत्या करणारा पुरुष रणामध्यें गो-ब्राह्मणांसाठीं युद्ध करीत असतां शस्त्रपातानें मृत्यु पावल्यास शुद्ध होतो किंवा प्रज्वलित अग्नीमध्यें त्यानें आपलें शरीर अर्पण केल्यासहि त्या पापा-पासून त्याची मुक्तता होते. सुरापी मनुष्यानें तप्त केलेली सुरा प्राशन केल्यास त्या पापापासून तो मुक्त होतो; अथवा त्या मद्यानें त्याचें शरीर दग्ध होऊन त्यानें मृत्यु आल्यास त्याची शुद्धि होते व त्याला स्वर्गादि लोकांची प्राप्ति होते. असें न केल्यास ती प्राप्ति होणें शक्य नाहीं. गुरुपत्नीशीं संबंध ठेवणाऱ्या पापी दुरात्म्यानें स्त्रीच्या तप्त लोहमय प्रतिमेस आलिंगन द्यावें. अशा रीतीनें त्याला मृत्यु आल्यास त्याची पापशुद्धि होते किंवा त्यानें आपलें शिस्न आणि वृषण हीं कापून हातांत घ्यावीं व नैर्ऋत्य दिशेला जाऊन मनांतील पापकर्म टाकून देऊन प्राणत्याग करावा. असें केल्यानें अथवा ब्राह्मणांकरितां प्राणत्याग केल्यानेंहि त्याची शुद्धि होते. त्याचप्रमाणें अश्वमेध, गोसव किंवा अग्निष्टोम यांच्या योगानेंहि तो इहलोकीं व परलोकींहि पूज्यता पावतो.

ब्रह्महत्या करणाऱ्या मनुष्यानें बारा वर्षेंपर्यंत ब्रह्मचर्यानें रहावें आणि हातांत नरकपाळ घेऊन आपलें पापकर्म जगाला सांगत फिरावें अथवा त्रिकाळ स्नान करून मुनीप्रमाणें तपोमग्न होऊन रहावें. स्त्री गर्भवती आहे, असें समजून तिचा वध केल्यास ब्रह्महत्येच्या दुप्पट पाप लागतें. मद्यप्राशन करणारानें नियताहार ठेवून ब्रह्मचर्यानें वागून भूमीवर शयन करावें. असें तीन वर्षें केल्यावर त्यानें

अग्निष्टोम यज्ञ करावा किंवा एक सहस्र वृषभ अथवा धेनु यांचें दान करावें. असें केल्यानें तो पापमुक्त होतो. वैश्याचा वध केला असतां द्व्यब्द प्रायश्चित्त करून शंभर बैल व शंभर गाई यांचें दान करावें. शूद्राचा वध झाला असतां एकाब्द प्रायश्चित्त करावें आणि शंभर वृषभ व तितक्याच धेनु यांचें दान करावें. कुत्रा, वराह, गर्दभ यांना मारल्यानें शूद्रवधासारखें प्रायश्चित्त करावें. मांजर, चाषपक्षी, बेडूक, सर्प आणि उंदीर यांना मारलें असतां एकाद्या प्राण्याचा वध झाल्यामुळें त्याला पशुवधाइतकें प्रायश्चित्त सांगितलें आहे.

आतां वेगवेगळीं प्रायश्चित्तें क्रमवार सांगतों. अबुद्धिपूर्वक कीटकादिकांचा घात झाल्यास पश्चात्ताप हेंच प्रायश्चित्त होय. गोवधाशिवाय एखादें उपपातक घडल्यास एकाब्द प्रायश्चित्त करावें. श्रोत्रियाच्या स्त्रीशीं संबंध घडल्यास त्र्यब्द आणि परदारसंबंध झाल्यास द्व्यब्द प्रायश्चित्त करावें आणि ब्रह्मचर्य पाळून दिवसाच्या चौथ्या प्रहरीं भोजन करावें. एकाच ठिकाणीं व एकाच आसनावर स्त्रियांसह बसणें उठणें या पातकाबद्दल दिवसा तीन वेळ स्नान करून पाण्यावर रहावें. असें केल्यानें त्याची शुद्धि होते. अग्निविच्छेद करणाऱ्यालाहि हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे. त्याचप्रमाणें पिता, माता आणि गुरु यांचा कारणावांचून त्याग करणारा यालाहि हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे. हे कुरुकुलोत्पन्ना, असा त्याग करणें हें पातकच गणिलें आहे. आपली पत्नी व्यभिचारिणी किंवा बंदिवासांत असल्यास तिला अन्न-वस्त्र मात्र द्यावें. परस्त्रीगमन केलेल्या पुरुषाला जें प्रायश्चित्त सांगितलें आहे, तेंच अशा स्त्रीनें करावें. श्रेष्ठ ब्राह्मणपतीचा त्याग करून जी स्त्री दुसऱ्या एखाद्या नीचवर्ण पुरुषाशीं संबंध ठेविते, तिला राजानें मोठ्या प्रेक्षक मंडळीच्या देखत भरमैदानांत कुत्र्यांकडून भक्षण करवावी. अशा स्त्रीशीं संबंध ठेवणाऱ्याला लोहमय तप्त पत्र्यावर निजवून व खालून लांकडें पेटवून जाळून टाकावें.

हीच शिक्षा हे महाराजा, भर्त्यांचा अतिक्रम करणाऱ्या स्त्रीस सांगितली आहे. पापकर्म होऊन एक वर्षपर्यंत ज्यानें प्रायश्चित्त घेतलें नसेल, त्याचें पाप द्विगुणित होतें. त्याला दुप्पट प्रायश्चित्त द्यावें. दोन वर्षें प्रायश्चित्त न घेणाऱ्यानें त्र्यब्द प्रायश्चित्त करावें. पतिताशीं चार वर्षें संबंध ठेवल्यानें पांच वर्षें मुनिव्रतानें भिक्षेवर राहून पृथ्वीपर्यटन करावें. ज्येष्ठ बंधूच्या आधीं कनिष्ठ बंधूचें लग्न झालें असतां ते दोघे बंधु, ती स्त्री आणि धर्मविरुद्ध विवाह करणारा हे सर्व पतित होतात. वीरघ्न पुरुषाला जें प्रायश्चित्त सांगितलें

आहे, तें ह्यांनीं करावें किंवा पापशुद्ध्यर्थ एक महिनाभर चांद्रायण व्रत अथवा कृच्छ करावें. ज्येष्ठाच्या पूर्वी विवाह झालेल्या कनिष्ठानें आपली पत्नी ज्येष्ठ बंधूची स्नुषा म्हणून त्याला अर्पण करावी व त्याच्याच अनुमतीनें तिला परत घ्यावी. असें केल्यानें ते दोघे बंधु व ती स्त्री अशीं तिघेंहि पापविमुक्त होतात. मनुष्येतर प्राण्यांमध्यें गाय वर्ज्य करून इतरांचा वध केल्यास तें दोषकारक होत नाहीं. कारण मनुष्य हा पशूंचा पालक तसा घातकहि आहे. तथापि त्या वधकर्त्यानें मृण्मय पात्र हातांत घेऊन व चमरीपुच्छ परिधान करून आपलें पाप लोकांना सांगत सात घरें फिरावें व जें अन्न मिळेल, तेवढ्यानें चरितार्थ चालवावा. असें बारा दिवस केल्यानें त्याची शुद्धि होते. पापाचा समूल नाश होण्यासाठीं हें व्रत एक वर्षपर्यंत आचरावें. हें व्रत मनुष्यांना उत्तम प्रायश्चित्त आहे.

दानसमर्थ लोकांनीं ह्या सर्व प्रायश्चित्तांऐवजीं दानाचीच योजना करावी. आस्तिक मनुष्यानें केवळ गोप्रदान करावें असें सांगितलें आहे. कुत्रा, वराह, कुक्कुट आणि गर्दभ यांचें मांस, मूत्र किंवा पुरीष यांचें भक्षण झाल्यास पुनः उपनयन करावें. सोमपान करणाऱ्या ब्राह्मणानें सुरापान करणाऱ्या मनुष्याचा गंध घेतल्यास त्यानें तीन दिवस ऊन पाणी, तीन दिवस ऊन दूध आणि नंतर तीन दिवस वायुभक्षण करून रहावें. अशाप्रकारें हा सनातन प्रायश्चित्तविधि तुला मीं सांगितला आहे. हा विशेषतः ब्राह्मणांकरितां आणि त्यांतहि ज्यांच्या हातून अज्ञानानें पातक घडलें आहे, अशांकरितांच आहे. १२. २. १६५.

---



## अध्याय १६६ वा.

[ १ भीष्माकडून नकुलाला खड्गोत्पत्तिकथन. ]

( १ ) **वैशंपायन**—अशाप्रकारें युधिष्ठिराचे प्रश्न चालले असतां मध्यें थोडी संधि सांपडली असतां खड्गयुद्धविशारद नकुलानें शरशय्येवर पडलेल्या पितामह भीष्माला विचारिलें.

**नकुल**—हे पितामहा, ह्या लोकीं धनुष्य हें अत्यंत श्रेष्ठ असें एक आयुध असल्याचें लोक मानतात. परंतु हे धर्मज्ञा, माझ्या मताप्रमाणें खड्ग हेंच अत्यंत श्रेष्ठ असें एकच आयुध आहे. हे राजा, धनुष्याचा भंग झाला असतां आणि

रथाचे अश्वांनाहि क्षीणता आली असतां आत्म्याचें संरक्षण एकटें खड्ग करूं शकतें. धनुष्यधारी, गदाधारी आणि शक्तिधारी अनेक वीरांना एकटा खड्गधारी वीर युद्धांत जिंकूं शकतो. म्हणून ह्याविषयीं मला मोठा संशय उत्पन्न झाला असून हे पार्थिवा, सर्व युद्धांमध्यें कोणतें आयुध श्रेष्ठ आहे, हें तुजपासून जाणण्याची मला मोठी उत्कंठा लागली आहे. तसेंच हें खड्ग कसें उत्पन्न झालें, कशाकरितां केलें, कोणीं केलें आणि त्याचा पूर्वाचार्य कोण होता, तेंहि मला कथन कर.

वैशंपायन—हे भारता जनमेजया, अशाप्रकारचें त्या ज्ञानी माद्रीपुत्राचें मोठ्या कुशलतेचें सूक्ष्मार्थदर्शक व आश्चर्यकारक भाषण ऐकून धनुर्वेदपारंगत भीष्मानें त्या द्रोणशिष्य नकुलाला समर्पक उत्तर दिलें.

भीष्म—हे माद्रेया, तुला तत्त्व सांगतों. रक्तानें आर्द्र होऊन गैरिकादि धातूंनीं युक्त पर्वताप्रमाणें दिसणाऱ्या मला हा प्रश्न विचारिलास, हें तूं उत्तम केलेंस. नकुला, पूर्वीं हें सर्व जगत् एकार्णवजलमय होतें. तें कंपरहित व आकाशशून्य असल्यामुळें महीतल कोणतें हें सांगतां येणेंहि शक्य नव्हतें. सर्वत्र अंधकारानें व्याप्त झालें असून, तें स्पर्शरहित, अत्यंत गंभीर, निःशब्द व अप्रमेय असें होतें. त्यामध्यें ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली. ब्रह्मदेवानें वात, अग्नि आणि वीर्यवान् सूर्य निर्माण केले वर आकाश, खालीं भूमि आणि नैऋतिदेवता यांची उत्पत्ति केली. तशींच आकाश, चंद्र, तारका, नक्षत्रें, ग्रह, संवत्सर, ऋतु, मास, पक्ष, कला आणि क्षण हीं सर्व त्यानें उत्पन्न केलीं. नंतर त्या पितामहानें लौकिक शरीराचा स्वीकार करून उत्तम तेजस्वी पुत्र निर्माण केले. ते म्हणजे मरीचि, अत्रि ऋषि, पुलस्त्य, पुलह, ऋतु, वसिष्ठ, आंगिरस् आणि प्रभु रुद्र हे होत. पुढें प्राचेतस दक्षानें साठ कन्यांना जन्म दिला आणि प्रजोत्पत्तीकरितां त्या ब्रह्मर्षींनीं त्या सर्वांचा स्वीकार केला. त्यांपासून सर्व प्राण्यांची उत्पत्ति झाली. त्यानें देव, पितृगण, गंधर्व, अप्सरा, विविध प्रकारचे राक्षस, पशु, पक्षी, मीन, वानर, मोठमोठे सर्प, सर्व जलचर व स्थलचर पक्षिसमूह, उद्भिज्ज, स्वेदज अंडज आणि जरायुज प्राणी व सर्व स्थावरजंगमात्मक विश्व निर्माण केलें.

याप्रमाणें सर्व प्राणिसृष्टि निर्माण केल्यावर त्या सर्वलोकपितामहानें वेदविहित सनातन धर्म उपयोगांत आणिला. त्या धर्मानुसार देव, आचार्य,

पुरोहित, आदित्य, वसु, रुद्र, साध्य, मरुत्, अश्विन् इत्यादि देवता; भृगु, अत्रि, आंगिरस्, सिद्ध, काश्यप, वसिष्ठ, गौतम, अगस्त्य, नारद, पर्वत इत्यादि तपस्वी; वालखिल्य, प्रभास, सिकत, घृतप इत्यादि ऋषि; अकृष्ट, हंस, अग्नियोनि, वानप्रस्थ आणि पृश्नि हे सर्व वागूं लागले. दानवेंद्र हे क्रोध लोभांनीं व्याप्त होऊन त्या पितामहाचे आज्ञेचा अतिक्रम करून धर्मक्षय करूं लागले. हिरण्यकशिपु, हिरण्याक्ष, विरोचन, शंबर, विप्रचित्ति, प्रल्हाद, नमुचि आणि बलि हे व दुसरेहि पुष्कळ दैत्य-दानव आपआपल्या गणांसह अधर्माचा प्रसार करण्याच्या निश्चयानें धर्ममर्यादेचा भंग करण्याला प्रवृत्त झाले. 'आम्ही सर्व एकाच जातींत जन्मल्यामुळें देवांसारखेच आम्हीहि आहों,' असें म्हणून देव आणि ऋषि यांबरोबर धर्मविषयक स्पर्धा करण्यास त्यांनीं आरंभ केला. हे भारता, त्यांनीं कोणाहि प्राण्याचें प्रिय केलें नाहीं किंवा कोणावर दयाहि केली नाहीं. साम, दान आणि भेद यांपैकीं एकाहि उपायाचा आश्रय न करितां चौथा जो दंड त्याच्या योगानें ते प्रजांना त्रस्त करूं लागले. ते असुरश्रेष्ठ मदोन्मत्त होऊन देवर्षींशीं कधींहि सख्यानें वागले नाहींत. पुढें एकदां ते ब्रह्मर्षि ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्याला तें सर्व वृत्त त्यांनीं निवेदन केलें. त्या वेळीं ब्रह्मदेव हिमालयाच्या एका रम्य शिखरावर होता. त्या शिखराचा विस्तार शंभर योजनें होता. त्यावर मणिरत्नांची प्रभा झळकत असून अनेक पुष्पवृक्ष फुलून गेले होते. शिखर अत्यंत उंच असल्यामुळें आकाशांतील तारे हे त्यावरील कमलांप्रमाणें दिसत होते. बाळा नकुळा, अशा त्या पर्वत-शिखरावर ब्रम्हदेव लोकांच्या अर्थसिद्धीकरितां राहत असे.

पुढें एक सहस्र वर्षें गेल्यावर प्रभु ब्रह्मदेवानें कल्पसूत्रोक्तविधीनें त्या ठिकाणीं एक यज्ञ केला. त्या यज्ञाला यथाशास्त्र सर्व सामग्री सिद्ध केली होती. यथाविधि कर्म करणाऱ्या अशा यज्ञपटु ऋषींनीं, तो मंडप व्याप्त झाला असून सर्वत्र पसरलेल्या समिधांनीं, प्रज्वलित अग्नींनीं आणि सुवर्णमय यज्ञपात्रांनीं त्याला अपूर्व शोभा आली होती. त्या मंडपांत श्रेष्ठ देवतांचे समुदाय सर्वत्र अधिष्ठित झाले असून सदस्य ब्रह्मर्षींच्या योगानें तो विशेषच शोभायमान झाला होता. त्या ठिकाणीं ऋषींच्या पुढें एक भयंकर घडलेली गोष्ट माझ्या ऐकण्यांत आहे. चंद्र ज्याप्रमाणें तारकांचा उदय झालेल्या विमल आकाशांतून वर येतो, त्याप्रमाणें अग्नीला बाजूला सारून त्यांतून एक प्राणी उत्पन्न झाल्याचें मीं ऐकिलें आहे. त्याची कांति नील कमलाप्रमाणें होती. त्याच्या दंष्ट्रा तीक्ष्ण असून त्याचें उदर अत्यंत

कृश होतें. त्याची उंची फार असून तो दुर्जय व अतितेजस्वी दिसत होता. तो अग्नींतून वर येतांना पृथ्वी कांपूं लागली, महोदधि क्षुब्ध झाला, आकाशांतून उल्का पडूं लागल्या आणि मोठे उत्पात होऊं लागले, वृक्षशाखा कोसळून पडूं लागल्या, सर्व दिशा अप्रशांत होऊन गेल्या, अशुभकारी वारा वाहूं लागला, आणि प्राणिमात्र भयव्याकुल झाला. ह्याप्रमाणें सर्वत्र एकच हलकल्लोळ उडालेला ऐकून आणि तो पुरुष आपल्याजवळ येत असल्याचें पाहून ब्रह्मदेव गंधर्व आणि ऋषि यांना उद्देशून म्हणाला, ‘ अशा प्रकारचा खड्ग नांवाचा एक वीर्यवान् प्राणी लोकांच्या संरक्षणासाठीं आणि देवद्वेष्ट्या दानवांच्या वधासाठीं उत्पन्न होईल, अशी कल्पना मीं पूर्वींच केली होती. ’ नंतर त्या पुरुषानें तें आपलें रूप टाकून दिलें आणि स्वच्छ, तीक्ष्ण धारेचें व प्रलयकालच्या मृत्यूप्रमाणें विश्वसंहाराविषयीं उद्युक्त अशा खड्गाचें स्वरूप धारण केलें. मग ब्रह्मदेवानें तें अधर्मनिवारक व तीक्ष्ण खड्ग वृषभध्वज नीलकंठ रुद्राला अर्पण केलें.

पुढें महर्षिजनांनीं संस्तुत अशा प्रभु शंकरानें त्या खड्गाचा स्वीकार करून आपण वेगळेंच स्वरूप धारण केलें. तो चतुर्भुज झाला. तो जरी जमिनीवर उभा होता, तरी त्याच्या मस्तकाचा स्पर्श सूर्यमंडळाला होत होता. त्याची ऊर्ध्व दृष्टि होती व त्याच्या मुखांतून भयंकर ज्वाला निघत होत्या. त्याचा वर्ण नील, पांडुर आणि आरक्त असा वरचेवर बदलत असे. त्यानें कृष्णाजिन परिधान केलें असून त्याच्या ललाटावर सुवर्णाप्रमाणें एक तेजस्वी नेत्र होता. त्यांतील तारका सूर्याप्रमाणें शोभत होत्या. त्याचे दुसरे दोन नेत्र कृष्णपिंगल वर्णाचे असून ते अत्यंत स्वच्छ व शोभायमान दिसत होते. नंतर भगनेत्रहारक त्या शूलपाणि शंकरानें प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें कांतिमान् अशा त्या खड्गाचा स्वीकार केला आणि आपलें भयंकर चर्म (ढाल) उभारून नानाप्रकारच्या गतींनीं वर जाऊं लागला. त्यावेळीं सविद्युत् मेघ जसा आकाशांत शोभतो, त्याप्रमाणें खड्गचर्मांनीं तो शंकर शोभत होता. पुढें युद्ध करण्याची इच्छा धरून तो आकाशांत खड्ग चमकावूं लागला आणि मोठमोठ्यानें गर्जनाहि करूं लागला. मधूनमधून तो हंसतहि होता. हे भारता, त्यावेळीं रुद्राचें स्वरूप अत्यंत भयंकर दिसत होतें.

अशा प्रकारें भयंकर स्वरूप धारण करून दारुण कर्म करण्याच्या इच्छेनें रुद्र येत आहे, असें ऐकून त्या सर्व दानवांना मोठा हर्ष झाला व ते त्याजवर

धांवून आले. त्यांनीं शंकरावर पाषाणांची, तशीच प्रज्वलित अग्निकाष्ठांचीहि वृष्टि केली आणि वस्तऱ्याच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण अशा दुसऱ्याहि लोहमय अनेक आयुधांचा त्याजवर वर्षाव केला. त्या सर्वनायक आणि अखिल बलांचें उत्पत्तिस्थान अशा शंकराला निर्भयपणें युद्ध करतांना पाहून तें दानवसैन्य मोहित होऊन कांपूं लागलें. त्वरित पदगतीनें हातांत खड्ग घेऊन संचार करणाऱ्या त्या एकट्या शंकराला पाहून हे हजारों शंकरच आहेत, असें त्या सर्व असुरांना वाटलें. तो शंकर त्या दैत्यांना छिन्न करीत, फोडून टाकीत, तुकडे तुकडे करीत, कापून काढीत आणि फाडून टाकीत सर्व प्रकारें त्यांचा नाश करीत होता. त्यावेळीं गवतामध्यें प्रवृत्त होणाऱ्या दावाग्नीप्रमाणें तो शंकर त्या शत्रुसमूहामध्यें संचार करीत होता. त्याच्या खड्गाच्या वेगामुळें त्या शत्रूंचा भंग झाला आणि त्यांचे बाहु, मांड्या आणि वक्षःस्थल हीं छिन्न होऊन गेलीं. त्या बलिष्ठ असुरांचीं विछिन्न झालेलीं आंतडीं आणि गात्रें सर्वत्र भूतलावर पडलीं. दुसरेहि कित्येक दानव युद्धांत भंग पावून व खड्गपातानें पीडित होऊन एकमेकांवर चरफडत दिगंतरीं गेले. कित्येकांनीं भूमींत प्रवेश केला, तर कित्येक पर्वतांच्या गुहेंत शिरले. दुसरे कित्येक आकाशांत प्रविष्ट झाले, तर कित्येक पाण्यामध्यें शिरले. तो दारुण संग्राम सुरू असतां पृथ्वीवर मांसशोणिताचा सर्वत्र चिखल होऊन ती अत्यंत भयंकर दिसत होती. हे महाबाहो, सर्वत्र रक्तस्राव होऊन पडलेल्या त्या दानवांच्या शरीरांच्या योगानें प्रफुल्ल पलाश वृक्षांनीं शोभणाऱ्या पर्वताप्रमाणें ती पृथ्वी दिसत होती.

याप्रमाणें दानवांचा संहार करून व जगतांत धर्मवासना वृद्धिंगत करून त्या शंकरानें आपलें रौद्रस्वरूप टाकिलें आणि सौम्य स्वरूप धारण केलें. त्यावेळीं सर्व महर्षि आणि सर्व देवगण त्या अत्यद्भुत जयाच्या योगानें आनंदित होऊन त्यांनीं त्या देवाधिदेव शंकराचें पूजन केलें. तेव्हां भगवान् रुद्रानें दानवांच्या रक्तानें सिंचित झालेलें तें खड्ग धर्मरक्षण करणाऱ्या विष्णूला सत्कारपूर्वक दिलें. विष्णूनें तें मरीचीला दिलें, भगवान् मरीचीनें महर्षींना, ऋषींनीं इंद्राला, इंद्रानें लोकपालांना, लोकपालांनीं सूर्यपुत्र मनूला अर्पण केलें आणि सांगितलें कीं, ' हे मनो, तूं मनुष्यांचा ईश्वर आहेस, तेव्हां ज्याच्या गर्भांत धर्माचें वास्तव्य आहे, असें हें खड्ग घे आणि प्रजांचें पालन कर. शरीर आणि मन यांना सुखविण्याकरितां धर्ममर्यादेचा भंग करणाऱ्या लोकांना धर्मानुसार दंड करून त्यांचें रक्षण कर. दुर्भाषणानें निग्रह करणें, मोठा द्रव्यदंड करणें,

शरीराचा एखादा अवयव छेद करून त्याला व्यंगता आणणें आणि तसेंच मोठें कारण असल्यास वध करणें असे दंडाचे चार प्रकार आहेत. हीं दुर्भाषणादि चार रूपें खड्गाचींच आहेत. ह्याचें कोणी अतिक्रमण केल्यास त्या चार रूपांचा उपयोग करावा.'

पुढें त्या मनूनें प्रजांचा अधिपति असा एक पुत्र निर्माण केला आणि प्रजांच्या रक्षणाकरितां त्यानें तें खड्ग त्या क्षुपनामक पुत्राला दिलें. क्षुपापासून तें खड्ग इक्ष्वाकूनें घेतलें, इक्ष्वाकूपासून पुरूरव्यानें आणि त्यापासून आयूनें तें घेतलें. आयूपासून तें पृथ्वीतलावर नहुषाला मिळालें, नहुषापासून ययातीला आणि त्यापासून तें पुरूला मिळालें. पूरूपासून तें अमूर्तरयला, त्यापासून भूमिशय राजाला, त्यापासून दुष्यंतपुत्र भरताला, भरतापासून धर्मज्ञ ऐलविलाला त्या खड्गाची प्राप्ति झाली. त्यापासून धुंधुमार नरेश्वराला, त्यापासून कांबोजाला, कांबोजापासून मुचकुंदाला, मुचकुंदापासून मरुत्ताला, त्यापासून रैवताला, रैवतापासून युवनाश्वाला, युवनाश्वापासून, इक्ष्वाकुवंशज रघूला, त्यापासून प्रतापवान् हरिणाश्वाला, त्यापासून तें खड्ग शुनकाला, शुनकापासून धर्मात्म्या उशीनराला, त्यापासून भोज व यादवाला, यांदवांपासून तें शिबीला, शिबीपासून प्रतर्दनाला, प्रतर्दनापासून अष्टकाला, त्यापासून पृषदश्वाला, त्यापासून भरद्वाजाला, त्यापासून कृपाला आणि कृपापासून तुला व तुझ्या बंधूंना या खड्गाची प्राप्ति झाली आहे.

या खड्गाचें नक्षत्र कृत्तिका असून त्याचें दैवत अग्नि आहे. त्याचें गोत्र रोहिणी असून रुद्र हा त्याचा उत्तम प्रकारचा गुरु आहे. या खड्गाचीं आठ गुप्त नांवें आहेत. हे पांडवा, त्यांचें गुणकीर्तन केल्यानें सदैव विजयाची प्राप्ति होते. तीं नांवें तुला सांगतों, ऐक. असि, वीरासन, खड्ग, तीक्ष्णधार, दुरासद, श्रीगर्भ विजय आणि धर्मपाल हीं तीं नांवें होत. हे माद्रीसुता, सर्व आयुधांमध्यें खड्ग हें अग्रस्थानीं आहे. ह्याचा उत्पत्तिकर्ता शंकर आहे, अशी पुराणांची निश्चयबुद्धि आहे. अरिविध्वंसक पृथूनें प्रथमतः धनुष्य निर्माण केलें. त्यानें पृथ्वीचें दोहन करून अनेक प्रकारचीं धान्यें उत्पन्न केलीं. त्यानें धर्मानें तिचें पालन केलें. हे माद्रेया, ह्या ऋषिप्रोक्त धर्माप्रमाणें तूं वागत जा. युद्धविशारदांनीं या खड्गाची पूजा सर्वदा करावी. हे भरतर्षभा, मीं तुला खड्गाच्या उत्पत्तीचें वर्णन विस्तारानें सांगितलें आहे. हा वृत्तांत जो श्रवण करितो, त्याला

इहलोकीं उत्तम कीर्ति प्राप्त होऊन पुढें स्वर्गीहि अनंत कालपर्यंत तिचा उपभोग घेतां येतो. १२. २. १६६.

---

## अध्याय १६७ वा.

[ १ विदुरासह आपल्या बंधूंना धर्मार्थकामांमध्यें श्रेष्ठ कोण, अशा युधिष्ठिराचा प्रश्न. २ विदुर, अर्जुन आणि भीमसेन यांकडून अनुक्रमें धर्म, अर्थ आणि काम, हे श्रेष्ठ असें उत्तर. ३ त्यावर युधिष्ठिराचें सर्वांत मोक्षच श्रेष्ठ होय असें प्रतिपादन. ]

( १ ) **वैशंपायन**—असें भाषण करून भीष्म स्वस्थ बसला. इकडे आश्रमाला गेल्यावर युधिष्ठिरानें आपले चार बंधु आणि पांचवा विदुर यांना प्रश्न केला. तो म्हणाला, 'धर्म, अर्थ आणि काम ह्या तिघांमध्यें लोभाचें अस्तित्व आहे. तेव्हां यांमध्यें श्रेष्ठ कोण, मध्यम कोण आणि कनिष्ठ कोण तें मला सांगा. तसेंच या त्रिवर्गावर जय मिळविण्याकरितां मनुष्यानें आपलें मन कोणावर जडवावें, हेंहि सांगा.' तें ऐकून अर्थशास्त्रतत्त्वज्ञ व प्रतिभावान् विदुर धर्मशास्त्राला अनुलक्षून प्रथमतः बोलला.

(२) **विदुर**—पुष्कळ अध्ययन, स्वधर्माचरण, दान, श्रद्धा, यज्ञक्रिया, क्षमा, निष्कापट्य, दया, सत्य आणि आत्मनिग्रह ह्यांचा तूं आश्रय कर. तुझें मन चळूं देऊं नको. ह्यांतच धर्म आणि अर्थ यांचें मूळ आहे. मी यांच्याच अनुरोधानें वागत असतों. ऋषि धर्माच्याच योगानें तरून गेले. धर्माच्याच ठिकाणीं उत्तम लोकांची प्राप्ति आहे. धर्मानेंच देवांची अभिवृद्धि होते. अर्थहि धर्मामध्येंच आहे. राजा, सर्वांत धर्म हा श्रेष्ठ असून अर्थ हा मध्यम आहे व काम कनिष्ठ आहे, असें ज्ञानवान् लोकांचें मत आहे. म्हणून मनुष्यानें मनोनिग्रह करून धर्माचा आश्रय करून रहावें. मनुष्यानें स्वतःप्रमाणेंच सर्व प्राण्यांशीं वागावें.

**वैशंपायन**—याप्रमाणें विदुराच भाषण समाप्त झाल्यावर त्या अर्थशास्त्रविशारद व धर्मार्थतत्त्वज्ञ अर्जुनानें धर्माच्या प्रेरणेवरून बोलण्यास प्रारंभ केला.

**अर्जुन**—हे राजा, ही कर्मभूमि आहे, म्हणून या ठिकाणीं कृषि, वाणिज्य, गोरक्षण आणि विविध प्रकारचीं कलाकौशल्यें हीं प्रशस्त गणलीं आहेत.

ह्या सर्व कर्मांना द्रव्याची आवश्यकता आहे. अर्थावांचून धर्म किंवा काम ह्यांचें कांहीं चालत नाहीं, असें श्रुतिवचन आहे. अर्थप्राप्तीनें हे दोन्ही धर्म व काम साधतां येतात. जटा आणि कृष्णाजिन धारण करणारे, आत्मनिग्रही, पंकलिप्त, जितेंद्रिय, शिरोमुंडन करणारे आणि नैष्ठिक ब्रह्मचारी हे सर्व वेगवेगळ्या प्रकारें अर्थाचीच इच्छा करणारे आहेत. श्मश्रु वाढवून काषायवस्त्रें परिधान करणारे, लज्जाशील, विद्वान्, शांत व मुक्तसर्वस्व असे लोकहि अर्थाचेच अभिलाषी असतात. आपापल्या धर्माचें आचरण करून कित्येक अर्थोपार्जन करणारे, दुसरे कित्येक स्वर्गाची इच्छा करणारे तर कित्येक कुलाभिवृद्धीची वासना करणारे असतात. त्याचप्रमाणें कित्येक आस्तिक-नास्तिक लोक धारणा, ध्यान आणि समाधि यांतच रंगलेले असतात. परंतु अर्थशास्त्राचें ज्ञान नसणें हा अंधकार असून त्याचें बरोबर ज्ञान असणें हाच प्रकाश होय. हे ज्ञानिश्रेष्ठा, जो आपल्या सेवकांना ऐश्वर्य देतो आणि शत्रूंना दंड करितो, तोच अर्थवान् होय. हें माझें मत असून तें बरोबर आहे. आतां ह्या नकुल-सहदेवांचें म्हणणें तूं ऐकून घे. ते बोलण्याविषयीं अगदीं उतावीळ झाले आहेत.

वैशंपायन—नंतर धर्मार्थकुशल अशा नकुल-सहदेवांनीं उत्कृष्ट भाषण केलें.

नकुल-सहदेव—मनुष्य बसलेला असो, निजलेला असो किंवा चालत असो, त्यानें लहानमोठे उद्योग करून अर्थसंपादन करावें. अर्थ हा सर्वांना प्रिय असून अत्यंत दुर्लभ आहे. तो प्राप्त झाला असतां मनुष्याचे सर्व मनोरथ ह्या लोकींच पूर्ण होतात, यांत संशय नाहीं. अर्थ हा धर्माशीं संबद्ध आहे आणि धर्म हाहि अर्थसंबद्ध आहे. ह्या धर्मार्थांचें आचरण तुला जसें अमृततुल्य वाटतें, तसेंच तें आम्हलांहि आहे. अर्थहीन मनुष्याला कामप्राप्ति होत नाहीं, तसेंच धर्महीन मनुष्याला अर्थप्राप्ति कोठून होणार ? म्हणून जो धर्महीन असतो, त्याला सर्वदा दुःख भोगावें लागतें. तरी मनुष्यानें मनोनिग्रह करून धर्माचरणानें वागावें आणि अर्थसंपादन करावें. हें आमचें मत आहे. जे कोणी ह्यावर विश्वास ठेवून वर्तन करितील, त्यांना सर्व कांहीं प्राप्त होईल. प्रथमतः धर्माचें आचरण करावें, नंतर धर्मयुक्त अर्थ संपादन करावा आणि त्यानंतर काम संपादावा. असें केल्यानें मनुष्य सिद्धार्थ होतो.

वैशंपायन—इतकें बोलून ते नकुल-सहदेव थांबले. तेव्हां भीमसेनानें बोलण्यास प्रारंभ केला.

भीमसेन–ज्याला काम नाहीं, तो अर्थाची इच्छा करीत नसतो किंवा धर्माचीहि वासना त्याला नसते. कामहीन मनुष्याला कोणतीच इच्छा होत नाहीं; म्हणूनच काम हा सर्वांत श्रेष्ठ आहे. ऋषिहि कामयुक्त होऊन तपामध्यें आसक्त होतात आणि पत्रें, फळें, फुलें आणि वायु भक्षण करून मनोनिग्रहानें राहतात. कित्येक वेदोपवेदांमध्यें आसक्त होऊन अध्ययनांत निमग्न असतात, तर कित्येक श्राद्धें, यज्ञक्रिया आणि दानप्रतिग्रह ह्यांमध्यें रत झालेले आढळून येत असतात. व्यापारी, शेतकरी, गवळी, कारागीर आणि शिल्पी, तसेंच देवांचें कर्म करणारे सर्व लोक हे कामाच्याच योगानें आपापलें कर्म करीत असतात. दुसरे कित्येक लोक कामयुक्त होऊन समुद्रामध्यें प्रवेश करितात. कामाचे अनेक प्रकार आहेत. हें सर्व दृश्य जगत् कामानेंच मोहित केलें आहे. ज्यांच्या अंतःकरणांत कामाचा लवलेशहि नाहीं, असा मनुष्य सध्यां कोणी नाहीं, पुढें होणार नाहीं किंवा पूर्वी झालेलाहि नाहीं. हे महाराज, काम हेंच सारभूत तत्त्व असून धर्मार्थ ह्यावरच अवलंबून असतात. दह्यापासून ज्याप्रमाणें नवनीताची प्राप्ति होत असते, त्याचप्रमाणें अर्थधर्मांपासून काम हा निर्माण होतो. पेंडीपेक्षां ज्याप्रमाणें तेल, तक्रापेक्षां ज्याप्रमाणें घृत, काष्ठापेक्षां जशीं पुष्पफलें श्रेष्ठ आहेत, त्याचप्रमाणें धर्मार्थांपेक्षां काम हा श्रेष्ठ होय. पुष्पापासून ज्याप्रमाणें मधुर रसाची प्राप्ति होते, तशीच कामाची प्राप्ति धर्म आणि अर्थ ह्या दोन पुरुषार्थांपासून होत असते. काम हा धर्मार्थांचें उत्पत्तिस्थान आहे किंवा धर्म आणि अर्थ हीं कामाचींच रूपें आहेत.

काम नसेल तर केवळ अर्थापासून ब्राह्मणांना सुग्रास अन्न मिळणें शक्य नाहीं. कामावांचून कोणी ब्राह्मणांना देत नसतो किंवा कामावांचून विविध प्रकारचे लोकव्यवहारहि होत नसतात. म्हणून काम हा तीन पुरुषार्थांमध्यें श्रेष्ठ होय. म्हणून तूं हे राजा, कामाचा स्वीकार कर आणि सुंदर वेष धारण करून अलंकारांनीं विभूषित झालेल्या, मदोत्कट आणि नयनमनोहर अशा स्त्रियांशीं रममाण हो. काम हाच श्रेष्ठ होय, असें माझें मत आहे. हे धर्मपुत्रा, सर्व स्थितीचा विचार करूनच माझी अशी बुद्धि झाली आहे. तुला शंका

घेण्याचें कारण नाहीं. धर्म, अर्थ आणि काम ह्या तिघांचेंहि सेवन सारख्याच प्रमाणानें करावें. असें न करतां एकाच्याच आश्रयानें राहणारा मनुष्य नीच होय. धर्म आणि अर्थ ह्या दोहोंमध्यें दक्ष असणारा मनुष्य मध्यम होय आणि तीनहि पुरुषार्थांच्या ठिकाणीं आसक्त होणारा मनुष्य श्रेष्ठ होय.

अशा प्रकारें थोडक्यांत परंतु विस्तारानें त्या वीरांना सांगून ज्यानें आपल्या अंगास चंदनाची उटी लावून शरीरावर सुंदर पुष्पें आणि अलंकार धारण केले आहेत, अशा त्या ज्ञानसंपन्न भीमसेनानें आपलें भाषण संपविलें. नंतर त्या सर्वांच्या भाषणाचा योग्य विचार करून तो धार्मिकश्रेष्ठ धर्मराज किंचित् हंसला आणि नंतर बोलूं लागला.

(३) युधिष्ठिर—तुम्ही सर्व धर्मशास्त्रसिद्धांतांमध्यें निपुण आहां, तुम्हांला त्यांच्या प्रमाणाचेंहि उत्तम ज्ञान आहे. मला तुमचें भाषण जाणण्याची इच्छा असल्यामुळें तुम्ही जें सिद्धांतरूप बोललांत, तेंहि मीं ऐकिलें आहे. आतां माझेंहि म्हणणें तुम्हीं एकाग्रपणें ऐकावें अशी माझी इच्छा आहे. जो मनुष्य पाप, पुण्य, धर्म, अर्थ आणि काम ह्यांमध्यें आसक्त नसतो, जो सर्व दोषांपासून मुक्त असतो, जो सुवर्ण आणि मृत्तिका ह्यांची किंमत सारखीच समजतो, तो सुखदुःखादिकांना प्राप्त करणाऱ्या सर्व गोष्टींपासून मुक्त होतो. हे सर्व प्राणी जन्ममरणात्मक असून जरा आणि नानाप्रकारचे विकार यांनीं युक्त आहेत. त्यांना ज्ञानोपदेशानें ज्ञान उत्पन्न झालें असतां ते मोक्षाचीच प्रशंसा करितात. परंतु त्या मोक्षाचें ज्ञान आम्हांला झालेलें नाहीं. जो मनुष्य सर्वदा स्नेहयुक्त असतो, त्याला मुक्ति नाहीं, असें स्वयंभू ब्रह्मदेवानें सांगितलें आहे. शहाणे लोक मोक्षप्राप्त्यर्थ सर्वदा उत्सुक असतात. म्हणून मनुष्यानें कोणाचें प्रिय करूं नये किंवा अप्रियहि करूं नये. हीच गोष्ट मुख्य असून वाटेल तसें वागल्यानें इष्टसिद्धि होत नसते. मी जें जें कांहीं करितों, तें तें सर्व दैव घडवून आणितें. सर्व प्राण्यांना प्रेरणा करणारें दैव आहे. म्हणून सर्व प्राण्यांत दैवच बलवत्तर आहे, असें तुम्ही सर्व समजा. जो अर्थ कधींहि प्राप्त व्हावयाचा नसतो, तो कितीहि प्रयत्न केले तरी मिळत नसतो व जें व्हावयाचें तें होत असतें, हें पक्कें समजा. त्रिवर्गहीन मनुष्यहि प्रसंगवशात् अधिकारी असल्यास मोक्षाला आवश्यक असें ज्ञान संपादन करितो आणि अंतीं मोक्ष पावतो.

वैशंपायन—याप्रमाणें हेतुयुक्त आणि मनाला पटणारें असें तें भाषण श्रवण करून त्यांना मोठा आनंद झाला व त्यांनीं मोठा हर्षध्वनि केला. त्यांनीं त्या

कुरुश्रेष्ठापुढें हात जोडिले. राजा जनमेजया, सुंदर वर्णांनीं युक्त, अंतःकरणाला आनंदविणारें आणि वाक्यदोषरहित असें तें युधिष्ठिराचें भाषण ऐकून त्या सर्व नरश्रेष्ठांनीं त्याची प्रशंसा केली. त्या महामनस्क वीर्यवान् युधिष्ठिरानेंहि आपल्यावरील त्यांचा विश्वास पाहून त्या सर्वांची प्रशंसा केली आणि पुनरपि त्या उदार अंतःकरणाच्या भागीरथीपुत्राला-भीष्माला-धर्मसंबंधीं प्रश्न केला. १२. २. १६७.

---

## अध्याय १६८ वा.

[ १ संधेयासंधेयपुरुषलक्षणकथन. ]

(१) युधिष्ठिर—महाप्राज्ञ पितामहा, तूं कुरुकुलावर प्रेम करणारा आहेस. तुला एक प्रश्न विचारीत आहें, तर त्याचें उत्तर तूं मला दे. कोणतीं मनुष्यें सौम्य असतात, कोणाच्या योगानें मोठा आनंद होतो, त्याचप्रमाणें वर्तमानकाळीं व भविष्यकाळीं कोण कल्याण करितात, हें मला सांग. जेथें उत्तम अंतःकरणाचे मित्र असतात, तेथें पुष्कळ द्रव्य नसतें व संबंधी बांधवहि नसतात. उत्तम मनाचे श्रोते जसे दुर्मिळ असतात, त्याचप्रमाणें उत्तम मनाचे मित्रहि दुर्मिळ होत. तेव्हां हे धार्मिकश्रेष्ठा, ह्या सर्वांचें कारण मला सांग.

भीष्म—सख्य करण्याला योग्य मनुष्यें कोणतीं, त्याचप्रमाणें कोणाशीं सख्य करणें अयोग्य आहे, हें मी तुला सांगतों.

भीष्म—हे राजा, कोणत्या पुरुषाशीं संधि करावा आणि कोणाशीं करूं नये, हें तत्त्व मी तुला आतां सांगतों. तें तूं लक्ष्यांत घे. युधिष्ठिरा, जो लोभी, क्रूर, धर्मत्याग करणारा, नीच, कपटी, क्षुद्रबुद्धीचा, पापी, सर्वांविषयीं शंका घेणारा, आळशी, दीर्घसूत्री, कुटिल, लोकनिंदित, गुरुस्त्रीगमन करणारा, संकटकाळीं त्याग करणारा, दुरात्मा, निर्लज्ज, सर्वत्र पापदृष्टीनें पाहणारा, नास्तिक, वेदनिंदक, ज्याचा इंद्रियांवर ताबा नाहीं, वाटेल तसे उपभोग घेणारा, असत्यभाषणी, लोकांनीं द्वेष केलेला, प्रतिज्ञा न पाळणारा, दुष्ट, विचारशक्ति नष्ट झालेला, मत्सरी, पापनिश्चयी, दुःशील, मूर्ख, सर्वदा मित्रांना पीडा करणारा, परद्रव्याची नित्य इच्छा करणारा, यथाशक्ति कोणी कांहीं दिलें असतां संतोष न होणारा, जो सर्वदा मित्राचें धैर्य नष्ट करणारा, अस्थानीं क्रोध

करणारा, योग्य ठिकाणीं दुर्लक्ष्य करणारा, अकस्मात् विरुद्ध होणारा, हितकर्त्या मित्रांचा त्याग करणारा, मित्राच्या हातून अल्प अपराध आणि तोहि अज्ञानानें घडला असतां त्याचा द्वेष करणारा, कार्यापुरती मैत्री करणारा, तोंडापुरता मित्र परंतु वस्तुतः द्वेष करणारा, कपटी दृष्टीचा, विपरीत दृष्टीचा, कल्याणकर्त्या पुरुषाचा द्वेष करणारा, मद्यपी, द्वेष करणारा, सदासर्वदा क्रोधी, निर्दय, कठोर, दुसऱ्यांना सर्वदा त्रास देणारा, मित्रद्रोही, प्राणिवधाविषयीं नित्य आसक्त, कृतघ्न आणि अधम ह्यांच्यांशीं ह्या लोकीं कधीं मैत्री करूं नये. त्याचप्रमाणें छिद्रान्वेषी। मनुष्याशींहि मैत्री करणें योग्य नाहीं. आतां मैत्री करण्यास योग्य कोण तेंहि सांगतों, ऐक.

कुलीन, सुशिक्षित, ज्ञानविज्ञाननिष्णात, रूपवंत, गुणी, लोभरहित, श्रमांची पर्वा न करणारे, उत्तम प्रकारचे मित्र, कृतज्ञ, सर्वज्ञ, मधुर बोलणारे, सत्यनिष्ठ, जितेंद्रिय, व्यायामशील, सत्कुलांत झालेले, कुलोचित कार्यभार धारण करणारे, दोषरहित, असे जे प्रसिद्ध पुरुष असतील, त्यांचाच राजांनीं संग्रह करावा. त्याचप्रमाणें हे प्रभो, यथाशक्ति सदाचरण करून त्यांतच संतुष्ट राहणारे, अस्थानीं कधींहि कोप न करणारे, कारणावांचून प्रेम न टाकणारे, प्रेमरहित असूनहि कोणाचा मनानें सुद्धां द्वेष न करणारे, अर्थशास्त्रविशारद असलेले, स्वतः त्रास सोसूनहि सुहृत्कार्यांत तत्पर होणारे, लोंकरीच्या वस्त्राच्या रंगाप्रमाणें ज्यांचे मित्रप्रेम कधीं भंग पावत नाहीं असे, निर्धनावर क्रोध न दाखविणारे, लोभ-मोहांमुळें स्त्रियांच्या ठिकाणीं असलेलें प्रेम न टाकणारे, जे सर्वदा उदार मनाचे, विश्वस्त आणि धर्मसंपन्न, लोष्ठ आणि सुवर्ण यांना समान लेखणारे, सुहृदांवर दृढ प्रेम करणारे, जे शास्त्रादि प्रमाणें आणि प्रारब्धकर्म यांना अनुसरून वागणारे, सेवकांशीं मैत्रीनें वागून धन्याचे कार्याविषयीं जे सर्वदा तत्पर असणारे, अशा पुरुषश्रेष्ठाशीं जो राजा मैत्री करितो, त्याच्या राज्याचा विस्तार चंद्रप्रकाशासारखा होत असतो. ज्यांचें वर्तन सर्वदा शास्त्राला अनुसरून असतें, जे जितक्रोध असतात, ज्यांचें बल संग्रामभूमीवर सर्वदा व्यक्त झालेलें आहे, ज्यांचा जन्म उत्तम कुलांत झाला असून ज्यांचें शील व गुण हीं उत्तम प्रकारचीं असतात, अशाच पुरुषश्रेष्ठांशीं राजानें मैत्री करावी. हे अनघा, मीं तुला दोषयुक्त म्हणून पुरुष सांगितले, त्यांत देखील हे राजा, जे मित्रघातकी आणि कृतघ्न असतील, ते अत्यंत अधम होत. असल्या दुराचारी लोकांचा त्याग करणेंच योग्य आहे, असें सर्व विद्वानांचें मत आहे.

युधिष्ठिर—ह्याचा संबंध विस्तारपूर्वक ऐकावा अशी माझी इच्छा आहे. मित्रद्रोही आणि कृतघ्न म्हणून जे तूं सांगितलेस, ते कोण, हें मला सांग.

भीष्म—हे राजा, ह्यासंबंधीं मी तुला एक पुरातन इतिहास सांगतों. ही गोष्ट उत्तरेकडे म्लेच्छ देशांत घडलेली आहे. कोणीएक मध्यदेशीय ब्राह्मण वेदज्ञानरहित होता. त्याला एक धनधान्यसंपन्न गांव दृष्टीस पडला. तो पाहून भिक्षा मागण्याच्या इच्छेनें तो त्या गांवांत गेला. तेथें एक दस्युजातींतील पुरुष मोठा धनिक होता. त्याला सर्व वर्गांतील विशेष गोष्टींचें ज्ञान उत्तम प्रकारचें होतें. तो ब्राह्मणांचें कल्याण करणारा असून सत्यनिष्ठ आणि दानशील होता. त्या धनिकाकडे जाऊन त्या ब्राह्मणानें भिक्षा मागितली. तेव्हां राहण्याला पुरेशी जागा, वर्षभर पुरेल एवढी भिक्षा, एक दशायुक्त नूतन वस्त्र आणि वयांत आलेली अशी एक गतभर्तृका दासी त्याला दिली. त्या दस्युजातीया-कडून एवढें मिळतांच त्या ब्राह्मणाच्या मनाला मोठा आनंद झाला आणि तो त्या सुंदर गृहांत त्या स्त्रीशीं रममाण होऊन राहिला. तेथें कुटुंबाकरितां श्रम करून तो त्या दासीलाहि साहाय्य करीत असे. अशा प्रकारें त्यानें समृद्ध शबर-गृहामध्यें अनेक वर्षें काढिलीं. तेथें त्या गौतमानें बाणवेध करण्यांत अनेक श्रम घेऊन त्या विद्येंत परम नैपुण्य मिळविलें. तो सर्वदा अरण्यामध्यें राहणाऱ्या हंसांचा शबरांप्रमाणें वध करूं लागला. हिंसा करण्यांत परमकुशल, निर्दय आणि प्राणिवधाचे कामीं सर्वदा आसक्त होऊन तो गौतम शबरसंगतीनें आपणहि शबर होऊन गेला. अशा रीतीनें तो गौतम त्या शबरग्रामीं सुखानें राहिला असतां अनेक पक्ष्यांचा वध करण्यांत त्याचे कित्येक महिने निघून गेले.

नंतर एकदां दुसरा एक ब्राह्मण त्या गांवीं आला. त्यानें जटा वाढविल्या असून, वल्कलें व कृष्णाजिन हीं धारण केलीं होतीं. तो अध्ययनरत, शुचिर्भूत, विनयशील, मिताहारी, ब्राह्मणांचा हितकर्ता आणि वेदपारंगत असा होता. तो ब्रह्मचारी त्या गौतमाच्याच गांवचा असून त्याचा अत्यंत आवडता मित्र होता. म्हणून तो जेथें गौतम रहात असे, त्या शबरग्रामांतच गेला. शूद्रान्न त्याला वर्ज्य असल्यामुळें ब्राह्मणगृहाचा शोध काढीत काढीत तो त्या दस्यु-प्रचुर ग्रामामध्यें इतस्ततः फिरला. शेवटीं तो विप्रश्रेष्ठ त्या गौतमगृहीं आला. इतक्यांत गौतमहि तेथें आला आणि त्या दोघांची भेट झाली. हातांत

धनुष्य व हंसांचा भार स्कंधावर घेऊन तो गौतम आला, तेव्हां त्याच्या अंगावर सर्वत्र रक्ताचे शिंतोडे उडालेले दिसत होते. त्याला पाहून कोणी निंद्य मनुष्यभक्षकच गृहामध्यें शिरला आहे, असें त्या ब्राह्मणाला वाटलें. नंतर हा आपला मित्रच आहे, असें समजतांच तो लज्जायुक्त होऊन म्हणाला, 'तूं मोहानें हें काय आरंभिलें आहेस?' तूं आपल्या कुलांतील धुरीण पुरुष असून मध्यप्रदेशांतील एक प्रसिद्ध ब्राह्मण आहेस. तूं असा दस्युजातीयांमध्यें कसा प्रविष्ट झालास? तुझे पूर्वज द्विज होते, ते प्रख्यात आणि वेदपारंगत होते, त्यांचें स्मरण कर. तूं असा कुलकलंक झाला आहेस! हे ब्राह्मणा, तूं आपल्या अंतःकरणांत आपणाविषयीं विचार कर आणि आपलें सत्व, शील, अध्ययन, आत्मनिग्रह आणि दया हीं लक्ष्यांत आण व ह्या स्थानाचा आधीं त्याग कर.' हे राजा, त्या हितेच्छु मित्राचें या प्रकारचें भाषण ऐकून त्याला दुःख झालें आणि तो निश्चयपूर्वक बोलला कीं 'हे द्विजश्रेष्ठा, मी निर्धन आहें. तसेंच मला वेदविद्याहि अवगत नाहीं. या कारणानेंच मी द्रव्यार्जनाकरितां येथें आलों. हे द्विजसत्तमा, तुझें दर्शन होऊन आज मी कृतार्थ झालों आहें. आजची रात्र तूं येथें रहा आणि उद्यां आपण दोघेहि बरोबरच जाऊं.' हें ऐकून त्या ब्राह्मणाला दया आली आणि तो तेथें राहिला. त्यानें तेथील एकाहि पदार्थाला स्पर्श केला नाहीं. भुकेनें तो पीडित झाला होता आणि गौतमहि त्याला आग्रह करीत होता, तरी तेथें अन्न घेणें त्याला आवडलें नाहीं. १२. २. १६८.

---

## अध्याय १६९ वा.

[ १ धनार्जनाकरितां वणिक्समूहासह निघाला असतां एका मदोन्मत्त वन्य गजाकडून तो तांडा उध्वस्त होऊन गौतमाचें उत्तरेकडे प्रयाण. २ एका न्यग्रोध-वृक्षाच्या मूळावर त्याचें शयन. ३ तेथें बकाधिपति राजधर्म्याचें गौतमास दर्शन. ]

( १ ) **भीष्म**—ती रात्र संपून उजाडल्यावर तो ब्राह्मण तेथून निघून गेला आणि धनार्थी गौतमहि तो गांव सोडून निघाला. इतक्यांत मार्गामध्यें समुद्रावर व्यापार करणाऱ्या लोकांचा एक तांडा त्याच्या दृष्टीस पडला. त्या तांड्याबरोबर गौतमहि समुद्राकडे जाऊं लागला. हे महाराजा, पुढें तो

व्यापाऱ्यांचा समूह एका गिरिगुहेजवळ आला असतां कोणी मदोन्मत्त गज तेथें येऊन त्यानें सर्व वणिक्‌समूहाचा नाश केला. सुदैवानें गौतम मात्र त्या संकटांतून पार पडला. आतां आपण कोणत्या बाजूनें जावें, अशी त्याला चिंता उत्पन्न झाली. शेवटीं जीविताच्या आशेनें त्यानें उत्तरेकडे पलायन केलें. अशा प्रकारें त्या तांड्यापासून भ्रष्ट झाल्यावर गौतम एकटाच त्या वनांत इकडेतिकडे फिरूं लागला. नंतर समुद्राकडे जाण्याचा रस्ता त्याला आढळून आला. त्या मार्गानें जात असतां तो एका रम्य आणि दिव्य अरण्यांत आला. तेथें वृक्षांवर पुष्पें आलीं असून सर्व ऋतूंमध्यें प्रफुल्लित होणाऱ्या आम्रवृक्षांनीं तें वन सुशोभित दिसत होतें. तें नंदनवनासारखें रमणीय असून तेथें यक्ष-किन्नर राहत असत. शाल, ताल, तमाल आणि कालगुरु व चंदनतरु यांच्या योगानें त्या वनाला उत्तम प्रकारची शोभा आली होती. तेथें सुगंधयुक्त पर्वतांच्या रम्य कड्यांवर मोठमोठे सुंदर पक्षी बसून कूजन करीत होते. त्यांमध्यें भारुंड नांवाचे मनुष्यमुखाचे कांहीं पक्षी, कांहीं भूमीवर वास करणारे, कांहीं समुद्रतीरनिवासी, तर कांहीं पर्वतनिवासी पक्षी होते. त्या सर्व पक्ष्यांचें तें मंजुळ कूजन ऐकत तो गौतम मार्गानें चालत होता. इतक्यांत त्या रमणीय प्रदेशामध्यें त्याला एका सुवर्णवालुकामय, सपाट, सुख-दायक आणि स्वर्गसदृश ठिकाणीं एक मंडलाकार न्यग्रोधवृक्ष दिसला. त्याची शोभा अत्यंत रमणीय असून त्याच्या शाखाहि त्याला अनुरूप होत्या. आकारानें तो छत्रासारखा दिसत होता. त्याच्या मूळावर चंदनोदकाचें सिंचन केलेलें होतें व वरून दिव्य पुष्पें ठेवलेलीं दिसत होतीं. त्यामुळें त्या वृक्षाला ब्रह्मसभेची शोभा आली होती.

( २ ) त्या मनाला आनंददायक, अत्युत्कृष्ट, पवित्र, देवमंदिराप्रमाणें शोभायमान, अनेक प्रफुल्लित वृक्षांनीं युक्त अशा वटवृक्षाला पाहून गौतमाला अति आनंद झाला आणि तो त्या वृक्षाखालीं जाऊन बसला. हे कौंतेया, गौतम तेथें बसल्यावर अत्यंत सुखदायक, कल्याणकारक, अनेक प्रकारच्या पुष्पांवरून वाहून येणारा मंगलवारा वाहूं लागला, त्यामुळें गौतमाच्या सर्वांगास मोठा आल्हाद वाटला. त्या पुष्पवाऱ्याचा अंगाला स्पर्श होतांच गौतमाला शांति प्राप्त झाली आणि तीमुळें सुख पावून त्या ठिकाणीं त्याला गाढ झोंप लागली. इतक्यांत सूर्यहि अस्तास गेला. सूर्यास्त होऊन संध्याकाळ झाली असतां ब्रह्मदेवाचा प्रियमित्र नाडीजंघ म्हणून प्रसिद्ध असलेला महाप्राज्ञ कश्यपपुत्र पक्षिश्रेष्ठ

बकाधिपति ब्रह्मलोकाहून तेथें असलेल्या आपल्या गृहीं आला. त्याची राजधर्मा या नांवानें प्रसिद्धि असून पृथ्वीतलावर त्याच्यासारखा दुसरा कोणी नव्हता. त्याचा जन्म देवकन्येच्या पोटीं झाला असून तो अत्यंत श्रीमान् आणि विद्वान् होता. त्याची अंगकांति देवांच्या कांतीप्रमाणें होती. त्याचीं सर्व गात्रें सूर्यसदृश उज्ज्वल अलंकारांनीं विभूषित झाल्यामुळें कांतीनें तो देवसदृश दिसत होता. आलेल्या त्या पक्ष्याला पाहतांच गौतमाला मोठा विस्मय वाटला आणि क्षुधा-तृषांनीं शांत झालेल्या त्या गौतमाच्या मनांत त्याचा वध करण्याचें येऊन तो त्याजकडे पाहूं लागला.

( २ ) राजधर्मा—हे विप्रा, तुझें कल्याण असो. तूं माझ्या गृहीं आलास, हें माझें मोठें सुदैवच होय. सूर्य अस्ताला गेला आहे आणि संध्यासमय प्राप्त झाला आहे. माझ्या गृहीं तूं प्रिय आणि अनिंदित असा अतिथि आला आहेस. प्रातःकाल झाल्यावर मी यथाविधि तुझें पूजन करीन आणि नंतर तूं निघून जावें! १२. २. १६९.

---

## अध्याय १७० वा.

[ १ बकाचें आतिथ्य स्वीकारून त्याच्याच प्रेरणेनें गौतमाचें विरूपाक्ष राक्षसाच्या नगरीं गमन. ]

( १ ) भीष्म—त्या बकाचें तें मधुर भाषण ऐकून गौतम आश्चर्यचकित झाला आणि मोठ्या कौतुकानें तो राजधर्म्याकडे पाहूं लागला.

**राजधर्मा**—ब्राह्मणश्रेष्ठा, मी कश्यपाचा पुत्र असून दाक्षायणी ही माझी माता होय. तूं गुणवान् अतिथि माझ्या गृहीं आला आहेस. तुझें स्वागत असो.

**भीष्म**—राजधर्म्यानें त्या ब्राह्मणाचा यथाशास्त्र सत्कार करून त्याला शाल-वृक्षाचें पुष्प आसनार्थ दिलें आणि भागीरथीच्या मार्गामधून संचार करणारे मोठमोठे मत्स्यहि त्याला अर्पण केले. दुसरेहि अतिपुष्ट मत्स्य त्या कश्यपपुत्रानें अतिथि गौतमाला दिले आणि शीतनिवारणार्थ प्रज्वलित अग्निहि त्याला दिला. पुढें भोजनसंतुष्ट झालेल्या त्या ब्राह्मणाचे श्रमापहारार्थ महातपस्वी राजधर्मा आपल्या पंखांनीं त्याला वारा घालूं लागला. नंतर श्रमापहार होऊन गौतम स्वस्थ बसला असतां राजधर्म्यानें त्याला त्याचें गोत्र विचारिलें. तेव्हां 'मी गौतमकुलोत्पन्न ब्राह्मण आहें, एवढेंच त्यानें सांगितलें. दुसरें कांहींहि उत्तर

त्यानें दिलें नाहीं. पुढें दिव्य पुष्पांनीं सुगंधित अशी दिव्य पर्णशय्या त्या गौतमाला दिली. तीवर तो सुखानें निजला. नंतर झोंपेंतून उठून गौतम त्या पर्णशय्येवर बसला असतां त्या वाक्यविशारद कश्यपपुत्र राजधर्म्यानें त्याला विचारिलें, 'येथें येण्याचा तुझा हेतु तरी कोणता?' त्यावर गौतम म्हणाला, 'हे महामते, मी निर्धन असल्याकारणानें द्रव्याकरितां समुद्रावर जाण्याची माझी इच्छा आहे.' तें ऐकून कश्यपसुत राजधर्मा संतुष्ट झाला आणि म्हणाला, 'त्याबद्दल एवढी उत्कंठा करण्याचें कारण नाहीं. हे द्विजश्रेष्ठा, तूं कृतकार्य होऊन विपुल द्रव्य घेऊन घरीं जाशील. बृहस्पतिमताप्रमाणें द्रव्यप्राप्तीचे चार उपाय आहेत. पहिला परंपरेनें प्राप्त होणारा, दुसरा दैवयोगानें होणारा; तिसरा इच्छानुसार कर्मादिकांनीं होणारा आणि चवथा मैत्रीच्या योगानें घडणारा. मी आतां तुझा मित्र झालों आहें, आणि तुझाहि माझ्या ठिकाणीं स्नेह आहे. म्हणून जेणेंकरून तूं द्रव्यसंपन्न होशील, असा यत्न मी करीन.'

पुढें प्रभातसमयीं गौतम सुखांत आहे, असें पाहून राजधर्मा त्याला म्हणाला, 'अरे गौतमा, तूं ह्या मार्गानें जा, तूं कृतकार्य होशील. येथून तीन योजनांवर माझा मित्र विरूपाक्ष नांवाचा राक्षसांचा अधिपति राहतो. तो महाबलाढ्य आहे. हे द्विजश्रेष्ठा, माझ्या सांगण्यावरून तूं त्याच्याकडे जा. तो तुझे सर्व मनोरथ पूर्ण करील, यांत संशय नाहीं.'

हे राजा, असें त्या राजधर्म्याचें भाषण ऐकून गौतमाच्या सर्व श्रमांचा परिहार झाला आणि मार्गानें यथेष्ट अमृतफलें भक्षण करीत तो तेथून चालता झाला. हे महाराजा, जातांना वाटेंत त्याला चंदन, अगुरु, दालचिनी इत्यादिकांचीं अरण्यें लागलीं व त्यांचा उपभोग घेत तो शीघ्र जाऊं लागला. पुढें त्याला मेरुव्रज नांवाचें एक नगर लागलें. त्याचें द्वार, तट, बुरूज हीं सर्व पर्वतांप्रमाणें होतीं. युधिष्ठिरा, इतक्यांत बुद्धिमान् राक्षसेंद्राला समजून आलें कीं आपल्या मित्रानें पाठविलेला एक अतिथि मोठ्या आनंदानें आपल्याकडे येत आहे. त्यानें आपल्या सेवकांस आज्ञा दिली कीं, 'नगरद्वारामधून त्या गौतमाला शीघ्र घेऊन या.' तेव्हां श्येनपक्ष्याप्रमाणें ते वेगवान् सेवक 'गौतम, गौतम,' म्हणत त्या पुरद्वारीं आले. आणि हे महाराजा, ते राजसेवक त्याला म्हणाले, 'हे द्विजा, आमचा राजा विरूपाक्ष तुझ्या भेटीची फार इच्छा करीत आहे, तर लवकर चल.' तें भाषण ऐकून त्या ब्राह्मणाला मोठा विस्मय

वाटला. त्याचे सर्व श्रमांचा परिहार झाला आणि तो त्वरेनें त्याबरोबर गेला. जातांना त्या नगराचें परम ऐश्वर्य पाहून तो आश्चर्यचकित झाला. पुढें राक्षसेंद्राच्या भेटीच्या इच्छेनें तो ब्राह्मण त्या सेवकांबरोबर शीघ्र राजमंदिरीं गेला. १२. २. १७०.

---

## अध्याय १७१ वा.

[ १ विरूपाक्षाकडून विपुल धनप्राप्ति होऊन गौतमाचें पुनः बकालयीं येणें. २ दुसरे दिवशीं स्वभवनाला जाण्याच्या इच्छेनें मार्गांत प्राणरक्षणार्थ भक्ष्य म्हणून बकवध करण्याविषयीं त्याचा दुष्ट विचार. ]

**भीष्म**—ज्याची माहिती राजाला पूर्वींच मिळाली होती, असा तो ब्राह्मण त्या अति उत्कृष्ट राजवाड्यामध्यें गेला. तेथें राक्षसेंद्रानें त्याचा सत्कार केल्यावर तो उत्तम आसनावर बसला. नंतर राक्षसेंद्र विरूपाक्षानें त्याला गोत्र, चरण आणि ब्रह्मचर्यांतील अध्ययन यांविषयीं विचारिलें असतां त्यानें गोत्राशिवाय दुसरें कांहींहि सांगितलें नाहीं. तेव्हां ह्याला ब्रह्मतेज आणि अध्ययन यांचा गंधहि नसून हा केवळ गोत्र जाणणारा आहे, असें समजून राक्षसानें त्याला त्याचें निवासस्थान कोणतें, म्हणून विचारिलें.

**राक्षस**—हे प्रिय मित्रा, तुझें निवासस्थान कोणतें ? तुझ्या पत्नीचें गोत्र कोणतें ? हें मला खरें सांग. तुला भिण्याचें कारण नाहीं. तूं मजवर पूर्ण विश्वास ठेव.

**गौतम**—माझा जन्म मध्यदेशांत झाला असून शबरगृहीं माझें वसतिस्थान आहे. माझी स्त्री जातीनें शूद्र असून ती पुनर्विवाहित आहे. ही खरी गोष्ट आहे.

**भीष्म**—गौतमाचें तें भाषण ऐकून विरूपाक्ष राजानें मनांत म्हटलें, ' याचें कार्य माझ्या हातून कसें घडणार आणि याच्या योगानें मला पुण्य तरी कोठून लागणार ? हा केवळ जन्मानें ब्राह्मण असून त्या महात्म्याचा मित्र आहे. त्या कश्यपानें ह्याला मजजवळ पाठविलें आहे. त्याचें प्रिय मला केलें पाहिजे. कारण तो सर्वदा माझ्या आश्रयानें राहून माझा भ्राता, संबंधी आणि अत्यंत जिव्हाळ्याचा मित्र आहे. आज कार्तिकी पौर्णिमा असून हजार ब्राह्मण

माझ्या येथें जेवणार आहेत. त्यांमध्यें हा देखील जेवील आणि मीहि त्याला विपुल धन देईन. आजचा दिवस हा अत्यंत पुण्यकारक आहे आणि हा अतिथिहि आला आहे. मीहि धनदानाचा संकल्प केला आहे. आतां ह्यासंबंधीं विचार तो काय करायाचा ?' इतक्यांत स्नान करून शरीरावर उत्तम प्रकारचे अलंकार धारण केलेले व महामोलाचीं रेशमी वस्त्रें परिधान केलेले एक हजार ब्राह्मण तेथें येऊन पोंचले. त्या ब्राह्मणांचें विरूपाक्षानें यथाविधि त्यांच्या योग्यतेनुसार आतिथ्य केलें. हे भरतसत्तमा, राजाज्ञेनें सेवकांनीं भूमीवर दर्भ पसरिले आणि त्यांवर ब्राह्मणांकरितां आसनें मांडलीं. राजानें पूजन केल्यावर ते ब्राह्मण त्या आसनांवर बसले. पुढें त्या राक्षसराजानें तिलदर्भोदक घेऊन विश्वे देव, पितर आणि अग्नि यांच्या ठिकाणीं त्यांची योजना करून त्यांचें यथाशास्त्र पूजन केलें, त्यांना गंधाची उटी लाविली, पुष्पें अर्पण केलीं आणि उत्तम प्रकारें त्यांचें पूजन केलें. तेव्हां ते ब्राह्मण नक्षत्रपति चंद्राप्रमाणें शोभूं लागले. नंतर हिरेजडित सोन्याच्या पात्रांत मध, घृत आणि अन्न घालून तीं त्यानें ब्राह्मणांना अर्पण केलीं.

त्याच्या येथें आषाढी आणि माघ महिन्यांतील पौर्णिमेस पुष्कळ ब्राह्मण येत असत. त्यावेळीं त्याकडून त्या ब्राह्मणांना उत्तम प्रकारें जेवण मिळून शिवाय उत्कृष्ट सत्कारहि होत असे. परंतु विशेषेंकरून शरदृतूच्या शेवटीं म्हणजे कार्तिक पौर्णिमेस तो ब्राह्मणांना मोत्यें, सुवर्ण, रुपें, रत्नें, हिरे, इत्यादिकांबरोबर दक्षिणेसाठीं रत्नराशी देत असे, असें आम्हीं ऐकिलें आहे. असा दिवस प्राप्त होतांच तो त्या द्विजश्रेष्ठांना म्हणाला, ' ब्राह्मणहो, हीं रत्नें आपणाला दिलीं आहेत, तसेंच ज्या पात्रांत आपण जेवलां, तींहि घेऊन तुम्ही खुशाल गृहीं जा.' राक्षसेंद्राचें तें भाषण ऐकून त्या ब्राह्मणांनीं आपल्या इच्छेप्रमाणें रत्नें घेतलीं. राक्षसाधिपतीनें आपला उत्तम सत्कार केल्याचें पाहून त्या ब्राह्मणांना मोठा आनंद झाला. मग नानाठिकाणांहून आलेल्या ब्राह्मणांस थांबवून तो राक्षसेंद्र त्यांना प्रेमानें म्हणाला ' ब्राह्मणहो, आजचा एक दिवस तुम्हांला राक्षसांपासून भिण्याचें कारण नाहीं, म्हणून तुम्ही आनंदानें रहा आणि मग वाटेल तिकडे निघून जा. '

( २ ) तें ऐकून ते ब्राह्मण त्वरेनें आपापल्या ठिकाणीं निघून गेले. गौतमहि तो सुवर्णभार मस्तकावर घेऊन मोठ्या कष्टानें त्या वटवृक्षाखालीं येऊन बसला. त्याला अत्यंत थकवा आला होता व तो क्षुधितहि झाला होता. तें पाहून तो

पक्षिश्रेष्ठ राजधर्मा त्याजकडे गेला आणि स्वागतपूर्वक त्यानें त्याचें अभिनंदन केलें. आपल्या पंखांनीं त्यानें गौतमाला वारा घातला. त्या योगानें त्याच्या श्रमाचा परिहार झाला. नंतर त्या राजधर्म्यानें त्याचें पूजन केलें आणि त्याला उत्तम भोजन दिलें. भोजन होऊन विश्रांति घेतल्यावर त्यानें विचार केला कीं, ' हा आनंददायक सुवर्णाचा भार मला मिळाला आहे आणि मला येथून दूर जावयाचें आहे. परंतु वाटेंत प्राणसंरक्षणाकरितां लागणारें अवश्य असें भक्ष्य मजपाशीं कांहींच नाहीं. ' काय केल्यानें आपलें प्राणाचें संरक्षण होईल, अशी काळजी त्याला लागून राहिली. परंतु वाटेंत भक्ष्याच्या ठिकाणीं उपयोगीं पडेल, असें त्याला कांहीं दिसेना. हे पुरुषश्रेष्ठा, तेव्हां त्या कृतघ्नानें असा विचार केला कीं ' हा मांसराशि बकराज माझ्याजवळ आहे. तेव्हां याचाच वध करून त्याला घेऊन आपण सत्वर निघून जावें ! ' १२. २. १७१.

---

## अध्याय १७२ वा.

[ १ राजधर्म्याचा वध करून व त्याचें मांस घेऊन गौतमाचें स्वपुराला गमन. २ दुसऱ्या दिवशीं बकाची भेट न झाल्यामुळें विरूपाक्षाकडून त्याच्या शोधार्थ स्वपुत्राची योजना. ३ पित्राज्ञेनें विरूपाक्षाकडून गौतमाचा सहपरिवार वध. ]

( १ ) भीष्म—तेथें जवळच त्या ब्राह्मणाच्या रक्षणाकरितां पक्षिश्रेष्ठ बकानें वाऱ्याच्या ठिकाणीं मोठा अग्नि तयार करून ठेवून तो स्वतः निर्भयपणें त्या ब्राह्मणाच्या समीप निजला होता. पुढें त्या दुष्ट व कृतघ्न गौतमाचे मनांत त्या राजधर्म्याचा वध करण्याचें येऊन त्यानें एक जळतें काष्ठ त्या अग्नींतून काढलें आणि त्याच्या योगानें आपल्यावर विश्वास ठेवणाऱ्या त्या पक्ष्याचा वध केला. त्याच्या वधानें त्याला मोठा आनंद झाला, त्या भरांत आपल्या कृत्याचा परिणाम काय होईल, हें त्याच्या लक्ष्यांत आलें नाहीं. पुढें त्या पक्ष्याचे पंख व केंस काढून त्याला अग्नींत भाजलें आणि मग तो ब्राह्मण सुवर्ण आणि तो मेलेला पक्षी यांसह सत्वर गांवाला निघाला.

( २ ) पुढें पौर्णिमेचा दुसरा दिवस गेल्यावर विरूपाक्ष आपल्या मुलाला म्हणाला, ' पुत्रा, पक्षिश्रेष्ठ राजधर्मा कुठें दिसत नाहीं. तो प्रत्येक दिवशीं सकाळीं ब्रह्मदेवाच्या वंदनाकरितां येत असतो व मला भेटल्यावांचून पुनः घरीं कधीं जात नसतो. तो गेल्या दोन रात्रीं माझ्या गृहीं आला नाहीं.

त्यामुळें माझ्या मनाला बरें वाटत नाहीं. तूं जा आणि त्या माझ्या मित्राची चौकशी कर. त्याच्याकडून येथें आलेला ब्राह्मण अध्ययनहीन व ब्रह्मतेजोरहित असून हिंसकहि होता. त्यामुळें मला शंका येते कीं त्या द्विजाधमानें त्या पक्ष्याचा वध केला असावा. त्याच्या लक्षणांवरून तो दुराचारी आणि दुर्बुद्धि असावा, अशी माझी कल्पना आहे. त्याची आकृति भयंकर असून तो निष्कृप, दुष्ट आणि दस्यूंप्रमाणें नीच आहे. तो गौतम त्याच्याचकडे गेला आहे, त्यामुळें माझें मन अत्यंत उद्विग्न झालें आहे. म्हणून हे पुत्रा, तूं शीघ्र त्या राजधर्म्यांच्या गृहीं जा आणि तो शुद्धात्मा जीवंत आहे किंवा नाहीं, ह्याचा शोध कर, विलंब लावूं नकोस.' असें राजानें सांगतांच आपल्याबरोबर राक्षस घेऊन तो राजपुत्र शीघ्र त्या वटवृक्षाकडे आला. तेथें येऊन पाहतो तों राजधर्म्याचा अस्थिपंजर मात्र त्याच्या दृष्टीस पडला. अस्थिपंजर पाहतांच त्या राजपुत्राला रडें कोसळलें. तथापि त्या स्थितींतहि गौतमाला धरण्यासाठीं त्यानें आपली सर्व शक्ति खर्च केली. नंतर जवळूनच राक्षसांनीं त्या गौतमाला धरून आणिलें. त्यावेळीं त्याचे जवळ पंख आणि चरण ह्यांविरहित राजधर्म्याचें शरीर मात्र सांपडलें. नंतर त्याला घेऊन ते सर्व मेरुव्रज नगराला गेले आणि तेथें तें राजधर्म्याचें शरीर आणि त्याबरोबरच त्या कृतघ्न, कठोर आणि पापी गौतमाला विरूपाक्ष राजाला त्यांनीं दाखविलें. राजधर्म्याचा तो अस्थिपंजर पाहून विरूपाक्ष राजा, त्याचे पुरोहित आणि अमात्य हे रुदन करूं लागले. त्यावेळीं त्याच्या मंदिरांत सर्वत्र एकच रुदनस्वराचा कोलाहल माजून राहिला. तेथील सर्व स्त्रिया आणि कुमार यांचीं मनें अगदीं अस्वस्थ होऊन गेलीं.

( ३ ) नंतर राजा विरूपाक्षानें आपल्या पुत्रास आज्ञा दिली कीं, 'ह्या पापी गौतमाचा वध करून हे राक्षस ह्याचें मांस यथेष्ट भक्षण करोत. हा पापाचार, पापकर्मा, पापात्मा आणि पापसाधन आहे. हे राक्षसांनो, ह्याचा तुम्ही वध करावा, असें माझें मत आहे.' त्या राक्षसांनीं राक्षसेंद्राचें असें भाषण ऐकिलें तथापि ते त्या पापकर्मी गौतमाचें मांस भक्षण करण्यास तयार होईनात. त्यांनीं राजचरणीं मस्तक ठेवून विनंतिपूर्वक सांगितलें कीं, 'महाराज, ह्या नीचाला दस्यूंच्या स्वाधीन करा, आम्हांला ह्या पाप्याचें मांस नको!' त्यावर 'ठीक आहे,' असें त्या राक्षसेंद्रानें म्हटलें आणि 'आजच ह्याला दस्यूंच्या स्वाधीन करा' असें त्यांना सांगितलें. नंतर त्या राक्षसांनीं हातांत शूल व व पट्टिश घेऊन त्यांच्या योगानें त्या गौतमाचे तुकडे तुकडे केले आणि ते दस्यूंना

वांटून दिले. त्या पापकर्मी गौतमाला ते दस्युहि खाण्याची इच्छा करीनात. कारण मांसभक्षक कृतघ्नाचें मांस खाण्याची कधीं इच्छा करीत नसतात. राजा, ब्रह्मघ्न, मद्यपी, चोर आणि भग्नव्रती अशा सर्व पातक्यांना प्रायश्चित्त सांगितलें आहे. परंतु कृतघ्नाला मात्र प्रायश्चित्त कोठें सांगितलें नाहीं. मित्रद्रोही, कृतघ्न आणि नृशंस अशा नीचांना क्रव्याद्–मांसभक्षक–आणि कृमिहि कधीं खाऊं इच्छीत नाहींत. १२. २. १७२.

---

## अध्याय १७३ वा.

[ १ विरूपाक्षाकडून बकराजाचें चितारोपण झाल्यावर आकाशांतून सुरभीच्या मुखांतून दुग्धमिश्र फेंस चितेवर पडून राजधर्म्याचें पुनरुज्जीवन व इंद्राकडून त्याला ब्रह्मशापादिकथन. २ राजधर्म्याच्या सांगण्यावरून इंद्राकडून पुनः गौतमाला जीवप्रदान. ३ कृतघ्न गौतमाला नरकप्राप्ति होईल, असा देवांचा शाप. ४ मनुष्यानें सर्वदा कृतज्ञ असावें. ]

( १ ) भीष्म—नंतर त्या प्रतापी राक्षसेंद्रानें अनेक प्रकारचीं रत्नें, सुगंधी पदार्थ आणि रम्य वस्त्रें ह्यांच्या योगानें विभूषित चिता रचून तीवर त्याचें दहन केलें आणि त्याचीं सर्व प्रेतकर्मेंहि करविलीं. त्यावेळीं दक्षकन्या कल्याणी सुरभि ही आकाशांत त्याच्यावर होती. तिच्या मुखांतून दुग्धमिश्र फेंस निघून तो त्या राजधर्म्याच्या चितेवर पडला. त्यामुळें हे अनघा, तो बकाधिपति पुनः जीवंत झाला. त्यानें तत्काळ उडी मारली आणि तो विरूपाक्षाला जाऊन भेटला. त्यावेळीं देवराज इंद्र हा विरूपाक्षपुराला आला होता. त्यानें राजधर्म्याला राक्षसेंद्रानेंच जीवंत केल्याबद्दल आनंद प्रदर्शित केला आणि राजधर्म्याला ब्रह्मदेवानें दिलेल्या शापाचें कथन केलें. तो म्हणाला, ‘ हा बकाधिपति पूर्वीं एकदां ब्रह्मदेवाच्या सभेंत गेला नव्हता, तेव्हां पितामहाला राग येऊन त्यानें त्या खगपतीला म्हटलें, ‘ हा नीच बकाधम ज्याअर्थीं माझ्या सभेला आला नाहीं, त्याअर्थीं लवकरच ह्या दुष्टात्म्याचा वध होईल.’ त्याप्रमाणें ब्रह्मदेवाच्या शापावरून गौतमहस्तें याचा वध झाला असून त्या ब्रह्मदेवानेंच पुनः अमृतसिंचनानें त्याला जीवंत केलें आहे.

( २ ) नंतर राजधर्मा बक त्या इंद्राला नमस्कार करून बोलला कीं, ‘ हे सुरेश्वरा, मजवर जर तुमची कृपा असेल, तर माझ्या ह्या प्रियमित्राला तुम्हीं

पुनः जीवंत करावें.' हे पुरुषश्रेष्ठा, तें त्या बकाधिपतीचें भाषण श्रवण करून इंद्रानें अमृतसिंचन केलें आणि त्या गौतमाला जीवंत केलें. तेव्हां त्या बकाधीश राजधर्म्यानें गौतमाकडे जाऊन त्याला आलिंगन दिलें आणि त्या पापकर्म्याला सर्व द्रव्यासहवर्तमान त्याच्या गांवीं पाठविलें आणि आपण गृहीं आला. पुढें तो बक योग्य प्रकारें ब्रह्मदेवाच्या सभेमध्यें गेला, तेव्हां ब्रह्मदेवानेंहि त्या महात्म्याचें योग्य गौरव करून त्याचा बहुमान केला.

( ३ ) इकडे गौतमहि शबरगृहाला आला. नंतर त्याला त्या शूद्र स्त्रीपासून अनेक पुत्र झाले. हे प्रभो, त्यावेळीं देवगणांनीं त्या गौतमाला असा भयंकर शाप दिला कीं, ' हा पापी कृतघ्न पुनर्विवाहित स्त्रीचे ठिकाणीं चिरकाल पुत्रोत्पत्ति करून शेवटीं नरकाला जाईल. ' हे भारता, हें आख्यान, नारद ऋषीनें पूर्वींच मला सांगितलें होतें. त्याचें स्मरण करून मीं तें तुला आज सांगितलें आहे. कृतघ्न पुरुषाला यश कोठचें किंवा त्याला वसतिस्थान तरी कोठचें ? त्याला सुखप्राप्ति तरी कोठून होणार ? कृतघ्नावर कोणाचाहि विश्वास बसत नाहीं. कृतघ्नाच्या पापाला निष्कृति नाहीं. मित्रद्रोह कोणींहि आणि विशेषेंकरून मनुष्यानें तर कधींच करूं नये. मित्रद्रोही मनुष्याला अनंत अशा घोर नरकाची प्राप्ति होत असते.

( ४ ) मनुष्यानें सर्वदा कृतज्ञ राहून मित्रांची इच्छा करावी. कारण, मित्रांपासूनच त्याला सर्व कांहीं मिळतें आणि मित्रांपासूनच त्याचा बहुमान होतो. मित्रापासूनच त्याला भोगांची प्राप्ति होते आणि मित्रांपासूनच तो संकटापासून मुक्त होतो. शहाण्यानें मित्राचा योग्य सत्कार करून त्याचा मान ठेवावा आणि पापी, कृतघ्न, निर्लज्ज, मित्रद्रोही, कुलांगार आणि दुष्ट अशा नराधमाचा त्याग करावा. हे धार्मिकश्रेष्ठा, ह्याप्रमाणें मित्रद्रोही व कृतघ्न पुरुषाचें वृत्त मीं तुला सांगितलें आहे, आतां यापुढें आणखी तुला काय ऐकावयाचें आहे ?

**वैशंपायन**—जनमेजया, महात्म्या भीष्माच्या तोंडचें हें भाषण ऐकून युधिष्ठिराच्या मनाला परम आनंद झाला. १२. २. १७३.

येथें दुसरें आपद्धर्मपर्व समाप्त झालें.

---

# मोक्षधर्मपर्व ३

—०—

## अध्याय १७४ वा.

[ १ भीष्माकडून युधिष्ठिराला विप्र आणि सेनजित् यांमधील संवादाचें कथन. २ विप्राकडून सेनजिताला पिंगलोपाख्यानकथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—राजधर्माला आश्रयभूत असे जे सर्व कल्याणावह आपद्धर्म ते त्वां पितामहानें मला सांगितले. आतां हे पृथ्वीपते, गृहस्थादिक सर्व आश्रमांनीं आचरण्यास योग्य असा जो मोक्षरूपी श्रेष्ठ धर्म त्याचें मला कथन कर.

**भीष्म**—धर्म हा सर्व आश्रमांनीं आचरण करावा, असें सांगितलें आहे. परब्रह्मरूप सत्य वस्तूचें श्रवण-मनन-निदिध्यासनादिक जें आलोचन त्याचें फल साक्षात्कार असून तें प्रत्यक्ष–मरणापूर्वींच प्राप्त होणारें–असतें. धर्माचीं द्वारें जरी पुष्कळ असलीं, तरी ज्याला जें इष्ट वाटत असेल, त्याचेंच आचरण केल्यास, तो धर्म व्यर्थ होत नसतो. हे भरतसत्तमा, धर्माचे अनेक मार्ग असून त्यांपैकीं ज्यावर मनुष्याचा विश्वास बसून तो कल्याणावह आहे, अशी त्याची समजूत होते, त्याच्याच आचरणानें त्याची चित्तशुद्धि होते आणि त्यामुळें हे सर्व लोकव्यवहार त्याला असार वाटूं लागून शेवटीं वैराग्य त्याचे मनांत उत्पन्न होतें, ह्यांत संशय नाहीं. हे युधिष्ठिरा, ह्या भूलोकापासून सत्यलोकापर्यंतचे सर्व लोक दोषपूर्ण असल्याकारणानें तत्प्राप्त्यर्थ यत्न न करितां बुद्धिमान् मनुष्यानें स्वतःच्या मोक्षप्राप्तीकरितां यत्न करावा.

**युधिष्ठिर**—हे पितामहा, धन, स्त्री, पुत्र, पिता ह्या सर्वांचा नाश झाला असतां कोणत्या विचाराचे योगानें त्यापासून उत्पन्न होणारा शोक नाहींसा होईल, तें मला सांग.

**भीष्म**—धन, स्त्री, पुत्रादिकांचा नाश झाला असतां मनुष्यानें हें सर्व जगत् दुःखरूप आहे, असा विचार केल्यानें त्या शोकापासून तो मुक्त होतो. ह्याविषयीं एक पुरातन इतिहास आहे, तो असा—

पूर्वी सेनजित् नांवाचा एक राजा होता. पुत्रशोकानें संतप्त होऊन त्याचें मन अगदीं विव्हल होऊन गेलें होतें. त्यावेळीं त्याचा एक ब्राह्मणमित्र त्याजवळ

आला आणि त्याला म्हणाला, 'हे राजा, तूं आधींच मोहमग्न आहेस; तरी आतां काय म्हणून पुनः मोहांत पडत आहेस? आत्मज्ञानरहित तूं असल्यामुळें वस्तुतः लोकांनीं तुझ्याविषयीं शोक करावा, तो तूंच लोकांविषयीं शोक करीत बसला आहेस, याला म्हणावें तरी काय? तुझ्याविषयीं जे आज शोक करीत आहेत, तेहि शोच्य आहेत, त्यांनाहि तुझ्या पुत्रासारखीच गति प्राप्त होणार आहे. राजा, तूं, मी आणि तुझी सेवा करणारे हे सर्व लोक, जेथून आलों तेथेंच सर्वांना जावयाचें आहे.'

सेनजित्—हे तपोधना विप्रा, कोणती बुद्धि, कोणतें तप, कोणत्या प्रकारची समाधि, कोणतें ज्ञान किंवा शास्त्र आहे, कीं ज्याच्या प्राप्तीनें तुला दुःख होत नाहीं.

ब्राह्मण—हे राजा, देव, पशुपक्षी आणि मनुष्यें इत्यादि उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ सर्व भूतें वेगवेगळ्या कर्मांमध्यें आसक्त होऊन दुःखव्याप्त होऊन गेलीं आहेत, तें पहा. हा आत्मा चिन्मात्रस्वरूप–परब्रह्मरूप–असल्यामुळें हा देह माझा नाहीं. ही सर्व पृथ्वी माझी आहे, तशीच ती इतरांचीहि आहे, या विचारानें मला कधीं व्यथा होत नाहीं. हा विचार माझ्या मनांत सर्वदा असल्यामुळें मला आनंद होत नाहीं किंवा दुःखहि होत नाहीं. ज्याप्रमाणें महासागरामध्यें काष्ठाला काष्ठ लागून तीं दोन्हीं काष्ठें कांहीं काळ बरोबर वाहून येतात आणि मग त्यांचा वियोग होतो, त्याचप्रमाणें या संसाररूपी महासागरांत प्राण्यांचा समागम आहे. पुत्र, पौत्र, आप्तेष्ट या सर्वांचीहि अशाच प्रकारची स्थिति असल्यामुळें त्यांच्यावर प्रेम करूं नये. कारण त्यांचा वियोग हा निश्चित आहे. स्थूल दृष्टीला अगोचर अशा शुद्ध चिन्मात्रापासून तुझा पुत्र उत्पन्न झाला असून पुनरपि तो त्याच परमात्मस्वरूपांत लीन झाला असल्यामुळें स्थूलदृष्टि तुला तो दिसत नाहीं. तुझ्या पुत्राला तुझें दर्शन होणें किंवा तुलाहि त्याचें दर्शन होणें शक्य नाहीं. तेव्हां तूं कोण आहेस आणि कशासाठीं शोक करीत आहेस? विषयांची तृप्ति न झाल्यामुळें दुःख प्राप्त होतें आणि दुःखनाशाबरोबर सुखाची प्राप्ति होते. सुखापासूनच दुःखाची प्राप्ति होते. अशा रीतीनें वारंवार दुःखप्राप्ति होत असते. सुखामागून दुःख आणि दुःखामागून सुख अशीं मनुष्याचीं सुख-दुःखें चक्राप्रमाणें फिरत असतात. सुखामुळेंच तुला दुःखाची प्राप्ति झाली आहे आणि पुनः तुला सुख प्राप्त होईल. कोणालाहि कायमचें दुःख किंवा

कायमचें सुख प्राप्त होत नसतें. शरीर जसें सुखाचें स्थान आहे, त्याचप्रमाणें तें दुःखाचेंहि आहे. या देहाचे योगानें मनुष्य जें जें कर्म करितो, त्याच्या अनुषंगानें त्याला सुखदुःखांची प्राप्ति होत असते.

मनुष्याच्या जीविताला कारणीभूत असें जें लिंगशरीर तें स्थूलशरीराबरोबरच उत्पन्न होतें. संसारदशेंत हीं दोनी शरीरें विविधरूपें धारण करितात आणि मोक्षकालीं स्थूलदेहाबरोबरच लिंगदेहाचाहि नाश होतो. अनेक प्रकारच्या स्नेहपाशांनीं मनुष्यें बद्ध झालीं असून त्यांच्या मनांत विषयवासना असतात, त्यामुळें पाण्यांतील वाळूच्या सेतूप्रमाणें त्यांचे सुखविषयक प्रयत्न निष्फल होऊन ते क्लेश पावतात. तेली ज्याप्रमाणें तिळांना घाण्यांत घालून तेल काढतात, त्याचप्रमाणें अज्ञानसंभव क्लेश मनुष्याला संसारचक्रांत पिळून काढितात. मनुष्य आपल्या स्त्रीसाठीं अशुभ कर्म करीत असतो, परंतु त्यामुळें त्या एकट्यालाच इहलोकीं व परलोकीं क्लेश सोसावे लागतात. सर्व मनुष्यें पुत्र, स्त्री, कुटुंब यांच्या ठिकाणीं आसक्त झालेलीं असल्यामुळें ज्याप्रमाणें वृद्ध गज चिखलांत राहतात, त्याप्रमाणें शोककर्दमामध्यें मग्न होऊन जातात. हे प्रभो, म्हणून पुत्रनाश, वित्तनाश, आप्तेष्टांचा नाश झाला असतां मनुष्याला दावानलाप्रमाणें मोठें दुःख होतें. हे राजा, सुख-दुःख, ऐश्वर्य-अनैश्वर्य या सर्व गोष्टी दैवाधीन आहेत, म्हणून त्यांबद्दल शोक करणें योग्य नाहीं. मनुष्याला उपकार करणारा स्नेही असो अथवा नसो, त्याला शत्रु असोत अगर मित्र असोत, त्याला बुद्धि असो अथवा नसो, त्याला दैवानेंच सुखप्राप्ति होत असते. सुहृद असले म्हणजे सुख देतात असें नाहीं किंवा शत्रु असले म्हणजे दुःख देतात असें नाहीं. बुद्धि असली म्हणजे द्रव्यप्राप्ति होतेच असें नाहीं किंवा धनाच्या योगानें सुखप्राप्ति होते असेंहि नाहीं. बुद्धीच्या योगानें धनलाभ होतो असें नाहीं किंवा मूर्खत्वाच्या योगानें दारिद्र्य येतें असें म्हणतां येत नाहीं. हे सुखादिक भोग्य पदार्थ कसे निर्माण होतात, हें तत्त्ववेत्त्यालाच समजतें, इतरांस समजत नाहीं.

मनुष्य बुद्धिमान्, शूर, मूढ, मूर्ख, जड, भीरू, दीर्घदर्शी, दुर्बल किंवा बलवान् कसाहि असो, तो दैववान् असेल तरच त्याला सुख प्राप्त होतें. धेनूवर त्याच्या वत्साची, गवळ्याची, त्याच्या धन्याची, तस्कराचीहि सत्ता चालते, परंतु ज्याला तिचें दूध प्यावयास मिळतें, त्याचीच ती धेनु होय, हें निश्चित समजावें. तिजवरील इतरांची ममता व्यर्थ होय. ह्या लोकीं जे अत्यंत मूढ अथवा अत्यंत

ज्ञानी असतात, त्यांसच सुख प्राप्त होतें. ह्या दोहोंच्या मध्यें जे असतात, त्यांना केवळ क्लेश होतात. जे ज्ञानी सुषुप्ति आणि समाधि यांमध्येंच रममाण होतात, ते मध्यम स्थितींत रममाण होत नाहींत. कारण सुषुप्ति अथवा समाधि यांच्या प्राप्तीनें सुख होतें आणि या दोहोंमधील स्थितींत जे असतात, त्यांना दुःखप्राप्ति होत असते. या मध्यम स्थितींत देखील विवेकी पुरुषांना क्लेश होत नाहींत. जे ब्रह्मसुखाला पोंचल्यामुळें सुखदुःखादिक द्वंद्वापासून मुक्त असतात, ज्यांचा मत्सर नष्ट झालेला असतो, त्यांना स्त्रीप्रमुख अर्थ अथवा त्यांचे वियोगरूपी अनर्थ हे पीडादायक होत नसतात. जे आत्मज्ञान न झाल्या- मुळें मोहग्रस्त झालेले असतात, ते अत्यंत आनंद पावतात व प्रसंगीं अत्यंत दुःखी होतात. अत्यंत अज्ञ मनुष्य स्वर्गांतील देवांप्रमाणें सर्वदा आनंदांत अस- तात, ते गर्व पावून सदसद्विवेकहीन झालेले असतात. कामादिकांच्या योगानें त्यांचें चित्त ग्रस्त झालेलें असतें आणि दुसऱ्याविषयीं ते तिटकारा करणारे असतात. हे अज्ञ लोक जरी सुखी दिसले, तरी त्यांच्या सुखाच्या शेवटीं दुःख हें असतेंच. तें मूर्खसुख कधीं कल्याणकारक होत नसतें. म्हणून सुखाच्या ठिकाणीं आसक्त न होतां आणि दुःखामुळें उद्विग्न न होतां ज्ञानसाधनाविषयीं मनुष्यानें उत्साह धारण करावा. अणिमादिक ऐश्वर्य आणि विद्या हीं दक्ष पुरु- षाच्याच ठिकाणीं आढळून येतात, आळशी मनुष्याचे ठायीं त्यांचें वास्तव्य कधीं नसतें.

सुख अथवा दुःख, प्रिय अथवा अप्रिय, प्राप्त होईल, त्याप्रमाणें त्याला वश न होतां तें मनुष्यानें भोगावें. शोकाचे हजारों त्याचप्रमाणें भयाचे शेंकडो प्रसंग प्रत्येक दिवशीं मूढ मनुष्यावर येत असतात, शहाण्यावर येत नाहींत. बुद्धिसंपन्न, स्वतःसिद्ध, विचारशक्ति- युक्त, शास्त्राभ्यासरत, शास्त्रीय गोष्टींत असूयारहित, बाह्येंद्रियांचा आणि मनाचा जय केलेला असा जो मनुष्य असतो, त्याला शोक कधींहि स्पर्श करीत नसतो. म्हणून शहाण्या मनुष्यानें ह्या गोष्टी लक्ष्यांत ठेवून व कामादिकांपासून आपल्या चित्ताचें रक्षण करून नेहमीं वागावें. विश्वोत्पत्ति- लयस्थान जें ब्रह्म त्याचें ज्याला ज्ञान आहे, त्याला शोक कधींहि स्पर्श करूं शकत नाहीं. ज्यापासून आपणाला शोक, ताप, दुःख किंवा आयास होतो, तें आपल्या शरीराचें जरी एखादें अंग असलें, तरी त्याचाहि त्याग करावा. कोणत्याहि वस्तूसंबंधीं 'ही माझी आहे' अशी बुद्धि एकदां झाली म्हणजे तें

तापाला कारण होत असतें. विषयांपैकीं ज्याचा ज्याचा त्याग करावा, तो तो सुखाच्या वृद्धीला कारण होत असतो. कामाच्या मागें मनुष्य लागला असतां त्या कामाच्या मागून आपलाहि नाश करून घेतो. ह्या लोकीं मिळणारें जें कामसुख अथवा स्वर्गलोकीं मिळणारें जें दिव्यसुख ह्या दोन्हीलाहि वैराग्य-सुखाच्या षोडशांशाइतकी योग्यता नाहीं. पूर्वजन्मीं मनुष्याच्या हातून जें बरें किंवा वाईट कर्म झालें असेल, त्याप्रमाणें या जन्मीं तें त्याला, मग तो प्राज्ञ असो, मूढ असो अथवा शूर असो, जसेंच्या तसेंच भोगलें पाहिजे. याप्रमाणें प्रियाप्रिय सुख-दुःखांची प्राप्ति मनुष्याला होत असते, असा विचार करून शहाणा मनुष्य सुखानें राहतो.

मनुष्यानें आपल्या अंतःकरणांतील विषयवासनेचा तिरस्कार करून तिचा त्याग केला पाहिजे. अंतःकरणांत वाढलेली कामवासना म्हणजे प्रत्यक्ष मृत्युच होय. प्राण्यांच्या शरीरांतील विषयवासना हीच कांहीं निमित्तानें पुढें क्रोधरूपानें बाहेर पडते, असें ज्ञानी लोकांचें मत आहे. कूर्म ज्याप्रमाणें आपलीं सर्व गात्रें संकुचित करून ठेवीत असतो, त्याप्रमाणें मनुष्य जेव्हां आपल्या सर्व वासनांचा संहार करून असतो, तेव्हां हा आत्मा स्वरूपामध्येंच आपल्याहून अभिन्न असें परब्रह्म पाहूं लागतो. जेव्हां मनुष्य कोणालाहि भीत नाहीं आणि त्याचीहि भीति जेव्हां कोणी धरीत नाहीं, जेव्हां तो कशाचीहि इच्छा करीत नाहीं किंवा कोणाचाहि द्वेष करीत नाहीं, तेव्हां तो परमात्मरूपी होतो. जेव्हां सत्य-अनृत, प्रियाप्रिय, शोकानंद हीं दोन्हीं तो टाकून देतो, तेव्हांच मनुष्याच्या मनांत उपरति उत्पन्न होते. जेव्हां ज्ञानी मनुष्याच्या हातून कोणाचेंहि कायावाचामनानें वाईट होत नाहीं, तेव्हां तो ब्रह्मस्वरूप होत असतो. दुर्मति लोकांना जिचा त्याग करितां येत नाहीं, मनुष्याचा अंतकाल आला असतांहि जिचा अंत होत नाहीं आणि जो मनुष्याच्या शरीरांतील एक प्राणांतिक रोगच होय, त्या तृष्णेचा त्याग करणाऱ्या मनुष्यालाच सुखाची प्राप्ति होते.

(२) हे पार्थिवा, ह्यासंबंधीं पिंगलेनें गाइलेल्या कांहीं गाथा माझ्या ऐकण्यांत आहेत. त्यांत संकटकालीं तिला सनातन धर्माची कशी प्राप्ति झाली तें त्यावरून समजून येतें. संकेतस्थळीं पिंगला वेश्या गेली असतां तेथें तिच्या कांताची भेट तिला झाली नाहीं. त्यामुळें ती दुःख पावली. पुढें तिनें शांति धारण करून आपले मनाचा निर्धार केला.

पिंगला—मी उन्मत्त होऊन निर्विकार व इष्ट अशा अंतर्यामी स्वामीला विसरून गेलें आणि अगदीं जवळ हृदयकोशांत असलेल्या आनंदप्रद रमणाची प्राप्ति करून घेतली नाहीं. ज्याला नऊ द्वारें असून एकच आधारस्तंभ आहे, असें हें शरीररूपी मंदिर मी विद्याबलानें बंद करून घेतें. तेथें चिन्मात्ररूप परमात्म्याचा उदय होऊन एकदां अभेदजनक अज्ञानाचा नाश झाला, म्हणजे हा परमात्मा आणि ही मी असा भेद कोण करील? आत्मलाभानें निरिच्छ झालेल्या मला आतां कामुकरूपानें नरकरूप धूर्त फसवूं शकणार नाहींत. आत्मज्ञानानें अविद्यानिद्रेचा नाश झाल्यामुळें मी आतां जागरूक आहें. पूर्वजन्मींच्या पुण्यानें अथवा सुदैवानें अनर्थहि अर्थाला कारण होत असतात. त्याप्रमाणें मी आतां ज्ञानरूप झालें आहें. तशीच जितेंद्रिय झालें आहें. निराश मनुष्याला सुखानें झोंप येत असते. नैराश्य हें परम सुख आहे. आशेचें पर्यवसान पिंगलेनें निराशेंत केल्यामुळें ती आतां सुखानें निद्रा घेत आहे.

भीष्म—हीं व अशाच प्रकारचीं त्या ब्राह्मणाचीं दुसरीं हेतुपूर्ण भाषणें ऐकून सेनजित् राजाचें समाधान झालें व तो सुखी होऊन आनंदानें राहूं लागला. १२. ३. १७४.

---

## अध्याय १७५ वा.

[ १ काळ वेगानें चालला असतां कोणतें कृत्य मनुष्याला कल्याणकारक आहे, अशा युधिष्ठिराच्या प्रश्नाला पितापुत्रसंवादानें भीष्माचें उत्तर. ]

( १ ) युधिष्ठिर—पितामहा, हा सर्वभूतांचा क्षय करणारा काल अतिवेगानें निघून जात असतां कोणतें कृत्य मनुष्यानें केलें असतां तें श्रेयस्कर होईल, तें मला सांग.

भीष्म—युधिष्ठिरा, ह्यासंबंधींहि एक पितापुत्रसंवादरूपी प्राचीन इतिहास सांगत असतात. तो सांगतों, नीट लक्ष्यांत घे. सर्वदा अध्ययनरत असा मेधावी नांवाचा एक ब्राह्मणपुत्र असून तो अत्यंत बुद्धिमान् होता. तो मोक्षधर्मामध्यें जसा कुशल तत्त्वज्ञ होता, तसाच लौकिक व्यवहारामध्येंहि निष्णात होता. त्यानें एकदां आपल्या अध्ययननिष्ठ पित्याला प्रश्न केला.

**पुत्र**—ताता, मनुष्याचें आयुष्य त्वरित निघून जात चाललें असतां त्यानें काय करावें कीं त्याचे योगानें त्याला त्वरित फलप्राप्ति होईल, तें मला क्रमपूर्वक कथन कर. तें ऐकून तदनुसार मी धर्माचरण करीन.

**पिता**—पुत्रा, ब्रह्मचर्य धारण करून प्रथम वेदाध्ययन करावें. नंतर पितरांच्या उद्धारार्थ गृहस्थाश्रमाच्या योगानें पुत्रांची इच्छा करावी. अग्नि ठेवावा, यज्ञ यथाशास्त्र करावे आणि नंतर वनांत जाऊन मुनीप्रमाणें ध्याननिष्ठ रहावें.

**पुत्र**—बाबा, ह्या लोकीं सर्व बाजूंनीं आघात होत असतां, सर्वांना घेरून टाकिलें असतां आणि रात्रि आयुष्य हरण करून फलसंपन्न झाल्या असतां तूं धीर पुरुषाप्रमाणें असें कसें बोलतोस ?

**पिता**—लोकांवर आघात कसले होत आहेत, त्याला कोणीं घेरून टाकिलें आहे आणि रात्रि आयुष्य हरण करून कशा फलसंपन्न होत आहेत ? तूं मला विनाकारण भीति कसली दाखवीत आहेस ?

**पुत्र**—ह्या लोकांवर मृत्यूचे सारखे आघात होत आहेत, त्याला जरेनें व्यापून टाकिलेलें आहे आणि हे अहोरात्र एकसारखे येऊन जात आहेत, हें तुझ्या लक्ष्यांत कसें बरें येत नाहीं ? ह्या अमोघ रात्रि नित्यशः येत आहेत आणि जातहि आहेत. मृत्यु हा कधीं थांबत नसतो, तर तो सारखा क्षणक्षणीं पुढें येत असतो, हें मला ठाऊक आहे. म्हणून मी ज्ञानकवच न घालतां कसा राहूं ? ज्ञानकवच घातल्यावर मला मृत्युभय राहणार नाहीं. एकएक रात्र निघून जाऊन जसजसें आयुष्य कमी होत जातें, तसतसा आपला दिवस व्यर्थ गेला, असें शहाण्या मनुष्यानें समजावें. उथळ पाण्यामध्यें मत्स्याला जशी सुखप्राप्ति होत नाहीं, त्याप्रमाणें येथें कोणत्या मनुष्याला सुख होणार आहे ? मनुष्याच्या इच्छा परिपूर्ण झाल्या नाहींत, तोंच त्याला मृत्यु येतो. एखादा मेष आपल्या स्त्रीच्या ऋतुकालाची वाट एकाग्र मनानें पहात असतां अकस्मात् लांडगा येऊन त्याला उचलून नेतो, त्याचप्रमाणें मृत्यु मनुष्याला नेत असतो. जें कांहीं श्रेयस्कर असेल, तें आजच कर. काल दवडणें ठीक होणार नाहीं. कारण कार्य होण्यापूर्वींच मनुष्याला मृत्यु खेंचून नेत असतो. उद्यांचें काम आज करून टाकावें आणि अपराह्णीं करावयाचें काम पूर्वाह्णीं करावें. कारण, ह्यानें आपलें काम केलें आहे किंवा न केलें आहे, ह्याची मृत्यु कधीं वाट पाहत बसत नाहीं.

आज कोणाला मृत्यु येणार हें कोण जाणूं शकणार आहे ? म्हणून मनुष्यानें तरुणपणींच धर्मशील व्हावें, कारण जीवित हें अनित्य आहे. मनुष्यानें धर्माचरण केलें असतां ह्या लोकीं कीर्ति होऊन परलोकींहि सुखप्राप्ति होते. मनुष्य मोहग्रस्त होऊन स्त्रीपुत्रांकरितां बरेंवाईट कृत्य करण्यास प्रवृत्त होतो आणि त्यांचें पोषण करितो. अशा रीतीनें पुत्रपशुसंपन्न होऊन व त्यांच्या ठिकाणीं सर्वदा चित्त जडवून राहिलेल्या पुरुषाला हरिणाला जसा व्याघ्र अकस्मात् घेऊन जातो, त्याप्रमाणें मृत्यु घेऊन जातो. वासनातृप्ति न होऊन दुष्कर्म करीत राहिल्यामुळें पशूला घेऊन जाणाऱ्या व्याघ्राप्रमाणें मृत्यु त्या मनुष्याला नेत असतो. हें कार्य मीं केलें आहे, हें करावयाचें आहे, हें दुसरें अर्धवट करून ठेवलें आहे, अशा आशेनें सुखासक्त झालेल्या पुरुषाला मृत्यु वश करीत असतो. शेती, व्यापार आणि गृहादि व्यवहार ह्यांमध्यें मी सर्वदा आसक्त राहून त्या त्या कर्मानुसार नांव पावलेल्या पुरुषाला त्याचें तें कर्म शेवटास गेलें नसलें, तरी मृत्यु घेऊन जातोच. मनुष्य दुर्बल असो, बलवान् असो, शूर असो, भित्रा असो, जड बुद्धीचा किंवा मोठा ज्ञानी असो, त्याच्या सर्व इच्छा तृप्त होण्यापूर्वींच मृत्यु त्याला घेऊन जातो. मृत्यु, जरा, व्याधि, अनेक कारणांमुळें उत्पन्न होणारीं दुःखें हीं मागें लागलीं असतां एकाद्या स्वस्थ मनुष्याप्रमाणें बसला आहेस हें काय ? जो कोणी जन्माला आला, त्याच्या नाशाकरितां अंतक आणि जरा हीं मागें लागलेलीं असतात. सर्व स्थावरजंगमात्मक पदार्थ ह्या दोहोंनीं ग्रस्त झाले आहेत. गांवामध्यें राहण्याची इच्छा करणें म्हणजे मृत्युमुखांत राहणें असून अरण्य हें देवांचें वसतिस्थान आहे, असें श्रुतींत सांगितलें आहे. गांवांतील वास्तव्यानें होणारा आनंद ही एक मनुष्याला निर्बंध करणारी रज्जूच आहे. पुण्यवान् पुरुष हिचें छेदन करून जातात. दुष्कर्मी लोकांना हिचें छेदन करतां येत नाहीं. जो मनुष्य कोणत्याहि प्राण्याला कायावाचामनानें क्लेश देत नाहीं, त्याला जीविताचें किंवा द्रव्याचें हरण करणाऱ्या कोणाहि प्राण्याकडून त्रास होत नाहीं. जराव्याधिरूप मृत्युसेना एकदां येऊं लागली म्हणजे कोणाच्यानेंहि तिचा प्रतिबंध करवत नाहीं. सत्यधर्माहून इतर असे जे असद्धर्म त्यांचा त्याग करावा. सत्याच्याच ठिकाणीं अमरत्व वास करितें, म्हणून मनुष्यानें सत्यव्रताचरणी होऊन जीव-परमात्म्यांचें ऐक्य करण्याविषयीं सर्वदा उत्सुक असावें. त्याची गुरुवचनावर तशी वेदवचनावरहि श्रद्धा असावी आणि

त्यानें मनोनिग्रही असावें. म्हणजे सत्याच्या योगानें त्याला मृत्यूला जिंकितां येईल.

अमरत्व आणि मृत्यु हीं दोनीहि देहामध्येंच असतात. विषयपरवश झाल्यानें मृत्यु येतो आणि विषयत्याग केल्यानें अमरत्वप्राप्ति होते. म्हणून मी आतां हिंसाकर्म सोडून देऊन, परमात्मपदप्राप्तीची इच्छा करून आणि कामक्रोधांचा त्याग करून सुख आणि दुःख ह्या दोहोंना सारखेंच समजेन आणि तेणेंकरून कल्याण पावून अमर्त्याप्रमाणें मृत्यूचाहि त्याग करीन. मी मनोनिग्रहपूर्वक शांतियज्ञ, ब्रह्मयज्ञ, वाग्यज्ञ, मनोयज्ञ आणि कर्मयज्ञ यांचें उत्तरायणामध्यें अनुष्ठान करीन. माझ्यासारख्याला हिंसामय असे पशुयज्ञ करणें कसें शक्य होईल? कारण, अनित्य फळ अशा व पिशाच्यांनीं केलेल्या शरीरत्यागासारखेच ते यज्ञ आहेत. ज्याची वाणी, अंतःकरण, तप, दान आणि सत्य हीं सर्वदैव ब्रह्मार्पण केलीं असतात, तोच ब्रह्म पावतो. विद्येसारखा डोळा नाहीं, सत्यासारखें तप नाहीं, प्रेमासारखें दुःख नाहीं आणि संन्यासासारखें सुख नाहीं. मी ब्रह्माच्याच ठिकाणीं ब्रह्मरूपापासून झालों आहें. मी ब्रह्मभूत होऊन राहिलों आहें. मी जरी अनपत्य असलों, तरी ब्रह्मामध्येंच वास्तव्य करणार. माझा उद्धार करण्यास संततीची मुळींच आवश्यकता नाहीं. एकाकी असणें, सर्वांवर समताबुद्धि ठेवणें, सत्यनिष्ठ असणें, शील, स्थिति, काया-वाचा-मनानें हिंसात्याग आणि कर्मसंन्यास करणें ह्यांसारखें दुसरें द्रव्य ब्राह्मणांना नाहीं. अरे ब्राह्मणा, तुला मरावयाचें आहे, मग तुला द्रव्याचा, बांधवांचा, स्त्रीचा काय उपयोग आहे? विचार करून तुझा पिता आणि पितामहादिक पितर कोठें गेले आहेत, त्याचप्रमाणें तुझा आत्मा कोठें आहे, ह्याचाहि शोध कर.

भीष्म—धर्मा, याप्रमाणें पुत्राचें भाषण ऐकून त्या पित्यानें वर्तन ठेविलें. तूंहि सत्यधर्मपरायण होऊन तसेंच आचरण ठेव. १२. ३. १७५.

---

१ मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ।
बंधाय विषयासक्तं मुक्त्यै निर्विषयं स्मृतम् ॥

## अध्याय १७६ वा.

[ १ युधिष्ठिराला शंपाकगीताकथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—पितामहा, जे सधन किंवा निर्धन लोक स्वशास्त्राला अनुसरून वागणारे असतात, त्यांना कोणत्या प्रकारचें सुखदुःख आहे व तें कसें प्राप्त होतें ?

**भीष्म**—ह्यासंबंधीं शांतिशील आणि मुक्त अशा शंपाक मुनीनें जें सांगितलें आहे, तें पुरातन इतिहास म्हणून सांगत असतात. पूर्वीं कोणी वैराग्यशील शंपाक ब्राह्मणानें मला जें सांगितलें, तें मी तुला सांगत आहें. वाईट प्रकारची स्त्री, शरीराच्छादनास वस्त्र नाहीं व खाण्यास अन्न नाहीं, अशी स्थिति असल्यामुळें तो गांजून गेला होता. तो म्हणाला, " ह्या लोकीं मनुष्य जन्माला आला कीं तेव्हांपासून त्याच्यामागें नानाप्रकारचीं सुखदुःखें लागलेलीं असतात आणि त्या सुखदुःखांपैकीं कोणत्या तरी एका मार्गावर त्याला दैव नेऊन ठेवीत असतें. म्हणून मनुष्यानें सुख प्राप्त झालें असतां आनंद मानूं नये किंवा दुःखानेंहि संतप्त होऊं नये. कामादिकांचा त्याग करून व योगांगांचा भार सहन करून तूं मोक्षप्राप्तीविषयीं उत्कंठित होत नाहींस, ह्याचें कारण तुझ्या अंतःकरणावर तुझा दाब नाहीं, हेंच होय. अकिंचन होऊन तूं फिरूं लागलास, म्हणजे तुला सर्वत्र सुख मिळेल. अकिंचन पुरुषाला सुखानें झोंप येते आणि तो सुखानें जागा होतो. अकिंचनत्व हें ह्या लोकीं सुखकारक, मोक्षमार्गाला अनुरूप, कल्याणकारी आणि विघ्नरहित आहे. अकिंचनत्व हा कामी जनांला दुर्लभ, परंतु खरोखरच सर्वांना मिळविण्याला सुलभ असा मार्ग आहे. तीनहि लोकांत शोध करून पाहिलें, तरी शुद्ध आणि वैराग्यशील अशा अकिंचनत्वाच्या तोडीचें दुसरें कांहीं सांपडेल, असें दिसत नाहीं.

" अकिंचनत्व आणि राज्य यांना तराजूंत घालून मीं पाहिलें, तेव्हां गुणाधिक्यानें निष्किंचनता ही राज्यापेक्षां अधिक भरली. अकिंचनत्व आणि राज्य यांमध्यें जो भेद दिसून येतो, तो हा कीं धनवान् पुरुष सर्वदा उद्विग्न असून मृत्यूच्या तोंडांत असल्यासारखा वाटतो; परंतु आशारहित व अकिंचन–निर्द्रव्य–पुरुषाला अग्नि, कोणतेंहि अरिष्ट, मृत्यु किंवा दस्युलोक यांजपासून यत्किंचितहि भीति नसते. यथेच्छ संचार करणाऱ्या व शय्याहीन भूतलावर बाहु उशाशीं घेऊन झोंपणाऱ्या शांत पुरुषाची देव स्तुति करीत असतात. धनवान् पुरुष क्रोध व लोभ

यांनीं भरलेला असतो, त्यामुळें त्याची विचारशक्ति नष्ट झालेली असते. त्याची नजर वक्र असून मुख सर्वदा शुष्क असतें. तो पापाचरणी असून त्याच्या भोंवया चढलेल्या असतात. तो नित्य क्रुद्ध असून दांतओंठ खात असतो. त्याचें भाषण नेहमीं उद्धटपणाचें असतें. त्यानें जरी पृथ्वीदानाची इच्छा केली, तरी त्याची भेट घेण्याची इच्छा कोणाला होईल? संपत्तीच्या अतिसहवासानें अज्ञान मनुष्याला मोह उत्पन्न होतो आणि तो वायु जसा शरत्कालीन मेघाला हरण करून नेतो, त्याप्रमाणें त्याच्या चित्ताचें हरण करितो. पुढें त्याला आपल्या स्वरूपाविषयीं आणि द्रव्याविषयीं अभिमान वाटूं लागतो. 'मी मोठ्या कुलांत जन्मलों आहें, मी सिद्ध आहें, मी केवळ मनुष्य नाहीं,' असें त्यास वाटूं लागतें. ह्या तीन कारणांनीं धन, रूप आणि कुलीनता यांच्या अभिमानानें त्याचें चित्त प्रमादशील बनतें. त्याचें अंतःकरण विषयांच्या ठायीं अत्यंत आसक्त होऊन राहतें आणि अशा रीतीनें वडिलार्जित धनाचा नाश झाला म्हणजे परद्रव्याचा अपहार करण्यांत कांहीं दोष नाहीं, तें करणें योग्यच आहे, असें त्याला वाटतें. याप्रमाणें मर्यादेचा अतिक्रम करून वाटेल तिकडून द्रव्य मिळवूं लागला असतां, व्याध ज्याप्रमाणें बाणांनीं हरिणांचा निषेध करितात, त्याप्रमाणें राजा त्याला दंड करितो.

"अशा रीतीनें ह्या लोकीं मनुष्याला हीं व ह्याहूनहि भयंकर अशीं दुसरीं दुःखें प्राप्त होतात. हीं दुःखें मनुष्यांवर अवश्य येणारीं असल्यामुळें त्यानें ज्ञानाच्या योगानें देहादिक नश्वर पदार्थ आणि पुत्रेषणादि लौकिक धर्म ह्यांचा तिरस्कारपूर्वक त्याग केला पाहिजे. सर्वांचा त्याग केल्याशिवाय त्याला सुखप्राप्ति होणार नाहीं. तो त्याग केल्याशिवाय त्याला परब्रह्माचीहि प्राप्ति होणार नाहीं. त्याग केल्यावांचून त्याला सुखानें झोंपहि येणार नाहीं. म्हणून तूं सर्वस्वाचा त्याग करून सुखी हो."

हें वृत्त शंपाक ब्राह्मणानें मला हस्तिनापुरांत पूर्वीं सांगितलें आहे. म्हणून त्याग हा सर्वांत श्रेष्ठ गुण गणला आहे. १२. ३. १७६.

---

## अध्याय १७७ वा.

[ १ धनतृष्णाग्रस्त झालेल्यांनीं काय केलें असतां ते सुखी होतील, ह्या युधिष्ठिरप्रश्नास अनुलक्षून भीष्माकडून मंकिगीताकथन. ]

( १ ) **युधिष्ठिर—पितामहा, जीवनाकरितां कृषि, वाणिज्य, इत्यादि उद्योग करण्याची इच्छा करणाऱ्या धनलोभी मनुष्याला जर द्रव्यप्राप्ति झाली नाहीं, तर त्यानें काय केलें असतां तो सुखी होईल ?**

**भीष्म—हे भारता, मानापमानांना व लाभालाभांना सारखेंच समजणें, धनाकरितां श्रम न करणें, सत्य भाषण, वैराग्य, कोणतेंहि कार्य करण्याविषयीं इच्छाभाव, हीं ज्याचे ठिकाणीं वास करीत असतात, तोच खरा सुखी होय. ह्या पांच गोष्टी शांतिदायक आहेत, इतकेंच नव्हे, तर ह्याच प्रत्यक्ष स्वर्ग, धर्म आणि उत्तम प्रकारचें सुख आहेत, असें ज्ञानी लोक समजतात.**

ह्यासंबंधीं एक पुरातन इतिहास सांगत असतात. पूर्वी मंकिनामक ऋषीनें वैराग्यसंपन्न होऊन जें कांहीं म्हटलें, तें यांत सांगितलें आहे. युधिष्ठिरा, नीट लक्ष्यांत घे. मंकी हा द्रव्याची इच्छा करणारा होता, परंतु त्याच्या द्रव्यविषयक आशा वारंवार भग्न झाल्या. तेव्हां शिल्लक राहिलेल्या द्रव्यानें त्यानें आपल्या कामास योग्य असे दोन बैल विकत घेतले आणि त्यांस जुंवाला जुंपून बाहेर कामास काढिलें. ते कामाला निघाले तों धांवतांना त्यांना मध्येंच बसलेला एक उंट आढळला. ते त्याच्या स्कंधप्रदेशाजवळ येऊन पोंचले, तेव्हां तें सहन न होऊन त्यानें त्या दोहोंहि बैलांना ताजव्याप्रमाणें उचलून तो वेगानें जाऊं लागला. तो उंट आपल्या बैलांना उचलून नेत आहे व त्यामुळें ते आतां मरणोन्मुख झाले आहेत, हें पाहून मंकी म्हणाला, " मनुष्य कितीहि दक्ष असला आणि फलप्राप्त्यर्थ त्यानें कितीहि श्रम घेतले, तरी दैव अनुकूल नसल्यास त्यानें द्रव्यप्राप्तीची इच्छा कधीं करूं नये. कार्य घडून येण्यापूर्वी कितीहि संकटें आलीं, तरी मी लक्ष्यपूर्वक द्रव्यप्राप्त्यर्थ सारखे श्रम करीत होतों. परंतु दैवानें ह्या उंटाचा वृषभाशीं संबंध आणून मला कसें गोत्यांत आणलें पहा ! उंटाच्या गतिवेगामुळें हे माझे बैल खालींवर होत चालले आहेत. ह्या उंटाला माझ्या बैलांची संगति काकतालीय न्यायानें जडली आहे, तरी तो त्यांना फेंकीत फेंकीत विषम मार्गानें जात आहे. हे दोन माझे प्रिय बैल त्या उंटाच्या गळ्यांत लोंबणारे दोन मणिच होत, असें

वाटत आहे! हा केवळ दैवाचा खेळ होय. दैव अनुकूल नसल्यास हट्टानें कार्य करण्याचा आग्रह धरिल्यास त्यांत यशःप्राप्ति होण्याचें कधींहि सामर्थ्य नसतें. एखाद्या वेळीं असें सामर्थ्य आहे, असें दिसून आलें तरी तें देखील दैवावरच अवलंबून आहे, असें विचारांतीं समजून येईल. म्हणून सुखाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें ह्या लोकीं वैराग्याचा आश्रय करून रहावें.

"कोणत्याहि अर्थसाधनाविषयीं निरिच्छ होऊन वैराग्यानें राहणाऱ्या मनुष्याला सुखानें झोंप येते. जनकाच्या गृहांतून सर्व संबंध सोडून महारण्यांत जाणाऱ्या शुकानें जें म्हटलें आहे, तें अगदीं बरोबर आहे. तें हें कीं, "जो कोणी सर्व मनोरथ पूर्ण करून घेतो आणि जो कोणी सर्व मनोरथांचा त्याग करितो, या दोहोंमध्यें मनोरथ पूर्ण करून घेण्यापेक्षां त्यांचा त्याग करणें ही गोष्ट अधिक श्रेष्ठ आहे. द्रव्यप्राप्त्यर्थ मनुष्याची जी प्रवृत्ति असते, ती कधीं शेवटास गेली आहे, असें नाहीं. अज्ञ मनुष्याची शरीरविषयक आणि जीवितविषयक आशा दिवसेंदिवस वाढतच असते. म्हणून हे कामुक मना, ही प्रवृत्ति तूं टाकून दे. तूं शांत हो आणि वैराग्य धारण कर. तूं वारंवार फसला आहेस, तरी तुझ्या ठिकाणीं अजून वैराग्य बिंबत नाहीं. हे धनेच्छु मना, माझा नाश व्हावा, अशी जर तुझी इच्छा नसेल आणि माझ्यामुळें तुला आनंद होत असेल, तर माझा संबंध लोभाशीं व्यर्थ जडवूं नकोस. धनलोभी मना, वरचेवर संग्रह करून ठेवलेलें तुझें धन नष्ट होऊन गेलें आहे! तरी तूं अद्याप धनलोभ सोडीत नाहींस ना? ह्या माझ्या मूर्खपणाला काय म्हणावें कीं मी तुझ्या हातांतलें खेळणें होऊन राहिलों आहें. असें असल्यावर मनुष्य दुसऱ्याचा दास कां बरें होणार नाहीं?

"पूर्वीच्या किंवा सांप्रतच्या काळीं कोणाहि पुरुषाच्या विषयवासना शेवटाला गेलेल्या नाहींत. म्हणून मी सर्व गोष्टींचा त्याग करून ज्ञानी व जागृत होऊन राहिलों आहें. हे कामा, तुझें हृदय वज्राचें बनलेलें असल्यामुळें तें अत्यंत बळकट आहे. कारण, त्यावर शेंकडो अनर्थ येऊन कोसळले तरी त्याचे शेंकडो तुकडे होत नाहींत. हे कामा, तुला आणि तुला जें प्रिय आहे, त्यालाहि मी ओळखतों. तुझें प्रिय करावयाला मी गेलों, तो माझ्याच सुखाला मुकलों. हे विषयवासने, तुझें मूळ मला ठाऊक आहे. तुझी उत्पत्ति संकल्पापासून आहे. म्हणून मी आतां तुझा संकल्पच करीत नाहीं. असें केल्यानें तुझा

समूळ नाश होईल. द्रव्याची इच्छा ही कधींहि सुखदायक होत नसते. कारण द्रव्य मिळालें असतां चिंता पुष्कळ लाभते. लब्ध द्रव्याचा नाश झाला असतां मरणप्राय दुःख होतें. तें पुनः मिळेल किंवा नाहीं, याचा संशयच असतो. आपलें शरीर दुसऱ्याला अर्पण केल्यानेंहि द्रव्यप्राप्ति होत नाहीं. म्हणून ह्याहून अधिक दुःखदायक अशी दुसरी कोणती गोष्ट आहे? प्राप्त झालेल्या द्रव्यानेंहि मनुष्याला आनंद होत नसतो, कारण तो आणखी द्रव्याची इच्छा करीत असतो. गंगेच्या गोड पाण्याप्रमाणें हें धन आहे. तें पाणी जों जों प्यावें तों तों जशी अधिकाधिक तहान लागते, त्याचप्रमाणें द्रव्याचें आहे. जों जों धन मिळवावें, तों तों त्याची आशा वृद्धिंगत होत जाते. ही द्रव्याशा माझ्याच नाशाला कारण होणारी आहे, हें मला समजतें, यास्तव हे कामा, तूं माझा त्याग कर.

"माझ्या देहासभोंवतीं जो हा पंचमहाभूतांचा समुदाय जमला आहे, तो पाहिजे असल्यास जावो अथवा राहो. काम-लोभांच्या तंत्रानें वागणाऱ्या राजस-तामस विकारांच्या ठायीं आतां माझें प्रेम नाहीं. मी आतां विषयवासना सोडून सत्त्वगुणाचाच आश्रय करून राहीन. माझ्या देहामध्यें आणि तशांतहि माझ्या अंतःकरणामध्यें मी आतां सर्व भूतांचें अवलोकन करून योगाचे ठिकाणीं बुद्धि ठेवीन. अंतःकरणाची एकाग्रता करून तें श्रवणादिकांच्या ठायीं लावीन आणि ब्रह्माच्या ठिकाणीं मन जडवीन. अशा रीतीनें राग-द्वेषादिकांचा त्याग करून सुखानें कोठेंहि आसक्त न होतां मी लोकांमध्यें राहीन. मग हे कामा, तूं मला दुःखामध्यें पुनः ढकलूं देणार नाहींस. माझ्या ठिकाणीं तूं सारखा मारा चालविला असल्यामुळें मला ह्यावांचून गत्यंतरच नाहीं. हे कामा, तूं तृष्णा, शोक आणि श्रम यांचें उत्पत्तिस्थान आहेस. धननाश झाल्यानें जें दुःख होतें, तें सर्वांहून अधिक होय असें मला वाटतें. आपले ज्ञातिजन, तसे मित्रहि धनहीन मनुष्याचा सर्वदा अवमान करीत असतात. असे हजारों अवमानाचे प्रसंग येत असल्यामुळें दारिद्र्य हें अत्यंत कष्टदायक होय, असें ठरतें.

"द्रव्यानें जें सुख मिळतें त्यांत देखील दुःख हें असतेंच. ह्याच्यापाशीं द्रव्य आहे, अशा समजुतीनें दस्युलोक त्याचा वध करितात. विविध प्रकारच्या दंडांनीं त्यांना क्लेश भोगावे लागतात आणि ते नित्य दुःखी असतात. द्रव्यलोभ हें

सर्वांत मोठें दुःख आहे, हें मला बऱ्याच वेळानें कळून आलें. कामा, तूं ज्याचा म्हणून आश्रय करितोस, त्यालाच तूं सर्वदा त्रास देत असतोस. तुला तत्त्वज्ञान नाहीं, तूं बाल आहेस, तुझा संतोष होणें कधींहि शक्य नाहीं, तूं अग्नीप्रमाणें असून तुझें पूरण कधींहि होत नसतें. तूं सुलभ काय आणि दुर्लभ काय, ह्याचाहि कधीं विचार करीत नाहींस. पाताळाप्रमाणें तुझें पूरण होणें कधींहि शक्य नसून मला तूं दुःखांत घालूं पहात आहेस. परंतु हे कामा, आतां तुझा मजमध्यें प्रवेश होणें अगदीं अशक्य आहे. यदृच्छेनें द्रव्यनाश होऊन माझ्या ठिकाणीं वैराग्य उत्पन्न झालें आहे. त्यामुळें सर्व विषयांपासून माझें मन निवृत्त झालें आहे. मी आतां विषयांची चिंता करीत नाहीं. ह्या लोकीं मीं अनेक दुःखें सोशिलीं, तरी मला ज्ञान झालें नव्हतें; परंतु द्रव्यनाशानें फसल्यामुळें वैराग्य उत्पन्न होऊन मला शांति प्राप्त झाली आहे, त्यामुळें मला सुखानें निद्रा येत असते. हे कामा, आतां मी मनाच्या सर्व वृत्तींचा त्याग करून तुझाहि त्याग करितों. हे कामा, आतां पुनः तुझी माझी संगति कधींहि एकत्र घडणार नाहीं आणि मजपासून आतां तुला आनंदहि होणार नाहीं. माझी कोणीं आतां निंदा केली तरी मी ती सोशीन आणि कोणीं त्रास दिला तरी त्याबद्दल त्याला मी त्रास देणार नाहीं. माझा कोणीं द्वेष केला तरी त्याच्याशींहि मी सुखानें राहीन आणि त्यानें माझें वाईट केलें, तरी तिकडे लक्ष्य न देतां त्याच्याशीं मी गोड भाषण करीन. जेवढें मिळेल, तेवढ्यांत तृप्ति मानून मी सुखानें राहीन.

"हे कामा, तूं माझा शत्रु असल्यामुळें तुझ्या इच्छा आतां माझ्या हातून परिपूर्ण होणार नाहींत. वैराग्य, सुख, तृप्ति, शांति, सत्य, दम, क्षमा आणि सर्वभूतदया यांचा मीं आतां आश्रय केला आहे, हें तूं लक्ष्यांत ठेव. म्हणून काम, लोभ, तृष्णा आणि दैन्य यांनीं मोक्षमार्गाला लागलेल्या सत्त्वनिष्ठ माझा त्याग करावा. मी आतां काम आणि लोभ यांचा त्याग करून सुखी झालों आहें. आतां मी लोभवश होऊन मूर्खासारखा पुनः दुःखांत पडणार नाहीं. कामाचा त्याग केला असतां मनुष्य सुखाला पावतो आणि जो सर्वदा कामाला वश होऊन राहतो, तो दुःखी होतो. रजोगुण हा सर्वदा कामाशीं संबद्ध असल्यामुळें मनुष्यानें त्याचाहि त्याग केला पाहिजे. कामक्रोधांपासून दुःख, निर्लज्जता आणि अतृप्ति यांची उत्पत्ति होत असते. ग्रीष्मकालीं ज्याप्रमाणें एखादा मनुष्य शीतल डोहाकडे जातो, त्याचप्रमाणें मी आतां परब्रह्माकडे निघालों आहें. मी

आतां सर्व कर्मांचा त्याग करणार आहें. तसें केल्यानें मी निर्दुःखी होऊन केवळ सुखच मजकडे येत राहील. जगांत कामसुख म्हणून जेवढें आहे, त्याचप्रमाणें स्वर्गलोकींचें जें म्हणून दिव्य सुख आहे, त्याला वैराग्यसुखाच्या षोडशांशाइतकीहि किंमत नाहीं. मी आतां पंचकोशात्मक शरीर, सहावा आनंदाख्य सबीज समाधि आणि महत्तत्त्वनामक सर्वांनर्थबीजभूत काम ह्या सर्वांचा मोठ्या शत्रूप्रमाणें विध्वंस करून ब्रह्मपुरनगरांत प्रवेश करीन. तेथें प्रवेश केल्यावर मी राजाप्रमाणें सुखी होईन. कारण, तें अविनाशी आहे."

असा विचार करून तो मंकी वैराग्यसंपन्न झाला. त्यानें सर्ववासनात्याग केला आणि महासुख पावला. त्याच्या वृषभांचा नाश झाला, म्हणून त्याला हा मोक्ष प्राप्त झाला. त्यानें काममूलाचाच उच्छेद केला, त्यामुळें त्याला महासुखप्राप्ति झाली. १२. ३. १७७.

---

## अध्याय १७८ वा.

[ १ भीष्म युधिष्ठिराला बोध्य-नाहुषसंवादरूप इतिहास कथन करितो. ]

( १ ) भीष्म—ह्यासंबंधीं पुरातन इतिहास म्हणून शांतिसंपन्न विदेहराज जनक याचें भाषण सांगत असतात, तें असें आहेः—जनक म्हणाला, 'आतां माझें असें कांहींच नसल्यामुळें अनंत-परब्रह्म-हें माझें द्रव्य आहे. सारी मिथिला नगरी जळून खाक झाली, तरी माझें कांहींच दग्ध होणार नाहीं.' हे युधिष्ठिरा, ह्यासंबंधीं बोध्यनामक मुनीचे कांहीं श्लोक वैराग्याचे द्योतक म्हणून सांगत असतात, ते ऐक. त्या शांत अशा बोध्य ऋषीला नाहुषानें प्रश्न केला. बोध्य मुनि म्हणजे वैराग्यानें शांतिसंपन्न झालेला, त्याचप्रमाणें शास्त्र आणि तत्त्वज्ञान यांच्या योगानें तृप्त झाला होता. त्या नाहुषानें त्याला प्रश्न केला कीं, 'हे महाप्राज्ञा, तूं मला शांतिसंबंधीं उपदेश कर! कोणत्या बुद्धीचा आश्रय करून तूं सुखी होऊन सर्वत्र संचार करीत आहेस?'

बोध्य—मी लोकांच्या उपदेशानुसार वागत असतों. कोणाला उपदेश करीत नाहीं. त्याचें लक्षण तुला सांगतों. त्याचा तूं स्वतः विचार कर! पिंगला, कुरर पक्षी, सर्प, वनामध्यें भटकणारा भ्रमर, बाण करणारा आणि कुमारी हे सहा माझे गुरु होत.

भीष्म—राजा, आशा ही अत्यंत बलिष्ठ आहे. नैराश्यासारखें दुसरें सुख नाहीं. आशेची निराशा करूनच पिंगला सुखानें झोंप घेऊं लागली. कुरर पक्षी मांस खात आहे, हें पाहून ज्यांच्याजवळ मांस नव्हतें, असे पक्षी त्याचा वध करण्याच्या इच्छेनें त्याजवर धांवून आले. हें पाहतांच त्या कुररानें आपल्या-जवळील मांस फेंकून दिलें, त्यामुळें तो सुखी झाला. घर बांधायाला आरंभ करणें म्हणजे सर्वदा दुःखदायकच होय. तो यत्न कधींहि सुखकारक होत नसतो. म्हणूनच सर्प हे दुसऱ्यांनीं बांधिलेल्या गृहामध्यें सर्वदा राहत असतात. भ्रमराप्रमाणें भैक्ष्यवृत्तीचा आश्रय करून मुनि कोणाहि प्राण्याशीं अद्रोहानें वागतात, त्यामुळें ते सुखी होतात. मन बाण करण्यांत दंग होऊन गेल्यामुळें जवळून राजा गेला, तरी बाण करणाराचें लक्ष तिकडे नसतें. अशा प्रकारची एकाग्रता असावी. एका कुमारीनें आपल्या हातांतील अनेक कंक-णांचा नाद होतो, म्हणून एकच कंकण हातांत ठेवून बाकीचीं पिचवून टाकिलीं, त्याप्रमाणें अनेकांचा सहवास एके ठिकाणीं झाल्यानें तें कलहास कारण होतें. दोघांचाहि समागम एकत्र झाल्यानें वाद होत असतो. म्हणून मी सर्वदा एकटाच फिरत असतों, असें तो बोध्य म्हणाला. १२. २. १७८.

---

## अध्याय १७९ वा.

[ १ युधिष्ठिराला भीष्माकडून प्रऱ्हाद आणि अजगर मुनि यांच्या वादाचें कथन. ]

( १ ) युधिष्ठिर—हे आचारसंपन्ना, कोणत्या प्रकारच्या आचरणांनीं मनुष्य ह्या पृथ्वीतलावर शोकरहित होऊन राहूं शकतो आणि काय केल्यानें त्याला उत्तम गति प्राप्त होते ?

भीष्म—ह्यासंबंधीं प्रऱ्हाद आणि अजगर मुनि यांमधील संवाद हा प्राचीन इतिहास म्हणून सांगत असतात. तो असाः–कोणी ज्ञानानें आदरणीय, दृढनिश्चयी आणि रागद्वेषरहित ब्राह्मण संचार करीत फिरत असतां बुद्धिमान् प्रऱ्हाद राजानें त्याला विचारलें.

प्रऱ्हाद—हे ब्राह्मणा, तूं विषयांपासून अलिप्त आहेस. तूं दंभरहित आहेस. तूं दयाळू, जितेंद्रिय असून निरारंभ आहेस, तुला कोठेंहि दोष दिसत नाहीं. तूं सत्यवक्ता असून प्रगल्भ आहेस, तसा विचारचतुरहि आहेस. तूं

तत्त्वज्ञानी असूनहि बालाप्रमाणें संचारहि करीत असतोस, याचें कारण काय ? कोणतीहि लाभप्राप्ति व्हावी, अशी इच्छा तूं कधीं करीत नाहींस व प्राप्ति झाली नाहीं, तरी तुला तीविषयीं कधीं शोक होत नाहीं. तुझी वृत्ति नित्य-तृप्ताप्रमाणें असून इष्ट अथवा अनिष्ट यांचा कांहींहि विचार तुझ्या मनांत येत नाहीं, हें कसें ? कामादिकांचे वेग लोकांना खेंचून नेत असतां तूं विमनस्क होऊन धर्मार्थकामविषयक क्रियांच्या ठिकाणीं कूटस्थाप्रमाणें वागतोस, असें दिसतें. तूं धर्मार्थांचें आचरण कधीं करीत नाहींत, तसें कामाचेंहि आचरण तुझ्या हातून घडत नाहीं. इंद्रियांच्या विषयांचे ठिकाणीं आसक्त न होतां साक्षिवत् परब्रह्माप्रमाणें तूं मुक्तपणानें वागत असतोस. हे ब्रह्मन्, तुला कोणतें ज्ञान, कोणतें शास्त्र किंवा कोणती वृत्ति श्रेयस्कर वाटते, तें मला शीघ्र सांग.

भीष्म—प्रऱ्हादानें असें विचारल्यावर त्या लोकधर्मवेत्त्या बुद्धिमान् मुनीनें सौम्य आणि अर्थपूर्ण वाणीनें त्याला म्हटलें, “ प्रऱ्हादा, प्राण्यांची उत्पत्ति, वृद्धि, ऱ्हास आणि विनाश हीं सर्व कारणहीन परमात्म्यापासून होत असतात; म्हणून त्यापासून मला आनंद होत नाहीं, किंवा खेदहि होत नाहीं. प्राण्यांच्या ज्या वर्तमानकालिक स्वाभाविक प्रवृत्ति असतात, त्यांचा मनुष्यानें योग्य विचार केला पाहिजे. त्यांना आपल्या स्वभावापलीकडील दुसऱ्या कोणत्याहि प्रवृत्तींत–मग तींत ब्रह्मलोकाची प्राप्ति होत असली, तरी–तृप्ति होत नसते. हे प्रऱ्हादा, संयोगाचे शेवटीं वियोग आणि संचयाचे शेवटीं नाश हा ठेवलेलाच आहे. म्हणून मी त्याच्याकडे कधीं लक्ष देत नसतों. सत्त्वादि गुणांनीं युक्त जीं भूतें, तीं सर्व नाशवंत आहेत, हें समजून येऊन उत्पत्ति आणि मृत्यु यांचें ज्ञान झालें असतां प्राण्यांला दुसरें कार्य कोणतें राहिलें ? महासागराच्या पाण्यामध्यें असणारे जे मोठमोठे जलचर प्राणी त्यांनाहि अंत आहे. हे असुराधिपा, पृथ्वींतील जंगम-स्थावरादिक जे प्राणी त्यांनाहि मृत्यु आहे, असें दिसून येतें. हे दानवोत्तमा, आकाशांत संचार करणारे जे बलवान् पक्षी त्यांनाहि यथाकालीं अंत असतोच. आकाशांत भ्रमण करणारीं लहान-मोठीं नक्षत्रें यथाकालीं पतन पावतात, असें माझ्या दृष्टोत्पत्तीस येतें.

“ याप्रमाणें सर्व भूतांना मृत्यूनें पछाडिलें आहे, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून कृत-कृत्य होत्साता मी सुखानें झोंप घेत असतों. दैवयोगानें मला मोठें भोजन मिळाल्यास तें मी सुखानें घेतों व कांहीं न मिळाल्यास मी कित्येक दिवस

उपाशीं राहतों. एखाद्या वेळीं अनेक प्रकारचें मधुर अन्न मला पुष्कळ मिळतें. एखाद्या वेळीं थोडें, एखाद्या वेळीं अगदीं थोडें आणि एखाद्या वेळीं कांहींहि मिळत नसतें. मला कधीं कण्या मिळाल्यास त्या मी खातों; कधीं पेंड भक्षण करितों, कधीं साळींचा भात तर कधीं मांस किंवा कमीअधिक प्रतींचीं भक्ष्येंहि खातों. मी एखाद्या वेळीं पर्यंकावर शयन करितों, तर एखाद्या वेळीं जमिनीवर निद्रा घेतों. कदाचित् राजवाड्यांतहि निजण्याचा प्रसंग येतो. मी कधीं तागाचीं तर कधीं जवसाच्या सालींचीं वस्त्रें वापरतों, तर एखाद्या वेळीं मी मूल्यवान् उंची वस्त्रेंहि परिधान करितों. मला तर कधीं दैवयोगानें एखादी उपभोग्य अशी धर्म्यवस्तु प्राप्त झाली, तर तिचा मी निषेध करीत नाहीं, किंवा ती अत्यंत दुर्लभ असल्यास तत्प्राप्त्यर्थ प्रयत्नहि करीत नाहीं.

"अशा प्रकारें ज्यांत मृत्यूची भीति नाहीं, जें कल्याणकारक आहे, ज्यामुळें शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं, जें निरुपम, विद्वानांना मान्य, जें मूर्खांना आवडणारें नसतें व त्यामुळें त्यांजकडून त्याचें आचरण होत नाहीं, असें आजगरव्रत असून त्याचें मी शुचिर्भूतपणें आचरण करीत असतों. मी निश्चयबुद्धिपूर्वक, धर्मभ्रष्ट न होतां, संसाराची हांव मर्यादित करून, मागीलपुढील विचार ध्यानांत घेऊन आणि भय, राग, लोभ, आणि मोह यांचा त्याग करून हें आजगरव्रत आचरण करीत असतों. या व्रतांत भक्ष्य, भोज्य आणि पेय यांच्या फलाविषयीं नियम नाहीं. दैव-योगानेंच देशकालादि व्यवस्था या व्रतांत लागत असते. विषयलुब्धाकडून याचें आचरण होणें शक्य नाहीं. असें हें आजगरव्रत मी शुचिर्भूतपणें आचरण करितों. हें माझें, तें माझें अशा आशेनें ग्रस्त झालेले आणि द्रव्यप्राप्ति न झाल्यामुळें खेद करीत राहणारे लोक, अशांना तत्त्वदृष्टीनें अवलोकन करून हें आजगरव्रत मी अत्यंत शुचिर्भूतपणें आचरण करीत असतों. अर्थप्राप्त्यर्थ पुष्कळ आर्य लोक दीनपणानें अनार्यांचा आश्रय करून राहिलेले पाहिल्यामुळें अर्थातच माझी भक्ति वैराग्यावर जडली आणि त्यामुळें मनोनिग्रह करून व शांतचित्त होऊन अत्यंत शुचिर्भूतपणें हें आजगरव्रत मी आचरण करीत असतों.

सुखासुख, लाभालाभ, संतोषासंतोष आणि मरण-जीवित हीं सर्व दैवाधीन आहेत, असा तत्त्वदृष्ट्या विचार करून मी शुचिर्भूतपणें ह्या आजगर-व्रताचें आचरण करीत असतों. भय, राग, मोह आणि दर्प हीं त्याग करून आणि धैर्य, विचार आणि निश्चय यांचा आश्रय करून अजगर ज्याप्रमाणें

समीप येऊन ठेपलेलें फल प्रिय मानतात, त्याप्रमाणें मी शुचिर्भूतपणें हें आजगरव्रत आचरण करीत असतों. माझें शयन किंवा आसन हीं नियमित नाहींत. तरी मी दम, नियम, व्रतें, सत्य आणि शौचाचार यांचें पालन करून व योगफलसमूहांचा त्याग करून, शुचिर्भूतपणें ह्या आजगरव्रताचें आचरण करीत असतों. अंतःकरणप्रवृत्ति विषयादिकांकडे गुंतून गेल्यामुळें आणि परिणामीं तें दुःखाला कारण होणारें असल्यामुळें त्याचा लय परमेश्वराचे ठिकाणीं व्हावा, या उद्देशानें त्याचा निग्रह करण्याकरितां मी शुचिर्भूत होऊन हें आजगरव्रत आचरण करीत असतों. हृदय, वाणी आणि मन यांचा निग्रह करून व प्रिय आणि सुखकारक गोष्टी, ह्या सर्वदा दुर्लभ आणि अनित्य आहेत, हें जाणून शुचिर्भूतपणानें मी ह्या आजगरव्रताचें आचरण करीत असतां, आपल्या व इतरांच्या मतानुसार आत्म्याचें स्वरूप अशाच प्रकारचें आहे, असें गहन तर्क काढून आत्मकीर्तीचा प्रसार करणाऱ्या अनेक बुद्धिमंत कवींनीं पुष्कळ सांगितलें आहे. प्रत्यक्षादि प्रमाणांनीं सिद्ध झालेलें असें हें जगत् पर्वताच्या कड्यासारखें नाशकारक आहे व तें परमात्म्याहून भिन्न आहे, असें अज्ञ लोकांचें म्हणणें आहे. परंतु तें निर्दोष व परिच्छेदशून्य अशा ब्रह्मापासून वेगळें नाहीं, असा माझा विचार ठरल्यामुळें मी कामादि दोष आणि वासना यांचा त्याग करून लोकांमध्यें संचार करीत असतों.

भीष्म—जो कोणी महात्मा पुरुष काम, भय, लोभ, मोह आणि क्रोध यांचा त्याग करून आजगरव्रतरूप क्रीडा करील, तो निःसंशय सुखी होईल. १२. ३. १७९.

---

## अध्याय १८० वा.

[ १ काश्यपमुनि आणि शृगालरूपी इंद्र यांमधील संवाद. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, मनुष्याला जी प्रतिष्ठा प्राप्त होते, तिला कारण कोण होतात ? बांधव होतात, कर्म होतें, द्रव्य होतें किंवा ज्ञान कारण होतें ? हा माझा प्रश्न आहे, त्याचें उत्तर तूं दे पाहूं !

भीष्म—ज्ञान हीच मनुष्यांची प्रतिष्ठा होय. ज्ञान हाच मोठा लाभ होय. ज्ञान हें मनुष्यांचें कल्याण करणारें मोठें साधन असून तें प्रत्यक्ष स्वर्ग आहे, असें सत्पुरुषांचें मत आहे. सर्व द्रव्याचा क्षय झाला असतां बलिराजाला

ज्ञानामुळेंच इष्टार्थप्राप्ति झाली. प्ऱ्हाद, नमुचि आणि मंकी यांनाहि ज्ञानाच्याच योगानें सुस्थिति प्राप्त झाली. तेव्हां ज्ञानापेक्षां श्रेष्ठ असें दुसरें काय बरें आहे ?

ह्याविषयीं एक प्राचीन इतिहास म्हणून इंद्र आणि काश्यप यांमधील संवाद सांगत असतात. तो हे युधिष्ठिरा, तुला मी सांगतों, ऐक. काश्यप नांवाच्या, कडक तपश्चर्या करणाऱ्या एका ऋषिपुत्राला कोणीं एक श्रीमान् वैश्यानें उन्मत्तपणानें आपल्या रथाचा धक्का देऊन पाडिलें. तो ऋषिपुत्र पडला असतां अत्यंत व्याकुळ झाला आणि धैर्य सोडून मोठ्या क्रोधानें बोलला, 'मी आतां प्राण देणें बरें ! माझ्यासारख्या निर्धनानें आतां जगून तरी काय उपयोग आहे ?' असा तो मरण्याच्या इच्छेनें स्वस्थ व मूर्च्छित होऊन पडला असतां इंद्र शृगालरूपानें तेथें आला आणि त्या द्रव्यलुब्ध ऋषिपुत्राला बोलला, " जगांतील सर्व प्राणी मनुष्ययोनीची इच्छा करितात आणि त्यांतहि मनुष्यत्व प्राप्त झालें असतां ते सर्व ब्राह्मणत्वाचें अभिनंदन करितात. काश्यपा, तूं मनुष्य आहेस, त्यांत ब्राह्मण असून वेदज्ञहि तसाच आहेस. असें हें दुर्लभ मनुष्यपण प्राप्त झालें असतां मूर्खपणानें त्याचा त्याग करण्यास तयार होणें हें तुला शोभत नाहीं. अरे, लाभ म्हटला म्हणजे तेथें अभिमान असलाच पाहिजे. मीं धन मिळविलें, ह्या अभिमानालाच द्रव्यलाभ म्हणत असतात. वस्तुतः द्रव्याचा कोणाशींहि संबंध नसतो. 'तूं कोणाच्याहि धनाची इच्छा करूं नकोस. म्हणून जें श्रुतींत सांगितलें आहे, तें अगदीं बरोबर आहे.

"तुझें स्वरूप खरोखर संतोषकारक आहे, परंतु लोभामुळें तूं त्याचा अनादर करून मरण्यास सिद्ध झाला आहेस ! अहो, ज्यांना हात आहेत, ते प्राणी खरोखरच धन्य होत. ज्यांना हात आहेत, असे लोक मला फार आवडतात. ज्याप्रमाणें तुला धनाची अत्यंत आवड आहे, त्याप्रमाणें मला हात असलेल्या लोकांची फार इच्छा आहे. प्राण्याला हस्तलाभासारखा दुसरा कोणता लाभ आहे, असें वाटत नाहीं. हे विप्रा, हात नसल्यामुळें आम्हांला आपल्या आंगावरील कांटे काढतां येत नाहींत, किंवा शरीरावरील दंश करणारे लहानसहान प्राणीहि उपटून टाकितां येत नाहींत. परंतु ज्यांना ईश्वरकृपेनें दशांगुलयुक्त हात प्राप्त झाले आहेत त्यांना अंगाला दंश करणारे कृमी

काढितां येऊन त्यांचा नाशहि करितां येतो. त्यांना पर्जन्य, थंडी आणि ऊन यांपासून आपलें संरक्षण करितां येतें. वस्त्र, अन्न, सुख, शय्या आणि निर्वात प्रदेश यांचा त्यांना उपभोग घेतां येतो. ते बैलावर आरोहण करून त्याजकडून भार वाहवितात आणि अनेक उपायांनीं त्यांजकडून कष्ट करवून मिळविलेल्या वस्तूंचा उपभोग आपणच घेतात. जे जिह्वाहीन, दीन, बलहीन आणि हस्तहीन प्राणी आहेत, तेहि नानाप्रकारचीं दुःखें सहन करितात. परंतु हे मुने, तूं तसा नाहींस, हें तुझें सुदैव होय. सुदैवानें तूं शृगाल, कृमि, मूषक, सर्प, बेडूक किंवा दुसऱ्या कोणत्याहि पापयोनींत जन्मला नाहींस. एवढ्या लाभानें देखील तुला संतुष्ट राहिलें पाहिजे होतें. तूं तर सर्व प्राण्यांमध्यें श्रेष्ठ अशा ब्राह्मणकुलांत जन्म पावला आहेस. काश्यपा, माझें शरीर हे कृमि कसें खाऊन टाकीत आहेत पहा! मला हात नसल्यामुळें त्या कृमींना हांकून लावण्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं नाहीं. माझी ही अवस्था किती करुणास्पद आहे, हें पहा तर खरें. अशी स्थिति असूनहि अकार्य म्हणून मी शरीरत्याग करीत नाहीं. असें केल्यानें मी कदाचित् याहूनहि वाईट अशा पापयोनींत पडेन, म्हणून मी तसें करीत नाहीं. ज्या पापयोनीपैकीं शृगालयोनीमध्यें मी उत्पन्न झालों आहें, तीहूनहि अनेक पापयोनि आहेत.

"कित्येक लोक जात्याच अतिशय सुखांत उत्पन्न झालेले असतात, तर दुसरे अत्यंत दुःखांत झालेले असतात. परंतु ह्या दोहोंतहि चिरकालचें सुख पावलेला कोणी प्राणी माझ्या पाहण्यांत नाहीं. मनुष्य संपन्नदशेला गेला म्हणजे त्याला राज्यपदाची इच्छा उत्पन्न होते. राज्यप्राप्तीनंतर त्याला देवत्वाची इच्छा होते आणि त्यानंतर त्याला इंद्रपदाचीहि इच्छा होते. तूं जरी मोठा संपन्न झालास, तरी तूं राजा किंवा देवता होणार नाहींस. कदाचित् दैवयोगेंकरून तुला इंद्रपदाची प्राप्ति झाली किंवा देवत्व प्राप्त झालें, तरी कधीं सुख म्हणून प्राप्त होणार नाहीं. प्रिय वस्तूच्या लाभानें मनुष्याला तृप्ति होतेच असें नाहीं. जलाच्या योगानें तृष्णा शांत होत नाहीं, तर समिधांच्या योगानें जसा अग्नि अधिकच प्रज्वलित होतो, त्याप्रमाणें ती भडकत असते. तुझ्यामध्यें जसा शोक आहे, तसा हर्षहि आहे. तशींच सुखदुःखेंहि आहेत. मग त्या हर्षाच्या योगानें शोकाचें निरसन न करितां हा शोक करणें हें योग्य नव्हे. सर्व वासना आणि सर्व क्रिया यांचें मूळ जी बुद्धि आणि इंद्रियसमुदाय त्यांना पिंजऱ्यांत बद्ध करून टाकलेल्या

शकुंताप्रमाणें अडकवून टाकिलें असतां मग तुला भीति बाळगण्याचें कारण काय आहे? दुसरें मस्तक अथवा तिसरा हात यांचें छेदन होईल, अशी भीति कोणालाहि नसते, कारण मूळांतच जें नाहीं, त्याच्यापासून मुळींच भय बाळगण्याचें कारण नाहीं. अरसज्ञ मनुष्याला कोणत्याहि वस्तूची वासना होत नाहीं. स्पर्शाच्या, दर्शनाच्या किंवा श्रवणाच्या योगानें ती वासना उत्पन्न होत असते. तुला मद्याचें अथवा लट्वाकपक्ष्याचें स्मरण कधीं होत नाहीं. त्यांहून दुसरा कोणताहि भक्ष्य पदार्थ गोडीनें श्रेष्ठ नाहीं. परंतु तुला त्याची मधुरता न समजल्यामुळें कधीं त्याचें स्मरण होत नाहीं. कोणत्याहि प्राण्याला जे पदार्थ कधींहि भक्ष्य नसतात, त्यांच्या आस्वादाची चव नसल्यामुळें त्यांचें स्मरण त्यांना कधींहि होत नसतें. म्हणून त्यांचें प्राशन, त्यांचा स्पर्श आणि त्यांचें दर्शन यांचा त्याग करणें, हेंच मनुष्यांना हितकर होय, ह्यांत संशय नाहीं.

"ज्यांना हात आहेत, जे बलसंपन्न आहेत, तसेच जे धनवंत आहेत, अशा मनुष्यांना मनुष्येंच दास करितात. वध, बंधन इत्यादि क्लेश पुनःपुनः भोगावे लागून त्यांना दुःख होतें. तथापि त्या स्थितींतहि ते रमतात, आनंद पावतात आणि हंसतात. दुसरे कोणी बाहुसामर्थ्यसंपन्न, विद्यावंत व बुद्धिमान् पुरुष निंद्य आणि दीन अशा पापवृत्तीचें अवलंबन करितात. दुसरी कांहीं वृत्ति आपण पत्करावी असें त्यांस वाटत असतें; परंतु आपल्या कर्मानुसार जें ठरलेलें असतें, तदनुसार सर्व कांहीं होत असतें. पुष्कळ चांडालादि हीनजातीय लोकहि आत्मत्याग करण्यास कधीं सिद्ध होत नाहींत. ते आपल्याच जातीनें सर्वदा संतुष्ट असतात, अशी ही माया आहे पहा! काश्यपा, हस्तहीन, अर्धांगानें पीडित आणि इतर रोगी यांना पाहिलें असतां व तुझे सर्व अवयव पूर्ण आहेत, ही गोष्ट ध्यानांत घेत असतां, आपणाला हा लाभ झाला आहे, असेंच तुला म्हणावें लागेल. हे ब्राह्मणा, तुला हा देह जर रोगरहित व ताप-रहित मिळाला आहे, तुझीं सर्व अंगें जर संपूर्ण आहेत, तुझा लोकांमध्यें धिक्कार होत नाहीं, जातिभ्रंशकर कोणताहि कलंक तुला लागलेला नाहीं, तर तूं ऊठ आणि धर्मकृत्यें करण्यास लाग, आत्मत्याग करणें तुला शोभत नाहीं. हे ब्राह्मणा, माझें हें म्हणणें तूं ऐकून घेशील आणि त्यावर विश्वास ठेवून जर वागशील, तर वेदोक्त धर्माचें मुख्य फल जी चित्तशुद्धि ती तुला मिळेल. आपलें अध्ययन आणि अग्निसंस्कार यांचें रक्षण तूं कर. त्याचप्रमाणें सत्य,

दम आणि दान यांचेंहि आचरण कर. कोणाशींहि स्पर्धा करूं नकोस. ज्यांनीं उत्कृष्ट प्रकारचें अध्ययन केलें आहे, ज्यांचें यजन-याजन उत्तम चाललें आहे, त्यांना शोक करण्याचें कारण तरी कोठून पडणार किंवा दुसऱ्याचें अशुभ तरी कसें चिंतणार ?

"आपलीं यज्ञादि कर्में सुयंत्रित पार पडावीं, एवढीच केवळ त्यांची इच्छा, आणि त्यामुळेंच त्यांना मोठें सुख मिळत असतें. उत्तम नक्षत्र, उत्कृष्ट तिथि, आणि शुभ मुहूर्त यांवर उत्पन्न झालेले जे असतात, ते यज्ञ, दान आणि संतति यांविषयीं सर्वदा यथाशक्ति यत्न करीत असतात. तसेंच जे कोणी आसुर नक्षत्र, वाईट तिथि आणि दुष्ट मुहूर्त यांवर जन्मलेले असतात, ते आसुरी योनीमध्यें जन्म पावतात, त्यांना यज्ञफलाची प्राप्ति होत नसते. पूर्वीं मी कुत्सित पंडित असून हेतुवादानें सर्वदा वेदांची निंदा करीत असें आणि निरर्थक अशा अनुमानप्रधान तर्कविद्येमध्यें आसक्त होत असें. मी सर्वदा हेतुवादाचें अवलंबन करून सभांमध्यें हेतुवादानेंच भाषण करीत असें. सभांमधून वेदवाक्यांचा विचार चालला असतां मी ब्राह्मणांना कठोरपणानें बोलत असें. मी नास्तिक, सर्वशंकी, मूर्ख आणि स्वतःला पंडित मानणारा असा होतों. हे द्विजा, त्याच कर्मांचें फळ म्हणून मला ही शृगालयोनि प्राप्त झाली आहे. शेंकडो दिवसरात्र जाऊन जरी मला पुनः मनुष्यत्व प्राप्त झालें, तरी किती बरें होईल म्हणून सांगूं ? मग मी संतुष्ट, अप्रमत्त, यज्ञ, दान आणि तप यांमध्यें आसक्त, ज्ञेय जाणणारा आणि त्याज्याचा त्याग करणारा असा होईन !"

युधिष्ठिरा, हें त्याचें भाषण ऐकून तो काश्यप मुनि तत्काळ उठला आणि त्याला म्हणाला, 'तूं मोठा कुशल आणि बुद्धिमान् पुरुष आहेस.' त्यानें विस्मय पावून आपल्या ज्ञानदृष्टीनें त्याजकडे पाहिलें, तों तो देवाधिपति शचीपति इंद्र आहे, असें त्याला आढळून आलें. नंतर त्या काश्यपानें इंद्राची पूजा केली आणि नंतर त्याच्या अनुज्ञेनें आपल्या घरीं तो निघून गेला. १२. १. १८०.

---

## अध्याय १८१ वा.

[ १ पूर्वजन्मार्जिताचें स्वरूप. ]

**युधिष्ठिर**—हे पितामहा, ज्या ज्या दानांचा, यज्ञकर्मांचा किंवा तपश्चर्येचा शुभकारक परिणाम होतो, तीं तीं दानादि कर्में किंवा गुरुशुश्रूषा हीं कशीं करावीं, तें मला सांग.

**भीष्म**—अनर्थकारक आणि म्हणूनच स्वतःच अनर्थरूप असलेले जे कामक्रोधादि विकार यांचा आत्म्याला बुद्धिद्वारा संपर्क लागला म्हणजे मनुष्याचें मन पापाला प्रवृत्त होतें. मलिन कर्मांचें आचरण केल्यानें मनुष्य संकटमय नरकलोकांतच राहण्यास योग्य ठरतो. पापाचरणी दरिद्री लोकांच्या मागें दुर्भिक्षामागें दुर्भिक्ष, क्लेशामागें क्लेश, भीतीमागें भीति, मृत्यूमागें मृत्यु, अशा संकटपरंपरा लागतात. तसेंच श्रद्धाळु अंतःकरणानें इंद्रियनिग्रह करून जे लोक पुण्यकर्मांचें आचरण करतात, ते धनाढ्य बनतात, त्यांना एकामागून एक उत्सवाचे प्रसंग प्राप्त होतात, त्यांना क्रमाक्रमानें वरच्या वरच्या लोकांची प्राप्ति होते व एकापेक्षां एक वरचढ अशीं सुखें प्राप्त होतात. नास्तिक लोक साप, चोर इत्यादिकांचें भय ज्या ठिकाणीं आहे व जेथील गुहांमधून वाघासारखे, मदोन्मत्त गजांसारखे क्रूर प्राणी आहेत, अशा वनांत शिरतात—म्हणजे अशा वनांतल्याप्रमाणें संकटें त्यांच्यावर येतात—व हातबेडी घातलेल्या एकाद्या माणसाप्रमाणें त्यांना या संकटांचा प्रतिकारहि करितां येत नाहीं. याच्या उलट, देव, अतिथि व साधु पुरुष हे ज्यांना प्रिय आहेत, असे पुरुष दानादिकांनीं सुलभ बनलेल्या योग्यांनाच प्राप्त होणाऱ्या अशा सुखकर मार्गाला लागतात. ज्या लोकांना धर्माची चाड नसते, असे लोक म्हणजे धान्यांतील फोलाप्रमाणें किंवा पक्ष्यांच्या मधील माशांप्रमाणें होत. ज्या ज्या पुरुषानें जें जें कर्म केलेलें असतें तें तें, त्याच्या मागें मागें येतें. त्याला चुकविण्यासाठीं तो कितीहि वेगानें पळाला तरी कृतकर्म हें पुरुषाला कधींच सोडीत नाहीं. कृतकर्म हें कर्ता थांबला तर त्याच्या बरोबर थांबतें; तो चालूं लागला तर त्याच्याबरोबर चालतें. सारांश, छायेप्रमाणें कृतकर्म हें कर्ता जें जें करील तें तें करतें व त्याची पाठ सोडीत नाहीं. ज्या पुरुषानें जें ईप्सित कर्म पूर्वीं केलें असेल, त्याचीं फळें त्याला एकट्याला भोगावीं लागतात.

स्वतः केलेल्या कर्मांचें फल हाच ज्याचा ठेवा, असा हा दैवाधीन असलेला प्राणिमात्राचा समुदाय कालाच्या प्रवाहाबरोबर आकर्षिला जात असतो. फळें व फुलें यांच्या उत्पत्तीला कोणत्याहि बाह्य प्रेरणेची जरूरी नसते, तीं ज्याप्रमाणें कोणाच्याहि सांगण्याची वाट न पहातां योग्य काळीं उत्पन्न होतात व पिकतात–कधींहि योग्य कालाचें उल्लंघन करीत नाहींत—त्याप्रमाणें पूर्वजन्मींचें कृतकर्म मनुष्याला योग्य काळीं योग्य फल देतें. मान किंवा अपमान; लाभ किंवा नुकसान; अथवा, नाश किंवा अभ्युदय हीं पूर्वजन्मींच्या कृतकर्मांनुसार घडून येतात किंवा नाशहि पावतात. कृतकर्मांच्या अनुरोधानें त्यांचें रहाटगाडगें नेहमीं चाललेलें असतें. मातेच्या उदरामध्यें येऊन, स्वतः पूर्वजन्मीं आचरिलेलें सुकृत किंवा दुष्कृत मनुष्याला भोगावें लागतें. त्यासाठीं गर्भवास स्वीकारावा लागतो. पुरुष बाल असो, तरुण असो, वा म्हातारा असो, तो जें जें कर्म–शुभाशुभ कर्म–ज्या ज्या वेळेला करील, त्या त्या कर्मांचें फळ, त्या त्या अवस्थेमध्यें त्याला प्राप्त होतेंच होतें. वत्स ज्याप्रमाणें हजारों गाईंच्या कळपांतून आपली आई हुडकून काढतो, त्याप्रमाणें मनुष्याचें कृतकर्महि त्याला हुडकून काढीत असतें. पाण्यांत भिजलेलें वस्त्र ज्याप्रमाणें प्रथम धुवून काढल्यानें स्वच्छ होतें, त्याप्रमाणें विषयत्याग करून तपश्चर्या करणाऱ्याचें मन शुद्ध होऊन त्याला दीर्घकालीन अक्षय सुख–मोक्ष–मिळतो. पक्ष्यांचें आकाशांतील निवासस्थान अमकें म्हणून दाखवितां येत नाहीं किंवा पाण्यांतील माशांचें घर कोठें तें सांगतां येत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञात्या लोकांची गति असते. असो. उगाच आक्षेपरूपी वाक्यें उच्चारण्यांत किंवा दोषांची घोषणा करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तेव्हां स्वतःच्या कौशल्याचा उपयोग करून स्वतःला योग्य अशा तऱ्हेचें आत्मकल्याण करून घ्यावें, हाच श्रेयस्कर मार्ग होय. १२. ३. १८१.

---

## अध्याय १८२ वा.

[ १ पूर्वजन्मार्जिताविषयीं भृगु-भरद्वाजांचा संवाद. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, हें चराचर विश्व कोठून उत्पन्न झालें व प्रळयकाळच्या वेळीं हें कोठें जाईल, तें मला सांग. समुद्र, आकाश, पर्वत, मेघ, पृथ्वी, अग्नि आणि वायु यांनीं युक्त असा हा विश्वगोल

कोणीं निर्माण केला? या पृथ्वीवरचीं सर्व भूतें कशीं निर्माण झालीं; त्यांत वर्णभेद कोठून आले; पावित्र्य व अशुद्धता हीं कशीं उत्पन्न झालीं; त्यांचा धर्माधर्मविवेक कसा झाला; पृथ्वीवर वावरणाऱ्या प्राण्यांचा जीव कशा प्रकारचा असतो; मेलेलीं माणसें मेल्यानंतर कोठें जातात; कोणच्या लोकांतून कोणच्या लोकांत जातात, तें सर्व तूं मला सांग.

भीष्म—पूर्वी भरद्वाजानें भृगूला हाच प्रश्न केला होता, असा इतिहास आहे. त्या वेळेस भृगूनें भरद्वाजास जें पुरातन शास्त्र सांगितलें, तें मी आतां तुला सांगतों. कैलासपर्वताच्या शिखरावर आत्मतेजानें तळपत असलेला महर्षि भृगु याला पाहून भरद्वाजानें त्याला प्रश्न केला, 'महाराज, समुद्र, आकाश, पर्वत, मेघ, पृथ्वी, अग्नि व वायु यांनीं युक्त असा हा विश्वगोल कोणीं निर्मिला? यांत नानाप्रकारचे प्राणिमात्र, नानाप्रकारचे वर्णभेद, कोठून आले; पावित्र्य व अपावित्र्य, धर्म व अधर्म यांबद्दलच्या कल्पना कोठून आल्या; जीवाचें स्वरूप काय, मृत झाल्यावर जीव कोठें जातो, परलोकीं वा इहलोकीं त्याची स्थिति कशी असते, हें सर्व हे महाभागा, तूं मला सांग.

भरद्वाजानें अशी शंका विचारल्यानंतर ब्रह्मतेजानें तळपणाऱ्या त्या ब्रह्मर्षीनें त्याला सर्व सांगितलें.

भृगु—ज्याचें वर्णन 'हा असा आहे' अशा शब्दांनीं करितां येत नाहीं, किंवा 'हा असा नव्हे' असेंहि ज्याच्याबद्दल म्हणतां येत नाहीं, असल्या अज्ञातापासून मन जन्माला आलें व त्या मनांत चित्स्वरूपाचें प्रतिबिंब पडलें. या प्रतिबिंबानें युक्त अशा मनालाच मानस म्हणतात. हा आद्यंतरहित आहे. अभेद्य आहे, अजर आहे, अमर आहे. महर्षींना ज्ञात असलेल्या या मानसालाच अव्यक्त असें म्हणतात. हा नित्य आहे. हा कोणत्याहि प्रकारें नाश पावत नाहीं किंवा क्षीणहि होत नाहीं. सर्व प्राणिमात्र याच्यापासून उत्पन्न झालेले असून जन्म, मृत्यु, जरा-व्याधि हे दोष या प्राण्यांच्या मागें लागलेले आहेत. ह्या अव्यक्तानें प्रथम महत्तत्त्व निर्माण केलें; महत्तत्त्वापासून अहंकार उत्पन्न झाला; अहंकारापोटीं आकाश झालें; आकाशापासून पाणी, पाण्यापासून अग्नि व वायु आणि अग्नि व वायु यांच्या संयोगानें पृथ्वी निर्माण झाली.

नंतर स्वयंभु परमेश्वरानें एक दिव्य तेजस्वी असें कमल निर्माण केलें. त्या पद्मामधून वेदराशि ब्रह्मा निर्माण झाला. या ब्रह्मदेवालाच अहंकार अशी संज्ञा आहे. हा सर्व पंचमहाभूतांचा आत्मा असून प्राणिमात्रांची उत्पत्तिहि याच्यापासून होते. हे जे पंचधातु म्हणजे आकाशादिक हाच ब्रह्मदेव होय. पर्वत ह्या याच्या अस्थि आहेत. पृथ्वी हीच याची मेद व मांस; समुद्र हेंच रक्त; आकाश हेंच उदर होय. आकाशांत वाहणारा वायु हाच याचा निःश्वास; अग्नि हेंच याचें तेज; नद्या याच याच्या रक्तवाहिन्या होत; अग्नि व सोम यांच्यासारखेच असणारे चंद्र-सूर्य हे या पुरुषाचे डोळे आहेत; वरतीं दिसणारा आकाशकटाह हें याचें मस्तक; खालची जमीन हे याचे पाय व भोंवतालच्या दिशा हेच याचे हात. असल्या या भगवान् ब्रह्याला विष्णु अथवा अनंत म्हणतात. हा सर्व भूतांचा आत्मा असून सर्व भूतांमध्यें निवास करतो. कृतात्मे जे ज्ञानी पुरुष त्यांना सुद्धां फार कष्टानें याचें ज्ञान होतें. असो. सर्व भूतांना उत्पन्न करणारें अहंकारतत्त्व ज्यानें निर्माण केलें तो हा आहे. ज्याच्यापासून सर्व विश्व निर्माण झालें तोच हा होय. याप्रमाणें हे भरद्वाजा, तुझ्या प्रश्नाचें उत्तर आहे.

भरद्वाज—आकाश, दिशा, पृथ्वी, वायु, इत्यादिकांचें परिमाण—मोजमाप—काय तें मला सांगून, हे महाभागा, माझ्या संशयाचें निरसन कर.

भृगु—सिद्ध पुरुषांनीं आणि दैवतांनीं सेविलेलें हें आकाश अनंत व रम्य असून याच्या आश्रयाला असणाऱ्या नानाविध वस्तूंनीं व्यापिलेलें आहे. याचा थांग मुळींच लागत नाहीं. वर वर जाऊन व खालीं खालीं येऊन सुद्धां चंद्र-सूर्यांनाहि आकाशाचा अंत लागत नाहीं. खालवर घिरट्या घालूनहि आकाश केवढें आहे, याचा थांग चंद्र-सूर्यांनाहि नाहीं. या ठिकाणीं आत्मतेजानें अग्नी-प्रमाणें शोभणारे स्वयंप्रकाश देव वास्तव्य करितात; पण, त्यांनाहि या आकाशाचा अंत कळत नाहीं, इतकें हें आकाश दुर्गम व अनंत आहे. जसजसें वरवर जावें तसतसें हें आकाश स्वयंप्रकाश अशा देदीप्यमान देवांनीं व्यापिलेलें आहे, असें दिसतें. पृथ्वीतलाच्या शेवटीं समुद्र, समुद्राच्या शेवटीं अंधकार, अंधकाराच्या शेवटीं पाणी, पाण्याच्या शेवटीं अग्नि, अशी स्थिति सांगतात.

पातालाच्या शेवटीं पाणी, पाण्याच्या शेवटीं सर्पराज, त्याच्यापुढें आकाश व त्याच्यापुढें पुनः पाणी असलें हें अनुस्यूत रहाटगाडगें आहे. हेंच भगवंताचें

परिमाण-मोजमाप-होय. याचा अंत कधींहि कोणास लागणार नाहीं. अग्नि, वायु व जल यांचाहि अंत कोणास कळत नाहीं. अग्नि, वायु व जल यांचें तसेंच क्षितितलाचें परिमाण-रूप व स्पर्श यांनीं रहित असलेल्या आकाशा-प्रमाणेंच अमोज आहे. तत्त्वज्ञान यथायोग्य तऱ्हेनें न झाल्यानें हीं तत्त्वें आका-शापासून भिन्न मानिलीं जातात. नानाप्रकारच्या शास्त्रांत अनेक ऋषींनीं त्रैलोक्याचें व सागराचें प्रमाण सांगितलें आहे, ही गोष्ट खरी; तथापि, वस्तु-स्थिति तशी नाहीं. अगम्य व अदृश्य अशा वस्तूचें प्रमाण कोणीं सांगावें? सिद्धांची गति-जाण्यायेण्याचा मार्ग-तशीच देवांचीहि गति जर परिमित ठरूं लागली, तर परमात्म्याचें आनंत्यहि औपचारिकच ठरेल व असें होणें हें 'अनंत ब्रह्म' या श्रुतीशीं विरुद्ध आहे. तेव्हां ज्याचें नामधेय सर्वथा सार्थ आहे, असा हा मानसाख्य महात्मा अनंतच होय. जें आरंभीं नसतें व शेवटींहि नसतें, त्याचें भासमान स्वरूपहि पण अभावरूपच होय. त्याचा ऱ्हास किंवा वाढ हीं भासमानच असतात. तेव्हां जीव जरी ब्रह्मरूप झाला, तरीहि त्याला जगताचें यथार्थरूप जाणतां येणें शक्य नाहीं.

असो. अशा त्या पुष्करापासून सर्वज्ञ, धर्ममय, सर्वोत्तम, असा मूर्तिमान् पहिला प्रजापति भगवान् ब्रह्मदेव निर्माण झाला.

भरद्वाज—ब्रह्मदेव पुष्करांतून निर्माण झाला असें मानल्यास, उत्पत्ति-क्रमानुसार कमल श्रेष्ठ ठरतें आणि आपण तर ब्रह्मदेव श्रेष्ठ होय, असें सांगितलें हें कसें? हा माझा संशय आपण दूर करावा.

भृगु—मानसाख्य महात्म्याची जी मूर्ति ब्रह्मस्वरूप धारण करिती झाली तिचें आसन म्हणून पृथ्वीलाच कमल मानिलें आहे. आकाशाला भिडलेला मेरुपर्वत हीच त्या कमलाची कर्णिका. त्याच्या मध्यभागीं राहून हा प्रभु विश्वाची निर्मिति करितो. १२. ३. १८२.

---

## अध्याय १८३ वा.

[ १ भृगु-भरद्वाजांचा सृष्टिविषयक संवाद. २ भूतोत्पत्ति. ]

(१) भरद्वाज—मेरुपर्वताच्या मध्यभागीं राहून, तो भगवान् ब्रह्मदेव नाना-प्रकारच्या प्रजा कशा निर्माण करतो, तें हे द्विजसत्तमा, तूं मला सांग.

भृगु—त्या मानसाख्य महात्म्यानें नानाप्रकारच्या प्रजा मनापासूनच निर्माण केल्या व मग त्यांच्या रक्षणासाठीं त्यानें प्रथम जल निर्माण केलें. जल हें सर्व भूतांचा प्राण होय. याच्या योगानें सर्व प्रजांचें संवर्धन होतें. पाणी नसलें म्हणजे सर्व नाश पावतात; म्हणून जलानेंच सर्व वेढिलेलें आहे. पृथ्वी, पर्वत, मेघ वगैरे ज्या ज्या गोष्टींना मूर्तस्वरूप आहे त्या त्या सर्व पाण्याच्याच मुळें होतात. कारण, पाण्याचा घनीभाव-घट्ट होणें-द्रव्यरूपाचें घनरूप होणें-यालाच भूतोत्पत्ति म्हणतात; कारण, हें घनरूप म्हणजेच पृथिव्यादि पदार्थ होत.

भरद्वाज—पाणी कसें उत्पन्न झालें, अग्नि व वायु कोठून निर्माण झालीं, पृथ्वीची उत्पत्ति कशापासून झाली, तें मला सांगून माझा संशय नाहींसा कर.

( २ ) भृगु—पूर्वी ब्रह्मकल्पाच्या वेळेस अनेक ब्रह्मर्षि एकत्र जमले होते व त्यांच्यांत त्या वेळेला हाच प्रश्न निघाला होता. लोकांची उत्पत्ति कशी झाली, याबद्दल संदेह उत्पन्न झाला असतांना, ते ब्रह्मर्षि ध्यानमग्न होऊन, मौन धरून, निश्चल राहून, आहार टाकून, वारा पिऊन शंभर (देवांचीं) वर्षें राहिले. तेव्हां, आकाशांतून त्यांच्या कानावर ब्रह्ममयी वाणी पडली. पूर्वी काजळासारख्या काळ्या अंधकारानें व्यापिलेलें असें पर्वतासारखें अनंत व चंद्र-सूर्य ज्यांत नाहींत, असें आकाश निर्माण झालें व तें सुप्तावस्थेंत असलेलें दिसलें. ज्याप्रमाणें अंधकाराच्या एका राशींतून दुसरी राशि निर्माण होते, त्याप्रमाणें आकाशांतूनच जल निर्माण झालें व त्या जलाच्या प्रवाहांतून नाद निर्माण झाला, हाच शब्द होय. पहिल्या प्रथम अच्छिद्र असलेलें भांडें निःशब्द आहे असें वाटतें. पण, त्यांत पाणी भरण्यास सुरवात केल्यावर त्यांतूनच शब्द निघतो. त्याचप्रमाणें, आकाशाच्या सीमेवर पाणी भिडलें म्हणजे समुद्राच्या पृष्ठभागापासून वायु निर्माण होतो व त्यांतून शब्द निघतो. समुद्र-पृष्ठापासून निघणारा हा वायु सर्व आकाशभर फिरतो व त्याची शांति कशानेंहि होत नाहीं. हा वायु आणि जल यांच्या संघर्षानें तेजस्वी, महाबल, असा अग्नि निर्माण झाला व त्यानें आकाश अंधकाररहित केलें. हा अग्नि वायूचें साहाय्य घेऊन जलाला आकाशांत उडवितो व पुढें वायूशीं संयुक्त झाल्यामुळें घनरूप होतो. घनरूप पावलेल्या या अग्नीचा दुसरा भाग जो आकाशांत जातो, त्याचेंच घनरूप म्हणजे पृथ्वी होय. सर्व रस, सर्व गंध, सर्व प्रकारचा स्निग्ध-

पणा, सर्व प्राणिमात्र या सर्वांचें उत्पत्तिस्थान ही पृथ्वी होय व हिच्यापासूनच सर्वांची निर्मिति होते. १२. ३. १८३.

---

## अध्याय १८४ वा.

[ १ पांचांनाच भूतसंज्ञा कां ? २ स्थानवरांचें पांचभौतिकत्व. ३ पृथिव्यादिकांचे गुण. ]

( १ ) भरद्वाज—ज्यांनीं हे सर्व लोक व्यापृत केलेले आहेत व ज्यांना महाभूतें अशी संज्ञा आहे, असे हे ब्रह्मदेवानें निर्माण केलेले पंचधातु होत. पण, यावर शंका अशी कीं, पूर्वी ब्रह्मदेवानें हजारों भूतें निर्माण केलीं असतां या पांचांनाच 'भूत' अशी संज्ञा कां ? यांच्यांत असें विशेष काय आहे ?

भृगु—'महंत' हा शब्द अमितत्व–अनंतत्व–दर्शवितो. ज्याला मोजमाप लावितां येत नाहीं, त्याला महत् म्हणतात. तसेंच ज्यांला उत्पत्ति आहे —जीं उत्पन्न होतात–तीं सर्वच भूतें होत. पंचमहाभूतें अनंत असून उत्पत्तियुक्त आहेत. म्हणून, त्यांना महाभूतें म्हणतात. शरीर हें पांचभौतिकच आहे. यांतील हालचाल वायूमुळें होते. या शरीरांतील पोकळी हें आकाश, यांतील ऊष्मा हा अग्नि, यांच्यांतील द्राव हें पाणी व काठिन्य ही पृथ्वी होय. म्हणून शरीराला पंचभूतात्मक म्हणतात. अशा प्रकारानें सर्व चराचर सृष्टि या पंचमहाभूतांचीच झालेली आहे. श्रोत्र, घ्राण, रस, स्पर्श, दृष्टि हीं पंचेंद्रियें अनुक्रमानें आकाश, पृथ्वी, जल, वायु, तेज यांची ओळख करून देतात. तेव्हां तीं तद्रूपच होत.

( २ ) भरद्वाज—स्थावरजंगमांचे ठिकाणीं पंचमहाभूतें आहेत, असें तूं सांगितलेंस. परंतु, स्थावर वस्तूंच्या शरीरांत पंचधातु, पंचमहाभूतें दिसत नाहींत. ज्यांच्या अंगांत उष्णता नाहीं, ज्यांना हालचाल नाहीं, जे घनरूप आहेत, अशा वृक्षादिकांच्या ठिकाणीं पंचधातु कोठून येणार ? ज्यांना ऐकूं येत नाहीं, चव कळत नाहीं व स्पर्शहि समजत नाहीं, त्यांना पांचभौतिक कसें म्हणावयाचें ? वृक्षांच्या ठिकाणीं रस नाहीं, तेज नाहीं, भूमिद्रव्य त्यांच्यांत सांपडत नाहीं, तेथें वायु नाहीं, आकाशहि नाहीं. तेव्हां, वृक्षांना पांचभौतिकत्व नाहीं.

भृगु—वृक्ष जरी घनरूप असले तरी त्यांच्या ठिकाणीं आकाशद्रव्याचा भाग आहे. ही गोष्ट त्यांना फुलें व फळें येतात, यावरून सिद्ध होते. वृक्षांना

स्पर्शज्ञान आहे, म्हणूनच त्यांच्या साली, फुलें व फळें हीं उन्हानें आतळलीं जातांच कोमेजतात. वायु, अग्नि आणि वज्र यांचा आवाज ऐकतांच वृक्षांचीं पानें, फुलें फळें, गळून पडतात. अर्थातच, वृक्षांना शब्दज्ञान आहे. वृक्षांवर वेली चढतात व त्यांना चोहों बाजूंनीं वेढतात. त्या वेलींना आपला मार्ग सांपडतो, तो कांहीं दृष्टीवांचून नव्हे. तेव्हां वृक्षांना दृष्टिहि आहेच. नाना प्रकारची धुरी दिल्यानें, धुराच्या योगानें झाडें निरोगी होऊन फलपुष्पांनीं समृद्ध होतात; तेव्हां झाडांना वास घेतां येतो, हेंहि नक्कीच झालें. मूळांच्या द्वारें झाडांना पाणी मिळतें, त्यांना रोग उत्पन्न होतात व त्यांचा प्रतिकारहि केला जातो. तेव्हां रसज्ञानहि वृक्षांना आहे, हें उघडच होतें. कमळाच्या देठानें तोंडानें पाणी ज्याप्रमाणें शोषून घ्यावें, त्याप्रमाणें झाडें मूळांच्या द्वारानें पाणी शोषून घेतात. या ठिकाणीं वायुत्वाचें साहाय्य लागतें; कारण शोषण हें त्याचें कर्म होय. सुख व दुःख यांचा अनुभव घेण्याची पात्रता झाडांत आहे. तसेंच झाडें तोडलीं तरी तीं पुन्हां वाढतात. तेव्हां त्यांच्यांत चैतन्य आहे असेंच मानलें पाहिजे. झाडें निर्जीव समजून चालणार नाहीं. वृक्षांनीं मूलद्वारानें शोषून घेतलेलें जल, अग्नि व वायु पचवितात व या आहारपचनानें झाडांत स्निग्धता येऊन त्यांची वृद्धि होते. जंगम वस्तूंच्या ठिकाणीं प्रत्येक वस्तुमात्रामध्यें पंचमहाभूतें आहेत व हीं प्रत्येक शरीरामध्यें वेगळ्या वेगळ्या स्वरूपांत आपलें कार्य करीत असतात. यांच्यामुळेंच शरीराचे व्यापार चालू रहातात. शरीरामध्यें त्वचा, मांस, हाडें, मज्जा व स्नायु हे पृथ्वीचे पांच विकार होत. तेज, अग्नि, क्रोध, चक्षु व पोटांतील जठराग्नि–ज्याच्या योगानें अन्नपचन होतें तो–हे अग्नीचे विकार आहेत. कान, नाक, तोंड, हृदय व कोठा हीं पांच म्हणजे शरीरांतील पांच आकाशविकार होत. कफ, पित्त, घाम, वसा व रक्त हे प्राण्यांच्या शरीरांतील पांच जलप्रकार आहेत. ज्याच्या योगानें प्राणी चलनवलन करतो तो वायुप्रकार म्हणजे प्राण. ज्याच्या योगानें मोठमोठीं शक्तीचीं कामें प्राणी करतो, तो वायुप्रकार म्हणजे व्यान. अपान वायूची गति अधोमुख असते. उदान वायु उच्छ्वास करवितो. याचाच शरीराच्या भिन्नभिन्न भागांशीं संस्पर्श झाला असतां निरनिराळे शब्दध्वनि उमटतात. समान वायु हृदयाकाशांत वास करतो. असे हे पांच प्रकारचे वायु शरीराकडून नानाविध चेष्टा करवितात. देहधारी प्राण्याला पृथ्वीपासून गंधगुण कळतो; पाण्यापासून रसज्ञान होतें; तेजोमय नेत्रेंद्रियाच्या योगानें रूपाचें

ज्ञान होतें व वायुतत्त्वाच्या योगानें स्पर्श समजतो. गंध, स्पर्श, रूप, रस आणि शब्द ह्यांना गुण असें म्हणतात. या गुणांचे निरनिराळे प्रभेद तुला सांगतों, ते ऐक.

( ३ ) पृथ्व्यादिकांचे गुणप्रभेद : पृथ्वीच्या ठिकाणीं जो गंधगुण आढळतो, त्याचे प्रकार नऊ आहेत. इष्ट, अनिष्ट, मधुर, कटु, निर्हारी, संहत, रूक्ष व विशद हे ते नऊ प्रकार होत. सर्वांचा वास मारून टाकणारा हिंगासारख्या पदार्थांचा उग्र दर्प म्हणजे निर्हारी गंध होय. तसेंच, अनेक सुगंधि द्रव्यांचा मिश्र वास हा संहत गंध होय. शिजविलेल्या अन्नाचा वास हा विशद गंध होय. अशा प्रकारें पृथ्वीचा गंधविस्तर नवविध आहे. डोळ्यांनीं रूप पहातां येतें, वायूनें स्पर्श कळतो, शब्द, स्पर्श, रूप आणि रस हेहि गंधाप्रमाणेंच गुण आहेत. रसगुणाचे प्रभेद तुला सांगतों ते ऐक. महर्षींनीं रसप्रकार अनेक सांगितले आहेत. जलाचा गुण जो रस तो मधुर, खारट, तिखट, तुरट, आंबट, व कडु, असा षड्विध आहे. शब्द, स्पर्श व रूप हे तीन तेजाचे गुण होत. तेजाचे योगानें रूपज्ञान होतें. रूपाचे प्रकार बहुविध आहेत. आंखूड, लांब, स्थूल, चौकोनी, वाटोळें, पांढरें, काळें, तांबडें, पिंवळें, निळें, केसरी, कठिण, चिकट, तुळतुळीत, चिखलासारखें मऊ व कठोर असें सोळा प्रकारचें रूप असतें. शब्द व स्पर्श या दोन गुणांनीं युक्त असा वायु असतो. वायूचा मुख्य गुण स्पर्श होय.

या स्पर्शाचे प्रकार बहुविध आहेत. उष्ण, थंड, सुखकर, दुःखकर, स्निग्ध व विशद असे ते प्रकार होत. तसेंच, तीक्ष्ण, मृदु, रूक्ष, लघु व गुरु, असेहि वायूचे प्रकार आहेत. हे सर्व प्रकार मिळून बारा प्रकारचा वायु आहे. शब्द हा एक आकाशाचा गुण आहे. त्या शब्दाचा नानाप्रकारचा विस्तार मी तुला सांगतों, तो ऐक. षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, धैवत, पंचम, निषाद असा सप्तविध शब्द होय. हा आकाशसंभव आहे. हा सर्वत्र व्यापून राहणारा असला तरी पटहादिकांच्या द्वारें व्यक्त होतो. मृदंग, भेरी, शंख, मेघ, रथाचीं चक्रें यांपासून उत्पन्न होणारा सर्व शब्द हा या सात प्रकारांपैकींच होय. मग तो शब्द प्राण्यांचा असो वा अचेतन पदार्थांचा असो. अशा प्रकारें आकाशांतून उत्पन्न होणारा हा शब्दगुण निरनिराळ्या प्रकारांचा असून वायूच्या स्पर्शगुणाच्या योगानें तो निरनिराळ्या ठिकाणीं प्रतीत होतो. वायूच्या स्पर्शगुणांना प्रतिबंध झाला तर शब्दज्ञान होत नाहीं व तीच त्या

गुणाची गति अप्रतिहत राहिली, तर शब्दज्ञान होतें. शब्दाची उत्पत्ति करणारे जे प्राणादि धातु त्यांचें संवर्धन आरंभापासून त्वगादि धातूंनींच होतें. जल, अग्नि व मारुत हीं तीन भूतें प्रत्येक प्राणिमात्राच्या ठिकाणीं सदैव जागृत असतात. हींच शरीराचें मूल होत व हींच प्राणांना व्यापून राहिलेलीं आहेत. १२. १. १८४.

---

## अध्याय १८५ वा.

[ १ शरीरस्थ अग्नि व वायु यांचें स्वरूप. ]

(१) भरद्वाज—हे प्रभो, मनुष्याच्या शरीरांतील अग्नि हा पार्थिव द्रव्याश्रयानें कसा रहातो? तसेंच निरनिराळ्या अवकाशविशेषांच्या ठिकाणीं हा अनिल (वायु) कसकसा संचार करतो, तें तूं मला सांगा.

भृगु—हे ब्रह्मन्, वायूची गति कोणत्या प्रकारची असते, तो कोणत्या प्रकारें प्राण्यांचे देह चाळवतो तें मी तुला सांगतों. मनुष्याच्या शरीराचें रक्षण करणारा अग्नि त्याच्या मस्तकाचा आश्रय करून रहातो व प्राणवायु हा मस्तक व तेथील अग्नि या दोघांच्या आश्रयानें रहातो आणि सर्व शरीरभर फिरतो. हा प्राण हाच जीव होय. हाच सर्व भूतांचा आत्मा, हाच सनातन पुरुष. देहेंद्रियांच्या उपाधींशीं संबंध झाला म्हणजे हाच प्राण, मन, बुद्धि, अहंकार, पंचतन्मात्रें अशा अष्टधा प्रकृतीचें रूप घेतो व शब्दादि विषयहि तोच बनतो. अशा प्रकारें, हा प्राण देहेंद्रियाची चालना करतो. पुढें जीवत्व प्राप्त झाल्यानंतर हाच समान वायु बनतो व शरीराच्या निरनिराळ्या भागांचा आश्रय करून त्या त्या ठिकाणचें आपलें कार्य करतो. मूत्र व पुरीष यांचा उत्सर्ग करविणाऱ्या वायूस अपानवायु म्हणतात. प्रयत्न, प्रत्यक्ष क्रिया व सामर्थ्य या तीन्हींना व्यापून रहाणारा जो एक वायु त्याला उदान अशी संज्ञा अध्यात्मवेत्ते पुरुष देतात. मनुष्यदेहाच्या सर्व संधींना व्यापून रहाणारा जो वायु, त्याला व्यान अशी संज्ञा आहे. त्वचा आदिकरून जे देहधातु, त्यांना व्यापून राहिलेला व समानवायूनें समिद्ध केलेला जठराग्नि हा अन्नादि रस, त्वगादि धातु व पित्तादि दोष यांची चालना करीत रहातो. अपान व प्राण या दोहोंमध्यें त्यांनींच समिद्ध केलेला हा अग्नि नाभिमंडलाचा आश्रय करून अन्नादिरसांचें योग्य पाचन करतो. तोंडापासून गुदद्वारापर्यंत या प्राणवायूचा मार्ग म्हणून म्हटली जाणारी एक मोठी नलिका आहे. या मुख्य मोठ्या नलिकेपासून दुसऱ्या

अनंत नलिका झाल्या असून त्यांच्या द्वारें प्राणवायु सर्वत्र संचार करतो. अशा तऱ्हेनें, सर्व अंगप्रत्यंगांचा प्राणवायूशीं संगम होतो व त्याबरोबरच जठराग्नीचाहि संयोग होतो.

प्राण्यांच्या अन्नाचें पचन करणारा जो तोच हा जाठराग्नि होय. त्या अग्नीची ऊब सर्व शरीराला आहे. अग्नीच्या वेगामुळें हा प्राणवायु वहातो तो मोठ्या नलिकेच्या तोंडाशीं गुदद्वारापर्यंत येऊन थडकल्यानंतर पुनः ऊर्ध्वगति होतो व अग्नि चाळवितो. नाभीच्या ठिकाणीं अधोभागीं पक्वाशय आहे व ऊर्ध्वभागीं अन्नाशय आहे. शरीरांतील सर्व प्राण नाभीच्या मध्यभागीं असतात. हे सर्व प्राण हृदयापासून निघतात व शरीराच्या मध्यें आडवे, उभे, वर, खालीं, अशा तऱ्हेनें अनिरुद्ध संचार करतात. प्राणवायूच्या योगानें चालना मिळालेल्या दहा नाड्या सर्व ठिकाणीं अन्नरस पोंचवितात. हा योग्यांचा मार्ग होय. याच मार्गाच्या द्वारानें ज्यांना कधींहि क्लेश होत नाहींत, जे सर्वत्र समदृष्टि असतात, जे धैर्यप्रकृति असतात, असे योगी लोक सहस्रदल कमलामध्यें सुषुम्ना नाडीच्या द्वारें आत्म्याला नेऊन त्याची तेथें स्थापना करितात. अशा प्रकारें प्राणिमात्रामध्यें असणाऱ्या सर्व प्राणापान वायूंचा योगनिरोध सांगितला आहे. त्याचें आचरण केलें असतांना स्थाली-मध्यें ठेविलेल्या अग्नीप्रमाणें जाठराग्नि सदैव प्रदीप्त रहातो. १२. ३. १८५.

---

## अध्याय १८६ वा.

[ १. जीवस्वरूपाविषयीं भरद्वाजाचा आक्षेप. ]

( १ ) भरद्वाज—वायूच जर प्राणिमात्रांना जगवितो, तोच जर त्यांच्या देहांची चालना करतो; तोच त्यांच्याकडून श्वासोच्छ्वास करवितो; शब्दोच्चार करवितो; तर जीव जीव म्हणून म्हणतात, त्याचें अस्तित्वच निरर्थक ठरेल. शरीरांतील ऊष्मा हा जर अग्निजन्य म्हणावयाचा; अन्नाचें पचन अग्नि करतो असें मानावयाचें; अग्नि हाच हें अन्न जीर्ण करतो असें समजावयाचें, तर जीव हा निरर्थकच होय. देहेंद्रियांचें संघातरूप असें हें शरीर नष्ट होत असतांना जीव कोठेंच उपलब्ध होत नाहीं. शरीरांतून नाहींसें काय होत असेल तर तो व उष्णता. जीव हा जर वायुमय मानावयाचा व वायूशीं त्याचा अत्यंत जवळचा संबंध आहे, असें म्हणावयाचें तर वाऱ्यानें उठविलेल्या वावटळीप्रमाणें त्यानें वारा वाहील तिकडे वाऱ्याबरोबर गेलें पाहिजे.

जीवाचा प्राणादिकांशीं संश्लेष होतो, एवढाच जर त्याचा संबंध असेल व हा संबंध सुटल्यानें त्याचा नाश होत असेल तर प्राणादिकांचा संबंध तुटल्यावर नाश पावतां पावतां प्राणादिकांहून भिन्न असलेला जीव दृश्य स्थितींत दिसला पाहिजे. दगड घातलेलें मडकें पाण्यांत सोडलें म्हणजे आंतले दगड बाहेर पडल्यानंतर बुडतां बुडतां तें मडकें जसें दिसत असतें, तसा जीव दिसावयास पाहिजे. पाण्याची घागर विहिरींत ओतली म्हणजे पाण्यांत पाणी मिळून जाऊन घागरींतील पाणी नाहींसें झालेलें वाटतें, किंवा दिवा विस्तवांत टाकला म्हणजे दीपतेज विस्तवांत विलीन होतें व दिवा नाहींसा झाल्याचा भास होतो, तद्वत् शरीरादि संघाताचा नाश होतांच जीवाचाहि नाश होतो, असें मानण्याची पाळी येईल. शरीर हें पंचमहाभूतांचें बनलेलें असल्यानें पांचांपैकीं एकाचा नाश होतांच उरलेल्या चारांचाहि आपोआप नाश होतो, यांत संशय उरत नाहीं. मग त्यांत जीवाला निराळें अस्तित्व कोठें? आहार टाकल्यानें शरीरांतील जलतत्त्वाचा नाश होतो. उच्छ्वासाचा निरोध केल्यानें वायुतत्त्व नाहींसें होतें. कोठ्याचा भेद केल्यानें आकाशतत्त्वाचा लय होतो. भोजनाचा त्याग केल्यानें तेजाचा-अग्नीचा-विनाश होतो. रोग, सूज व नानाप्रकारचे क्लेश यांनीं शरीरांतील पृथ्वीतत्त्वाचा प्रणाश होतो. या पंचतत्त्वांपैकीं एकाला जर नाश प्राप्त झाला तर त्यांच्या संघाताचे पांच भागहि निरनिराळे जातात. याप्रमाणें पंचमहाभूतांचें बनलेलें हें शरीर पंचभूतांत विलीन झालें, म्हणजे जीव कोणाच्या मागून जाणार? हा काय जाणणार, काय ऐकणार, काय बोलणार? मी परलोकांत गेल्यावर ही धेनु माझा उद्धार करील, या हेतूनें मनुष्य इहलोकीं धेनूचें दान करीत असतो. जीवाला स्वतंत्र अस्तित्व नाहीं, असें ठरल्यास ही धेनु उद्धार कोणाचा करील? पक्ष्यांनीं खाल्लेल्या, पर्वत-शिखरावरून खालीं पडलेल्या व अग्निमुखीं पडून भस्मसात् झालेल्या देहाचें पुनरुज्जीवन कोठून होणार? तोडलेल्या झाडाच्या मुळ्या जरी जीव धरीत नाहींत व त्यांना अंकुरहि फुटत नाहीं तरी, वृक्ष-बीजापासून त्याची पुनरपि उत्पत्ति होते. पण मेलेल्या माणसाला कोणती गति? परमेश्वरानें पूर्वीं निर्माण केलेलें बीजमात्रच परिवर्तन पावतें. परंतु मेलेलीं माणसें नाश पावतात. बीजापासूनच बीजाची उत्पत्ति होते. १२. १. १८६.

## अध्याय १८७ वा.

[ १ जीवस्वरूपनिरूपण. २ पंचभूतविलक्षण असें जीवनस्वरूप कोणतें, असा भरद्वाजाचा प्रश्न. ३ भृगूचें त्यावर उत्तर. ]

(१) भृगु—जीवाचा किंवा जीवानें केलेल्या कृतीचा अथवा दिलेल्या दानाचा या जगांत नाश होत नाहीं. प्राणी एक देह सोडून दुसऱ्या देहांत जातो व त्यक्त देहाचा नाश होतो. शरीर नाश पावतें, म्हणजे त्याच्याबरोबर तदाश्रित जीवहि नष्ट होतो, असा अर्थ नाहीं. समिधा जळून गेल्या तरी त्याच्या आश्रयानें असणारा अग्नि हा शिल्लकच राहतो—नष्ट होत नाहीं—तशीच जीवाची स्थिति आहे.

भरद्वाज—अग्नीचा जसा नाश होत नाहीं, तसाच जीवाचाहि होत नाहीं, हा दृष्टांत योग्य नाहीं. कारण, आधीं अग्नि नाश पावत नाहीं, हेंच खरें नव्हे. सर्पण जळून गेल्यावर अग्निहि नष्ट होतो. सर्पण जळून गेल्यानंतर शांत झालेला अग्नि नष्ट झाला, असेंच मी मानतों. कारण त्याची गति, प्रमाण किंवा आश्रयस्थान यांपैकीं कशाचीच उपलब्धि होत नाहीं.

भृगु—इंधनें दग्ध झालीं असतां अग्नि जसा सूक्ष्मपणानें दिसत नाहीं, तो जसा निराश्रित होऊन आकाशांत लीन होऊन जातो, त्याचप्रमाणें देहनाश झाला असतां हा सूक्ष्म व आकाशतुल्य जीव दृग्गोचर होत नाहीं. अग्नि ( विज्ञानमय जीव ) हाच प्राणधारण करीत असतो. शरीरांत संचार करणाऱ्या वायूप्रमाणेंच त्याची स्थिति असते. त्या वायूचा नाश झाला म्हणजे जीवाचाहि लोप होतो. हा शरीरांतील अग्नि ( जीव ) नाश पावला असतां शरीर अचेतन पडून भूमिमय होऊन जातें. कारण भूमि हें शरीराचें लयस्थान आहे. सर्व स्थावरजंगमात्मक प्राण्यांच्या शरीरांतील वायु आकाशांत प्रविष्ट होतो आणि अग्नि हा वायूमध्यें प्रवेश करितो. हे तिघे एकरूप होऊन दुसरे दोन —जळ आणि भूमि हे—पृथ्वीमध्यें राहतात. जेथें आकाश असतें, तेथें वायु असतो व जेथें वायु असतो, तेथें अग्नि असतो. हे तीनहि पदार्थ अमूर्त आहेत, परंतु ते प्राण्यामध्यें मात्र मूर्तिमंत असतात.

भरद्वाज—हे अनघा, जर अग्नि, वायु, भूमि, आकाश आणि जळ हीं पंचभूतें प्राण्यांमध्यें असतात, तर तेथें जीव म्हणून असतो, त्याचें लक्षण काय तें मला सांग. ह्या पंचभूतात्मक, पंच विषयांचे ठिकाणीं रममाण होणारें, पंचज्ञानें-

न्द्रियें आणि तज्जन्य ज्ञान यांनीं युक्त, मांस आणि शोणित, त्याचप्रमाणें मेंदु, स्नायु आणि अस्थि यांचा एकत्र संचय असलेलें जें प्राण्याचें शरीर, त्यामध्यें जीवाचें वास्तव्य कशाप्रकारें होत असतें, तें जाणण्याची मला इच्छा आहे. हें शरीर पाहिलें असतां त्यांत जीव कोठेंहि आढळून येत नसतो. जर पंचभूतात्मक शरीर हा जीव नव्हे, तर शारीरिक किंवा मानसिक यातना झाल्या असतां त्या दुःखाचा अनुभव शरीरावांचून दुसरें कोण घेऊं शकतें? हे महर्षे, मनुष्य सांगितलेलें श्रवण करीत असतो, परंतु अंतःकरण व्यग्र असेल, तर त्यास श्रवण करितां येत नसतें. म्हणून जीव हा भिन्न मानणें योग्य नव्हे. तसेंच मनाशीं संबद्ध अशा नेत्रांच्या योगानें मनुष्याला कोणताहि दृश्य पदार्थ अवलोकन करितां येतो. परंतु मन व्याकुल असतां अगदीं दृष्टीपुढील पदार्थहि दिसत नाहीं, त्याचप्रमाणें मनुष्य निद्रावश झाला असतां कोणताहि पदार्थ पाहूं शकत नाहीं, वारा घेऊं शकत नाहीं, ऐकत नाहीं किंवा बोलतहि नाहीं. त्याला स्पर्श किंवा रस यांचेंहि ज्ञान नसतें. आनंद पावणारा, क्रोध करणारा, शोकग्रस्त होणारा, उद्विग्न बनणारा, इच्छा, ध्यान आणि द्वेष करणारा आणि वाणीला प्रवृत्त करणारा शरीरामध्यें दुसरा कोण आहे?

भृगु—भरद्वाजा, विषयांप्रमाणें इंद्रियेंहि महाभूतात्मकच आहेत आणि मनहि इंद्रियांप्रमाणेंच पंचमहाभूतात्मक आहे. म्हणून त्या मनाचा अथवा इंद्रियांचा शरीरधारणाला कांहींएक उपयोग होत नाहीं. तर शरीरामध्यें असणारा अंतरात्मा हाच शरीराचें धारण करितो. त्याला गंध, रस, शब्द, स्पर्श, रूप आणि अन्यगुण ह्यांचें ज्ञान असतें. तो अंतरात्मा ह्या पंचभूतात्मक शरीरांत राहणारा असून अंतःकरणाचा द्रष्टा आहे. तो त्याच्याच द्वारानें सर्व अवयवांमध्यें प्रवेश करितो. सुख आणि दुःख ह्यांचें ज्ञान त्याला होतें. त्याचा आणि त्याच्या द्वारें जेव्हां इंद्रियांचा कांहीं संबंध येत नसतो, त्यावेळीं देहाला कांहींच ज्ञान होत नाहीं.

जेव्हां शरीरांतील अग्नीचा ऊष्मभाव नाहींसा होतो व रूप आणि स्पर्श यांची उपलब्धि होत नसते, तेव्हां आत्म्यानें देहत्याग केलेला असतो. परंतु तो नाश स्थूलदेहाचा होतो; कारण, सूक्ष्मदेह अविनाशी असतो. हें सर्व जगत् सूक्ष्म महाभूतांनीं व्याप्त आहे, म्हणून प्राण्यांचेंहि शरीर सूक्ष्म पंचमहाभूतात्मकच आहे. ह्या सूक्ष्म शरीरांत असणाऱ्या अंतःकरणामध्यें आत्मा—चिद्रूप पुरुष—व्यक्त असतो. हा उपाधियुक्त झाला असतां जीव होतो. सर्व लोक-

कर्ता ब्रह्माहि हाच होय. हा आत्मा प्रकृतिगुणांनीं—इंद्रियें आणि मन यांनीं—युक्त झाला म्हणजे त्याला क्षेत्रज्ञ म्हणतात. त्या गुणांचा त्याच्या ठिकाणीं वियोग दिसून आल्यास त्याला परमात्मा म्हणत असतात. कमलांतील जलबिंदूप्रमाणें स्थूल-सूक्ष्म शरीरांमध्यें वास्तव्य करणारा असा सर्वलोकहितात्मक जीव तोच आत्मा होय. सर्वदा लोकसुखाच्या रूपानें असणाऱ्या त्या आत्म्याला क्षेत्रज्ञ अशी संज्ञा आहे. सत्व, रज आणि तम हे तीन जीवगुण होत. सचेतन देह, इंद्रियें आणि अंतःकरण हीं ह्या जीवाचीं उपभोगसाधनें आहेत—हीं स्वतः क्रिया करितात आणि त्यांशीं संबद्ध अशा, सात भुवनें उत्पन्न करणाऱ्या आणि संसाराच्या पलीकडे असणाऱ्या परमात्म्याकडूनहि क्रिया करवितात. देहभेद होऊन जरी जीवाला अन्य देहाची प्राप्ति होते, तरी तो त्याचा नाश नव्हे. त्याचा नाश होतो, असें म्हणणारे लोक अज्ञ होत. जीव हा पहिला देह सोडून दुसऱ्या देहांत जातो. हें अन्य देहांत जाणें म्हणजेच मरण होय.

ह्याप्रमाणें अविद्यारूपी अज्ञानानें व्याप्त आणि देहेंद्रियांमध्यें लीन असलेला हा आत्मा सर्व विश्वामध्यें संचार करीत असतो. जे तत्वज्ञानी आहेत, त्यांसच हा सूक्ष्मबुद्धीच्या योगानें ज्ञात होतो. सात्विक आहार ठेवून आणि शुचिर्भूत राहून रात्रीच्या पूर्व आणि उत्तरभागीं योगाभ्यास करीत राहिल्यानें ज्ञानी पुरुषाला आत्मसाक्षात्कार होतो. चित्ताची वृत्ति अंतर्मुख होऊन आणि शुभाशुभ कर्मांचा त्याग घडून अंतःकरणशुद्धि झाली असतां आत्मनिष्ठ पुरुषाला मोक्षसुखाची प्राप्ति होत असते. अंतःकरणामध्यें अग्नीप्रमाणें प्रज्वलित होणारा जो आत्मा, त्यासच शरीरांत असणारा जीव म्हणतात. त्या सर्वेश्वरापासूनच ही सकल सृष्टि उत्पन्न झाली आहे. ह्याचा अनुभव आत्मज्ञानानंतरच येत असतो. १२. ३. १८७.

---

## अध्याय १८८ वा.

[ भृगूकडून भरद्वाजाला चातुर्वर्ण्यविभागांचें कथन. ]

( १ ) भृगु—पूर्वीं ब्रह्मदेवानें अखिल विश्वाचे अधिपति असे ब्राह्मण उत्पन्न केले. ब्रह्मदेवानें आपल्या तेजापासून त्यांना उत्पन्न केलें असल्यामुळें अर्थातच ते सूर्याग्नींसमान देदीप्यमान झाले. त्यानंतर त्यांना स्वर्गप्राप्ति व्हावी, या हेतूनें त्या ब्रह्मदेवानें सत्य, धर्म, तप, शाश्वत वेद, आचार आणि शुचिर्भूतता

हीं निर्माण केलीं. देव, दानव, गंधर्व, दैत्य, असुर, मोठमोठे सर्प, यक्ष, राक्षस, नाग, पिशाच आणि मनुष्यें, त्याचप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र आणि प्राणिवर्गांतील इतर वर्ण यांनाहि त्यानेंच निर्माण केलें. ब्राह्मण हे सत्त्वगुणी असल्यामुळें त्यांचा वर्ण शुभ्र असतो. क्षत्रिय हे रजोगुणी आहेत, म्हणून त्यांचा वर्ण रक्त आहे. वैश्य हे रज आणि तम या दोन गुणांनीं युक्त असतात, म्हणून त्यांचा वर्ण पीत असतो आणि शूद्र हे तमोगुणी असल्याकारणानें त्यांचा वर्ण कृष्ण असतो.

भरद्वाज—ह्या चतुर्वर्णांच्या जातींवरूनच जर श्वेतादि वर्ण ठरत असतील, तर मग सर्व वर्गांमध्यें वर्णसंकर असल्याचें आढळून येईल. ब्राह्मणादि सर्वहि आम्हां वर्णांवर काम, क्रोध, भय, लोभ, शोक, चिंता, क्षुधा आणि श्रम ह्यांचें सारखेंच नियंत्रण आहे, मग हा वर्णभेद कां असावा? घर्म, मूत्र, पुरीष, कफ, पित्त, रक्त हीं सर्वांच्या शरीरांतून सारखींच निघत असतात, मग ह्या वर्णभेदाचें कारण काय? जंगम आणि स्थावर प्राण्यांच्या असंख्य जाति असून त्यांचे रंगहि वेगवेगळे आहेत, मग त्यांच्या वर्णांचा निश्चय कशावरून ठरवावयाचा?

भृगु—ह्या वर्णांमध्यें कांहीं विशेष नाहीं. हें सर्व जगत् ब्रह्मदेवानें निर्माण केलें असल्यामुळें प्रथमतः ब्राह्मणच होतें. कर्मांच्या योगानें त्याला मागाहून वर्णस्वरूप प्राप्त झालें. ज्या ब्राह्मणांना अत्यंत कामोपभोगप्रीति, जे अति तापद, जे साहसप्रिय आणि स्वधर्मत्यागाची इच्छा करणारे होते, ते रजोगुणी क्षत्रिय बनले. जे पीत–रजोगुण आणि तमोगुण यांनीं युक्त–ब्राह्मण होते, ते पशुपालन आणि कृषि यांवर उपजीविका करूं लागले. त्यांनीं स्वधर्माचरण सोडून दिल्यामुळें ते वैश्य बनले. जे ब्राह्मण तमोगुणी असून हिंसा आणि अनृत भाषण यांवर प्रेम करणारे होते आणि लोभाला अनुसरून व शौचाचार सोडून वाटेल तें कृत्य करून उपजीविका करूं लागले, ते शूद्र झाले. ह्या कर्मांमुळें मूळच्या ब्राह्मणजातीपासून हे भिन्न होऊन त्यांचा दुसराच वर्ण झाला असें होतें तरी धर्म आणि पंचमहायज्ञ ह्यांचा त्यांना कधींहि निषेध झालेला नाहीं. असे हे चार वर्ण झाले असून त्यांच्याकरितांच ब्रह्मदेवानें वेद उत्पन्न केले. परंतु आपल्याच लोभदोषानें ते शूद्र वेदविहित कर्मांमध्यें अनधिकारी झाले. ब्राह्मण मात्र वेदानुष्ठानांत सर्वदा आसक्त असतात, त्यामुळें त्यांच्या

तपाचा नाश कधींहि होत नसतो. ते नित्य व्रतनियमांचें आचरण करितात आणि सर्वकाल ब्रह्मचिंतनांत घालवितात.

हें सकल विश्व आणि ब्रह्म हीं एकच आहेत, हें ज्ञान ज्यांना नसतें ते हीन द्विज होत. त्यांच्या अनेक जाती अनेक ठिकाणीं आहेत. पिशाच, राक्षस, प्रेतें आणि विविध म्लेच्छ जाति यांचा अंतर्भाव याच जातीमध्यें होत असतो. त्यांचें शास्त्रज्ञान आणि अनुभवज्ञान यांचा लोप झाला असल्याकारणानें त्यांना वाटतील त्या क्रिया ते स्वच्छंदपणें करीत असतात. वेदविहित संस्कारांनीं युक्त आणि आपल्या कर्तव्याविषयीं निश्चित बुद्धीचे अशा ऋषींची उत्पत्ति पूर्वीच्यापासून पुढच्यांची अशा क्रमानें त्यांच्या त्यांच्या तपःसामर्थ्यानें झालेली आहे. अगदीं पूर्वीच्या ऋषींची उत्पत्ति आदिदेव ब्रह्मयापासून झालेली आहे. ती त्या ब्रह्मदेवाची मानसी सृष्टि असून वेदाला आधारभूत आहे. तशीच ती अक्षयी आणि अव्यय असून योगानुष्ठानाविषयीं सर्वदा उत्सुक असते. १२. ३. १८८.

---

## अध्याय १८९ वा.

[ १ भरद्वाजाला भृगूकडून ब्राह्मणादिवर्णलक्षणनिरूपण. २ परब्रह्माचें साधन वैराग्य हेंच होय, त्याचें कथन. ]

( १ ) भरद्वाज—हे द्विजश्रेष्ठा, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे भेद कशाचे योगानें उत्पन्न होतात, तें मला सांग.

भृगु—जो कोणी जातकर्मादि संस्कारांनीं संस्कृत, शुचिर्भूत, वेदाध्ययनसंपन्न, षट्कर्में[1] नियमित रीतीनें करणारा, उत्तम प्रकारें सदाचारनिष्ठ, अतिथीचें भोजन झाल्यावर अवशिष्ट अन्न सेवन करणारा, गुरूंना प्रिय, सर्वदा व्रतनिष्ठ, आणि सत्यपर असतो, त्याला ब्राह्मण असें म्हणतात. सत्य, दान, अद्रोहबुद्धि, अक्रूरता, लज्जा, दया आणि तप हीं ज्याचे ठिकाणीं दिसून येतात, तोच ब्राह्मण होय, असें सांगितलें आहे. जो युद्धात्मक कर्म करून वेदाध्ययनांत सर्वदा तत्पर असतो, जो दान करितो, प्रजेपासून कर घेतो, त्याला क्षत्रिय

---

१ संध्यास्नानं जपो होमो देवतानां च पूजनम् ।
आतिथ्यं वैश्वदेवं च षट्कर्माणि दिने दिने ॥

म्हणतात. व्यापार, पशुरक्षण, आणि शेती करणारा, तसेंच द्रव्यसंपादनाची आवड बाळगणारा, शुचिर्भूत, वेदाध्ययनसंपन्न, अशाला वैश्य म्हणतात. सदा वाटेल तें भक्षण करून राहणारा, हवीं तीं कर्में करणारा, अशुचि, वेदाचा त्याग केलेला आणि दुराचारी तो पुरुष शूद्र होय. हीं सांगितलेलीं ब्राह्मण-लक्षणें शूद्रांच्या ठिकाणीं कधीं आढळून येतील तर कधीं ब्राह्मणाच्या ठिकाणींहि आढळून येणार नाहींत. शूद्र हा सर्वदा शूद्र धर्मानेंच युक्त असत नाहीं, तसा ब्राह्मणहि सदा ब्राह्मणधर्मानेंच वागणारा असतो असेंहि नाहीं.

ब्राह्मणांनीं सर्व प्रकारची उपाययोजना करून आधीं लोभ आणि क्रोध यांचा निग्रह तसेंच इंद्रियदमन हें केलें पाहिजे. सर्व ज्ञानामध्यें पवित्र असें हेंच ज्ञान होय. क्रोध आणि लोभ हे कल्याणाच्या नाशासाठींच असल्यामुळें कोणत्याहि उपायानें त्यांचें आधीं निवारण करणें योग्य आहे. सर्वदा क्रोधा-पासून संपत्तीचें, मत्सरापासून तपाचें, मानापमानापासून विद्येचें आणि प्रमा-दापासून स्वतःचें रक्षण केलें पाहिजे. हे द्विजा, ज्याचे सर्व उद्योग निष्काम असतात आणि जो काम्यकर्मत्यागपूर्वक सर्व यज्ञादि क्रिया करितो, तोच त्यागी आणि तोच बुद्धिमान् होय. ब्राह्मणानें अहिंसाशील असलें पाहिजे; त्यानें सर्व प्राण्यांशीं मैत्रीनें वागलें पाहिजे; सर्व परिग्रहांचा त्याग करून त्यानें जितेंद्रिय असलें पाहिजे; तसेंच इह-परलोकीं निर्भय व शोकरहित अशा ब्रह्मपदाच्या प्राप्ती-विषयींहि त्यानें तत्पर राहिलें पाहिजे. त्यानें नित्य तपोनिष्ठ राहून इंद्रियदमन करावें, त्यानें मननशील असावें आणि पुत्रदारादिकांवरील लोभ आणि विषय-वासना यांचा त्याग करावा.

( २ ) ज्यांचें आपणांला इंद्रियांचे योगानें ज्ञान होतें, त्या वस्तु व्यक्त असून ज्या केवळ अनुमानगम्य आणि इंद्रियांना अगोचर असतात, त्या अव्यक्त होत. या दोहोंचेंहि ज्ञान असणें आवश्यक आहे. अतींद्रिय परमात्म्यासंबंधीं अवि-श्वास ठेवूं नये, तर मनाची प्रवृत्ति विश्वासाकडे ठेवावी. मन प्राणाकडे लावावें आणि परब्रह्माचे ठिकाणीं प्राणाची धारणा करावी. ब्रह्माची प्राप्ति होण्याला एक वैराग्यच साधन आहे, त्यावांचून दुसऱ्या कशानेंहि होणें शक्य नाहीं. ब्राह्मणाला वैराग्याच्या योगानें ब्रह्मप्राप्ति अगदीं सुखानें होत असते. सर्वदा शुचिर्भूत राहून, सदाचारनिष्ठ आणि भूतमात्राविषयीं सदय असणें हेंच ब्राह्मणाचें लक्षण होय. १२. ३. १८९.

---

## अध्याय १९० वा.

[ १ धर्माधर्म हीं सुखदुःखसाधनें होत, असें भृगूचें प्रतिपादन. २ निरिच्छ योगनिष्ठ मुनि त्यांची इच्छाच करीत नसतात, असा भरद्वाजाचा आक्षेप. ३ सुखाची प्राप्ति होण्यास निष्काम कर्माचीच आवश्यकता आहे, असें भृगूचें उत्तर. ]

( १ ) **भृगु**—वेद आणि स्वधर्मानुष्ठान ह्यांच्या योगानें परब्रह्माची प्राप्ति होत असते. ह्यांच्याच योगानें जगताची उत्पत्ति झाली असून त्याची स्थितिहि यांमुळेंच होत असते. स्वर्गप्राप्तीलाहि ह्यांचेंच साधन आहे. त्याच्या उलट यथेष्टाचरण हें तमोगुणाचें स्वरूप आहे. याच्या योगानें मनुष्याला अधोगतीची प्राप्ति होते. तमोग्रस्त लोक तमानें वेष्टित असल्यामुळें त्यांना स्वर्गाची प्राप्ति होत नाहीं. सत्त्वगुणानें देवत्वाची प्राप्ति, तमोगुणानें तीर्यग्योनीची आणि या उभयतांच्या मिश्रणानें ह्या जगतांतील प्राण्यांस मनुष्यत्वाची प्राप्ति होत असते. असें असूनहि या लोकांमध्यें सत्यानृत, धर्माधर्म, प्रकाश-तम आणि सुख-दुःख ह्या वृत्ति आहेत. येथें जें सत्य म्हटलें आहे, तोच धर्म होय. जो धर्म सांगितला आहे, तोच प्रकाश होय आणि जो प्रकाश सांगितला आहे, तेंच सुख होय. तसेंच जें अनृत तो अधर्म, जो अधर्म तेंच तम आणि जें तम तें दुःख होय. ह्याविषयीं असें म्हटलें आहे कीं, शारीरिक किंवा मानसिक दुःखांनीं, तसेंच ज्याच्यापासून पुढें दुःखावह परिणाम होणार आहे, अशा सुखकारक गोष्टींनीं लोकव्यवहाराचें निरीक्षण करणारे ज्ञानी लोक कधीं मोह पावत नाहींत. शहाण्या मनुष्यानें आपली दुःखांतून सुटका कशी होईल, ह्याविषयीं प्रयत्न केला पाहिजे. इहलोकीं किंवा परलोकीं प्राण्यांना मिळणारें सुख अनित्य आहे. म्हणूनच मनुष्यानें नित्य सुखाच्या प्राप्त्यर्थ यत्न केला पाहिजे. राहुग्रस्त चंद्राला जसा प्रकाश नाहीं, त्याचप्रमाणें अज्ञानानें व्याप्त प्राण्यांनाहि सुखप्राप्ति होत नाहीं.

एक शारीरिक आणि दुसरा मानसिक असे सुखाचे दोन प्रकार आहेत. इहलोकीं किंवा परलोकीं वास करण्याची जी मनुष्याच्या मनाची प्रवृत्ति होत असते, ती सुखप्राप्त्यर्थ होय. धर्म, अर्थ आणि काम ह्या त्रिवर्गांचें सुखाहून अन्य फल नाहीं. तार्किकांचे मतें सुख हा आत्म्याचाच एक गुण आहे. प्रत्येक प्राणी त्याची इच्छा करीत असतो. सुख प्रधानभूत असून धर्म व अर्थ हीं त्याचीं

अंगें आहेत. धर्मादिकांचें आचरण हें सुखासाठींच असून त्यांचा हेतु सुख हाच होय. धर्मक्रिया ह्या सुखप्रयोजनार्थच केल्या जातात.

( २ ) भरद्वाज—सुख हें नित्य असतें, असें जें आपण सांगितलें, तें आम्हांला मान्य नाहीं. योगैश्वर्ययुक्त मुनि ह्या सुखाची इच्छा करीत नसतात. त्रैलोक्यकर्ता ब्रह्मदेव एकटाच तप करीत राहिला आहे, तो ब्रह्मचारी राहून विषयसुखाची कधींहि इच्छा करीत नाहीं, असें आमच्या ऐकण्यांत आहे. त्याचप्रमाणें विश्वेश्वर भगवान् उमापति ह्यानेंहि जवळ आलेल्या मदनाला जाळून त्याचा नाश केला. म्हणूनच आम्ही असें म्हणतों कीं हा मार्ग महात्म्यांनीं स्वीकारिलेला नाहीं आणि त्यांत त्यांना कांहीं जीवाचा विशिष्ट गुण आहे, असेंहि वाटत नाहीं. म्हणून तुझ्या म्हणण्यावर आमचा विश्वास बसत नाहीं. सुखाहून श्रेष्ठ दुसरें कांहीं नाहीं, असें तुझें म्हणणें आहे. परंतु लोकप्रवाद असा आहे कीं सुकृतापासून सुख व दुष्कृतापासून दुःख अशा दोन प्रकारांनीं कर्मांचीं फळें मिळत असतात.

( ३ ) भृगु—आतां ह्याविषयीं सांगतों, तें ऐक. तमाची उत्पत्ति अज्ञानापासून झाली आहे. तमोग्रस्त प्राणी अधर्माच्याच मार्गे लागलेले असतात. धर्माकडे त्यांचें लक्ष्य नसतें. क्रोध, लोभ, हिंसा, अनृत इत्यादिकांनीं ते घेरले गेले असतात. त्यामुळें इहलोकीं किंवा परलोकींहि त्यांना सुखाची प्राप्ति होत नाहीं. विविध प्रकारच्या व्याधि, रोग आणि ताप ह्यांच्या योगानें ते ग्रस्त झालेले असतात. वध, बंधन, इत्यादि प्रकारचे क्लेश, तसेंच क्षुधा, तृषा, श्रम, इत्यादिकांचाहि त्यांना ताप सोसावा लागतो. वृष्टि, वायु, अत्यंत उष्णता किंवा अतिशीतता, यांपासून उत्पन्न होणाऱ्या शारीरिक दुःखांपासून त्यांना त्रास होतो. बंधुजनांचा वियोग आणि धनादिकांचा नाश यांच्या योगानें होणारा मानसिक त्रास आणि जरा, मृत्यु इत्यादिकांपासून होणारें दुःखहि त्यांना सहन करावें लागतें. ज्याला म्हणून या शारीरिक किंवा मानसिक दुःखांचा स्पर्श होत नाहीं, त्यालाच सुखाचें ज्ञान होत असतें. हे दोष स्वर्गामध्यें उत्पन्न होत नसतात. तेथें सुखकारक वायु असतो, एकच सुगंध असतो, क्षुधा, तृषा यांचे श्रम कधींहि होत नसतात. जरा आणि पाप हींहि तेथें नसतात. स्वर्गामध्यें सर्वदा सुखच असतें. मृत्युलोकीं सुख-दुःख हीं दोन्ही असतात आणि नरकामध्यें दुःखमात्र असतें. स्वर्गार्थी लोकांची प्रवृत्ति सर्वदा सुखाकडेच

असते. त्यांना सुखावांचून दुसरें कांहीं नसतें. असें आहे, तरी बुद्धिमान् लोक ज्याप्रमाणें ऐहिक सुखाला तुच्छ समजून स्वर्गीय सुखाची इच्छा करितात, त्याचप्रमाणें बुद्धिमान् विद्वान् लोक स्वर्ग देखील नाशवंत आहे, म्हणून त्याची इच्छा न करितां मोक्षसुखप्राप्तीकरितांच यत्न करीत असतात. इहलोकाप्रमाणें स्वर्गलोकींहि स्त्रिया आहेत. सर्व प्राण्यांची पृथ्वी ( अविद्या ) ही जशी जननी आहे, त्याचप्रमाणें अनंत क्लेशांना कारणभूत अशा स्वर्गांतहि स्त्रिया आहेत. ज्याप्रमाणें इहलोकीं पुरुष दुःखी असतात, त्याचप्रमाणें स्वर्गलोकांत ब्रह्मादिकहि दुःखी असतात. या लोकांत जन्मांतराला कारणीभूत होणारें जें वासनारूपी बीज तें पापपुण्यरूप असतें, परंतु स्वर्गलोकांत तें केवळ तेजोमय पुण्यरूप असतें. यावरून निरुपाधिक सुख हाच परम पुरुषार्थ होय. ब्रह्मदेवानें स्त्रीपुरुष इत्यादि सृष्टीचीं उत्पत्तिस्थानें निर्माण केलीं आहेत आणि आपापल्या कर्मांत आसक्त झालेले प्राणी त्या त्या साधनांचा आश्रय करून राहिले आहेत. १२. ३. १९०.

---

## अध्याय १९१ वा.

[ १ दानादिक धर्माचरण, तप, अध्ययन आणि हवन यांचें फल काय? असा भरद्वाजाचा प्रश्न. २ दानाचे प्रकारांचें वर्णन. ३ भृगूकडून भरद्वाजाला चारहि आश्रमधर्मांचें कथन. ]

**( १ ) भरद्वाज**—दानरूप धर्माचें फळ तसेंच उत्तम प्रकारचें तप, अध्ययन आणि हवन यांचें फल काय?

**( २ ) भृगु**—हवनाच्या योगानें पापाचा नाश होतो, अध्ययनानें उत्तम प्रकारची शांति–उपरति–प्राप्त होते, दानाच्या योगानें भोग मिळतो आणि तपाच्या योगानें स्वर्गप्राप्ति होत असते. दान दोन प्रकारचें सांगितलें आहे. तें एक परलोकप्राप्त्यर्थ आणि दुसरें ऐहिक सुखप्राप्तीसाठीं केलेलें असें होय. सज्जनांना दिलेलें जें दान त्याचा आपणाला परलोकीं उपयोग होतो आणि अयोग्य मनुष्याला केलेल्या दानाचा उपभोग ह्याच लोकीं मिळतो. जशा प्रकारचें आपण दान करितों, त्याचें फलहि आपणास तशाच प्रकारचें मिळतें!

**भरद्वाज**—कोणाचें धर्माचरण कशा प्रकारचें आहे, तसेंच धर्माचें लक्षण काय आणि धर्माचे प्रकार किती आहेत, हें आपण मला सांगावें.

भृगु—जे विद्वान् स्वधर्माचरणामध्यें आसक्त होऊन राहतात, त्यांनाच स्वर्गप्राप्ति होत असते, इतर मोहग्रस्त होऊन राहतात.

भरद्वाज—ज्या ह्या चार आश्रमांचें पूर्वी ब्रह्मर्षीनीं पालन केलें, त्या आश्रमांचे आचार कोणते, तें आपण मला सांगावें.

( १ ) भृगु—लोकहितकारी भगवान् ब्रह्मदेवानें पूर्वी धर्मसंरक्षणकरितां चार आश्रम सांगितले आहेत. त्यांमध्यें पहिला आश्रम म्हणजे गुरुकुलींच राहून अध्ययन करणें–ब्रह्मचर्य–हा होय, असें सांगितलें आहे. ह्या आश्रमामध्यें उत्तम प्रकारचें पावित्र्य, तसेंच संस्कारसंबंधीं नियम आणि व्रतें यांविषयीं मनांत उत्सुकता असावी लागते. प्रातःकालीं आणि सायंकाळीं सूर्य, अग्नि आणि इतर देवता यांचें पूजन करावें. तंद्री आणि आलस्य यांचा त्याग करून गुरूचें अभिवादन, वेदाभ्यास आणि श्रवण यांच्या योगानें अंतःकरण शुचिर्भूत ठेवावें, त्रिकाल स्नान करून ब्रह्मचर्यानें रहावें, अग्नीचें पूजन करावें, गुरुशुश्रूषातत्पर असावें, प्रत्येक दिवशीं भिक्षा मागून गुरूला निवेदन करावें, गुरूची आज्ञा पाळण्यांत केव्हांहि विन्मुख नसावें आणि गुरुप्रसादानें जें कांहीं अध्ययन होईल, त्यांत सर्वदा मग्न रहावें. याविषयीं एक श्लोक आहे. 'जो कोणी द्विज गुरूची आराधना करून वेद संपादन करितो, त्याला स्वर्गफल मिळतें, शिवाय त्याचे मनोरथहि सिद्धीला जातात.'

गार्हस्थ्य हा दुसरा आश्रम सांगितला आहे. त्याच्या आचाराचीं सर्व लक्षणें आतां सांगतों. समावर्तन झालेले, सदाचारी आणि सहधर्माचरणाच्या फलाची इच्छा करणारे लोक यांसाठीं गृहस्थाश्रम निर्माण केला आहे. हा आश्रम धर्मार्थकाम यांची प्राप्ति करून देणारा आहे. या आश्रमांत त्रिवर्गाच्या सिद्धीसाठीं कोणतेंहि निंद्यकर्म टाकून द्रव्य मिळवावें; अध्ययनांत मिळविलेल्या प्रकर्षानें, ब्रह्मर्षीनीं आचरण केलेल्या याजनादिकांच्या योगानें, हव्य, कव्य, नियम यांचें आचरण करून देवताप्रसादानें धनसंपादन करावें व गृहस्थानें गृहस्थाश्रम चालवावा. गृहस्थाश्रमाला सर्व आश्रमांचें मूळ म्हणतात. गुरुकुलामध्यें निवास करणारे ब्रह्मचारी, संन्यासी आणि व्रत, नियम व धर्म यांचें संकल्पानें आचरण करणारे इतर लोक यांनाहि याच आश्रमापासून भिक्षा वगैरे मिळत असते. वानप्रस्थ लोक हे धनहीन असल्यामुळें त्यांनाहि यांचेपासून द्रव्यसाहाय्य होत असतें. हे सत्पुरुष बहुशा

चांगलें पथ्यकारक अन्न भक्षण करितात, सर्वदा अध्ययनमग्न असतात आणि तीर्थयात्रा व देशपर्यटन करीत फिरत असतात. त्यांना उत्थापन द्यावें, त्यांच्या जवळ जाऊन नमस्कार करावा, त्यांच्याशीं मात्सर्यरहित भाषण करावें आणि त्यांना सुखकारक शय्या, आसन व भोजन द्यावें. ह्याविषयीं एक श्लोक आहे, तो असा कीं, ' आशाभंग होऊन अतिथि ज्याच्या गृहापासून निघून जातो, तो आपलें पाप त्याला देतो आणि त्याचें पुण्य घेऊन जातो. '

या गृहस्थाश्रमामध्यें यज्ञक्रियांच्या योगानें देवता संतुष्ट होतात. पितृतर्पणानें पितरांचें समाधान होतें. विद्याभ्यास आणि श्रवण-धारण यांच्या योगानें ऋषि संतृप्त होतात व अपत्योत्पादनानें प्रजापति संतुष्ट होतो. यासंबंधींहि दोन श्लोक आहेत ते असे, ' प्राणिमात्राच्या श्रवणांला आनंददायक असेंच भाषण प्रेम-पूर्वक नित्य करीत रहावें. पीडा, प्रतिबंध, कठोरपणा, अपमान, अहंकार आणि दंभ हीं सर्वदा निंद्य आहेत. अहिंसा, सत्य आणि अक्रोध हें सर्वाश्रमां-मधील तपच होय. या आश्रमामध्यें पुष्पमाला, अलंकार, वस्त्रें आणि अभ्यंग इत्यादिकांचा नित्य उपभोग घेतां येतो. तसेंच नृत्य, गीत, वाद्यें यांचें श्रवणसुख व नेत्रसुख प्राप्त होतें आणि भक्ष्य, भोज्य, लेह्य, पेय आणि चोष्य अशा पांच प्रकारच्या विविध द्रव्यांचा आस्वादहि घेतां येतो. इष्ट विहार घेण्यास मिळाल्यामुळें संतोष होतो आणि कामसुखाचीहि प्राप्ति होते.

या गृहस्थाश्रमामध्यें धर्म, अर्थ आणि काम या पुरुषार्थांची कृतार्थता होते, त्याचप्रमाणें या लोकीं सुखानुभव प्राप्त होतो व पुढें सद्गतिहि मिळते. जो गृहस्थाश्रमी पुरुष मार्गावरील कण वेंचून त्यांवर आपली उपजीविका करितो, स्वधर्माचरणामध्यें आसक्त होऊन राहतो आणि कामविषयांचा त्याग करितो, त्याला स्वर्गसुख मुळींच दुर्लभ नाहीं. १२. ३. १९१.

---

## अध्याय १९२ वा.

[ १ भृगूकडून भरद्वाजाला वानप्रस्थाश्रमाचें निवेदन. २. संन्यासाश्रमाच्या लक्षणांचें कथन. ]

( १ ) वानप्रस्थाश्रमी लोक धर्माला अनुसरून पुण्यकारक तीर्थांवर व नदीप्रवाहांवर राहतात व मृग, महिष, वराह, शार्दूल आणि वनगज यांनीं व्याप्त अशा निर्जन अरण्यामध्यें तपश्चर्या करीत असतात. ग्राम्य वस्त्रें, खाणें-पिणें

आणि उपभोग यांचा त्याग करून वन्यौषधी, मूळें, फळें, पत्रें यांचा परिमित, विचित्र आणि नियमित आहार ते करितात. भूमि हें त्यांचें आसन असतें. जमीन, पाषाणरेणु, बारीक खड्यांची मृत्तिका आणि वाळू ही त्यांची शय्या, त्यांचें अंग काश, कुश, कृष्णाजिन व वल्कलें यांनीं आच्छादित असतें. ते केंस, श्मश्रु कधींहि काढीत नाहींत. ते वेळच्यावेळीं स्नान करितात. बलिप्रदान आणि होम यांचें अनुष्ठान ते कधीं चुकवीत नाहींत. समिधा, दर्भ आणि फुलें आणून तीं स्वच्छ करून ठेवणें हीच त्यांची विश्रांति; त्यांची त्वचा शीत, उष्ण, पर्जन्य आणि वायु यांच्या आघातानें भिन्न झालेली असते; अनेक व्रतें व नियम यांचे अनुष्ठानानें त्यांचे शरीरांतील रक्त आटून जाऊन मांस शुष्क झालेलें असतें; त्यांचा अस्थिपंजर मात्र शेष राहिलेला दिसत असतो. ते केवळ सत्त्वगुणाच्याच जोरावर धैर्याचा अवलंब करून शरीरधारण करितात. ह्या त्यांच्या आचरणाचा विधि ब्रह्मर्षींनीं सांगितलेला आहे, जो कोणी विधिपूर्वक ह्या आचरणाचें पालन करितो, त्याचे सर्व दोष अग्नीप्रमाणें जळून जातात आणि त्याला दुर्जय लोकांची प्राप्ति होते.

( २ ) आतां संन्याश्यांचे आचार सांगतों. अग्नि, धन, स्त्री, भोगसामग्री इत्यादिकांचा त्याग करून व सर्वसंगविषयक स्नेहपाश झुगारून ते संन्यास घेत असतात. त्यांना मातीचें ढेंकूळ, पाषाण आणि सुवर्ण हीं सारखींच वाटतात. त्यांची बुद्धि धर्म, अर्थ आणि काम ह्या तीन पुरुषार्थांवर आसक्त होऊन राहत नाहीं. ते शत्रु, मित्र आणि उदासीन ह्या तिघांनाहि सारख्याच दृष्टीनें पाहतात. ते स्थावर, जरायुज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज प्राणिवर्गाचा वाणीनें, मनानें अथवा क्रियेनें कधींहि द्रोह करीत नसतात. ते कायमचे कोठेंहि राहत नाहींत. ते पर्वत, वाळवंटें, वृक्षमूळप्रदेश आणि देवमंदिरें यांमध्यें संचार करून वस्तीकरितां नगरांत अथवा खेड्यांत राहतात. नगरांत पांच दिवस व खेड्यांत एक दिवस ते राहतात. उदरनिर्वाहार्थ ते शुचि व कर्मनिष्ठ ब्राह्मणांच्या येथें जातात. तेथेंहि कांहीं न मागतां जें पात्रांत पडेल, त्यावर ते निर्वाह करितात. ते काम, क्रोध, दर्प, लोभ, मोह, कार्पण्य, दंभ, परनिंदा, अहंकार आणि हिंसा ह्यांपासून निवृत्त झालेले असतात.

ह्याविषयीं श्लोक आहेत, ते असे—जो मुनि सर्व प्राण्यांना अभय देऊन संचार करितो, त्याला कोणत्याहि प्राण्यापासून कोठें यत्किंचित् देखील भय वाटत नसतें.

जो ब्राह्मण आपल्या शरीराचे ठिकाणीं अग्निहोत्राची प्राणप्रतिष्ठा करून आपल्या मुखामध्यें--मुखरूप कुंडामध्यें--अग्नीला उद्देशून भिक्षावृत्तीनें मिळविलेल्या अन्नरूपी हविर्द्रव्याचा होम करितो, त्याला अग्निचयन करणाऱ्या मुनिवृंदांना मिळणाऱ्या लोकाची–प्राजापत्यपदाची-प्राप्ति होत असते. जो शुचि पुरुष विषयांपासून बुद्धीला निवृत्त करून यथोक्त मोक्षधर्मांचें आचरण करितो, त्याला इंधनरहित प्रशांत ज्योतीप्रमाणें देदीप्यमान ब्रह्मलोकाची प्राप्ति होते.

**भरद्वाज**—ह्या लोकांहून भिन्न असा परलोक (परमात्मलोक) असल्याचें ऐकूं येतें, परंतु त्याचा साक्षात्कार मात्र होत नाहीं. तो लोक कसा आहे, हें जाणण्याची माझी फार इच्छा आहे, तरी तूं त्यासंबंधीं मला सांगावें.

**भृगु**—तें स्थान आत्मसाक्षात्काराचें आहे. तेथें जो अत्यंत उत्कृष्ट, रमणीयतादि सर्वगुणसंपन्न आणि पुष्कळ पुण्याच्याच योगानें प्राप्त होणारा नासिकाग्रमूलाजवळ भ्रू-घ्राणमध्यप्रदेश आहे, त्यावर पापरहित, सत्यसंकल्प आणि सर्वकामोपभोग्य असा परमात्मरूपी परलोक आहे. तेथें पुण्यकर्म करणारे, शुचिर्भूत, अतिनिर्मल, लोभ-मोहांचा त्याग केलेले लोक गेले असतां त्यांना कोणताच उपद्रव होत नाहीं. तो देश स्वर्गसदृश असून पुष्कळ शुभ गुणांनीं युक्त असल्याचें सांगतात. तेथें समाधिकालीं आत्मा प्रगट होऊन त्याचें ईश्वरत्व दृष्टोत्पत्तीस येतें. आत्म्याच्याच ठिकाणीं त्यांची रति असल्यामुळें परदारादिक बाह्य पदार्थांचा लोभ अर्थातच त्यांना जडत नाहीं. तेथें आत्म्याव्यतिरिक्त कोणतीच वस्तु नसल्यामुळें परस्परांशीं कधींहि विरोध येत नसतो. तेथें इच्छा करितांच वाटेल ती वस्तु प्राप्त होत असते; त्याबद्दल कोणालाहि आश्चर्य वाटत नाहीं. तेथें अधर्म नांवालाहि सांपडत नाहीं आणि परमात्मस्वरूपाविषयीं कोणत्याच प्रकारचा संशय नसतो. तेथें केलेल्या कर्मांचें फल तत्काळ मिळत असतें. ह्या ठिकाणीं पोंचलेले कित्येक योगी उत्तम प्रकारचें अन्नपान, आसन, प्रासाद आणि गृह यांचा आश्रय करितात, आपलें शरीर सुवर्णादि भूषणांनीं सुशोभित करितात आणि सर्व प्रकारच्या वासनांनीं लिप्त होऊन संसारांत पुनः पुनः फेरे खात असतात. कित्येक योगी आपल्या वासना परमात्म्याचे ठिकाणीं लीन करितात. जे मध्यम असतात, त्यांना असें करणें क्लेशसाध्य वाटत असतें. व्यास, नारदादिक योगैश्वर्य पावून धर्मनिष्ठ झालेले आहेत. त्यांची सिद्धि परोपकारार्थ असून स्वभोगाकरितां नसते. दुसरे कित्येक

बाह्यभोगावरच आसक्त होऊन आत्मवंचन करून घेतात. म्हणूनच धर्मपर असतात, ते सुखी होतात व आत्मवंचक दुःखी होतात. आत्मवंचक लोक ह्या लोकीं श्रम, भय, मोह, तीव्र क्षुधा आणि द्रव्यलोभ यांनीं व्याप्त होऊन अशा मोहांत सांपडतात.

ह्या लोकीं धर्माधर्मसंबंधीं लोकांच्या अनेक प्रकारच्या कल्पना आहेत. परंतु ज्यांना दोहोंच्या स्वरूपाचें बरोबर ज्ञान असतें, त्या सुज्ञ पुरुषांना पापाचा स्पर्शहि होत नसतो. दंभ, वंचकता, चौर्य, परनिंदा, असूया, परोपघात, हिंसा, दुष्टपणा आणि अनृत यांचा आश्रय करून जो योगी वागतो, त्याचें तप क्षीण होतें आणि जो विद्वान् ह्यांचें अवलंबन करीत नाहीं, त्याचें तप वृद्धिंगत होतें. धर्माधर्म कर्मासंबंधीं अनेक विचार ह्याच लोकीं केले पाहिजेत. कारण ही कर्मभूमि असल्यामुळें येथें शुभ कर्म केलें असतां शुभ फल प्राप्त होतें आणि अशुभ कर्म केल्यानें अशुभ फल मिळत असतें. पूर्वीं ह्याच लोकीं तपाची आवड असलेले ब्रह्मदेवादिक देव व ऋषिसमुदाय हे याग करून ब्रह्मलोकाला गेले. ह्या लोकीं वसति करून ज्ञानरूप पुण्य संपादन करितात, तेच सर्वोत्तम, शुभ आणि पवित्र अशा भ्रूमध्यरूपी प्रदेशांत परमात्मस्वरूप होऊन राहतात. कारण त्यांची योगाच्या ठिकाणीं आदरबुद्धि असते. ह्याविरुद्ध वागणारे कित्येक तिर्यग्योनीमध्यें जन्म घेतात, तर कित्येक अल्पायुषी होऊन पृथ्वीतलावर नाश पावतात. लोभ-मोहादिकांनीं व्याप्त असल्यामुळें एकमेकांस गिळून टाकण्याविषयीं ते सर्वदा तत्पर असतात. त्यामुळें त्यांना या संसारांतच गुरफटून रहावें लागतें. त्यांना भ्रूमध्यप्रदेशाची प्राप्ति होत नाहीं. जे काया-वाचा-मनानें शमदमादिकांचें आचरण करून गुरूची उपासना करितात, त्या विवेकशील पुरुषांना सर्वांना सुगम असें निर्गुण ब्रह्मप्राप्तीचें द्वार जें सगुण ब्रह्म त्याचें ज्ञान होतें. त्याप्रमाणें हा वेदप्रकाशित धर्म मीं तुला संक्षेपानें सांगितला आहे. ह्या लोकीं धर्माधर्मांचें ज्ञान ज्याला आहे, तोच बुद्धिमान् होय.

भीष्म—ह्याप्रमाणें भृगूचें भाषण ऐकून त्या प्रतापी भरद्वाजाला मोठा आनंद झाला आणि त्या धर्मात्म्यानें भृगूचें मोठ्या आदरानें पूजन केलें. हे महाप्राज्ञा, याप्रमाणें मीं तुला जगताच्या उत्पत्तीविषयीं सर्व माहिती सांगितली आहे. आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे? १२.२.१९२.

---

## अध्याय १९३ वा.

[ १ भीष्माकडून युधिष्ठिराला आचारविधिकथन. ]

युधिष्ठिर—हे अनघा धर्मज्ञा, तुझ्या मुखानें, आचारविधि श्रवण करण्याची माझी फार इच्छा आहे. तूं सर्वज्ञ आहेस, असें मला वाटतें.

भीष्म—दुराचारी, दुष्कर्मी, दुर्बुद्धि आणि साहसप्रिय असे जे लोक असतात ते दुर्जन म्हणून प्रसिद्ध आहेत. सज्जन सदासर्वदा सदाचार-लक्षणसंपन्न असतात. राजमार्गावर अथवा गाईंच्या किंवा धान्याच्या मध्यें जे मूत्र-पुरीषोत्सर्ग करीत नाहींत, ते शुभ लोक होत. हे विधि झाल्यावर पाय धुवून व आचमन करून नदींत स्नान करावें आणि मग देवतांचें तर्पण करावें. हा मनुष्यांचा धर्म होय, असें सांगितलें आहे. सर्वदा सूर्याची उपासना करावी व सूर्योदय झाला असतां कधीं झोंप घेऊं नये. सायंकाळीं आणि प्रातःकालीं गायत्रीजप करावा आणि पूर्वेकडे तसेंच पश्चिमेकडे तोंड करून गृह्यसूत्रांतील मंत्रांनीं संध्योपस्थान करावें. भोजनकालीं हात, पाय व तोंड हीं ओलीं असावीं. पूर्वेकडे तोंड करून व मौन धारण करून भोजन करावें. अन्नाची निंदा कधीं करूं नये. जें अन्न असेल, तें मिष्ट समजून त्याचें भक्षण करावें. भोजन झाल्यावर उत्तरापोशन घेऊन उठावें. ओले पाय घेऊन रात्रीं झोंपूं नये. हें आचारलक्षण ऋषि नारदानें सांगितलें आहे.

शुचिप्रदेश, वृषभ, पवित्र गोष्ठभूमि, चव्हाटा, धार्मिक ब्राह्मण आणि देवमंदिर यांना प्रदक्षिणा घालून जावें. अतिथि, सर्व सेवकगण आणि आप्तेष्ट यांस जें अन्न आपण भक्षण करितों, तशाच प्रकारचें घालणें प्रशस्त होय. मनुष्यानें सकाळीं आणि सायंकाळीं असें दोनदां भोजन करणें योग्य होय, असें वेदांत सांगितलें आहे. मध्यंतरीं त्यानें कांहीं खाऊं नये. असें केल्यानें त्यास उपवास केल्याचें फळ मिळतें. होमकालीं होम करणारा, ऋतुकालीं स्त्रीगमन करणारा व परस्त्रीकडे ढुंकूनहि न पाहणारा अशा मनुष्याला ब्रह्मचर्यफल प्राप्त होतें. ब्राह्मणाचें जें उच्छिष्ट तें मातेच्या हृदयाप्रमाणें हितकर असें ब्रह्मदेवानें निर्माण केलेलें अमृतच होय. यज्ञीय वेदीचीं नित्य ढेंकळें फोडणारा, यज्ञाकरितां कुश तोडणारा, नखें खाणारा आणि सदा उच्छिष्ट असणारा मनुष्य दीर्घायु होत नसतो. मांसभक्षणापासून निवृत्त झालेल्या मनुष्यानें अध्वर्यूनें

संस्कार केलेलें मांस खाऊं नये. असंस्कृत मांसाचें अथवा श्राद्धावशिष्ट मांसाचें भक्षण कोणीं करूं नये.

स्वदेशीं किंवा परदेशीं अतिथीला कधींहि उपवासीं ठेवूं नये. भिक्षा मागून मिळविलेलें अन्न पित्रादि गुरूंला अर्पण करावें. गुरुजनांना आसन देऊन त्यांना प्रणाम करावा. गुरूंना प्रणाम केल्यानें आयुष्य, कीर्ति आणि संपत्ति यांची प्राप्ति होते. उदय पावणाऱ्या सूर्याचें तसेंच नग्न अशा परस्त्रीचें अवलोकन कधीं करूं नये. मैथुन ऋतुकालींच एकांतांत करावें. गुरुजनांचें रहस्य हें प्रत्यक्ष तीर्थ होय. अग्नीचा अंतर्भाग सर्वदा पवित्र असतो. शिष्टांनीं केलेली प्रत्येक गोष्ट प्रशस्त असते, तसा गोपुच्छाचा स्पर्शहि सदा पवित्र असतो. शिष्टजनांची गांठ पडली असतां प्रत्येक वेळीं प्रणामपूर्वक कुशलप्रश्न विचारावे. ब्राह्मणांना सकाळ-सायंकाळ वंदन करावें. देवालयांत, गाईंच्या समुदायांत, ब्राह्मणांचीं श्रौतस्मार्त कर्में चाललीं असतां, अध्ययनकालीं आणि भोजनसमयीं मनुष्यानें सव्य करावें. सकाळ-संध्याकाळीं ब्राह्मणांचें पूजन करणें हें व्यापार आणि शेती यांप्रमाणें तत्काल फल देणारें आहे. त्याच्या योगानें धान्यसंपन्नता आणि दिव्य स्त्री, अन्नपानादि इष्टप्राप्ति होते. भोजन झालें असतां यजमानानें ब्राह्मणांना ‘संपन्नं’ ठीक झालेंना ? असें, व जल दिलें असतां ‘तर्पणं’ तुमची तृप्ति झालीना, असें विचारावें, तसेंच पायस, खिचडी इत्यादि पदार्थ वाढले असतां ‘सुश्रुतम्’ चांगलें शिजलें आहेना--असा प्रश्न करावा. श्मश्रुकर्मानंतर, शिंकल्यानंतर, स्नानानंतर आणि भोजनोत्तर ब्राह्मणांना नमस्कार करणें हें व्याधिग्रस्त मनुष्यांचेंहि आयुष्य वाढविणारें आहे. सूर्याकडे तोंड करून केव्हांहि मूत्रोत्सर्ग करूं नये. तसेंच आपला पुरीषोत्सर्गहि मनुष्यानें अवलोकन करूं नये. स्त्रीशीं एकशय्येवर शयन किंवा तिच्या संगतींत एकत्र भोजन वर्ज्य करावीं. वडील मनुष्यासंबंधीं कधींहि एकेरी नांवानें बोलूं नये. आपल्यापेक्षां लहान किंवा आपणाशीं जे समानवयस्क असतील, त्यांच्याशीं एकेरी बोलण्यांत दोष नाहीं.

दुराचारी मनुष्यांचें पाप त्यांच्या नेत्रादि विकारांवरूनच समजतें. बुद्धिपूर्वक पाप करून तें जर महाजनांपुढें ठेवलें नाहीं, तर नाशाला कारण होतें. अशा-स्वज्ञ मनुष्य बुद्धिपूर्वक पाप करूनहि गुप्त ठेवितो, तें मनुष्याला जरी समजलें नाहीं, तरी देवांना तें पातक दिसतें. पापी मनुष्यानें पाप गुप्त ठेवलें असतां त्याची प्रवृत्ति पापाकडेच होते आणि धार्मिक वृत्तीनें वागणाऱ्या मनुष्याची

प्रवृत्ति धर्माकडे होत असते. मूर्ख मनुष्याला त्यानें केलेल्या पापाचें कधीं स्मरणच राहत नाहीं; तथापि त्याचें आचरण शास्त्रविरुद्ध असल्याकारणानें तें पाप त्याजकडेसच येतें. राहु ज्याप्रमाणें चंद्राजवळ येतो, तसें पापहि अशास्त्रज्ञ मनुष्याजवळ येतें. आशेनें सांठविलेल्या द्रव्याचा उपभोग दुःखदायक होत असतो. म्हणून असा द्रव्यसंचय करणें शहाण्यांना इष्ट वाटत नाहीं. कारण त्या मनुष्यानें उपभोग घेईपर्यंत मृत्यु वाट पाहत नाहीं. विद्वान् लोकांच्या मताप्रमाणें धर्म हा सर्व भूतांच्या अंतःकरणांत असतो. म्हणून मनुष्यानें अंतःकरण-पूर्वक सर्व प्राण्यांचें कल्याण चिंतीत असावें. प्रत्येकानें स्वतःच धर्माचरण करीत रहावें; तेथें दुसऱ्याच्या साहाय्याची आवश्यकता नाहीं. मन धर्मशून्य असल्यावर साहाय्यकर्ता तरी काय करणार? धर्म हाच मनुष्याच्या उत्पत्तीस आणि प्रल-यास कारण आहे. स्वर्गामध्यें देवांना अमृत प्राप्त होण्याचें कारणहि हाच धर्म होय. धर्माचरण करणाऱ्या लोकांस स्वर्गांत सर्वदा सुखच मिळत असतें. १२. ३. १९३.

---

## अध्याय १९४ वा.

[ १ भीष्माकडून युधिष्ठिराला अध्यात्मनिरूपण. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, जो हा योगधर्म मनुष्यांनीं आचरण व्यक्त करावा, म्हणून शास्त्रांत सांगितलें आहे, त्याचें स्वरूप काय आहे, तें मला सांग. तसेंच हे ब्रह्मनिष्ठा, हें स्थावरजंगमात्मक विश्व कोठून निर्माण झालें व त्याचा प्रलय कसा होतो, तेंहि मला सांग.

भीष्म—हे पृथापुत्रा, ज्या योगधर्माविषयीं तूं मला विचारिलें आहेस, त्याचें विवरण करून मी तुला आतां सांगतों. हा योगधर्म अत्यंत श्रेयस्कर व सुखदायक आहे. हा आचार्यांनीं सांगितलेला असून त्यांत सृष्टि आणि प्रलय यांचा विचार केलेला आहे. हा जाणल्यानें मनुष्याला ऐहिक सुखप्राप्ति व परब्रह्मपदप्राप्तिहि होत असते आणि त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. हा सर्व जगताचें हित करणारा आहे. पृथ्वी, वायु, आकाश, आप आणि तेज हीं पंचमहाभूतें असून सर्व प्राण्यांची उत्पत्ति ह्यांच्याचपासून आहे. समुद्राच्या

---

१ मनसैव कृतं राम न शरीरकृतं कृतम्।
येनैवालिंग्यते कांता तेनैवालिंग्यते सुता ॥

लाटांप्रमाणें हीं पंचमहाभूतें ज्या प्राण्यांपासून निघतात, तेथेंच लय पावतात. कांसव ज्याप्रमाणें आपलीं अंगें पसरतें व पुनः आंखडून धरितें, त्याप्रमाणें जीवात्मा पंचमहाभूतांना निर्माण करितो आणि त्यांचा संहारहि करितो. ईश्वरानें प्रत्येक प्राणिमात्राच्या शरीरामध्यें पंचमहाभूतें ठेविलीं आहेत. परंतु जीवात्म्यास त्यांचा जीवाभिमान असेपर्यंत या पंचमहाभूतादि भेदाचें ज्ञान होत नाहीं. शब्द, श्रोत्र आणि पोकळी हें शरीरांतील आकाश होय. स्पर्श, त्वगिंद्रिय आणि चलनवलनादि क्रिया हा शरीरगत वायु होय. रूप, चक्षु आणि अन्नादिपचनास कारणभूत होणारा अग्नि हें शरीरगत तेज होय. रस, घर्म आणि जिह्वा हे जलगुण सांगितले आहेत. तसेंच वास घेण्याचे पदार्थ, घ्राण ( नासिका ) आणि शरीर हे शरीरगत पृथ्वीचे भेद होत. ह्याप्रमाणें शरीरांतहि पंचमहाभूतें असून सहावें मन हें आहे.

हे भारता, इंद्रियें आणि मन ह्या सहा ज्ञानद्वारांपलीकडे बुद्धि ही सातवी आणि आठवा क्षेत्रज्ञ-जीव-हीं शरीरामध्यें असतात. चक्षुरादि पांच इंद्रियें विषयांचें ग्रहण करितात, मन हें त्या विषयांसंबंधीं संशय घेत असतें, बुद्धि निश्चय करिते आणि क्षेत्रज्ञ साक्षिवत् राहतो. पादतलद्वयापासून ऊर्ध्वस्थित मस्तकापर्यंतचा सर्व भाग हें साक्षिभूत चैतन्य पाहत असून त्यानेंच आकाशाच्या उदरांत असलेलें हें सर्व विश्व व्याप्त करून टाकिलें आहे. सर्व इंद्रियें आणि त्यांचे विषय हीं सर्व सत्त्व-रज-तमोरूपी आहेत, हें मनुष्यांनीं लक्ष्यांत ठेवावें. ही त्रिगुणात्मक प्रकृति म्हणजेच पंचमहाभूतें व सर्व प्राण्यांचें उत्पत्ति व लय यांचें स्थान आहे. हें बरोबर समजल्यानेंच मनुष्याला उत्कृष्ट शांति हळुहळु प्राप्त होते.

तम आदि गुण हे बुद्धीला विषयरूपी बनवितात. यावरून पंचमहाभूतें, इंद्रियें आणि मन हीं बुद्धिच होत. बुद्धीचें अस्तित्व नसल्यास हीं इंद्रियें आणि पंचमहाभूतें कोठून असणार? बुद्धीचें अस्तित्व असल्यास सर्व पदार्थ अस्तित्वांत येतात व तिच्या नाशाबरोबर सर्व पदार्थांचाहि नाश होतो. म्हणून हें सर्व स्थावरजंगमात्मक विश्व बुद्धिरूप आहे, असें सांगितलें आहे. ज्याच्या योगानें ही बुद्धि पदार्थ अवलोकन करिते, त्याला नेत्र म्हणतात; ज्याच्या योगानें ही श्रवण करिते, त्याला श्रोत्र म्हणतात; ज्याच्या योगानें ही अवघ्राण

करिते, त्याला घ्राणेंद्रिय म्हणतात; ज्याच्या योगानें ही रस चाखते, त्याला जिह्वा म्हणतात आणि त्वगिंद्रियाच्या योगानें हिला स्पर्शज्ञान होतें. या पांच इंद्रियांना घेऊन चिदाभासविशिष्ट बुद्धि ही त्या त्या रूपानें विकृत होऊन प्रगट होत असते. बुद्धि विकृत होऊन जेव्हां कोणत्याहि विषयाची इच्छा करिते, तेव्हां तिला मन म्हणतात. ज्यांचे विषय वेगवेगळे आहेत, अशीं जीं पांच बुद्धीचीं द्वारें आहेत व ज्यांस इंद्रियें म्हणतात, त्या सर्वांवर अदृश्य चिदात्म्याची सत्ता आहे.

लोहकांत ज्याप्रमाणें सन्निध राहून लोहामध्यें क्रिया उत्पन्न करितो, त्याचप्रमाणें हा चिदात्मा आपल्या सत्तामात्रेंकरून इंद्रियें चालवितो. पुरुषाच्या ठिकाणीं असणारी जी बुद्धि ती सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांनीं व्याप्त झालेली असते. ती जेव्हां सत्त्वगुणयुक्त असते, तेव्हां सुख होतें, रजोगुणयुक्त असते, तेव्हां शोकयुक्त असते आणि जेव्हां ती तमोगुणयुक्त असते, तेव्हां तिला सुख व दुःखहि नसतें. ज्याप्रमाणें ऊर्मिमान् सरितापति नद्यांना पूर आला असतां त्यांशीं एकरूप होऊन अतिक्रमण करून राहतो, त्याप्रमाणें तीन अवस्थांनीं युक्त असलेली बुद्धि मनुष्याच्या अंतःकरणामध्यें वास्तव्य करून राहिलेली आहे. ही बुद्धि त्रिगुणात्मक असून त्रिगुणांना व्यापून राहिलेली आहे. अशाप्रकारें गुणत्रयास आक्रमण करून अंतःकरणामध्यें राहिलेली बुद्धि अभ्युत्थानकालीं पुनः पूर्वावस्थेला प्राप्त होते आणि रजोगुणाची प्रवृत्ति होते. बुद्धि रजोगुणानें व्याप्त झाली असतां रागद्वेषादिकांना अनुसरून सत्त्वात्मक —यथार्थज्ञान—आणि तम—विपरीत ज्ञान—यांची प्रवृत्ति होते. सत्त्वगुणांपासून सुख, रजोगुणापासून शोक आणि तमोगुणापासून मोह ह्यांची उत्पत्ति असून ह्या जगांतील सर्व पदार्थ ह्या त्रिगुणांनींच व्याप्त झाले आहेत.

हे भारता, बुद्धीची सर्व गति मीं तुला सांगितली. शहाण्या मनुष्यानें इंद्रियांचा जय अवश्य केला पाहिजे. सत्त्व, रज आणि तम हे सर्वदा प्राण्यांचा आश्रय करून असतात. सर्व प्राण्यांमध्यें सात्विक, राजस आणि तामस अशा तीन प्रकारच्या वेदना दृष्टीस पडतात. सत्त्वगुण हा सुखप्राप्तिदायक आहे. रजोगुण हा दुःखकारक आहे आणि तमोगुण ह्याचे योगानें सुखदुःख ह्या दोहोंपैकीं कांहींच नसतें. त्यानें केवळ मोहच होत असतो. ज्याच्या योगानें शरीराला अथवा मनाला सुख होतें, त्याला सत्वगुणात्मक म्हणतात. तसेंच ज्याच्या योगानें आपणांला दुःख होतें आणि मनांतील आनंदाचा नाश होतो, त्याला रजोगुणात्मक म्हणतात. ह्यापासून

दुःखोत्पत्ति होते, म्हणून त्याचें चिंतन करीत बसूं नये. ज्याचेविषयीं कोणताच तर्क चालत नाहीं किंवा ज्ञान होत नाहीं. जो मोहसंयुक्त आहे व ज्याचे योगानें कोणताहि विषय बरोबर समजत नाहीं, तो तमोगुण होय. हर्ष, आनंद, प्रीति, सुख, शांतचित्तता, ह्या सात्त्विक गुणांची प्राप्ति मोठ्या भाग्यानें होत असते. असमाधान, संताप, शोक, लोभ आणि अक्षमा, हीं रजोगुणाचीं लक्षणें असून तीं सकारण व निष्कारणहि असतात. अवमान, मोह, प्रमाद, निद्रा, झांपड हीं तमोगुणाचीं अनेक लक्षणें असून तीं दुर्भाग्याच्या योगानें प्राप्त होत असतात. मन हें दुर्बल वस्तूच्याच ठिकाणीं आसक्त होणारें, अनेक विषयांमध्यें एकाच वेळीं जाऊन भिडणारें, सर्वदा इच्छा करणारें व संशय घेणारें आहे. ज्याचे मनाचें नियमन झालें आहे, तोच इहपरलोकीं सुखी होतो. ज्याप्रमाणें तप्त लोह आणि अग्नि हीं वेगळीं भासत नसतात, त्याप्रमाणें बुद्धि आणि क्षेत्रज्ञ–जीवात्मा–यांमधील भेद सहसा लक्ष्यांत येत नाहीं. तो अत्यंत सूक्ष्म आहे. बुद्धि ही अहंकारादि गुणांस उत्पन्न करणारी आहे, तर जीवात्मा त्या गुणांस निर्माण करणारा नाहीं. ज्याप्रमाणें उंबर आणि त्यामधील कीटक हे परस्परांशीं अति संलग्न झालेले असतात, त्याप्रमाणें बुद्धि आणि जीवात्मा हे परस्परांशीं संबद्ध झालेले आहेत. ह्याप्रमाणें जरी ते परस्परसंबद्ध दिसतात, तरी ते स्वभावतः परस्परांहून भिन्न आहेत. मत्स्य आणि जल यांच्या संबंधाप्रमाणें या उभयतांचा संबंध आहे. देह, अहंकार इत्यादि गुणांना आत्म्याचें ज्ञान नसतें, परंतु आत्म्याला मात्र त्यांचें ज्ञान असतें. तो गुणांचा द्रष्टा आहे, याप्रमाणें ते जरी भिन्न असले, तरी आपल्याशीं त्यांचें तादात्म्य आहे, असेंच आत्मा मानीत असतो.

ज्याप्रमाणें पात्राच्छादित करून ठेवलेला दीप असला, तरी त्या पात्राच्या छिद्रांतून बाहेर पडलेल्या किरणांच्या द्वारें पदार्थ दृष्टिगोचर करीत असतो, त्याप्रमाणें गुणसंगी आत्मा हा पांच ज्ञानेंद्रियें, मन आणि बुद्धि यांच्या द्वारानें विषयांस प्रकाशित करीत असतो. बुद्धितत्त्व हें गुणांना निर्माण करितें व जीवात्मा हा केवळ पहात असतो. बुद्धि आणि जीवात्मा यांचा हा संबंध अनादि आहे. हीं जरी परस्परसंबद्ध आहेत, तरी बुद्धि किंवा जीवात्मा यांपैकीं कोणी कोणास आश्रय नाहीं. आत्म्याचें असंगत्व आणि निर्गुणत्व यांमुळें आपल्या महिम्यानेंच तो राहणारा आहे. तशी अविद्यारूपी बुद्धि ही मिथ्या आहे. बुद्धि ही मनाला प्रकाशित करणारी आहे, पण ती

अहंकारादि गुणांना कधींहि प्रकाशित करीत नसते. ज्याप्रमाणें घटांतील छिद्रें नीट बुजविलीं असतां आंत ठेवलेल्या दीपाचा प्रकाश त्या घटांत उत्तम पडत असतो, त्याचप्रमाणें आत्म्याचीं किरणेंच अशीं जीं इंद्रियें त्यांचा मनानें विरोध केला असतां मनुष्याच्या शरीरांत आत्मज्ञान होत असतें. अशाप्रकारें इंद्रियनिग्रहानें स्वाभाविक कर्मांचा त्याग करून आत्मचिंतन करीत राहणारा जो मुनि त्याला उत्तम प्रकारची गति मिळते. ज्याप्रमाणें जलांत फिरतांना जलचर प्राण्याला जलाचा संपर्क होत नाहीं, त्याप्रमाणें कृतप्रज्ञ पुरुषाला संसारांत असूनहि कर्मलेप होत नसतो. आत्मस्वरूपच असें आहे कीं, त्याला कर्ममल कधींहि लागत नाहीं. हें लक्ष्यांत ठेवून कोणाशींहि मत्सर करूं नये, कोणाविषयींहि शोक व आनंद करूं नये आणि संसारामध्यें वास्तव्य करावें. अशाप्रकारें आत्मस्वरूपी होऊन गेलेला मनुष्य योगबलानें तंतू उत्पन्न करणाऱ्या कोळ्याप्रमाणें सर्व भूतें आणि भौतिक पदार्थ यांना उत्पन्न करितो. म्हणजेच त्यापासून उत्पन्न होणारे भूतादि गुण हे कोळ्याचे तंतूंप्रमाणें होत. जीवन्मुक्ताच्या दृष्टीनें गुणांचा नाश झालेला असतो. कित्येक असें म्हणतात कीं आत्मसाक्षात्कारानंतर गुणांचा नाश होतो व त्यांची निवृत्ति पुनः होत नसते. परंतु हें म्हणणें बरोबर नाहीं. गुणनिवृत्ति होत नाहीं, असें जरी प्रत्यक्ष प्रमाणांवरून दिसत असलें, तरी अनुमानानें गुणनिवृत्ति होत असते, असें सिद्ध होतें. कित्येकांच्या मतें गुणनिवृत्ति होत नाहीं, तर दुसरे कित्येक गुणांची निवृत्ति होते, असें मानणारे आहेत. या दोन्ही पक्षांचा शास्त्रदृष्ट्या विचार करून योग्य तो निश्चय करावा. अशारीतीनें अन्योन्याध्यासानें बुद्धिभेद करणाऱ्या हृदयग्रंथीचा छेद करून संशयनिवृत्ति झाल्यावर सुखानें रहावें. मग शोक करण्याचें कारणच रहाणार नाहीं.

ज्याप्रमाणें पाण्यानें भरलेल्या नदीमध्यें स्नान करून सर्व लोक स्वच्छता पावतात, त्याप्रमाणें अज्ञानानें मलिन झालेले जीव ज्ञानस्वरूपी परमात्मस्वरूपाचे ठिकाणीं प्रविष्ट झाले म्हणजे मुक्तिरूप शुद्धीला पावतात. महानदीच्या परतीराचें ज्ञान असलें, तरी तेवढ्यावरून मनुष्यास परतीरास जातां येत नाहीं; परंतु जो तत्वज्ञ आहे, तो नौकादिकांच्या साहाय्यानें तरून जातो. याप्रमाणें ज्यांना उत्तम अध्यात्मज्ञान प्राप्त झालें आहे, त्यांचा उद्धार होतो. प्राण्याची उत्पत्ति व लय यांचें हेंच स्थान आहे, असें समजून हळूहळू आपल्या बुद्धीनें त्याचा विचार केला म्हणजे सुखाची प्राप्ति होते. धर्म, अर्थ आणि काम हे तीनहि

पुरुषार्थ क्षयिष्णु असल्याचें ज्याला समजतें व जो श्रुत्यादिकांच्या योगानें त्यांचें अनित्यत्व जाणून, त्यांचा त्याग करितो आणि ध्यानशील होऊन श्रवणमननादिकांच्या द्वारें त्यांचा शोध करितो, त्याला कसलीच अपेक्षा राहत नाहीं, त्याच्या सर्व आशा परिपूर्ण झालेल्या असतात. ज्यांनीं आत्मसंयमन केलेलें नाहीं, त्यांना विषयांचे ठिकाणीं आसक्त इंद्रियांनीं परमात्म्याचें पृथक्त्वानें ज्ञान होणें शक्य नाहीं. हें सर्व समजल्यानें मनुष्य ज्ञानवान् होतो. ज्ञानी मनुष्याचें आणखी दुसरें लक्षण काय असूं शकणार ? ह्याचे योगानें विचारवान् लोक कृतकृत्य होतात. अज्ञानी लोकांना ज्याची मोठी भीति वाटत असते, त्या संसारदुःखाचें भय ज्ञानी मनुष्यांला किमपि नसतें. त्या दुःखाचें कारण म्हटलें म्हणजे अज्ञान हेंच होय. ज्ञानवान् मनुष्याच्या अज्ञानाचा नाश झालेला असतो व त्यामुळें त्याला मोक्षप्राप्ति सहज प्राप्य असते. ती सर्वांना सारखीच मिळत असते. कारण निर्गुणाच्या ठिकाणीं विषमता कोठून येणार ?

जो कोणी निष्काम कर्म करितो, त्याचे पूर्वजन्मकृत दोषांचा परिहार होतो; परंतु तेवढ्याचकरितां ज्ञानी मनुष्यानें कर्म करण्याची आवश्यकता नाहीं ! कारण, एकदां ज्ञान झालें म्हणजे प्राचीन अथवा ऐहिक कोणतेंहि कर्म अप्रिय अशा संसारबंधास कारण होत नाहीं. काम-क्रोधादिकांनीं जर्जर करून सोडलेल्या लोकांचा शहाणा मनुष्य तिरस्कार करीत असतो. कामादिकांच्या ठायीं आसक्ति ठेवणाऱ्या मनुष्याला ती इहलोकीं पीडादायक होते. इतकेंच नव्हे, तर मरणोत्तरहि त्याला येथील सर्व योनींत जन्म घ्यावा लागतो. हे राजा, ह्या लोकीं संसारपीडित लोक शोक करीत आहेत पहा ! जे विचारवान् आहेत, ते मात्र शोक करीत नसतात. यास्तव क्रममुक्ति व सद्योमुक्ति यांपैकीं कोणत्याहि द्वारानें तत्काळ मोक्ष मिळविणें, हेंच प्रशस्त होय १२. ३. १९४.

---

## अध्याय १९५ वा.

[ १ भीष्माकडून चतुर्विधध्यानयोगकथन. ]

(१) भीष्म—हे पार्था, मी तुला आतां चार प्रकारचा ध्यानयोग सांगतों. हा श्रवण केल्यानें ह्या लोकीं महर्षींना शाश्वत सिद्धि प्राप्त झाली आहे. जे ज्ञानानें तृप्त झाले आहेत व ज्यांचें चित्त मोक्षावर जडलें आहे, असे योगी उत्तम

प्रकारें ध्यान करीत असतात. त्यामुळें जन्मप्राप्तीला कारण होणारे त्यांचे सर्व दोष नाहींसे होऊन ते स्वस्वरूपामध्यें जातात. अशाप्रकारें ते शीतोष्णादि द्वंद्वें सहन करून, नित्य सत्त्वगुणाचा आश्रय करून, कामक्रोधादिकांपासून अलिप्त राहून, नियमादिकांचे आचरणांत आसक्ति ठेवून, स्त्रियादिकांचा संग सोडून, जेथें विवाद करणारे प्रतिपक्षी नाहींत, अशा अंतःकरणास शांतिप्रद ठिकाणीं वास करितात. अशा ठिकाणीं राहून अंतःकरण ध्येय वस्तूच्या ठिकाणीं एकाग्र जडवावें. अशा योग्यानें काष्ठाप्रमाणें निश्चल रहावें आणि आपलीं सर्व इंद्रियें कूर्माप्रमाणें आकुंचित करून ठेवावीं, कीं तीं बाह्य विषयांपासून परावृत्त होतील, श्रवणेंद्रियानें शब्द ग्रहण करूं नये; त्वचेंद्रियानें स्पर्शज्ञान होऊं देऊं नये; डोळ्यानें रूप जाणूं नये आणि जिह्वेनें रसज्ञान घेऊं नये. योगवित् पुरुषानें सर्व घ्रेय पदार्थांचा त्याग करावा. पांचहि इंद्रियांना त्रस्त करून सोडणाऱ्या अशा वस्तूंची धैर्यशील योग्यानें कधींहि इच्छा करूं नये. कुशल पुरुषानें पांचहि इंद्रियांचा लय मनाचे ठिकाणीं करावा आणि पांचहि इंद्रियांच्या द्वारा विषयांच्या ठिकाणीं संचार करणारें अत्यंत चंचल, कोठेंहि स्थिर न रहाणारें असें जें मन त्याची व पांचहि इंद्रियांची वृत्ति ध्येय वस्तूकडे जडवावी. धीरवान् योग्यानें प्रथमतः आपलें अंतःकरण बाह्य विषयांपासून काढून हृदयाकाशाकडे वळवावें व अशा रीतीनें तें ध्यानमार्गीं लावावें. योग्यानें इंद्रियबाह्यवृत्तींचा निरोध करून त्यांचा मनामध्यें लय करणें, तसेंच मनोवृत्तींचाहि निरोध करणें, हाच ध्यानमार्ग असून ह्याचें वर्णन मीं प्रथमतःच केलें आहे.

अशा रीतीनें मनाचा निरोध केला तरी तें मेघांत लीन झालेली वीज ज्याप्रमाणें सर्वत्र चमकूं लागते, त्याप्रमाणें आत्म्याचें सहावें इंद्रिय जें आभ्यंतर मन, तें पूर्वीं निरुद्ध केलें असलें तरी स्फुरण पावतें. ज्याप्रमाणें जलबिंदु पर्णावर टाकिला असतां सर्व बाजूंनीं चांचल्य पावतो, त्याचप्रमाणें ध्यानमार्गीं आसक्त असणाऱ्या योग्याची चित्तवृत्ति असते. मन एकाग्र केलें असतां तें कांहीं काळ ध्यानमार्गावर जडून राहतें, परंतु तें नाडीमार्गामध्यें प्रविष्ट होऊन तेथील विविध प्रकारच्या रूपांस पाहून वायुवत् चंचल होऊन जातें. अशा वेळीं मनुष्यानें धीर धरावा. निरलस आणि अमत्सरी व परोत्कर्षसह होऊन क्लेश सहन करावे आणि पुनः ध्येयवस्तूकडे चित्त जडवून तें स्थिर करावें. योगाभ्यासी, मननशील पुरुषाला विचार, विवेक किंवा वितर्क ह्यांपैकीं कोणतेंहि एखादें ध्यान

त्याच्या अधिकारानुसार प्राप्त होतें. ध्यानाच्या काळीं अंतःकरणाला कितीहि क्लेश झाला, तरी ध्यान सोडून न देतां समाधि कायम ठेवावी आणि आपणाला हितकारक असें चित्तैकाग्र्य प्राप्त करून घ्यावें. धूळ, भस्म किंवा वाळलेलें शेणाचें चूर्ण यांच्या राशींवर पाणी मारल्यानें त्यापासून चित्रोत्पत्ति होत नसते. तर त्या पदार्थांस त्या योगानें थोड्या प्रमाणानें स्निग्धता येते. त्या पदार्थांस जरी संस्कार झालेले नसले तरी खिन्न न होतां सतत त्यावर पाणी घातल्यानें तें शुष्क चूर्ण चित्राकृति देण्यास पात्र असें बनतें. इंद्रियगणाचीहि अशाच प्रकारची स्थिति आहे. इंद्रियांची वृत्ति तत्काळ जरी ध्येयमय करितां आली नाहीं, तरी यत्न केल्यास ती तशी करितां येईल. असा योगाभ्यास सर्वदा करून मन, बुद्धि आणि पंचेंद्रियें ह्यांना ध्यानमार्गीं आणून ठेविलें असतां तीं आपोआपच दग्धेंधनाप्रमाणें शांत होतात. ज्यानें मनःसंयमन केलें आहे, अशा योग्याला मिळणारें सुख दुसऱ्या कोणत्याहि उपायानें अथवा दैव-बलानें प्राप्त होत नसतें. हें सुख एकदां प्राप्त झालें म्हणजे मनुष्य ध्यानकर्मांत कायमचा रत होत असतो. याप्रमाणें योगिजन द्वैतशून्य अशा मोक्षसुखाला प्राप्त होतात. १२.३.१९५.

---

## अध्याय १९६ वा.

[ १ जापकोपाख्यान. २ युधिष्ठिराला यम-ब्राह्मणसंवादेतिहासाचें भीष्माकडून कथन. ]

(१) **युधिष्ठिर**—महामते, चार आश्रम, राजधर्म आणि दुसऱ्या पुष्कळ गोष्टी तूं मला सांगितल्या. तसेंच तुझ्या मुखानें मीं धर्मासंबंधींहि अनेक कथा ऐकिल्या. हे भारता, आतां मला एक संदेह उत्पन्न झाला आहे, त्याचेंहि कथन तूंच करावें, अशी माझी इच्छा आहे. जप करणाऱ्या लोकांना कशा प्रकारचें फल मिळत असतें, त्यांना कोणत्या गतीची प्राप्ति होते आणि हे निष्पापा, जप करण्याचा विधि कोणता, हेंहि कृपा करून मला तूं निवेदन कर. त्याचप्रमाणें जप करण्याचा जो विधि असतो, त्याला वेदांतविचाराचा आधार आहे कीं योगाचा आहे ? तो कर्मकांडापैकीं आहे किंवा तो ब्रह्मयज्ञविधि आहे ? ज्याला जप म्हणतात, तें काय आहे, हें सर्व तूं मला सांग ! तूं सर्वज्ञ आहेस, असें माझें मत आहे.

( २ ) भीष्म—ह्याविषयीं पुरातन इतिहास म्हणून एक गोष्ट सांगत असतात. ती यम, काल आणि ब्राह्मण ह्यांविषयीं आहे. ती पुढें येईल. मोक्षवेत्त्या मुनींनीं वेदांत आणि योग अशीं जीं दोन शास्त्रें सांगितलीं आहेत, त्यांपैकीं वेदांतांत जप म्हणजे 'त्याग' असें सांगितलें आहे. जप हें कर्म असल्यामुळें तें मोक्षप्राप्तीचें साधन नाहीं, म्हणून वेदांताच्या मतानें त्याज्य आहे. वेदवचनें निवृत्तिप्रधान असल्यामुळें त्यांचें पर्यवसान ब्रह्माचेच ठिकाणीं आहे. असें आहे, तरी वेदांतांत जप हा चित्तशुद्धीचें साधन सांगितलें असल्यामुळें व योगाचा आधार जप हाच आहे, त्यामुळें समदर्शी मुनींनीं सांगितलेले वेदांत आणि योग हे जे दोन मार्ग त्या दोहोंनाहि जपाचा आधार आहे. ब्रह्मसाक्षात्काराला मात्र ह्या जपाची आवश्यकता नाहीं. हे राजा, वेदांतांतील निवृत्तिमार्ग आणि योगांतील प्रवृत्तिमार्ग या उभयांस जप हा कसा आधारभूत आहे, तें सांगतों, ऐक. मन, समाधि, इंद्रियजय, सत्य, अग्निपरिचर्या, शुद्धाहार, तसेंच एकांतवास, ध्यान, तप, दम, कामादिकांचा जय, शांति, अनसूया आणि मिताहार, मितभाषण आणि शम ह्या गोष्टी जपकर्मास अवश्य लागत असतात. असा हा जपयज्ञ म्हणजे प्रवृत्तिमार्गच होय. ह्याच्या योगानें स्वर्गादि लोकांचीहि प्राप्ति होत असते. आतां निवृत्तिपर जप कोणता, तें सांगतों, ऐक. जप करणाऱ्या ब्रह्मनिष्ठ पुरुषांचीं कर्मबंधनें ज्याचे योगानें नष्ट होतात, असा जो जप तो निवृत्तिपर होय. कर्मनिवृत्ति कशी करावी, त्याचा प्रकार असा आहे. ज्याला स्थूल किंवा सूक्ष्म अशा ध्येय वस्तूच्या आश्रयाची यत्किंचितहि आवश्यकता वाटत नाहीं, त्यानें निवृत्तिमार्गांत प्रवेश केल्यावर मनःसमाधि इत्यादि विधि सोडून देऊन त्यांच्या जागीं दुसऱ्यांची योजना करावी. म्हणजे प्रवृत्तिमार्गानुसार कामना मनांत धरून कांहीं न करितां निष्कामबुद्धीनें ते आचरावे.

आपण परब्रह्मच आहों, असें कल्पून स्थूल मूलांच्या व सूक्ष्म अग्रांच्या अशा कुशतुल्य नाडी आहेत, त्या आपल्या आसनांप्रमाणें, त्या आपल्या हातांप्रमाणें, त्या आपल्या मस्तकावरील शिखेप्रमाणें समजून त्याच आपल्या सभोंवतीं आणि मध्यभागीं आहेत, अशी कल्पना करावी. बाह्य विषय मनांत न आणतां आभ्यंतर विषयांचा त्याग करावा आणि मनाचा लय मनाशींच करून जीवब्रह्मांचें ऐक्य करावें. प्रणवरूपी किंवा गायत्र्यादिरूपी संहितेचा जप करीत परब्रह्मचिंतन करावें; चित्तस्थैर्य झालें असतां आणि समाधिनिष्ठता प्राप्त झाली

असतां मग त्या जपाचा त्याग करावा. अंतःकरणाची शुद्धता होऊन आणि विचारशक्तीनें जितेंद्रियता पावून, जे कोणत्याहि प्राण्यांशीं द्वेष करीत नाहींत, जे ब्रह्मप्राप्तीचीच केवळ इच्छा करितात. राग, मोह आणि सुखदुःखादि द्वंद्वें यांचा ज्यांनीं त्याग केला आहे, ज्यांना कधीं शोक होत नाहीं व जे कोणत्याहि ठिकाणीं आसक्त होत नाहींत, जे कोणतेंहि कर्म करीत नाहींत व ज्यांना कर्मफलांचा उपभोग घ्यावा लागत नाहीं, त्यांनाच परब्रह्मस्वरूपीं असल्याचें ज्ञान होतें. अहंकारयोगानें कोठेंहि मन जडवूं नये; विषयग्रहणाविषयीं कधीं उद्युक्त होऊं नये; कोणाचा अपमान करूं नये; कर्मांचा सर्वथा त्याग करूं नये; ध्यानक्रियेविषयीं सर्वदा तत्पर असावें. ध्यानाविषयीं निष्ठा ठेवून त्या ध्यानाच्याच योगानें ध्येयवस्तूचे ठिकाणीं चित्तैकाग्र्य करावें आणि मग त्या ध्येयाचाहि त्याग करावा. तीच निर्बीज अथवा असंप्रज्ञात समाधि होय.

अशा अवस्थेंत योगफलाची इच्छा न धरितां जो मनुष्य लोकांतरगतिसाधन अशा लिंगशरीराचा त्याग करितो, त्याला ब्रह्मसुखाची प्राप्ति होते. पण तेथें जाऊन ब्रह्मसुखाचा अनुभव घेण्याचीहि ज्याची इच्छा नसेल, तो देवयानमार्गावरील पुरुष संसारांतून पार निघून जातो, तो पुनः जन्म घेत नाहीं. त्याला आत्मसाक्षात्कार झाल्यामुळें तो मोक्षप्राप्तीचीच इच्छा धारण करितो आणि त्याच्या सर्व वासना आणि जरामरणादि अवस्था यांचा विनाश होऊन तो परब्रह्माचेच ठिकाणीं लीन होतो. १२.३.१९६.

---

## अध्याय १९७ वा.

[ १ जापकाला ब्रह्मलोकाशिवाय दुसरी कोणती गति मिळते ? ]

( १ ) **युधिष्ठिर**—जापकांला उत्तम गति मिळते असें तूं कथन केलेंस, परंतु त्यांस ही एकच गति मिळते, कीं दुसऱ्या एखाद्या गतीला ते जातात, तें मला सांग.

**भीष्म**—हे राजा, जापकांना दुसरी गति, अनेक प्रकारचे कष्टदायक नरकलोक, कसे प्राप्त होतात, तें आतां सांगतों, तें लक्ष्यपूर्वक ऐक. जो जापक पूर्वी सांगितल्याप्रमाणें जप न करितां एकांगी असाच जप करितो तो नरकाला जातो. जो जपकर्ता श्रद्धापूर्वक जप करीत नाहीं किंवा त्यापासून त्याला संतोष किंवा आनंदहि होत नाहीं, तो नरकाला जातो, यांत संशय नाहीं. अहंकारानें जप

करणारे सर्व मनुष्य नरकाला जातात, त्याचप्रमाणें दुसऱ्याचा अपमान करणाऱ्या पुरुषालाहि नरकप्राप्ति होत असते. जो मोहग्रस्त होऊन एकाद्या फलाच्या इच्छेनें जप करितो, त्याला इच्छित फलाचा उपभोग घेण्यास योग्य अशा देहाची प्राप्ति होते. अणिमादिक ऐश्वर्यसूचक फलें दृष्टीस पडूं लागलीं असतां जपकर्ता त्यांतच रममाण होतो. हाच त्याचा नरक होय व त्यापासून त्याची सुटका कधींहि होत नाहीं. मोहित होऊन जपकर्ता ज्या फलाच्या इच्छेनें जप करितो, त्या फलोपभोगाला योग्य अशा देहाची त्याला प्राप्ति होते. जो दुर्बुद्धि व ज्ञानशून्य मनुष्य आपल्या चंचल मनाच्या धोरणानें फलोपभोगासक्त होऊन राहतो, त्याला अस्थिर गतीची अथवा नरकाची प्राप्ति होते. ज्या जपकर्त्याला फलोपभोगाचा परिणाम वाईट आहे, हें समजत नाहीं, तो अज्ञ जपकर्ता मोहांत पडतो आणि त्या मोहामुळें नरकांत पडून त्याला शोक करावा लागतो. जो अविरक्त पुरुष दुराग्रहानें विषयांला सोडून 'मी जप करणार' म्हणून जप करीत बसतो, त्यालाहि नरकप्राप्ति होते.

युधिष्ठिर—जें वाणी आणि मन यांना अगोचर व प्रणवजपाच्या योगानें प्राप्त होणारें परब्रह्म, तद्रूप झालेल्या जापकाला पुनः शरीर धारण करावें लागतें याचें कारण काय ?

भीष्म—जप हा सर्वदा प्रशस्तच होय. तथापि कांहीं अभिलाषबुद्धीनें तो केल्यास नानाप्रकारचे नरक प्राप्त होतात असें सांगितलें आहे. ही अभिलाषबुद्धि म्हणजे रागादि दोषच होत. १२. ३. १९७.

---

## अध्याय १९८ वा.

[ १ जापकांना कोणत्या प्रकारचे नरक प्राप्त होतात, त्याचें युधिष्ठिराला कथन. ]

( १ ) युधिष्ठिर—हे राजा, जापकाला कोणत्या प्रकारची नरकप्राप्ति होते, तें मला कृपा करून सांग.

भीष्म—हे अनघा, तूं धर्माचा अंशावतार असून स्वभावतःच धर्मनिष्ठ आहेस. म्हणून धर्माला मूलभूत श्रुतीला अनुसरून मी जें सांगत आहें, तें लक्ष्यपूर्वक श्रवण कर. हीं जीं चार लोकपाल, शुक्र, बृहस्पति, मरुत् , विश्वेदेव, साध्य, अश्विनीकुमार, रुद्र, आदित्य, वसु आणि इतरहि स्वर्गवासी देवता यांचीं नानाप्रकारच्या आकारांचीं, रूपांचीं, वर्णांचीं व अनेक प्रकारचें फल देणारीं स्थानें, वाटेल तेथें

इच्छेनुरूप नेणारीं दिव्य विमानें, सभा आणि कांचनमय कमलिनी आहेत, तीं सर्व परमात्मस्वरूपस्थानापुढें नरकवत् आहेत. या परमात्मस्वरूपाला नाशभय नाहीं. कारण तें स्वभावसिद्ध आहे. त्याला अविद्यादिक जे क्लेश त्यांचा संबंध नाहीं; त्याला प्रियाप्रिय कांहीं नाहीं; सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण त्याचे ठिकाणीं नाहींत; भूतें, इंद्रियें, मन, बुद्धि, वासना, वायु, कर्म आणि अविद्या यांपासून तें मुक्त आहे; तें ज्ञेय, ज्ञान आणि ज्ञाता या सर्वांपासूनहि निर्मुक्त आहे. त्याला दृष्टि, श्रुति, मति आणि विज्ञान यांचा संपर्क नाहीं. दर्शन होण्यास कारण असे रूपादि गुणहि त्याच्या ठिकाणीं नाहींत. त्याला इष्ट विषयप्राप्तीपासून सुख नाहीं, इष्ट वस्तूच्या उपभोगानें होणारा आनंदहि त्याला नाहीं. त्याला शोक होत नाहीं किंवा थकवाहि येत नाहीं.

हे राजा, त्या परमात्म्यापासूनच कालाची उत्पत्ति होते. परंतु त्या कालाचें प्रभुत्व मात्र त्याजवर चालत नसतें. उलट त्याची मात्र कालावर सत्ता चालत असते. स्वर्गावरहि त्याचें प्रभुत्व असतेंच. अशारीतीनें परमात्मस्वरूपाशीं जो एकरूप होऊन जातो, त्याला शोक करण्याचा प्रसंगच येत नाहीं. म्हणून हें स्थान अशा प्रकारें श्रेष्ठ असून नरक हे वर सांगितल्याप्रमाणें आहेत. तुला मीं हे सर्व नरक यथार्थ कथन केले आहेत. त्या परमात्मरूपी श्रेष्ठ स्थानापुढें बाकीचीं सर्व स्थानें नरकाप्रमाणेंच आहेत. १२. ३. १९८.

---

## अध्याय १९९ वा.

[ १ युधिष्ठिराच्या सांगण्यावरून ह्या जपासंबंधीं भीष्माकडून इक्ष्वाकु, यम, ब्राह्मण, काल आणि मृत्यु यांच्या एका पुरातन कथेचें कथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—तूं मला पूर्वीं काळ, यम, मृत्यु, इक्ष्वाकु आणि ब्राह्मण यांमधील संवादाचा उल्लेख केला होतास, तेव्हां तो विवाद कृपा करून मला सांग.

**भीष्म**—ह्या जपासंबंधीं राजा इक्ष्वाकु, यम, ब्राह्मण, काळ आणि मृत्यु यांची एक प्राचीन कथा सांगत असतात. त्यांचा संवाद कोठें झाला व कशाप्रकारें झाला यासंबंधीं सर्व हकीकत तुला मी सांगतों, ऐक. वेदाचीं शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष हीं षडंगें जाणणारा, महाप्राज्ञ, महायशस्वी, धर्मशील असा कौशिककुलोत्पन्न पिप्पलादाचा एक पुत्र होता. त्याला सहा अंगांमध्यें तत्त्वदर्शनात्मक ज्ञान होऊन तो वेदांमध्यें अत्यंत निष्णात झाला होता.

त्यानें हिमालयाच्या पायथ्याशीं राहून इंद्रियनिग्रहपूर्वक अर्थज्ञानयुक्त मंत्राचा जप करून ब्राह्मणाला योग्य असें तप केलें. अशी नियमानें तपश्चर्या करीत असतां त्याचीं एक हजार वर्षें होऊन गेलीं. तेव्हां प्रत्यक्ष सावित्रीदेवीनें दर्शन देऊन 'मी तुजवर प्रसन्न झालें आहे,' असें सांगितलें. तथापि मौन धारण करून त्यानें तसाच जप चालू ठेविला व तिला कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्यामुळें त्या वेदमातेला त्याची दया आली आणि तिनें संतुष्ट होऊन त्याच्या जपाची अत्यंत प्रशंसा केली. पुढें कांहीं वेळानें जप समाप्त झाल्यावर तो धर्मात्मा उठला आणि तिच्या चरणांवर मस्तक ठेवून तिला म्हणाला, 'हे देवि, तूं प्रसन्न होऊन मला दर्शन दिलेंस, हें माझें मोठें भाग्य होय, असें मी समजतों. जर तूं मजवर प्रसन्न असशील, तर हें माझें मन ह्या जपाच्याच ठिकाणीं सदा रममाण होवो.'

**सावित्री**—हे जापकश्रेष्ठ ब्राह्मणा, तुझी काय इच्छा आहे ? तुझा कोणता हेतु मीं परिपूर्ण करावा ? तूं सांगशील, त्याप्रमाणें सर्व कांहीं घडून येईल.

ह्याप्रमाणें सावित्रीचें भाषण ऐकून तो धर्मशील ब्राह्मण म्हणाला, 'हे देवि, ही माझी जपविषयक इच्छा दिवसेंदिवस दृढ होत जाऊन माझ्या मनाची एकाग्रताहि अधिकाधिक वाढो !' त्यावर 'ठीक आहे,' असें म्हणून त्याचें प्रिय करण्याच्या हेतूनें ती त्याला पुनः बोलली, 'पूर्वीं द्विजश्रेष्ठहि जेथें गेले आहेत, त्या नरकाची तुला कधींहि प्राप्ति होणार नाहीं. तूं जन्ममरणरहित व अनिंदित अशा ब्रह्मस्थानीं जाशील. मी आतां येतें. तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व घडून येईल. तूं आत्मनिग्रहपूर्वक एकाग्रतेनें जप करीत रहा ! काल, मृत्यु, आणि यम हे तुझ्याजवळ येतील आणि धर्मासंबंधीं त्यांचा तुजशीं संवाद होईल.'

**भीष्म**—असें बोलून ती देवी आपल्या ठिकाणीं गेली आणि तो दमनशील, जितक्रोध, सत्यप्रतिज्ञ आणि निर्मत्सर ब्राह्मण शंभर दिव्य वर्षें जप करीत राहिला. त्याच्या जपकालाची समाप्ति झाली असतां धर्मानें संतुष्ट होऊन त्याला दर्शन दिलें.

**धर्म**—हे ब्राह्मणा, हा मी धर्म तुझ्याकडे आलों आहें, मजकडे पहा. या तुझ्या जपाचें जें फल तुला मिळालें आहे, तें मी सांगतों, ऐक. जे दिव्य आणि मानुष लोक आहेत, ते सर्व तूं जिंकिले आहेस. त्याचप्रमाणें, हे साधो,

देवांच्या वसतिस्थानांचे पलीकडे असणाऱ्या लोकांतहि तूं जाशील. तरी हे मुने, आतां हें शरीर ठेवून तुला इष्ट असेल, त्या ठिकाणीं जा. आपला शरीरत्याग केल्यावरच तुला ते इष्ट लोक प्राप्त होतील.

ब्राह्मण—हे धर्मा, मला ते लोक घेऊन काय करावयाचें आहे? तुला वाटेल तिकडे तूं निघून जा. हे विभो, हें शरीर पुष्कळ सुख-दुःखांना कारणीभूत होणारें असल्यामुळें त्याचा त्याग मी करूं इच्छीत नाहीं.

धर्म—मुनिश्रेष्ठा, ह्या शरीराचा त्याग तुला अवश्य करावा लागणार आहे. म्हणून हे विप्रा, तूं आतांच ह्या शरीराचा त्याग कर आणि स्वर्गलोकाला निघून जा. अनघा, तुझी जी कांहीं इच्छा असेल, ती मला सांग.

ब्राह्मण—हे प्रभो, हा देह नसेल, तर मला त्या स्वर्गवासाचीहि इच्छा नाहीं आणि म्हणूनच शरीरत्याग करून मी स्वर्गाला जाऊं इच्छित नाहीं. हे धर्मा, तूं निघून जा.

धर्म—ह्या देहावर अंतःकरण ठेवूं नकोस. शरीराचा त्याग कर आणि सुखी हो. जेथें तुला शोक करण्याचा केव्हांहि प्रसंग येणार नाहीं, अशा पवित्र लोकीं जा.

ब्राह्मण—हे महाभागा, मी जपांतच आनंद मानतों. ते सनातन लोक घेऊन मला काय करावयाचें आहे? हे विभो, स्वर्गाला जावयाचें तर मी शरीरासह जाईन, नाहींतर तो स्वर्ग मला नको.

धर्म—हे द्विजा, जर तूं शरीरत्याग करूं इच्छित नसशील, तर तुजकडे हे पहा, काल, मृत्यु आणि यम आले आहेत.

भीष्म—विभो, नंतर सूर्यपुत्र यम, काल आणि मृत्यु असे तिघे त्या महाभाग ब्राह्मणाकडे आले आणि त्याला म्हणाले—

यम—तूं केलेल्या उत्तम तपाचें, त्याचप्रमाणें तुझ्या सच्चरिताचें फल तुला उत्तम मिळालें आहे, असें मी यम तुझ्याजवळ येऊन सांगत आहें.

काल—यथाविधि जो हा जप तूं केलास, त्याचें उत्तम फळ तुला मिळालें आहे, आतां तुझी स्वर्गाला जाण्याची वेळ येऊन ठेपली आहे, असें मी काल तुला सांगत आहें.

मृत्यु—हे धर्मज्ञ विप्रा, कालाच्या प्रेरणेनें तुला येथून नेण्याकरितां मी मृत्यु शरीर धारण करून आज स्वतः आलों आहें, हें जाण.

**ब्राह्मण**—सूर्यपुत्र यम, महात्मा काल, मृत्यु आणि धर्महो, तुमचें स्वागत करितों. तुमचें कोणतें कार्य मी करूं ?

**भीष्म**—अर्घ्य, पाद्य, इत्यादि त्यांना देऊन तो आनंदित झालेला ब्राह्मण त्यांना म्हणाला, 'मी स्वशक्त्यनुसार कोणतें कार्य करावें, अशी तुमची इच्छा आहे ?' इतक्यांत तीर्थयात्रेला गेलेला इक्ष्वाकु राजा तेथें येऊन पोंचला. त्यानें त्या सर्वांचा सत्कार केला आणि प्रणामपूर्वक त्या सर्वांना कुशल प्रश्न केले. त्या ब्राह्मणानेंहि त्याला आसन दिलें आणि अर्घ्यपाद्य अर्पण करून व त्याचें कुशल विचारून त्याला म्हटलें, 'हे महाराजा, तुझें स्वागत असो, माझ्या शक्त्यनुसार मीं तुझें कोणतें कार्य करावें, अशी तुझी इच्छा आहे, तें मला सांग.'

**राजा**—मी राजा आहें आणि तूं षट्कर्मीं करीत राहणारा ब्राह्मण आहेस. त्यामुळें माझ्या मनांत तुला कांहीं द्रव्यदान करावें, अशी इच्छा आहे, तर स्वर्गरत्नादि जें कांहीं तुला पाहिजे असेल, तें सांग पाहूं !

**ब्राह्मण**—हे राजा, प्रवृत्त आणि निवृत्त असे दोन प्रकारचे ब्राह्मण आहेत आणि धर्महि तसाच दोन प्रकारचा आहे. मी कोणापासून प्रतिग्रह घेत नसतों. जे प्रवृत्तिनिष्ठ असतील, त्यांनाच हे नराधिपा, तूं दान दे. मी दान कधीं घेत नसतों. तेव्हां, हे नृपतिश्रेष्ठा, तुला काय इष्ट आहे ? तपाच्या योगानें कोणती गोष्ट साध्य करून तुला मी देऊं, तें सांग.

**राजा**—मी राजा असल्यामुळें 'दे' हा शब्द मला कधींच माहीत नाहीं. हे द्विजोत्तमा, मागावयाचें असल्यास 'युद्धदान दे' एवढेंच आम्ही मागत असतों.

**ब्राह्मण**—हे नृपा, तूं जसा स्वधर्मानें संतुष्ट आहेस, तसे आम्हीहि स्वधर्मानें संतुष्ट आहों. अर्थात् आम्हां दोघांमध्यें कांहींच अंतर नाहीं. तुला आतां जें इष्ट वाटत असेल, तें कर.

**राजा**—माझ्या शक्त्यनुसार मी देईन, असें तूं पूर्वीं बोलला होतास. तर हे ब्राह्मणा, तुझ्या जपाचें फल तूं मला द्यावें एवढी याचना मी करितों.

**ब्राह्मण**—माझी वाणी सर्वदा युद्धाचीच प्रार्थना करिते, अशी प्रौढी तूं मिरवितोस, मग मजबरोबर युद्ध करण्याची इच्छा तूं कां बरें करीत नाहींस ?

राजा—वाणी हें ब्राह्मणाचें वज्र आहे असें सांगितलें आहे. तसेंच बाहु हें क्षत्रियांचें बल आहे. तेव्हां मी जें तुझ्याकडे मागितलें, तें हें तीव्र वाग्युद्धच होय.

ब्राह्मण—अजूनहि माझी तीच प्रतिज्ञा आहे. मी माझ्या शक्त्यनुरूप तुला काय देऊं? राजेंद्रा, बोल लवकर. विलंब लावूं नकोस. माझें सामर्थ्य असल्यास मी देईन.

राजा—तुझी देण्याची इच्छा असल्यास शंभर वर्षें तप करून जें फल तूं मिळविलेंस, तें मला दे.

ब्राह्मण—माझ्या जपाचें फल तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व किंवा अर्धें तूं घे. हे राजा, तुला जर सर्व फल घेण्याची इच्छा असेल, तर तें सर्व फलहि तूं खुशाल घे.

राजा—तुझ्या जपाचें सर्व फल मला नको. तुझ्याकडे जो जप मीं मागितला, त्याचें फल कोणतें तें मला सांग, म्हणजे झालें. मग मी जातों. तुझें कल्याण होवो.

ब्राह्मण—मीं ज्या जपाचें दान तुला केलें आहे, त्याचें फल काय हें मी जाणत नाहीं. मीं दान केलें ह्याविषयीं हा धर्म, काल, यम आणि मृत्यु हे साक्षी आहेत.

राजा—ह्या धर्मफलाचें जर मला ज्ञान नाहीं आणि त्याचें फल काय, हें जर तूं सांगणार नाहींस, तर तें एखाद्या ब्राह्मणालाच दे. असलें संशयित फल मला मिळावें अशी माझी इच्छा नाहीं.

ब्राह्मण—मी आतां दुसरें कांहीं बोलत नाहीं. मी तुला जपाचें सर्व फल दिलें आहे. हे राजर्षे, आज तुझें तसें माझेंहि बोलणें खरें झालें पाहिजे. मीं जर कधीं जपाच्या फलप्राप्तीची इच्छाच केली नाहीं, तर मला त्याचें फल तरी कसें समजणार? तूं ' दे ' असें म्हटलेंस आणि मीं ' देतों ' असें म्हटलें. मी देत नाहीं असें म्हणून माझ्या वाणीला बाध आणूं इच्छीत नाहीं. तूं मात्र स्थिर हो आणि सत्याचें रक्षण कर.

मी तुला सांगत असतां तूं जर माझें वचन पाळणार नाहींस, तर तुला खोटें भाषण केल्याचा मोठा दोष लागेल. हे अरिमर्दना, असत्य वाणी तुला शोभत नाहीं. त्याप्रमाणें मीहि जें बोललों, तें खोटें करणें मलाहि योग्य नाहीं. मी तुला

'देतों' असें कांहींहि विचार न करितां बोललों, तेव्हां तूं जर सत्यनिष्ठ असशील, तर कांहींहि कांकूं न करितां मीं दिलेलें घे. हे राजा, तूं येथें येऊन माझें जपफल मागितलेंस, तें मीं तुला दिलें आहे, तर घे आणि सत्यनिष्ठ हो. असत्य भाषण करणाऱ्याला जसा इहलोक नाहीं तसा परलोकहि नाहीं. त्याला आपल्या पूर्वजांनाहि तारितां येत नाहीं. यज्ञाचें, दानाचें किंवा नियमांचें फल हीं सत्याच्या तोडीला कधींहि लागणार नाहींत. ज्यांनीं अनेक तपें केलीं आहेत व जे करणार आहेत, त्या शेंकडो किंवा लक्षावधि तपांपेक्षां सत्याची योग्यता विशेष आहे.

सत्य हें अविनाशी ब्रह्म, तसेंच अविनाशी तप आहे. सत्य हा अनश्वर यज्ञ आहे, त्याप्रमाणें सत्य हें अनश्वर असें शास्त्रज्ञान आहे. वेदाच्या ठिकाणीं सत्य हें जागृत आहे. फलप्राप्तीस सत्य हेंच कारण आहे. सत्यापासून धर्म आणि मनोनिग्रह हे होत असून सर्व सत्यावरच अवलंबून आहे. वेद, वेदांगें, विद्या, विधि, व्रताचरण आणि प्रणव हीं सर्व सत्याचीं स्वरूपें आहेत. प्राण्यांचें जनन आणि संतति हीं सत्यावरच अवलंबून आहेत. सत्याच्याच योगानें वायु वाहतो व सूर्य प्रकाशतो. अग्नि सत्याच्याच योगानें दाह करितो. स्वर्ग हा सत्याच्याच ठिकाणीं प्रतिष्ठित आहे. यज्ञ, तप, वेद, साममंत्र, मंत्र आणि सरस्वती हीं सत्यच आहेत. धर्म आणि सत्य हीं ताजव्यांत घालून पाहिलें असतां सत्याचेंच पारडें खालीं बसतें, असें आमच्या ऐकण्यांत आहे.

जेथें जेथें धर्म आहे, तेथें तेथें सत्य असतेंच. सर्वांचा सत्याच्याच योगानें अभ्युदय होतो. असें असतां हे राजा, असत्यकर्म करण्याची इच्छा तूं कां बरें करीत आहेस ? सत्याच्या ठिकाणीं स्थिर भाव ठेव. हे राजा, असत्य भाषण करूं नकोस ! त्यावेळीं 'मला दे' असें जें तूं वाक्य बोललास, तें आतां काय म्हणून मागें घेत आहेस ? हे नृपा, आतां मीं दिलेलें जपफल घेण्याची जर तुझी इच्छा नसेल, तर तूं धर्मभ्रष्ट होशील आणि सर्व पृथ्वीवर भटकत राहशील. देतों म्हणून वचन देऊन जो देत नाहीं व याचना करून नंतर जो घेत नाहीं, त्या दोघांनाहि असत्य भाषणानें पाप लागतें. यास्तव खोटें कर्म करणें तुला शोभत नाहीं.

राजा—हे ब्राह्मणा, युद्ध करणें तसेंच संरक्षण करणें हा क्षात्रधर्म असून क्षत्रिय हे दाते समजले जातात. मग मीं तुझ्याकडून दान कसें घ्यावें ?

ब्राह्मण—हे राजा, तूं दान माग म्हणून मी कांहीं तुझ्यामागें लागलों नव्हतों किंवा तुझ्या घरींहि गेलों नव्हतों. येथें येऊन आणि मजकडे याचना करून आतां घेत नाहींस हें कसें ?

धर्म—तुम्हां दोघांचा विवाद आतां राहूं द्या. मी धर्म तुमच्याकडे आलों आहें. ह्या ब्राह्मणाला असें केल्यानें दानफल दिल्याचें श्रेय मिळेल आणि ह्या राजालाहि सत्यव्रत पाळल्याचें फळ मिळेल.

स्वर्ग—हे राजेंद्रा, मी स्वर्ग असून तुम्हांकडे रूप धारण करून आलों आहें. हा वाद आतां राहूं द्या, कारण तुम्हां उभयतांला मिळणारें फळ सारखेंच आहे.

राजा—मला स्वर्गाशीं कांहीं करावयाचें नाहीं. स्वर्गा, तूं आल्या मार्गानें परत निघून जा. ह्या ब्राह्मणाची जर स्वर्गाला जाण्याची इच्छा असेल, तर माझ्या धर्माचें फल तो घेवो.

ब्राह्मण—लहानपणीं अज्ञान असतां मीं जर कोणापुढें हात पसरिला असेल, तर असो. सांप्रत मी संहिताजप करीत असून निवृत्तिधर्माचें आचरण करीत असतों. राजा, निवृत्तिमार्गाला लागलेल्या मला विनाकारण कां म्हणून भुरळ घालीत आहेस ? माझें कार्य साधून घेण्याला मी समर्थ आहें. हे नृपा, तुजपासून यत्किंचितहि फलाची इच्छा मी करीत नाहीं. तप आणि स्वाध्याय हींच माझीं नित्याचीं कर्में असून प्रतिग्रहापासून मी मुक्त आहें.

राजा—हे ब्राह्मणा, जर तूं आपल्या जपाचें उत्तम फल मला अर्पण केलें असेल, तर आम्हां उभयतांना जें कांहीं मिळवायाचें असेल, तें सर्व एकत्र करून त्याची वांटणी समान करून घेऊं या. ब्राह्मणांनीं प्रतिग्रह घ्यावा व राजांनीं दान करावें, हा धर्म तुला ठाऊक आहे, तर आपण समसमान फल घेऊं. आतां माझ्याहि धर्माचें फळ आपणालाच मिळावें, अशी तुझी इच्छा असल्यास मीं आचरिलेल्या सर्व धर्मांचें फळ तूंच घे.

भीष्म—राजा, इतकें होत आहे तों अंगावर भिकार कपडे घालून व एकमेकांच्या खांद्यावर हात टाकून दोन पुरुष तेथें आले. ते परस्परांशीं बोलत होते. त्यांपैकीं एक दुसऱ्याला म्हणाला, ‘तूं माझें कांहीं लागत नाहींस.’ त्यावर दुसऱ्यानें म्हटलें, ‘मी तुझें देणें लागतों. हा वादाचा विषय आहे, तरी अनुशास्ता राजा हा येथेंच आहे, त्याकडे आपण जाऊं.’ त्यावर पहिला पुरुष

पुनः म्हणाला, 'तूं माझें कांहींहि देणें लागत नाहींस, ही सत्य गोष्ट मी सांगतों.' पुनः दुसरा म्हणाला, 'तूं खोटें बोलत आहेस, मी तुझें देणें लागत आहें.' असा वाद करतां करतां ते दोघेहि अत्यंत संतप्त झाले आणि राजाकडे जाऊन म्हणाले, 'राजा, या कामांत आम्हां दोघांनाहि विघ्न होणार नाहीं, असा कांहीं उपाय शोधून काढ!'

विरूप—हे महीपते, मी या विकृताचें एका गोप्रदानाचें फल देणें लागतों. मी तें देत असतां हा घेत नाहीं.

विकृत—हे नराधिपा, हा विरूप माझें कांहींहि देणें लागत नाहीं. हा सत्यासारखें, परंतु खोटें बोलत आहे.

राजा—विरूपा, तूं ह्याचें काय देणें लागत आहेस, तें मला सांग. तुझें भाषण ऐकल्यावर मग काय तो न्याय द्यावा, असें मला वाटतें.

विरूप—राजा, मी सांगतों, तें लक्ष्यपूर्वक ऐक. मग मी ह्या विकृताचें देणें कसें लागतों, तें तुझ्या लक्ष्यांत येईल.

ह्या विकृतानें धर्मप्राप्तीकरितां एका तपोनिष्ठ व अध्ययनरत अशा ब्राह्मणाला एक उत्तम गाय पूर्वी दिली होती. त्याचें फल मी याच्याकडे जाऊन मागितलें असतां तें त्यानें शुद्धांतःकरणानें मला दिलें. नंतर मीं आत्मशुद्ध्यर्थ कांहीं सत्कर्म केलें आणि पुष्कळ दुग्ध देणाऱ्या अशा दोन सवत्स गाई विकत घेतल्या आणि त्या श्रद्धापूर्वक एका उंछवृत्ति ( धान्य वेंचून त्यांवर निर्वाह करणाऱ्या ) ब्राह्मणास यथाविधि अर्पण केल्या. याकडून मीं जें कांहीं घेतलें, त्याच्या दुप्पट फल आज मी याला देत आहें. पण हा तें घेत नाहीं, तेव्हां या कामीं खरा कोण व दोषी कोण याचा निर्णय हे पुरुषव्याघ्रा, तूंच लाव. याप्रमाणें आमचा वाद आहे आणि म्हणून हे नृपा, आम्ही तुजजवळ आलों आहों. आतां तूं धर्मानें न्याय कर किंवा अधर्मानें कर; आम्हांला योग्य मार्गाला लाव म्हणजे झालें. यानें जसें मला दान केलें, तसें जर तो मजकडून घेऊं इच्छित नसेल तर तूं मध्यस्थ होऊन आम्हांला योग्य मार्ग कोणता, तें दाखीव.

राजा—विकृता, तुझें ऋण हा तुला देत असतां तूं आज घेत नाहींस, याचें कारण काय? तूं जसें दिलेंस, तसेंच घे. उगीच विलंब लावूं नकोस.

विकृत—ह्याचें देणें मी लागतों असें हा म्हणतो व मी तें देऊन टाकिलें असें म्हणतों. तेव्हां आतां ह्यानें माझें कांहीं देणें नाहीं. याला वाटेल तिकडे हा जाऊं दे.

राजा—विकृता, हा देत असतां तूं घेत नाहींस, हें मला चमत्कारिक वाटतें. तूंच दंडाला निःसंशय पात्र आहेस, असें मला वाटतें.

विकृत—हे राजर्षे, मीं जें याला दिलें, तें पुनः कसें घ्यावें? खरोखर हा माझाच अपराध आहे, असें तुला वाटत असेल, तर हे प्रभो, तूं मला शिक्षा कर.

विरूप—मी जें कांहीं तुला देत आहें, तें जर तूं घेणार नसशील, तर हा धर्मशास्ता नृपति तुला दंड करील.

विकृत—माझ्याकडे मागितल्यावरूनच मीं माझी वस्तु तुला दिली. आतां ती मी परत कशी घेऊं? तूं आतां जा, माझी तुला अनुज्ञा आहे.

ब्राह्मण—राजा, या दोघांचें भाषण तूं ऐकलें आहेस, तेव्हां तुला जें देण्याचा मीं विचार केला आहे, तें तूं निःशंकपणें घे.

राजा—ह्या उभयतांचें कार्य मोठ्या विचाराचें आहे. हा जपकर्ता ब्राह्मणहि मोठा दृढनिश्चयी दिसतो. तेव्हां आतां येथें काय करावें? या ब्राह्मणानें दिलेलें दान जर मीं घेतलें नाहीं, तर मला महत्पाप कसें लागणार नाहीं? असा विचार करून तो राजा विकृत व विरूप यांना म्हणाला, 'न्याय करतांना माझ्या हातून राजधर्माला डाग लागूं नये; तेव्हां तुमचें काम झाल्यावर तुम्ही जा. राजांनीं आपल्या धर्माचें पालन केलें पाहिजे. माझा विचार नष्ट झाल्यामुळें हा गहन विप्रधर्म माझ्या मागें लागला आहे. तुम्ही कांहीं वेळ थांबा, म्हणजे तुमचाहि न्याय होईल.'

ब्राह्मण—हे राजा, तूं माझ्याकडे ज्याची याचना केलीस, तें मीं तुला देण्याची प्रतिज्ञा केली आहे. तूं जर तें घेतलें नाहींस, तर मी तुला निःसंशय शाप देईन.

राजा—धिक्कार असो ह्या माझ्या राजधर्माला, कीं ज्यांत राजानें प्रतिग्रह घेऊं नये, असा नियम आहे. तथापि आम्हां दोघांचें फल सारखें व्हावें, एवढ्यासाठीं तुझें दान मला घेतलें पाहिजे. जो हात आजपर्यंत दान देण्याकरितां मी पुढें करीत होतों, तोच हात आज दान घेण्याकरितां तुझ्यापुढें पसरला आहे. हे विप्रा, आतां माझें जें कांहीं तूं लागतोस, तें देऊन टाक.

ब्राह्मण—संहिताजप केल्यामुळें जो कांहीं पुण्यसंग्रह मीं केला असेल आणि त्याजवर माझें सत्त्व असेल, तें सर्व तूं घे.

**राजा**—हे द्विजोत्तमा, हें दानाचें जल माझ्या हातावर पडलें. आतां आम्हां दोघांचेंहि फल सारखें व्हावें, म्हणून तूं माझ्या पुण्याचरणाच्या फलाचाहि प्रतिग्रह कर.

**विरूप**—राजा, आम्ही कामक्रोध आहों. आम्हींच तुझ्याकडून असें करविलें आहे. सारखें फल मिळावें म्हणून तूं म्हणालास, तरी तुला आणि या ब्राह्मणाला सारखेच लोक प्राप्त होतील. हा विकृत माझें कांहीं लागत नाहीं. तुझ्या परीक्षेकरितांच आम्हीं ही न्यायाची खटपट केली होती. काल, धर्म, मृत्यु, कामक्रोध व तुम्ही दोघे यांसमक्ष ह्या विषयाची चर्चा झाली आहे. आतां तुला ज्या लोकांची इच्छा आहे, तेथें तूं गमन कर. ते लोक तूं आपल्याच पुण्यानें संपादन केले आहेस.

**भीष्म**—जापकांस होणारी फलप्राप्ति मीं तुला सांगितली. त्याचप्रमाणें मुक्ति, ब्रह्मलोक आणि सूर्यादि लोक हे जापकाला कसे प्राप्त होतात, तेंहि सांगितलें. संहिताजप करणाऱ्याला परमेष्ठिपदाची प्राप्ति होते किंवा तो अग्निसंनिध जातो अथवा सूर्यामध्यें प्रविष्ट होतो. तो जर तैजसभावानें तेथेंच रममाण झाला, तर रागमोहित होऊन त्यांच्याच गुणांचें आचरण करूं लागतो. अशा प्रकारें तो सोम, भूमि, वायु आणि आकाश यांच्या स्वरूपामध्यें प्रवेश करितो आणि मोठ्या प्रेमानें तेथें रममाण होतो. पुढें तेथेंहि त्याची वृत्ति संशयित होऊन अविनाशी अशा परमेष्ठिस्वरूपांत प्रविष्ट होण्याची इच्छा करितो व त्याप्रमाणें त्या स्वरूपांत पुनः लीन होतो. नंतर तो निष्काम व निरहंकार पुरुष परमेष्ठीच्या स्वरूपांतून निघून परब्रह्मरूपीं प्रविष्ट होतो. तेथें सुखदुःखातीत होऊन शांति, सुख व निरामय स्थिति त्याला प्राप्त होते. तेथें प्रवेश झाला असतां ज्याला अक्षर ( अविनाशी ) अशी संज्ञा आहे, ज्याला दुःख व वार्धक्य हीं नाहींत, अशा अद्वितीय ब्रह्माची त्याला प्राप्ति होते. ब्रह्मपदीं लीन होऊन राहण्याची त्याची इच्छा नसल्यास तो त्या पुरुषाचें अतिक्रमण करून जेथें प्रत्यक्ष, आगम, अनुमान आणि चित्त ह्यांचा प्रवेश होत नाहीं, प्राणादिक षोडश पदार्थांचा जेथें संबंध पोंचत नाहीं, अशा अदुःख, अजर, शांत, चिन्मय परब्रह्मस्थानाची त्याला प्राप्ति होते. तेथेंहि त्याचें मन रममाण होत नसल्यास, त्याच्या मनाला ज्याची इच्छा होईल, त्याची प्राप्ति होते. पुढें त्याला सर्व लोक नरकासमान दिसूं लागून तेथून

त्याची इच्छा निवृत्त झाली तर तो निर्गुण परब्रह्माचेच ठिकाणीं सुखानें रममाण होतो. हे महाराजा, जापकाला गति कशी मिळते, हें सर्व मी तुला सांगितलें. आतां यापुढें काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे ? १२. ३. १९९.

---

## अध्याय २०० वा

[ १ जपकर्त्यास मिळणाऱ्या फलांचें कथन. ]

(१) युधिष्ठिर—असें त्याचें भाषण झाल्यावर त्यावर त्या ब्राह्मणानें अथवा राजानें काय उत्तर दिलें, तें हे पितामहा, तूं मला सांग. तूं सांगितलेंस त्या ठिकाणीं त्यांनीं गमन केलें किंवा त्यांचा संवाद काय झाला अथवा त्यांनीं पुढें काय केलें, तें सर्व मला सांग.

भीष्म—' ठीक आहे, ' असें म्हणून त्या ब्राह्मणानें धर्म, यम, काल, मृत्यु आणि स्वर्ग यांची पूजा केली. नंतर, तेथें आलेल्या ब्राह्मणांना नमस्कार करून तो ब्राह्मण त्या राजास म्हणाला, ' हे राजर्षे, तुला फलाची प्राप्ति झाली आहे, तुलाच आतां मुख्य गतीची प्राप्ति होवो. तुझ्या अनुज्ञेनें मी पुनः जप करूं लागतों. हे महाबलिष्ठ राजा, मला देवीनें वर दिलाच आहे कीं, ' तूं जप करूं लागलास म्हणजे तुझीहि त्या जपावर भक्ति जडेल. '

राजा—तूं आपलें जपफल मला दिल्यानें जरी तुझी जपसिद्धि विफल झाली आहे आणि पुनः जप करण्याविषयीं जरी तुला मोठी इच्छा उत्पन्न झाली आहे, तरी हे विप्रा, जपाचें दान करून मिळालेल्या पुण्याचें फल घेऊन तूं मजबरोबर चल.

ब्राह्मण—तुला जपदान करण्यासंबंधीं मीं सर्वांसमक्ष बराच प्रयत्न केला. त्यामुळें तुला व मला आतां सारख्याच पुण्याची प्राप्ति झाली आहे. तरी आपल्याला जी गति मिळाली असेल, तिकडे आपण दोघेहि जाऊं या.

त्या दोघांचा असा निश्चय जाणून लोकपाल व देवता यांसह इंद्र तेथें आला. साध्य, विश्वेदेव, मरुत्, मोठमोठीं वाद्यें, नद्या, पर्वत, समुद्र, विविध तीर्थें, तपें, वेदांत, इत्यादिकांच्या अधिष्ठात्री देवता, सरस्वती, नारद, पर्वत, विश्वावसु मुनि, चित्रसेनादि गंधर्व, तसेंच देवाधिदेव प्रजापति, सहस्रशीर्ष विष्णु वगैरे सर्व तेथें आले. आकाशांतून नौबती, नगारे वाजण्यास सुरवात झाली. दिव्य पुष्पांचा त्या महात्म्यांवर वर्षाव होऊं लागला आणि सर्वत्र अप्सरांचें

नृत्य सुरू झालें. इतक्यांत पूर्वीचे स्वरूपांत स्वर्ग येऊन त्या ब्राह्मणाला आणि त्या राजाला बोलला, 'हे महाभागा ब्राह्मणा, तूं चांगली सिद्धि मिळविली आहेस आणि हे नृपा, तुलाहि उत्तम प्रकारची सिद्धि प्राप्त झाली आहे.' नंतर त्या उभयतांनीं आपलीं इंद्रियें विषयांपासून काढून घेतलीं आणि प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान हे पांचहि वायु निरुद्ध केले. त्यांनीं प्राण व अपान या दोन वायूंच्या ठिकाणीं मनाला ठेवून पद्मासन घातलें आणि भ्रुकुटीच्या खालील नासिकाग्राचें ते अवलोकन करीत राहिले. अशा रीतीनें अगदीं हालचाल न करितां त्यांनीं दृष्टि स्थिर केली आणि अंतःकरण आणि प्राणापान या दोहोंना भ्रुकुटीच्या मध्यभागीं ठेवून आत्मा ब्रह्मरंध्रीं नेला. असें झाल्यावर त्या ब्राह्मणाचा तालुप्रदेश फोडून एक मोठी ज्योत बाहेर पडून स्वर्गास गेली.

त्या ज्योतीच्या ज्वालेच्या योगानें दिशांच्या ठिकाणीं मोठा हाहाकार झाला. त्या ज्योतीची स्वर्गांत स्तुति होत असतां तें तेज ब्रह्मदेवाच्या ठिकाणीं प्रविष्ट झालें. हे राजा, ब्रह्मदेवानें त्यावेळीं त्या प्रादेशमात्र पुरुषरूपी तेजाचे पुढें होऊन व 'स्वागतम्' म्हणून मनःपूर्वक आतिथ्य केलें आणि मधुर वाणीनें तो बोलला, 'जपकर्त्यांना आणि योग्यांना मिळणारें फल सारखेंच आहे, यांत संशय नाहीं. योग्याला मिळणाऱ्या फळाचा अनुभव येथील देवतांना आहेच. जपकर्त्याला ब्रह्म सामोरें जाऊन त्याचें आतिथ्य करितें हा विशेष आहे.' असें म्हणून ब्रह्मदेवानें त्याला 'तूं मजमध्यें निरंतर रहा,' असें सांगितलें व त्याला ब्रह्मात्म्यैक्याचा उपदेश केला. नंतर तो ब्राह्मण ब्रह्मदेवाच्या मुखांत निर्भयपणें शिरला. तो राजाहि त्या ब्राह्मणाच्या मुखप्रदेशीं प्रविष्ट झाला. त्यावेळीं स्वयंभू ब्रह्मदेवाला नमस्कार करून देव म्हणाले, 'जापकांचा विशेष म्हणजे प्रत्युत्थान करणें हाच होय. जपकर्त्यांच्या आदराकरितांच हा सर्व प्रयत्न चालला आहे व आम्हीहि त्याच-करितां येथें जमलों आहों. या दोघांची योग्यता सारखीच असून तूंहि त्यांचा सारखा मान केला आहेस. आज योगी आणि जपकर्ता यांचें मोठें फल आम्हांला पहावयाला सांपडलें. आतां हे दोघेहि सर्व लोकांस मागें टाकून वाटेल तिकडे जावोत.'

**ब्रह्मदेव**—जो कोणी वेदाचें किंवा त्याच्या मागून झालेल्या स्मृतींचें अध्ययन करील, त्याला अशाच प्रकारें माझ्या लोकांची प्राप्ति होईल. ज्याची

योगामध्यें भक्ति असेल, त्याला देखील देहत्यागानंतर माझे लोक मिळतील, यांत संशय नाहीं. मी आतां जातों आणि तुम्हीहि सिद्धिप्राप्त्यर्थ आपापल्या ठिकाणीं जा.

भीष्म—असें बोलून ब्रह्मदेव तेथेंच अंतर्धान पावला. देवांनींहि त्याचा निरोप घेऊन आपापल्या ठिकाणीं गमन केलें. ते सर्व काल, मृत्यु वगैरे महात्मेहि धर्माचा सत्कार करून आनंदभरानें त्याच्या मागून चालूं लागले. अशा प्रकारें मीं तुला जापकाला मिळणारें फळ व गति हीं कथन केलीं. यापुढें आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे? १२. ३. २००.

---

## अध्याय २०१ वा.

[ १ ज्ञानयोगाचें फल सांगतांना भीष्माकडून मनु-बृहस्पतिसंवादकथन. २ परब्रह्मस्वरूपवर्णन. ]

( १ ) युधिष्ठिर—हे पितामहा, ज्ञानयोग, वेद आणि नियम यांचें फल काय, त्याचप्रमाणें भूतात्म्याला कशाप्रकारें जाणावें, हें तूं मला निवेदन कर.

भीष्म—ह्यासंबंधीं प्रजापति मनु आणि महर्षि बृहस्पति यांमधील संवाद प्राचीन इतिहास म्हणून सांगत असतात. तो असाः—देवर्षिसमूहामध्यें प्रमुख असा महर्षि ब्रह्मदेव शिष्य होऊन प्रजाधिपति मनूकडे गेला आणि प्रणाम करून त्याला म्हणाला, हे भगवन्, ह्या जगाचें कारण काय? कर्मकांडाची उत्पत्ति कोठून झाली, ज्ञानाचें फल काय, मंत्रशब्दांनीं ज्याचें ज्ञान होत नाहीं, असें काय आहे? तें मला सर्व सांग. त्याचप्रमाणें अर्थशास्त्र, आगम आणि मंत्र यांचें ज्ञान असणारे लोक यांनीं अनेक यज्ञ किंवा गोप्रदानें देऊन कोणतें फल मिळत असतें? मोठे लोक कोणत्या फलाची इच्छा करीत असतात व तें कोठें मिळत असतें? पृथ्वी, तीवर उत्पन्न झालेले सर्व पदार्थ, पवन, आकाश, जलचर प्राणी, जल, स्वर्ग, सर्व देव यांची उत्पत्ति ज्यापासून झाली, तें पुराणब्रह्म कसें आहे, तें मला निवेदन कर. ज्या विषयाचें ज्ञान लोकांना हवें, तें प्राप्त झालें असतां अर्थातच त्या विषयाकडे त्यांची प्रवृत्ति होते. मला पुरातन ब्रह्माचें ज्ञान नाहीं, मग त्या विषयाकडे माझी प्रवृत्ति कशी व्हावी? ऋक्, साम, यजुर्वेद, छंदें, नक्षत्रगति, निरुक्त, व्याकरण, कल्प आणि शिक्षा यांचें अध्ययन मीं केलें आहे. तरी भूतमात्राचा आधार जो आत्मा त्याचें ज्ञान मात्र मला नाहीं. म्हणून तूं

मला सामान्य व विशेष प्रकारानें त्यासंबंधीं माहिती सांग. ज्ञानाचें व कर्माचें फल काय, मनुष्याचा जीव एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत कसा जातो, तें सर्व मला सांग.

**मनु**—मनुष्याला जें जें आवडतें तें तें त्याला सुखासारखें वाटत असून, जें जें अनिष्ट असतें तें तें त्याला दुःख वाटत असतें. चांगलें तेवढें मात्र मला मिळावें, वाइटाची जरूरी नाहीं, ह्या बुद्धीमुळें कर्मकांडाची प्रवृत्ति झाली आणि इष्टानिष्टसंबंध नसावा, ह्या बुद्धीमुळें ज्ञानमार्गाची प्रवृत्ति झाली आहे. वेदामध्यें जो कर्मयोग सांगितला आहे, तो वासनेला धरूनच होय. वासनेपासून निर्मुक्त झालें असतां ब्रह्मप्राप्ति होत असते. सुखाची इच्छा करून नानाप्रकारचीं कर्मे करणाऱ्या मनुष्याला नरकतुल्य लोकांची प्राप्ति होते.

**बृहस्पति**—इष्ट तें सुख व अनिष्ट तें दुःख, ह्यांपैकीं इष्टाची प्राप्ति होऊन अनिष्टाची होऊं नये, ह्या दृष्टीनेंच मनुष्य सर्वदा व्यवहार करीत असतो.

**मनु**—वासनेचा त्याग करून कर्माचरण केल्यानें त्या योगानें ज्ञानेच्छा उत्पन्न होते, त्यामुळें ब्रह्मप्राप्ति होते. ह्यासाठींच कर्मविधि आहे. अशाप्रकारच्या कर्माच्या योगानें मनुष्य बंधन पावत नाहीं. परंतु जे वासनायुक्त असतात, त्यांनाच कर्मयोग घेरून सोडतो. म्हणून वासनात्यागानें ब्रह्मज्ञानास कारणीभूत होणाऱ्या निष्काम कर्मांचेंच आचरण मनुष्यानें केलें पाहिजे. निष्काम होऊन कर्माचें आचरण केलें असतां रागादि दोष जाऊन धर्मप्रवृत्त असलेलें अंतःकरण आरशाप्रमाणें स्वच्छ होतें आणि सत् कोणतें व असत् कोणतें हें त्याला समजतें, म्हणजे त्याला मोक्षाची इच्छा होते. मग त्याला वासनाशून्य परब्रह्माचें ज्ञान होतें. मन आणि कर्म या दोहोंमुळेंच सर्व प्राणिमात्र झाले आहेत आणि लोकांनीं स्वीकारिलेले हे दोनच मार्ग परब्रह्मप्राप्तीस कारणीभूत होणारे आहेत. कार्य दोन प्रकारचें आहे. एक शाश्वत फळ देणारें व दुसरें क्षुद्र फल देणारें. अंतःकरणानें कर्मांचा त्याग करणें हेंच शाश्वत फलप्राप्तीचें कारण होय. सर्वथा कर्मत्याग करणें हें कांहीं त्या फलप्राप्तीचें साधन नाहीं. रात्र संपून उजेडल्यावर ज्याप्रमाणें डोळा मनुष्याला मार्गदर्शक होतो, त्याप्रमाणें बुद्धीला ज्ञान झालें असतां अशुभ कर्म कोणतें हें त्याला समजून तें त्याज्य वाटतें. सर्प, कुशाग्रें, विहिरी इत्यादिकांचें ज्ञान झालें असतां मनुष्य त्यांच्या वाटेला जात नाहीं, परंतु अज्ञानी लोक असतात, ते मात्र त्यांवर जाऊन पडतात. यावरून ज्ञानाचे फलाची विशिष्टता समजून येण्यासारखी आहे.

विधिपूर्वक योजलेले मंत्रप्रयोग, यज्ञ, दक्षिणा, अन्नदान व मनाची समाधि अशीं पांच प्रकारचीं कर्मे फलदायक होत, असें सांगितलें आहे. हीं कर्मे सत्त्व, रज, तम या गुणांनीं होत असतात. ज्याअर्थी हीं कर्मे मंत्रांनीं होत असतात, त्याअर्थी त्या मंत्रांमध्येंहि हे त्रिगुण आहेत. ज्या विधीनें हीं कर्मे केलीं जातात, त्यांमध्येंहि हे त्रिगुण आहेत. कर्मफळें त्रिगुणात्मक असून कर्मांचा भोक्ता जो जीव तोहि त्रिगुणात्मकच आहे. कर्मप्राप्य स्वर्ग मिळाला असतां तेथें उत्तम शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध ह्यांची फलरूपानें त्याला प्राप्ति होते. परंतु ज्ञानाचें फल मात्र मनुष्याला या लोकींच मरणापूर्वी मिळत असतें. मनुष्य जें जें कर्म शरीरानें करीत असतो, त्या त्या कर्मांचें फल त्याला त्या प्रकारच्या शरीरामध्येंच मिळत असतें. शरीर हें सुखाचें तसेंच दुःखाचेंहि स्थान आहे. जें जें कर्म मनुष्य वाचेनें करीत असतो, त्याचें त्याचें फल त्याला वाचेनें मिळतें. त्यानें मनानें केलेल्या कर्मांचें फल त्याला मनानें भोगावें लागतें. फलप्राप्तीकरितां मनुष्य ज्या गुणांनीं विशिष्ट अशा कर्मांचें आचरण करील, त्या गुणानुरूप त्याला चांगलें अथवा वाईट फळ मिळेल. प्रवाहांत पडलेला मत्स्य इच्छा नसतांहि ज्याप्रमाणें प्रवाहवेगाबरोबर वाहत जातो, त्याप्रमाणेंच पूर्वकर्मानुसार संसारी मनुष्य इष्ट नसेल अशा मार्गाला लागतो. अशा रीतीनें चांगल्या कर्मानें तो सुख व वाईट कर्मानें दुःख भोगितो. आतां ज्यापासून ह्या सर्व जगताची उत्पत्ति झाली, ज्याला जाणून ज्ञानी लोक ह्या संसारांतून तरून जातात, ज्याचें स्वरूप वेदमंत्रांना सुद्धां जाणणें शक्य नाहीं, त्या श्रेष्ठ परब्रह्माचें स्वरूप मी तुला सांगतों, ऐक.

( २ ) त्याला विविध प्रकारचे रस, गंध, शब्द, स्पर्श आणि रूप यांचा किमपिहि संपर्क नसून तें अव्यक्त आहे. लोकोपयोगार्थच त्यानें हे पंच प्रकार निर्माण केले आहेत. तें स्त्री, पुरुष किंवा नपुंसकहि नाहीं. तें सत् ( आहे असें ) नाहीं किंवा असत् ( नाहीं असेंहि ) नाहीं. तें सदसत्‌हि नाहीं. ब्रह्मवेत्त्या पुरुषांनाच त्याचा साक्षात्कार होतो. तें केव्हांहि नाश पावणारें नसल्यामुळें त्याला अक्षर म्हणतात. १२. १. २०१.

## अध्याय २०२ रा.

[ १ आत्मतत्त्वकथन. ]

( १ ) मनु—अक्षर अशा पुरुषापासून प्रथमतः आकाश उत्पन्न झालें, आकाशापासून वायूची उत्पत्ति झाली, वायूपासून ज्योति निर्माण झाली, तीपासून जलाची उत्पत्ति झाली, जलापासून पृथ्वीचा उद्भव झाला आणि नंतर पृथ्वीवर सर्व प्राणिमात्र उत्पन्न झाले. हे प्राणिमात्र संहारकालीं प्रथम जलामध्यें शिरून, नंतर ज्योतीमध्यें, पुढें वायूमध्यें आणि नंतर आकाशामध्यें प्रविष्ट होतात. जे मोक्षनिष्ठ असतात, ते आकाशांतून फिरून येथें न येतां ब्रह्माशीं मिळून जातात. जे मोक्षनिष्ठ नसतात, त्यांना कर्मानुसार पुनः जन्म घ्यावा लागतो. मोक्षनिष्ठ पुरुष ब्रह्म पावतात. तें ब्रह्म उष्ण नाहीं, शीत नाहीं, मृदु नाहीं अथवा तीक्ष्णहि नाहीं; तें आंबट नाहीं, कषाय नाहीं, मधुर नाहीं किंवा थंडहि नाहीं; त्याला शब्द नाहीं, रूप नाहीं, गंध नाहीं, किंवा स्वभावहि नाहीं. त्वचेला स्पर्श समजतो, जिव्हेला रस कळतो, घ्राणाला गंधाचें ज्ञान होतें, तसेंच श्रवणेंद्रियाला शब्दाचें आणि नेत्राला रूपाचें ज्ञान होतें. परंतु इतक्याहि पलीकडे जें आहे, तें परमात्मस्वरूप अध्यात्मज्ञानावांचून कोणालाहि कळणें शक्य नाहीं. हें स्वरूप जिव्हेला रसापासून, नाकाला गंधापासून, कर्णाला शब्दापासून, त्वचेला स्पर्शापासून व नेत्राला रूपापासून परतविल्यानेंच दिसूं लागतें. कर्ता, कर्म, करण, देश, काल, सुखदुःख, कर्मप्रवृत्ति इत्यादि समुदायाचें हेंच स्वरूप कारण आहे, असें मुनींनीं सांगितलें आहे. जो व्यापक ( ईश्वर ) असून व्याप्य ( जीव ) हि आहे, जो सर्वांचें कारण आहे, जो अद्वितीय आहे, तोच सर्वांना कारणीभूत असें परब्रह्म आहे. त्याहून भिन्न तें कार्यरूपी समजावें.

ज्याप्रमाणें मनुष्याच्या सर्व कर्मांमध्यें शुभाशुभ अशीं दोन प्रकारचीं फलें त्याला प्राप्त होतात, त्याचप्रमाणें या शरीरामध्यें जड शरीर व जडाहून भिन्न अशा दोहोंचा–जडाजडांचा–संबंध आहे. ज्याप्रमाणें पुढील प्रदीप्त दीप सर्व बाजूंस असलेल्या दुसऱ्या पदार्थांवर प्रकाश पाडतो, स्वतःच्या अगर अगदीं सन्निध असलेल्या पदार्थांवर उजेड पाडीत नाहीं, त्याप्रमाणें आपल्या शरीरामध्यें ज्ञानरूप तेजानें प्रदीप्त असलेले पंचेंद्रियरूपी दीपवृक्ष बाह्य वस्तूंस प्रकाशित करितात. ज्याप्रमाणें राजानें नेमलेले अमात्य निरनिराळीं प्रमाणें सांगत

असतात, त्याप्रमाणें शरीरामध्यें ज्ञानाच्या हाताखालीं पांच इंद्रियें आहेत. तीं वेगवेगळया वस्तूंचें ज्ञान करून देत असतात. ज्याप्रमाणें अग्नीच्या ज्वाला, पवनाचा वेग, सूर्याचीं किरणें आणि पाण्याचा प्रवाह हीं जात येत असतात, त्याचप्रमाणें शरीराचा नाश होऊन पुनः त्याची प्राप्ति होते. एखाद्या मनुष्यानें कुऱ्हाड घेऊन काष्ठाचा छेद केला, तरी त्याला त्यांतील धूम किंवा अग्नि दिसत नाहीं, त्याप्रमाणें शरीर, उदर, पाणि आणि पाद कापिले असतां त्यांतील आत्मा दिसत नाहीं. तीं लांकडें परस्परांवर घांसल्यानें धूम व अग्नि हीं दिसतात, त्याप्रमाणें ज्ञानानें इंद्रियें व जीव यांचे ऐक्यानें मनुष्याला आत्म्याचें ज्ञान होत असतें.

ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें आपलें अंग भिन्न होऊन भूमीवर पडलेलें मनुष्य पाहतो व पुनः स्वप्नानंतर त्या शरीराचा स्वीकार करितो, त्याचप्रमाणें श्रोत्रादिक दश इंद्रियें, पंचप्राण, मन आणि बुद्धि मिळून सतरा पदार्थांनीं युक्त जीव मरणोत्तर आपलें शरीर मजहून भिन्न आहे असें पाहत दुसऱ्या शरीरांत शिरतो. आत्म्याला उत्पत्ति, वाढ, नाश आणि मरण हीं नाहींत, तरी हा अज्ञानानें एका शरीराचा त्याग करून आपण केलेलें कर्म बरोबर घेऊन दुसऱ्या शरीरांत शिरतो. हा आत्मा कोणालाहि दिसत नाहीं किंवा त्याला कोणी स्पर्शहि करूं शकत नाहीं. हा इंद्रियांच्या योगानें कांहींहि कार्य साधीत नाहीं. तीं याला पाहत नाहींत. हा मात्र त्यांना पाहतो. ज्याप्रमाणें प्रदीप्त अग्नीच्या सन्निध ठेवलेला लोहगोल, अग्नीच्या उष्णतेनें लालभडक रंगाचा होतो, त्याप्रमाणें हा ज्या शरीरांत प्रविष्ट होतो, त्याचा रंग घेतो. आत्मा शरीरांत गेल्यामुळें चैतन्य उद्भवतें. तसाच हा आपला पंचभूतात्मक देह सोडून दुसऱ्या शरीरांत शिरतांना त्याचा देह पंचमहाभूतांमध्यें लीन होतो. याच्या सभोंवार असणारीं आकाश, वायु, अग्नि, जल आणि पृथ्वी यांमध्यें हा असा प्रवेश करितो कीं त्याच्या सूक्ष्म शरीरांतील तत्त्वें त्या त्या तत्त्वाशीं मिळून जातात व कर्मनिष्ठ श्रोत्रादिक पांच इंद्रियें आपापल्या शब्दादि गुणांचा आश्रय करून राहतात. श्रवणेंद्रिय हें आकाशगुण शब्दाचा आश्रय करितें, घ्राणेंद्रियाची उत्पत्ति पृथ्वीपासून असल्यामुळें तें गंधरूपी गुणाचा आश्रय करितें. तेजाचें कार्य जें चक्षुरिंद्रिय तें तेजोमय रूपाचा आश्रय करितें. त्वगिंद्रिय वायुस्वरूपी असल्यामुळें तें वायूचा गुण जो स्पर्श त्याचा आश्रय करून राहतें आणि रसनेंद्रिय जिह्वा हें जलगुण रसाचा आश्रय करून राहतें.

याप्रमाणें शब्दादि पांच गुण पंचमहाभूतांमध्य राहतात आणि तीं महाभूतें इंद्रियांचे ठिकाणीं वास करितात. हीं पंचतत्त्वें व पंचमहाभूतें मनाचीं अनुयायी आहेत. मन बुद्धीच्या मागून जातें व बुद्धि आत्म्याच्या मागून जाते, आपलें बरेंवाईट कर्म बरोबर घेऊन आत्मा नवीन शरीरामध्यें येतो. तीं बरींवाईट कृत्यें अनुकूल जलप्रवाहाबरोबर वाहत जाणाऱ्या जलचराप्रमाणें मनामागून असतात. ज्याप्रमाणें नौकेंत बसून जाणाऱ्या मनुष्याला किनाऱ्यावरील सर्व पदार्थ चंचल आहेत, असें वाटतें, उपनेत्रादिकांच्या योगानें ज्याप्रमाणें सूक्ष्म वस्तु मोठी दिसते किंवा मनुष्याला आपलें मुख दर्पणांतून दिसूं शकतें, त्याप्रमाणें हा निर्विकार आत्माहि पंचभूतात्मक व दृश्य भासतो. परब्रह्म जरी दृश्य नाहीं, तथापि अविद्याजनित बुद्धिरूप दर्पणाच्या योगानें आकाशादिक स्वरूपांनीं त्याचीं रूपें दृष्टिगोचर होत असतात. १२. ३. २०२.

---

## अध्याय २०३ वा.

[ १ दृष्टांतपुरःसर आत्म्याचें अस्तित्वकथन. ]

( १ ) मनु—इंद्रियांच्या योगानें मनुष्याला पुष्कळ दिवसांनीं मागच्या गोष्टींचें स्मरण होतें. इंद्रियें बुद्धीमध्यें लीन झालीं असतां आत्मा बुद्धिरूपांत प्रकट होतो. हा आत्मा इंद्रियें व बुद्धि यांहून वेगळा आहे. ज्याअर्थीं निरनिराळ्या वेळीं व निरनिराळ्या ठिकाणीं ह्याच्या योगानें इंद्रियांचे विषय प्रकाशित होतात, त्याअर्थीं आत्म्याला स्वतंत्र फिरणारें एक अस्तित्व आहे, असें मानण्यास हरकत नाहीं. जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थांमध्यें सत्त्व, रज आणि तम या त्रिगुणात्मक सुखदुःखांचें या जीवाला ज्ञान असतें, परंतु त्यांचा अनुभव त्याला नसतो. ज्याप्रमाणें काष्ठांतील अग्नीला वायु, आंत प्रवेश करून प्रज्वलित करीत असतो, त्याप्रमाणें शरीरांतर्गत हा आत्मा इंद्रियांमध्यें शिरतो. हा निर्गुण व निराकार असल्यामुळें नेत्रांनीं त्याचें आकलन होणें कधींहि शक्य नसतें. स्पर्शेंद्रियानें त्याला स्पर्श करणेंहि अशक्य आहे व कानानें तो ऐकूंहि येत नाहीं. इंद्रियांचेंहि इंद्रिय हा असल्यानें त्याचें इंद्रियांला ज्ञान होत नाहीं. केवळ वेदांताच्या योगानें त्याच्या स्वरूपाचें आकलन करणें शक्य आहे. त्या ज्ञानानें सर्व द्वैताचा निरास होतो. पण हें

ज्ञान जेव्हां त्या इंद्रियांला होतें, त्यावेळीं त्या इंद्रियांचें स्वरूप व ज्यायोगानें त्याला आत्मज्ञान प्राप्त होतें, ते वेदांतविचार सुद्धां लुप्तप्राय होतात. श्रोत्रादि इंद्रियांना आपल्या स्वतःचें ज्ञान होत नाहीं, तर त्यांना परमात्म्याचें ज्ञान कसें होणार ? आत्मा मात्र सर्ववेत्ता, सर्व पाहणारा असून त्याला ह्या सर्व गोष्टी दिसत असतात. ज्याप्रमाणें हिमाचलाचा पृष्ठभाग किंवा चंद्रावरील प्रदेश कोणाहि मानवानें अजून पाहिलेला नाहीं, म्हणून त्यांचें अस्तित्वच नष्ट होत नाहीं, तद्वत् सर्व भूतांमध्यें सूक्ष्मरूपांत राहणारा व ज्ञानस्वरूपी असा हा आत्मा नेत्रांनीं दिसत नाहीं, म्हणून नाहींच असें होत नाहीं.

ज्याप्रमाणें पृथ्वीचें चंद्रावरील कलंकरूप प्रतिबिंब दिसत असूनहि तो कलंक म्हणजे पृथ्वीच आहे, हें समजत नाहीं, त्याप्रमाणें हें आत्म्याचें ज्ञान आहे. दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीनें आत्मज्ञान होण्यासारखें नाहीं. तें स्वतंत्र तऱ्हेनेंच झालें पाहिजे. स्थूल दृष्टीनें दिसणाऱ्या वृक्षादिकांचें उदयापूर्वीचें व नाशानंतरचें स्वरूप विद्वान् लोकांना आपल्या बुद्धीनें दिसतें, त्याचप्रमाणें त्याच्या स्थानाच्या बदलावरून सूर्याची गतिसुद्धां आपल्या बुद्धिसामर्थ्यानें विद्वान् ठरवितात. याप्रमाणें विद्वान् लोक दूर असलेल्या आत्म्याला सुद्धां बुद्धिप्रदीपानें अगदीं जवळ असल्यासारखें भासवितात. तसेंच ज्ञानी लोक सन्निध असलेल्या संसाराला दूर टाकून देतात. उपायावांचून कोणतीहि गोष्ट सिद्धीस जात नाहीं. ज्याप्रमाणें जलचर प्राण्यावर निर्वाह करणारे लोक सूत्रांचें जाळें टाकून मत्स्यांना ग्रहण करितात; ज्याप्रमाणें मृगांचें ग्रहण करण्याचे कामीं मृगांचा किंवा पक्ष्यांना धरण्याचे कामीं पक्ष्यांचा उपयोग करितात, तसेंच गजांना धरण्याचे कामीं गजांचा उपयोग केला जात असतो, त्याप्रमाणें परमात्म्याचें ज्ञान होण्यास ज्ञानाचाच उपयोग करून घेत असतात. सर्पाचे पाय सर्पालाच दिसतात, असें आमच्या ऐकिवांत आहे. त्याप्रमाणें लिंगशरीरांत असणारें जें आत्मतत्त्व तें ज्ञानी लोकांना स्थूलशरीरांत दिसतें. इंद्रियांच्या योगेंकरून ज्याप्रमाणें इंद्रियज्ञान होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें बुद्धीनेंहि आत्म्याचें ज्ञान होणें शक्य नाहीं. अमावास्येचे दिवशीं चंद्रमंडलाचा क्षय झाल्याकारणानें त्याचे दर्शनाचें कांहींच साधन नसतें, परंतु तेवढ्यावरून याचा नाश झाला आहे, असें म्हणतां येत नाहीं. शरीरांतील आत्म्याचीहि गोष्ट तशीच आहे.

अमावास्येचे दिवशीं चंद्र क्षीणमंडल होऊन जसा दिसत नाहीं,

त्याप्रमाणें जीवात्मा हा बुद्धीशीं तादात्म्य पावून उपलब्ध होत नाहीं. ज्याप्रमाणें सूर्यमंडलांतील चंद्र आकाशांत येऊन पुनः पूर्ववत् प्रकाश देतो, तसाच आत्माहि एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत गेला असतां पुनः प्रकाशित होतो. जन्म, वृद्धि आणि क्षय ह्यांचा संबंध चंद्राप्रमाणें आत्म्याला प्रत्यक्ष असल्यासारखें करतो, परंतु आत्म्याचा त्यांशीं कांहीं संबंध नाहीं. कारण हे धर्म शरीराचे होत. आत्म्याचें उत्पन्न होणें, वृद्धि पावणें आणि क्षय होणें, ह्या धर्मांचा जरी त्याजवर आरोप आला, तरी वस्तुतः तो शरीराहून भिन्न आहे. अंधकार जसा चंद्राला कधीं चिकटल्याचें आढळण्यांत नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याला कधींहि संयोग किंवा वियोग घडत नाहीं. ज्याप्रमाणें आपणाला राहूचें ज्ञान स्वतंत्र रीतीनें होत नाहीं, तर त्याचें ज्ञान सूर्याचे अथवा चंद्राचे ग्रहणसमयींच होतें, त्याप्रमाणें शरीराचा संयोग घडून शरीरांतील आत्म्याचें ज्ञान होतें. ज्याप्रमाणें चंद्र-सूर्य यांपासून मुक्त झालेला राहु दिसत नाहीं, त्याप्रमाणें शरीराला सोडल्यावर आत्मा उपलब्ध होत नसतो. ज्याप्रमाणें अमावास्येच्या दिवशीं चंद्र नक्षत्रांच्याच संगतींत असतो, त्याप्रमाणें शरीरमुक्त आत्माहि सर्वदा कर्मफलभूत अन्य शरीरांत असतो. १२. ३. २०३.

---

## अध्याय २०४ वा.

[ मनु-बृहस्पतिसंवाद—मोक्षवर्णन. ]

( १ ) मनु—हें दृश्य स्थूल शरीर स्वप्नावस्थेंत असतां लिंगशरीर त्याला सोडून मनसोक्त फिरत असतें, तसाच हा जन्ममरणरूप संसार आहे. अर्थात् स्थूलशरीर नष्ट झालें, तथापि लिंगशरीर दुसऱ्या शरीराचा आश्रय करितेंच. सुषुप्तींत ज्ञान लिंगशरीराला सोडून वेगळें रहातें, तो मोक्ष होय. जसें स्वच्छ उदकांत आपलें रूप आपल्याच डोळ्यांनीं स्पष्ट दिसतें, तसेंच इंद्रियें वश करून शुद्ध झालेल्या अंतःकरणांत ज्ञानाच्या योगानें ज्ञेय वस्तु (परमात्मरूप) आपोआप दिसूं लागते. गढूळ झालेल्या पाण्यांत जसें आपलें रूप आपणास दिसत नाहीं, तसेंच इंद्रियें वश न केल्यामुळें अशुद्ध असलेल्या अंतःकरणांत गुप्त असलेलें परमात्मस्वरूप दिसेनासें होतें. अज्ञानाच्या योगानें अविद्या उत्पन्न होते आणि हिच्याचमुळें मन विषयांकडे

आकर्षिलें जातें आणि तसें तें मन एकदां विषयाकृष्ट झालें म्हणजे पांचहि श्रोत्रादि ज्ञानेंद्रियें विषयलोलुप होतात. अज्ञानानें पूर्ण ग्रासल्यामुळें विषय-भोगांत अत्यंत निमग्न झालेला मनुष्य ते भोगतां भोगतां कधींहि तृप्त होत नाहीं. त्यामुळें तो मेल्यावर पुनः विषयाचा उपभोग घेण्याकरितां जन्म घेतो. त्या पापामुळें त्या पुरुषाची विषयेच्छा या लोकीं नाहींशी होत नाहीं; पण जेव्हां त्याचें तें पाप निःशेष नष्ट होतें, तेव्हां मात्र त्याची ती विषयेच्छा निवृत्त होते. विषयाच्या संसर्गानें हा जीव त्यांत सर्वदा गढून राहिल्यामुळें आणि मनानेंहि विरुद्ध अशाच गोष्टींची इच्छा केल्यामुळें त्याला परमपदाची प्राप्ति कधींहि होत नाहीं. पापकर्माचा क्षय झाला, तरच मनुष्याला ज्ञानप्राप्ति होते आणि ज्याप्रमाणें स्वच्छ आरशांत आपणांस आपलें रूप दिसतें, त्याप्रमाणें आपल्याच अंतःकरणामध्यें त्याला आत्मस्वरूप दिसूं लागतें. इंद्रियांना विषयांची चटक लागून तीं सैरावैरा त्या त्या विषयाकडे धांवूं लागलीं असतां मनुष्य दुःखी होतो आणि त्यांना ताब्यांत ठेवलीं तर तो सुखी होतो. याकरितां मनुष्यानें आपल्या मनाला त्या त्या इंद्रियाला प्रिय असलेल्या विषयांपासून आंवरून धरावें.

इंद्रियांच्या पलीकडे मन असून त्याच्याहि पलीकडे बुद्धि आहे. त्याचप्रमाणें बुद्धीच्या पलीकडे जीवात्मा व जीवात्म्याच्या पलीकडे परमात्मा निवास करितो. ह्या परमात्म्यापासून जीवात्म्याचा उद्भव होतो. जीवात्म्यापासून बुद्धि उत्पन्न होते; बुद्धीपासून मन प्रादुर्भूत होतें आणि मनापासून श्रोत्रादि इंद्रियें अस्तित्वांत येतात आणि त्यामुळें शब्दादि विषयांचें उत्तम ज्ञान होतें. असें ज्ञान झाल्यावर जो त्या शब्दादि विषयांचा आणि त्यांना आश्रयभूत असलेल्या पंचमहाभूतांचा, इतकेंच नव्हे, तर प्रकृतीपासून उत्पन्न होऊन अंतःकरणाचें वसतिस्थान अशा स्थूल, सूक्ष्म, कारण या तिन्ही शरीरांचा त्याग करितो, त्याला मोक्षपद प्राप्त होतें.

सूर्य उदय पावला असतां जसे त्याचे हजारों लाखों किरण जगावर पसरतात आणि तो अस्त पावला असतां ते किरण नष्ट होतात, त्याप्रमाणें अंतरात्मा देहांत प्रवेश करितांना आपले चैतन्यरूप किरण पसरितो आणि इंद्रिय-विषयांचा उपभोग घेऊन मरणकालीं आपले चैतन्यरूप किरण नष्ट करून टाकितो. पूर्वजन्मार्जित कर्मानें जशा प्रकारचा मार्ग आंखून ठेविलेला असेल,

त्याच मार्गानें त्याला तीं कर्मे ओढून नेत असतात. म्हणून तदनुसार तो पापपुण्यात्मक कर्मे करण्यास प्रवृत्त होतो. हा देही विषय भोगण्यास समर्थ असतांहि जर ते वर्ज्य करील, तर ते आपोआपच निवृत्त होतात, पण त्याची विषयवासना मात्र पूर्णपणें नाहींशी होत नाहीं. परंतु त्याला जेव्हां आत्म-साक्षात्कार होतो, तेव्हां तीहि समूळ नाहींशी होते. जेव्हां मनच ज्यांत प्रधान आहे, अशा त्वंपदार्थांत विषयासक्तिरहित झालेली बुद्धि लीन होते, तेव्हां मन सुद्धां त्यांत लीन झाल्यामुळें ब्रह्मप्राप्ति होते. इंद्रियाभावीं ज्याला स्पर्शन, श्रवण, आस्वादन, दर्शन आणि अवघ्राण ह्या क्रिया करितां येत नाहींत आणि जें अनुमानानेंहि जाणणें शक्य नाहीं, अशा त्या परब्रह्मामध्यें बुद्धि लय पावते. मनामध्यें घटादि दृश्य पदार्थ विलीन होतात, मन बुद्धी-मध्यें लीन होतें, बुद्धि जीवात्म्यामध्यें लीन होते आणि जीवात्मा परमात्म्याचे ठिकाणीं लय पावतो. इंद्रियें मनाला जाणत नाहींत, मन बुद्धीला जाणत नाहीं आणि बुद्धि स्थूलाला जाणत नाहीं, पण चिदात्मा मात्र या सर्वांना पाहत असतो. १२. ३. २०४.

## अध्याय २०५ वा.

[ १ मनु-बृहस्पतींच्या संवादाचा अनुवाद–आत्मप्राप्तीचा उपाय. ]

( १ ) मनु—शारीरिक व्याधि किंवा मानसिक क्लेश होऊं लागले असतां योगाभ्यास करणें शक्य नसतें. म्हणून त्या क्लेशांचा विचारच करूं नये. अशा-नेंच तें दुःख दूर होतें. कारण, दुःखाचें वरचेवर चिंतन करीत गेल्यानें तें अधिकच जवळजवळ येतें. विचार करकरून ज्ञानयोगानें मानसिक दुःखें घालवावींत आणि औषधांनीं शारीरिक व्याधि घालवाव्या, हेंच खरोखर ज्ञान-प्राप्तीचें सामर्थ्य होय. अशा तऱ्हेनें ज्ञानाचा सदुपयोग न करितां घोटाळ्यांत पडून आपली बरोबरी मूर्खांशीं करून घेऊं नये. ज्ञानी मनुष्यानें तारुण्य, स्वरूप, संपत्ति, जीवित, द्रव्यसंचय म्हणजे धन-धान्य-अश्व-गजादिकांचें भांडार, आरोग्य आणि इष्टमित्रांचा सहवास हीं सर्व नश्वर असल्यामुळें त्यांवर आसक्ति ठेवून राहूं नये. सर्व देशावर आपत्ति ओढवली तर त्याविषयीं एकट्यानेंच शोक करीत बसणें, हें योग्य नाहीं. जर आपल्याला तिचा प्रतिकार करण्याचा उपाय आढळला, तर शोक न करितां, तो अवश्य करावा. जीवंत

शहाण्यांत सुखापेक्षां दुःखच अधिक होत असतें, यांत संशय नाहीं व सुखासाठीं इंद्रियांच्या विषयांसंबंधीं मोह उत्पन्न होऊन नको असलेलें मरण मात्र त्याला प्राप्त होतें. जो मनुष्य सुख व दुःख या दोहोंचाहि त्याग करितो, त्यालाच अंतपाररहित अशा परब्रह्माची प्राप्ति होते. जे त्या ब्रह्मपदाला जाऊन पोंचले असतील, त्या विद्वानांला शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं. ज्या द्रव्याच्या संपादनाकरितां दुःखच भोगावें लागतें, त्याच्या सुरक्षिततेकरितां सुख न होतां दुःखच होत असतें. किंबहुना दुःख होऊनहि तें द्रव्य कधीं कधीं मिळतहि नसतें. अशा त्या द्रव्याचा नाश झाला तरी शहाण्यानें निश्चिंत रहावें.

परब्रह्म हें मनाच्या अहंकारादिधर्मांनीं कलुषित झालेलें आहे, म्हणून मन हा त्या परब्रह्माचा धर्म आहे. हें मन जेव्हां ज्ञानेंद्रियांनीं युक्त होतें, तेव्हां त्याची वृत्ति विषयाकार बनते. ज्यावेळीं कर्मजन्य संस्कारांनीं प्रवृत्त झालेली बुद्धि मननात्मक वृत्तीमध्यें विलीन होते, तेव्हां यमनियमादिकांनीं ध्येयाकार बनविलेल्या योगसमाधीनें म्हणजे ब्रह्माकारवृत्तीच्या योगानें ब्रह्मज्ञान प्राप्त होतें. अज्ञानापासून प्रवृत्त होऊन इंद्रियांच्या घनजालांत गुरफटलेली ही बुद्धि पर्वतशिखरावरून खालीं खालीं जात असलेल्या पाण्याप्रमाणें मूल ब्रह्माकडे न वळतां विषयांकडेच धांवत असते. पण जेव्हां अज्ञानाचा नाश होतो, तेव्हां कसोटीवर उठलेल्या सुवर्णरेषेप्रमाणें बुद्धीमध्यें अहंकारशून्य ब्रह्माचा प्रकाश पडतो. इंद्रियविषय दाखविणारें हें मन त्याच्या प्रकाशानें आधींच नाहींसें झालेलें असतें. मन हें इंद्रियविषयांची अपेक्षा करणारें असल्यामुळें त्याला निर्गुण ब्रह्म दाखवितां येणें शक्य नाहीं.

हीं सर्व इंद्रियांचीं द्वारें बंद करून घेऊन स्वतः मनामध्यें लीन व्हावें. नंतर एकाग्र झालेल्या मनाचा बुद्धीमध्यें लय करावा. म्हणजे त्या परब्रह्माची प्राप्ति होत असते. इंद्रियविषय नाहींसे होऊन पंचभूतात्मक इंद्रियें त्या विषयांपासून परतून तन्मात्रांमध्यें लय पावतात, तीं तसाच इंद्रियांसह बुद्धीचाहि लय अहंकारामध्यें होत असतो. यद्यपि निश्चयरूप धर्मानें युक्त असलेली बुद्धि अहंकारांत संचार करीत असली, तथापि ती अहंकारांत लीन होऊन अहंकारस्वरूपी बनते. ध्यानयोगामुळें ज्यांत सत्त्वगुण वृद्धिंगत झाला आहे, तो अहंकार रूपादि गुणांनीं युक्त असणाऱ्या विषयांसह त्रिगुणस्वरूपी मूळ

प्रकृतींत लीन होतो आणि तिचाहि निर्गुण परमात्म्यांत लय झाला म्हणजे त्या त्रिगुणातीत परब्रह्माची प्राप्ति होते. अहंकारादिकांचें उपादान कारण असलेल्या परब्रह्मस्वरूपाचें विशेष ज्ञान करून घेण्यांत उपयुक्त होणारा दृष्टांत शक्य नाहीं. कारण, ज्याचें वाणीनें निश्चित वर्णन करणें शक्य नाहीं, अशा त्या परब्रह्माला प्रत्यक्ष दाखवून देणारा कोण बरें आहे ? विचारपूर्वक ध्यानानें, मननादि युक्ति-प्रयुक्तीनें, शमदमादिकांनीं, जात्युचित स्वधर्मानें, वेदांतश्रवणानें, इत्यादि सर्व उपायांनीं अत्यंत शुद्ध झालेल्या अंतःकरणानें त्या परब्रह्माला जाणण्याची इच्छा धरून प्रयत्न केला पाहिजे. गुणत्रयविरहित झालेले तत्त्वदर्शी पुरुष उपर्युक्त मार्गाला अनुसरून आपल्याला आपल्या ठिकाणींच पाहतात, तसेंच ते बाह्य वस्तूंमध्येंहि त्याला पाहतात. हें ज्ञेय ब्रह्म निर्गुण व आदिभूत असल्याकारणानें तर्कातीत आहे. मन विषयांपासून निवृत्त केल्यानें ब्रह्मप्राप्ति होते व त्याची प्रवृत्ति विषयांकडेच राहूं दिल्यास तें विषयांकडे वळतें.

लांकडामध्यें सर्वत्र असलेल्या अग्नीला इंधनादिकांनीं चेतविलें तर तो त्या लांकडालाच जाळून भस्म करितो, त्याप्रमाणें विषयग्रामांत यथेच्छ भटकणाऱ्या मनाला जर विषयांची चटक लावीत गेलें, तर तें परब्रह्मविमुख होऊन त्या सुखाला मुकतें ! ज्याप्रमाणें सुषुप्तीमध्यें पंचकर्मेंद्रियें आणि पंचज्ञानेंद्रियें हीं स्वकर्मांचा व्याप सोडून स्वस्थ असतात, त्याचप्रमाणें तुरीयावस्थेमध्येंहि मन स्वतःला कारणीभूत जी प्रकृति तिला सोडून तिच्याहि पलीकडे असलेल्या परब्रह्मामध्यें चित्स्वरूपानें स्वस्थ असतें. वास्तविक विचार केला असतां सर्व देहधारी जीव चिदाभासस्वरूपी असतात; पण ते अज्ञानामुळें स्वस्वरूपाला विसरून कर्में करीत या संसारजालांत गुंतून राहतात. पण अभ्यासपूर्वक त्यांस निवृत्त करण्याचे प्रयत्न साध्य झाले तर ते जीव संसारांतून मुक्त होऊन परब्रह्मास पोंचतात, नाहींतर स्वर्गाला तरी जातात. अर्थात् मुक्तीसाठीं केलेले प्रयत्न कधींहि विफल होत नाहींत. जीव, प्रकृति, बुद्धि, इंद्रियें व त्यांचे विषय, अहंकार व अभिमान म्हणजे 'हें असेंच आहे' अशी बुद्धिवृत्ति, या सर्वांना भूतसमूह ही संज्ञा आहे. अर्थात् हीं सर्व शेवटीं विनाश पावणारीं आहेत. कारण या सर्व भूतसमूहाची प्रथम उत्पत्ति मायेनें बनलेल्या शबल ब्रह्मापासून अर्थात् विकृत परब्रह्मापासून झालेली आहे व दुसरी म्हणजे तत्तजात्युत्पत्ति स्त्री व पुरुष या उभय व्यक्तींच्या एकीभावापासून झालेली आहे. स्ववर्णाला नियुक्त व उचित असलेल्या

धर्माचरणापासून कल्याण होतें व परधर्मादि अधर्मापासून अकल्याण होतें. विषयासक्त पुरुष संसारसागरांत म्हणजे जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतो व विषयांस सर्वस्वीं झुगारून देणारा पुरुष वैरागी बनतो व ज्ञानवान् होऊन मुक्त होतो. १२. ३. २०५.

---

## अध्याय २०६ वा.

[ १ मनु-बृहस्पतिसंवाद—ब्रह्मप्राप्तीचा उपाय. ]

( १ ) मनु—जेव्हां पंचेंद्रियात्मक विषय हे पंचेंद्रियें आणि मन ह्यांच्यांशीं युक्त होतात, तेव्हां रत्नमालिकेंत असणाऱ्या सूत्राप्रमाणें सर्व प्राण्यांमध्यें रहाणाऱ्या परब्रह्माचें दर्शन त्यामध्यें होतें. जसें एकच सूत्र सुवर्णामधून, मोत्यामधून, प्रवाळामधून, किंवा मातीच्या वस्तूमधून असतें, त्याप्रमाणें एकाच जीवाला विषयासक्तीमुळें आपापल्या कर्मानुसार गाई, अश्व, मनुष्य, गज, मृग, किडे, पक्षी, इत्यादि शरीरांशीं संबंध घडवून घ्यावा लागतो. ज्या ज्या शरीरामध्यें जें जें कर्म हा करितो, त्या त्या कर्माचें फळ त्याला त्या त्या देहांत जन्मास येऊन मिळतें. अर्थात् कर्मानुसारच देहाची प्राप्ति होत असते. याला दृष्टांत असाः—ज्याप्रमाणें भूमींत असलेलें पाणी एकसारखेंच असतें परंतु ज्या जातीचें ओषधिबीज असेल, त्याच बीजाच्या अनुरोधानें पोषक असें द्रव्य ही भूमि त्या पाण्याच्या योगानें त्या ओषधींत उत्पन्न करिते. त्याप्रमाणें अंतरात्मा व त्यानें प्रेरित केलेली बुद्धि हीं सर्वांना एकच असतात, परंतु ज्या जीवाचें जसें प्राक्तन कर्म असेल, तदनुसार त्याची बुद्धि त्या जीवाला कर्म करण्यास प्रवृत्त करिते. ज्या जीवाचें जसें बरें वाईट प्राक्तन कर्म असेल, त्याप्रमाणें, त्या जीवाला तशी शुभाशुभ बुद्धि प्रथमतः उत्पन्न होते; नंतर त्या बुद्धीच्या योगानें आसक्ति उत्पन्न होते. त्यानंतर त्या आसक्तीमुळें 'मी अमुक करीन, मी तमुक करीन' असे प्रयत्न तो करीत असतो व त्या प्रयत्नांसारखें फलहि त्यास मिळतें.

तात्पर्य—कर्म हें जीवाच्या इच्छेवर अवलंबून आहे आणि फल हें कर्मावर अवलंबून आहे. अर्थात् फल हें कर्मापासून उत्पन्न होतें. कर्म बुद्धीपासून निर्माण होतें. बुद्धि ज्ञानावर अवलंबून असून ज्ञान हें परब्रह्मावर अवलंबून आहे. ज्ञान, फल, बुद्धि आणि कर्म यांचा नाश झाला

असतां, जी फलप्राप्ति होते, तेंच आत्मज्ञान होय. तें आत्मज्ञान ज्ञेयवस्तूंचे म्हणजे परब्रह्माचे ठिकाणीं परिपूर्ण भरून राहिलेलें असतें. हें सर्व जाणून योगसाधनानें जे आत्मज्ञानाची प्राप्ति करून घेतात, त्यांना त्या नित्यसिद्ध महाभूताचें प्रत्यक्ष दर्शन सदासर्वकाळ होत असतें आणि जे विषयासक्त झाल्यामुळें त्या ज्ञानाला पारखे होत असतात, त्या मूर्खांना त्यांच्या अंतःकरणांत राहत असणाऱ्या त्या अंतरात्म्याची जाणीव नसते; मग प्रत्यक्ष दर्शन कोठचें ? त्यांना तें कधींच दिसत नसतें. पृथ्वीच्या आकारापेक्षां किती तरी पटीनें जल अधिक आहे. जलापेक्षां तेज मोठें आहे. तेजापेक्षां वायु अधिक आहे. वायूपेक्षां आकाश मोठें आहे. आकाशाहून मन मोठें; मनापेक्षां बुद्धि मोठी आणि बुद्धीपेक्षां कालरूप मोठें आहे. त्या कालापेक्षांहि 'एको विष्णुर्महद्भूतम्' या उक्तीप्रमाणें व 'व्याप्नोतीति विष्णुः' या विवेचनानुसार, तो शुद्ध ब्रह्मस्वरूपी सर्वव्यापक षड्गुणैश्वर्ययुक्त देव भगवान् विष्णु अत्यंतच मोठा आहे. त्याच्या विराट् स्वरूपामध्येंच हें जगत् आहे. त्या देवाला आदि नाहीं, अंत नाहीं, म्हणून मध्यहि नाहीं. तो अनादि—जन्मरहित—असल्यामुळें व अनंत—मरणरहित—असल्यामुळें त्याला मधली स्थिति नाहीं. म्हणून तो अव्यय आहे. तो सर्व दुःखांपलीकडे राहणारा आहे. कारण दुःखाला अंत आहे. तेंच तत्त्व परमश्रेष्ठ असून उत्तम प्रकारचें आश्रयस्थान देखील तेंच आहे. त्याचें ज्ञान झालें असतां अनित्य अशा दुःखांपासून मुक्त होऊन मोक्षपदाची प्राप्ति होते. हें परब्रह्म जरी देहादिकांमध्यें ज्ञानरूपानें असतें, तरी हें निर्गुण—याला गुणांचा संबंध नसल्यामुळें—त्यांच्या पलीकडे त्यांहून वेगळें असें असतें.

निवृत्तिलक्षणधर्म तोच श्रेष्ठ असून मोक्ष देणारा आहे. ऋक्, यजु आणि साम ह्या तीन वेदांनीं प्रतिपादित कर्में लिंगशरीराचे ठिकाणीं संस्कार करणारीं आहेत. तीं प्रवृत्तिमार्गाचीं साधनें असून नश्वर शरीरांचा आश्रय करून राहिलीं आहेत. तीं जिह्वाग्रापासून बाहेर पडणारीं असल्यामुळें नश्वर आहेत. तशीं तीं साध्य आहेत. ब्रह्म हें शरीराचा आश्रय करून राहणारें असलें तरी तें अशा प्रकारचें नाहीं. तें यत्नसाध्य नाहीं; त्याला आदि, अंत व मध्यहि नाहीं. ऋक्, यजु आणि साम यांना आदि अंत आहेत. ते ब्रह्माला नाहींत. तें अनादि व अनंत असल्यामुळें व्यापक व अविनाशी आहे. तें अविनाशी असल्यामुळें निर्दुःख आहे. त्याला सुखदुःखादि द्वंद्वें माहीत नाहींत. तें त्यांहून

पर-पलीकडचें-आहे. अदृष्टामुळें, यत्न न केल्यामुळें, कर्मांच्या विपरीतपणामुळें त्यांना ब्रह्मप्राप्तीचा मार्ग सांपडत नाहीं. विषयांच्या ठिकाणीं आसक्ति असल्यामुळें व स्वर्गसुख डोळ्यांपुढें असल्यामुळें भलत्याच कल्पनेनें मनुष्य पर-ब्रह्मपदाला आंचवतो. कित्येकांना येथें जे जे विषय दृष्टीस पडतात, ते ते आपणाला असावे, अशी इच्छा करितात. त्यामुळें त्या विषयांपलीकडे असणारें जें पर-ब्रह्म त्याची इच्छा त्यांस होत नाहीं. विषयांच्या ठिकाणीं आसक्त झालेल्या अशा लोकांचें चित्त त्या परमोच्च ब्रह्माकडे लागावें तरी कसें ?

गुणांच्या व अवयवांच्या पलीकडे असलेल्या परब्रह्माचें ज्ञान अनुमानानें करून घ्यावें. सूक्ष्म मनानें त्याचें ज्ञान होणें शक्य आहे. वाणीनें त्याचें वर्णन करतां येणार नाहीं. सूक्ष्म मनाच्या योगानें ज्याप्रमाणें मनोमय बाह्य पदार्थांचें ज्ञान होतें, त्याप्रमाणें परमात्म्याचें ज्ञान साक्षात्कारानें होतें. ज्ञानाच्या योगानें बुद्धि व बुद्धीच्या योगानें मन स्वच्छ करून मनाच्या योगानें सर्व इंद्रियें निर्मल केल्यानें ब्रह्मप्राप्ति होते. विचाराच्या योगानें जो कोणी विषयपराङ्मुख होतो, त्याला निर्गुण व निरिच्छ अशा ब्रह्माची प्राप्ति होते. काष्ठगत अग्नीपासून ज्याप्रमाणें वायु वेगळा असतो, त्याप्रमाणें अनेक प्रकारच्या आशांमध्यें गुरफटून गेलेल्या लोकांपासून ब्रह्म दूर राहतें. सर्व विषयांचा मनांतून एकदां त्याग केला म्हणजे बुद्धीहून पर अशा ब्रह्माची प्राप्ति होते. त्याप्रमाणें विषय परमात्म्याहून भिन्न आहेत, अशा समजुतीनें आपण त्या विषयांचे ठिकाणीं आसक्त होऊन राहिलों असतां निर-निराळ्या लोकांची प्राप्ति होते. हाच मार्ग लक्ष्यांत ठेवून विषयांचें उन्मूलन करण्याविषयीं जो यत्न करितो, तो ब्रह्मपदाला जातो.

आत्मा अव्यक्त असला तरी शरीरादिकांचा संबंध घडून तो व्यक्त अस-ल्यासारखा भासतो. सुषुप्तिकालीं मात्र त्याचें अव्यक्तत्व दिसून येतें. अशा या अव्यक्तस्वरूपी आत्म्याला इच्छेचा किमपि संबंध नाहीं. परंतु इंद्रिया-दिकांचा संबंध जडून त्यांच्या वृद्धीबरोबर याची वृद्धि व त्यांच्या म्लानपणाबरोबर याची म्लानता असल्याचा भास होतो. इंद्रियांशीं याचा संबंध जडून हा लिंगदेहामध्यें प्रविष्ट होतो. ह्याचाच पंचमहाभूतांला आश्रय आहे. परमात्म्याचा संबंध नसला म्हणजे आत्म्याच्या पंचमहाभूतादिस्वरूपी मूर्तीकडून कोणतेंहि कार्य होत नाहीं. या पृथ्वीचा अंत झालेला कोणीं पाहिलेला

नाहीं, परंतु तो निःसंशय होणार आहे. समुद्रामध्यें पडलेली वस्तु वायूच्या योगानें जसे झोके खात असते, तरी ती जशी किनाऱ्याला वायूच्यामुळें सुरक्षितपणें जाऊन पोंचते, त्याचप्रमाणें या लोकीं विषयांत गुरफटून गेलेले लोक शेवटीं कर्माच्याच योगानें चित्तशुद्धि होऊन परब्रह्माला पोंचत असतात. उदयकाळीं सूर्य ज्याप्रमाणें आपले किरण पसरून जनाला प्रकाश पुरवितो व मावळतांना तीं किरणें निवृत्त होऊन प्रकाश नाहींसा होतो, तसा सर्व भेदभाव नष्ट होऊन तपानेंच मनुष्य निर्गुण व अविनाशी ब्रह्मामध्यें प्रविष्ट होतो. जो जन्मरहित आहे, जो पुण्यवंतांचा परम आश्रय आहे, जो स्वयंभु आहे, ज्याच्यापासून सर्व सृष्टि निर्माण झाली असून तिचा ज्याच्यामध्यें पुनः लय होत असतो, जो अव्यय आहे, जो सनातन आहे, ज्याला आदि, मध्य व अंत हीं नाहींत, अशा परमात्म्याचें ज्ञान झालें असतां मनुष्याला मोक्षप्राप्ति होत असते. १२.३.२०६.

## अध्याय २०७ वा.

[ १ सर्व भूतोत्पत्ति व लय करणाऱ्या विश्वव्यापक प्रभु नारायणाचें स्वरूप भीष्माकडून श्रवण करण्याविषयीं युधिष्ठिराची इच्छा. २ भीष्माकडून नारायण परमात्म्याचें प्रभुत्ववर्णन. ]

**युधिष्ठिर**—हे महाप्राज्ञ पितामहा, त्या पुंडरीकाक्ष, अविनाशी, सर्व कार्यकर्त्या, जन्मरहित, सर्व प्राण्यांच्या उत्पत्तीस व लयास कारणभूत होणाऱ्या, इंद्रियनियंत्या, देहधर्मांपासून अलिप्त राहणाऱ्या, विश्वव्यापक प्रभु नारायणाचें तात्त्विक स्वरूप ऐकण्याची माझी इच्छा आहे.

( २ ) **भीष्म**—हीच गोष्ट जमदग्निपुत्र परशुरामापासून, देवर्षि नारदाकडून व कृष्णद्वैपायन व्यास यांच्या मुखानें मीं ऐकिली आहे. त्याचप्रमाणें असित, देवल, महातपस्वी वाल्मीकि आणि मार्कंडेय यांनीं त्या विष्णूविषयीं अनेक अद्भुत कथा वर्णिल्या आहेत. हे भरतश्रेष्ठा, तो केशव सर्वांचा प्रभु असून, सर्वांतर्यामी आणि सर्वव्यापक असल्याचें मीं पुष्कळदां ऐकिलें आहे. हे युधिष्ठिरा, त्या शार्ङ्गधन्व्या महात्म्या विष्णूच्या कर्मांचें ज्या ज्ञानवान् लोकांना ज्ञान आहे, तसेंच पुराणवेत्ते लोक त्याच्या ज्या कर्मांचें वर्णन करीत असतात, तीं सर्व कर्में मी तुला आतां सांगतों, नीट ऐक.

ह्या पुरुषोत्तमानें प्रथमतः पंचभूतांना निर्माण करून नंतर पृथ्वी उत्पन्न केली. नंतर त्यानें जलाशयामध्येंच आपलें शयनस्थान केलें. पुढें त्यानें अहंकाराला मनासह उत्पन्न केलें. तो सर्व उत्पन्न झालेल्या प्राण्यांना आधारभूत असून भूत व भविष्य अशा दोहोंनांहि तोच आश्रयस्थान आहे. नंतर त्या नारायणाच्या नाभीमध्यें सूर्याप्रमाणें तेजस्वी असें एक कमल निर्माण झालें. या कमलावर सर्व दिशांना प्रकाशित करणारा भगवान् ब्रह्मदेव उत्पन्न झाला.

युधिष्ठिरा, ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाल्यावर तमोगुणापासून मधु नांवाचा महासुर निर्माण झाला. तो दैत्यांचा पूर्वज होता. त्या पुरुषोत्तमानें ब्रह्मदेवाचें कल्याण करण्याच्या इच्छेनें त्या उग्रकर्मी राक्षसाला मारिलें. त्यामुळें देव, दानव, गंधर्वांमध्यें त्या योगिश्रेष्ठ पुरुषर्षभाला मधुसूदन नांव पडलें. नंतर त्या ब्रह्मदेवानें मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु आणि दक्ष असे सात मानसपुत्र निर्माण केले. या सातांत श्रेष्ठ जो मरीचि त्यानें ब्रह्मवित्तम व तेजस्वी अशा कश्यपमुनीला निर्माण केलें. आतां दक्ष म्हणून जो सांगितला, तो कश्यपाहूनहि ज्येष्ठ असून ब्रह्मदेवाच्या आंगठ्यापासून त्याची उत्पत्ति झाली होती. हे भरतश्रेष्ठा, दक्षप्रजापति म्हणतात, तो हाच होय. दक्षप्रजापतीला तेरा कन्या होत्या. त्यांमध्यें दिति ज्येष्ठ होती. सर्वधर्मविशेषज्ञ व महाकीर्तिमान् मरीचिपुत्र कश्यप हा त्या तेरा दक्षकन्यांचा पति झाला. पुढें त्या कन्यांहून कनिष्ठ अशा दहा कन्या दक्षप्रजापतीनें निर्माण करून त्या धर्माला दिल्या.

हे भारता, त्या धर्माला वसु, तेजस्वी रुद्र, विश्वेदेव, साध्य आणि मरुत्वत् असे पुत्र झाले. त्या दक्षप्रजापतीला मागें सांगितलेल्या कन्यांहून कनिष्ठ अशा दुसऱ्या सत्तावीस कन्या झाल्या. त्या सर्वांचा महाभाग चंद्र हा पति झाला. कश्यपाच्या इतर स्त्रियांना गंधर्व, अश्व, पक्षी, धेनु, किन्नर, मत्स्य, उद्भिज्ज आणि वनस्पति अशी संतति झाली. अदितीला महाबलवंत, देवश्रेष्ठ असे आदित्यसंज्ञक पुत्र झाले. त्या आदित्यांपैकीं बलवान् विष्णु वामनरूपानें प्रकट झाला. त्यानें देवांचें वैभव वाढविलें आणि दनु आणि दिति यांपासून निर्माण झालेल्या दानवदैत्यांचा पराभव केला. विप्रचित्तिप्रमुख दानव दनूपासून झाले आणि सर्व महाबलाढ्य असुर दितीपासून जन्मास आले. पुढें भगवान् मधुसूदनानें दिवस, रात्र आणि ऋतु, तसेंच पूर्वाह्ण आणि अपराह्ण काल यांस

निर्माण केलें. नंतर त्यानें विचार करून मेघ आणि सर्व स्थावरजंगम पदार्थ यांची उत्पत्ति केली. नंतर अत्यंत तेजानें युक्त अशी ही पृथ्वी त्यानें निर्माण केली.

हे युधिष्ठिरा, नंतर त्या विष्णूनें आपल्या मुखापासून शंभर ब्राह्मण उत्पन्न केले. तसेंच आपल्या बाहूंपासून शंभर क्षत्रिय, मांड्यांपासून शंभर वैश्य आणि चरणांपासून शंभर शूद्र उत्पन्न केले. याप्रमाणें चतुर्वर्णांची उत्पत्ति झाली असतां ब्रह्मदेवाला त्यांचा शास्ता म्हणून योजिलें. पुढें त्यानें मातृगण व पितृगण यांचा अध्यक्ष जो रुद्र त्याची उत्पत्ति केली. पापी व पितर यांचा शास्ता म्हणून त्यानें यमाची उत्पत्ति केली आणि कुबेराला त्यानें संपत्तीचा पालक म्हणून निर्माण केलें. वरुणाला त्यानें जलचरांचा व जलांचा अधिपति म्हणून निर्मिलें. सर्व देवाधिपति इंद्रालाहि त्यानेंच निर्माण केलें. त्याकाळीं जितके दिवस जगण्याची मनुष्यांना इच्छा होत असे, तोंपर्यंत ते जगत असत. त्यांना यमापासून भीति वाटत नसे.

हे भरतर्षभा, त्याकाळीं स्त्रीपुरुषसंबंधहि घडत नसे. केवळ मनाच्या संकल्पानेंच संतति होत असे. हे नृपा, नंतर त्रेतायुगांत नुसता स्पर्श झाला असतां त्यापासून संतति होऊं लागली. ह्या त्रेतायुगामध्येंहि स्त्रीपुरुषसंबंध नव्हता. लोकांमध्यें स्त्रीपुरुषसंबंध घडला तो द्वापरयुगांत होय. कलियुगांत तर हा पतिपत्नीसंबंध बराच घडूं लागला आहे. युधिष्ठिरा, हा भूतपति परमात्मा सर्व सृष्टीचा साक्षी आहे. आतां नरकाचीच केवळ इच्छा करणारे ते कोण आहेत, तें सांगतों, ऐक.

हे नरवरा, दक्षिणापथांत जन्म घेणारे सर्व आंध्र, गुह, कुलिंद, शबर, चूचुक आणि मद्रक हे सर्व नरकाला जाणारे लोक होत. आतां उत्तरापथामध्यें जन्म घेणाऱ्यांत कोणाला नरकप्राप्ति होत असते, तें सांगतों, ऐक. यौन, कांबोज, गांधार, किरात आणि बर्बर यांना नरकाची प्राप्ति होत असते. बापा युधिष्ठिरा, हे सर्व पापी असून या पृथ्वीवर यांचा संचार होत असतो. हे नराधिपा, चांडाळ, बगळे आणि गिधाड यांसारखें यांचें आचरण आहे. कृतयुगामध्यें पृथ्वीवर यांचा संचार नव्हता. यांची वाढ त्रेतायुगाच्या आरंभापासून आहे. पुढें त्रेता आणि द्वापरयुगाचा महाघोर संधिकाल जवळ येऊन ठेपला आणि राजे लोक एकमेकांवर धांवून गेले. अशा रीतीनें तो भगवान् श्रीकृष्ण अवतीर्ण झाला, असें सर्वलोक हितकारी नारदानें सांगितलें

आहे. हे भरतर्षभा युधिष्ठिरा, नारदाचेंहि मत तो भगवान् श्रीकृष्ण शाश्वत आहे असेंच आहे. असा हा महाबाहु कमललोचन सत्यपराक्रमी श्रीकृष्ण केवळ मनुष्य नसून अचिन्त्य परमात्मा आहे. १२. ३. २०७.

---

## अध्याय २०८ वा.

[ १ प्रजांचे अधिपति आणि प्राच्यादि दिशांच्या ठायीं कोण कोण ऋषि आहेत, याचें भीष्माकडून कथन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भरतर्षभा, पूर्वीं प्रजांचे अधिपति कोण होते, तसेंच प्रत्येक दिशेला महाभाग असे कोण कोण ऋषि आहेत, तें आतां सांग.

**भीष्म**—हे भरतश्रेष्ठा, जें तूं मला विचारीत आहेस, तें सर्व आतां सांगतों, ऐक. सर्वांच्या पूर्वीं एकटा सनातन ब्रह्मदेव हाच स्वतः निर्माण झालेला असून त्याला सात पुत्र होते. मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु आणि महाभाग वसिष्ठ हे ते सात पुत्र होत. हे सर्व त्या ब्रह्मदेवाच्या बरोबरीचे होते. म्हणूनच पुराणांमध्यें ह्या सातांना सात ब्रह्मे असें म्हटलें आहे. आतां तुला सर्व प्रजापतींची माहिती सांगतों. अत्रिवंशांत भगवान् प्राचीनबर्हि नांवाचा ऋषि उत्पन्न झाला. हा वेदांचें उत्पत्तिस्थान होतें, त्यापासून दहा प्रचेते उत्पन्न झाले. त्या दहांमध्यें दक्षनामक एकच पुत्र निर्माण झाला. लोकांमध्यें तो दक्ष आणि क या नांवांनीं प्रसिद्ध आहे. मरीचीला कश्यप नांवाचा पुत्र झाला. त्यालाहि अरिष्टनेमि आणि कश्यप अशीं दोन नांवें आहेत. अत्रीला राजा सोम नांवाचा एक औरसपुत्र होता. तो श्रीमान् व वीर्यवान् होता. त्यानें सहस्र दिव्य युगेंपर्यंत तप केलें. हे विभो, भगवान् अर्यमा आणि त्याचे पुत्र हे सर्व भुवनांवर सत्ता चालविणारे असून त्यांचे उत्पादक होते, असें सांगितलें आहे. शशबिंदु ह्याला दहा हजार स्त्रिया होत्या. त्यांपैकीं प्रत्येकीला एकेक हजार पुत्र होते. असे त्या शशबिंदूला एकंदर एक कोटी पुत्र असून आपणावर दुसरा कोणी प्रजापति नसावा, अशी त्याची इच्छा होती. ही सर्व प्रजा शशबिंदूचीच आहे, असें सर्व पुराणकालचे मुनि म्हणतात. वृष्णिवंशाची उत्पत्ति त्याच मोठ्या प्रजापतीच्या वंशापासून झाली आहे.

ह्याप्रमाणें तुला मीं मोठमोठे यशस्वी प्रजापति कथन केले. आतां त्रिभुवनेश्वर अशा देवांचें वर्णन करितों. भग, अंश, अर्यमा, मित्र, वरुण, सविता, धाता, विवस्वान्, त्वष्टा, पूषा, इंद्र व विष्णु हे कश्यपापासून झालेले देवांमधील बारा आदित्य होत. नासत्य आणि दस्र हे दोन अश्विनीकुमार असून त्यांची उत्पत्ति आठव्या मार्तंडापासून झाली आहे. ह्या सर्वांना पूर्वी देव आणि पितर म्हणत असत. महायशस्वी श्रीमान् विश्वरूप ह्या त्वष्ट्याचा पुत्र होता. अज, एकपाद, अहिर्बुध्न्य, विरूपाक्ष, रैवत, हर, बहुरूप, सुरेश्वर त्र्यंबक, सावित्र, जयंत आणि विजयी पिनाकी हे एकादश रुद्र होत. महाभाग असे आठ वसु तुला मीं पूर्वीच सांगितले आहेत. अशा प्रकारचे देव हे पूर्वी मनुकाळच्या देवता समजल्या जात असत.

त्याचप्रमाणें रूप-यौवनांवरून सिद्ध आणि साध्य यांमध्यें दोन निरनिराळ्या जाती झाल्या. ऋभु आणि मरुत् हे देवगण आहेत. विश्वेदेव आणि अश्विनीकुमार हे वेदांत सांगितले आहेत. ह्यांपैकीं आदित्य हे क्षत्रिय, मरुत् हे वैश्य आणि उग्र तपामध्यें आसक्त झालेले अश्विनीकुमार ह्यांची गणना शूद्रांमध्यें होत आहे. अंगिरा ऋषीपासून झालेले देव ब्राह्मण गणले जातात. अशी ही देवांमधील चार वर्णांची व्यवस्था आहे. जो कोणी प्रातःकाळीं ह्या देवतांचें संकीर्तन करील, तो स्वतःच्या व दुसऱ्यामुळें लागलेल्या पातकांपासून मुक्त होतो.

यवक्रीत, रैभ्य, अर्वावसु, परावसु, औशिज कक्षीवान्, बल, आंगिरस आणि मेधातिथिपुत्र बर्हिषद कण्व हे त्रैलोक्यहितकारी असून पूर्वदिशेला असणारे सप्तर्षि होत. उन्मुच, विमुच, वीर्यशाली स्वस्त्यात्रेय, प्रमुच, इध्मवाह, भगवान् दृढव्रत आणि प्रतापवान् मित्रावरुणपुत्र अगस्त्य हे ब्रह्मर्षि सर्वदा दक्षिण दिशेचा आश्रय करून राहिले आहेत. उषंगु, कवष, धौम्य, वीर्यवान् परिव्याध, महर्षि एकत, द्वित आणि त्रित हे अत्रिपुत्र सारस्वतप्रभु पश्चिम दिशेला आश्रय करून राहिले. आत्रेय, वसिष्ठ, महर्षि कश्यप, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम आणि महात्म्या ऋचीकाचा पुत्र जमदग्नि हे उत्तर दिशेला असणारे सप्तर्षि होत. ह्याप्रमाणें सर्व दिशांचे ठायीं असणारे प्रखर तेजस्वी ऋषि सांगितले आहेत. हे सर्व भुवनांचे कल्याणकर्ते असून सर्वांस साक्षिभूत आहेत. अशा रीतीनें हे ऋषि सर्व दिशांचे ठायीं वास्तव्य करून राहतात.

ह्यांचें संकीर्तन केल्यानें मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होतो. हे ऋषि ज्या दिशेला वास्तव्य करितात, त्या दिशेला जरी मनुष्य शरण गेला, तरी तो सर्व पापविनिर्मुक्त होतो आणि सुखानें गृहसौख्य भोगतो. १२. ३. २०८.

---

## अध्याय २०९ वा.

[ १ भीष्मकृत वराहावतारवर्णन. ]

( १ ) युधिष्ठिर—महाप्राज्ञ आणि सत्यपराक्रमी पितामहा, त्या अविनाशी व ऐश्वर्ययुक्त कृष्ण परमात्म्याविषयीं विस्तारपूर्वक ऐकावें, अशी माझी फार मोठी इच्छा आहे. त्याचें मोठें तेज, तसेंच त्यानें पूर्वी केलेलें मोठें पराक्रमकृत्य ह्यांचें यथायोग्य वर्णन करून मला सांग. त्याचप्रमाणें त्यानें तिर्यग्योनीमध्यें अवतार घेण्याचें कारण काय तेंहि सांग.

भीष्म—पूर्वी मृगयेसाठीं गेलों असतां एकदां मार्कंडेयाच्या आश्रमांत राहिलों होतों. तेथें हजारों मुनिगण बसलेले माझ्या दृष्टीस पडले. त्यांनीं माझी मधुपर्कानें पूजा केली. त्या त्यांच्या पूजेचा मीं स्वीकार केला आणि मीं त्या ऋषींचें अभिनंदन केलें. त्यावेळीं महर्षि कश्यपानें मनाला आनंद देणारी अशी एक दिव्यकथा सांगितली. ती तुला सांगतों. एकाग्र मनानें श्रवण कर. पूर्वी दानवप्रमुख नरकादि महासुर क्रोध आणि लोभ यांनीं युक्त व बलोन्मत्त होऊन गेले होते. त्यांबरोबर दुसरेहि अनेक युद्धदुर्मद दानव होते. देवांचें दिवसेंदिवस वृद्धिंगत होत जाणारें ऐश्वर्य त्यांच्यानें पाहवेना. त्यामुळें त्यांनीं देवांना पीडा देण्याला प्रारंभ केला. हे राजा, त्यामुळें देव, देवर्षि यांना तो त्रास सहन न होऊन त्यांनीं आपापलीं स्थानें सोडलीं व ते वेगवेगळ्या ठिकाणीं राहूं लागले; तथापि त्यांना सुख मिळेना. त्या देवांनीं राक्षसपीडित पृथ्वी अत्यंत आर्त झाली आहे व ती दुःखभारानें खिन्न होऊन खचूं लागली आहे, असेंहि त्यांच्या दृष्टीस पडलें. तें पाहून देव भयभीत होऊन गेले व ब्रह्मदेवाकडे जाऊन त्याला म्हणाले, 'हे ब्रह्मन्, ह्या दानवांनीं आमच्यावर चालविलेला जुलूम आम्हीं सहन कसा करावा ?'

त्यावर ब्रह्मदेव त्यांना म्हणाला, 'ह्याविषयीं जें करायाचें' त्याची योजना मीं आधींच योजून ठेविली आहे. त्यांना मिळालेल्या वरानें, तसेंच बलानें व मदानें ते

अगदीं धुंद होऊन गेले आहेत, त्यामुळें त्या अव्यक्तदर्शन विष्णूची त्यांना ओळख पटत नाहीं. देवांसहि अधृष्य अशा त्या श्रीविष्णूनें वराहरूप धारण केलेलें आहे. तो भूमीच्या अंतर्भागीं वास्तव्य करणाऱ्या त्या हजारों भयंकर दैत्यांचा निःपात करील.' तें ऐकून देवांना मोठा आनंद झाला. इकडे त्या महा-तेजस्वी विष्णूनें वराहाचें रूप धारण केलें आणि भूमीच्या अंतर्भागीं शिरून तेथें असलेल्या दैत्यांवर चालून गेला. त्या अमानुष प्राण्याला पाहतांच ते कालमोहित झालेले दैत्य मोठ्या वेगानें एकत्र होऊन त्यावर धांवून आले आणि क्रोधाविष्ट होऊन त्याला ओढूं लागले; परंतु त्याच्यापुढें त्या दैत्यांचें कांहीं चालेना. तें पाहून त्यांना मोठें आश्चर्य वाटलें आणि आपला जीव धोक्यांत आहे, असें वाटून त्यांना मोठी भीति उत्पन्न झाली.

हे भरतसत्तमा, पुढें त्या योगमूर्ति भगवान् विष्णूनें योगाचें अवलंबन करून त्या दैत्यदानवांचा क्षोभ करण्याच्या इच्छेनें मोठ्यानें गर्जना केली. त्यामुळें सर्व लोक आणि दाही दिशा दणाणून गेल्या. त्या गर्जनाशब्दानें सर्व लोक क्षुब्ध होऊन गेले, इतकेंच नव्हे, तर इंद्रादि देवहि अत्यंत भयभीत होऊन गेले. त्या गर्जनानादानें मोहित होऊन सर्व स्थावरजंगमात्मक जगताचे व्यापार बंद होऊन राहिले. सर्व दैत्य त्या नादानें भयभीत झाले व विष्णूच्या तेजानें मोहित होऊन गेले आणि गतप्राण होऊन जमिनीवर पडले. त्या वराहरूप विष्णूनें पाताळांत प्रवेश करून त्या देवद्वेष्ट्या दैत्यांचे मांस, मेद आणि अस्थि ह्यांचे ढीग आपल्या खुरांनीं विदीर्ण केले. सर्व प्राण्यांच्या शरीरामध्यें जीवरूपानें प्रकाशमान असणारा तो महायोगसंपन्न पद्मनाभ श्रीविष्णु त्या गर्जनेनें सनातन नांव पावला. ती गर्जना ऐकून सर्व देवगण पितामह ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्यांनीं त्याला विचारिलें, 'हे प्रभो, हा नाद कसला? आम्हांला कांहीं समजत नाहीं! ज्याच्या योगानें सर्व जगत् विह्वल होऊन गेलें आहे, तो हा कसला ध्वनि आहे?' असें बोलणें चाललें आहे, इतक्यांत सर्व महर्षि स्तुति करीत आहेत, असा तो वराहरूप-धारी विष्णु त्या ठिकाणीं प्रकट झाला.

ब्रह्मदेव—देवहो, महाबलवान्, महाकाय, सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं जीवरूपानें राहणारा, सर्वांची चिंता वाहणारा, सर्व भूतांचा नियंता, महायोगी, सर्व विघ्नसंहारक श्रीविष्णु, सर्व दानवश्रेष्ठांचा पराभव करून येथें आला आहे.

तुम्ही स्थिर व्हा. हे सुरसत्तमांनो, तुम्ही भिऊं नका किंवा शोकहि करूं नका. तुम्ही संतप्तहि होऊं नका. हा सर्वांचा उत्पादक असून सर्वांचा संहारकहि हाच आहे. तसाच हा सर्व लोकांना धारण करणाराहि आहे. ह्याच महात्म्यानें ही गर्जना केली आहे. तो हा महाबल, पुंडरीकाक्ष सर्व प्राण्यांस धारण करणारा, महापराक्रमी, अविनाशी, सर्वलोकवंद्य आणि ऐश्वर्यसंपन्न असा आहे. १२.३.२०९.



## अध्याय २१० वा.

[ १ प्राचीन इतिहासरूपानें युधिष्ठिराला भीष्माकडून अध्यात्मविषयकथन. ]

(१) युधिष्ठिर—हे पितामहा भारता, मोक्षप्राप्तीचा उत्तम उपाय कोणता तो मला सांग. हे वक्तृश्रेष्ठा, तो उपाय कोणता, हें तुजकडून ऐकावें, अशी माझी फार इच्छा आहे.

भीष्म—ह्यासंबंधी एका शिष्याचा गुरूशीं झालेला मोक्षविषयक संवाद प्राचीन इतिहास म्हणून सांगत असतात, तो असा आहेः—कोणी एक आचार्य, ऋषिश्रेष्ठ, अतितेजस्वी, महात्मा, सत्यप्रतिज्ञ आणि जितेंद्रिय असा ब्राह्मण होता. तो एकदां स्वस्थपणें बसला असतां एक बुद्धिमान् आणि कल्याणेच्छु शिष्य आपलें अंतःकरण एकाग्र करून त्याजकडे आला आणि त्याचे पाय घट्ट धरून व हात जोडून त्याला म्हणाला, 'भगवन्, तूं जर मजवर प्रसन्न असशील, तर मला जो एक मोठा संशय आहे, त्याचें निरसन कर. हे द्विजसत्तमा, तूं आणि मी ह्या लोकीं कोठून व कां आलों, तें मला यथातथ्य सांग ! तसेंच सर्व भूतें सारख्याच योग्यतेचीं असून सर्वांची उत्पत्ति पंचमहाभूतांपासूनच आहे. मग ह्यांपैकीं एकाचा नाश तर दुसऱ्याचा उदय असें कां व्हावें? त्याचप्रमाणें वेदांमध्यें निरनिराळ्या जातींकरितां निरनिराळे धर्म सांगण्याची काय आवश्यकता आहे ? आणि स्मृतीमध्यें कांहीं विशिष्ट वर्णांपुरतींच, तर कांहीं व्यापक वाक्यें आहेत, या सर्वांचा तूं योग्य विचार मला सांग.

गुरु—हे महाप्राज्ञ शिष्या, ऐक. तुझा हा प्रश्न वेदगुह्य अशा अध्यात्मज्ञानासंबंधीं असून तें ज्ञान सर्व वेदांमध्यें व शास्त्रामध्यें श्रेष्ठ आहे. वासुदेवरूपी श्रेष्ठ ब्रह्म हेंच ह्या वेदाचें मुख्य असून तो सत्य व ज्ञानरूप आहे. तें

ब्रह्म यज्ञ, दान, तप, इंद्रियजय व धर्मस्वरूपी असून वेदवेत्ते त्यालाच सनातन ब्रह्म म्हणतात. तेंच ब्रह्म वृष्णिकुलामध्यें उत्पन्न झालें असून त्याचा वृत्तांत आतां तुला मी सांगतों, ऐक. त्या तेजोमय देवाधिदेव विष्णूचें ज्ञान ब्राह्मणानें ब्राह्मणाला, क्षत्रियानें क्षत्रियाला, वैश्यानें वैश्याला व शूद्रानें शूद्राला अशा रीतीनें त्या त्या वर्णाच्या मनुष्यानें त्या त्या वर्णाच्या मनुष्याला करून द्यावें. हें श्रीकृष्णाचें आख्यान ऐकण्याला तूंच समर्थ आहेस. तरी तें तूं श्रवण कर.

सृष्टि आणि प्रलय यांवरून ज्ञात होणारें हें अनाद्यनंत कालचक्र आहे. त्या सर्वभूतेशाच्या ठिकाणीं हें त्रैलोक्य चक्राप्रमाणें फिरत राहिलेलें आहे. हे पुरुषव्याघ्रा, त्या पुरुषश्रेष्ठ केशवाला अविनाशी, अव्यक्त, अमर आणि शाश्वत ब्रह्म म्हणत असतात. त्या अव्यय पुरुषोत्तमानें पितर, देव, यक्ष, राक्षस, नाग, असुर आणि मनुष्यें यांना उत्पन्न केलें असून वेदशास्त्रें आणि शाश्वत लोकधर्म त्यानेंच उत्पन्न केले आहेत. ह्याच प्रलयकालीं ह्या सर्वांचा लय प्रकृतींत करितो व प्रत्येक युगारंभीं पुनः त्यांना उत्पन्न करितो. ज्याप्रमाणें ऋतुकाल प्राप्त झाला असतां त्या ऋतूचीं चिह्नें दृग्गोचर होत असतात, त्याचप्रमाणें युगारंभींहि युगाचीं चिह्नें दृष्टोत्पत्तीस येतात. पुढें जें जें कालाप्रमाणें युग सुरू होतें, त्याचें ज्ञान लोकव्यवहाराला अनुसरून होत असतें. युगाच्या शेवटीं नष्ट झालेले वेद व इतिहास यांचें ज्ञान ब्रह्मदेवाच्या अनुज्ञेनें व तपःप्रभावानें महर्षींना मिळालें. भगवान् ब्रह्मयाला वेदांचें ज्ञान व बृहस्पतीला वेदांताचें ज्ञान झालें; भृगुपुत्र शुक्राचार्याला सर्व जगाला हितकारक असें नीतिशास्त्र मिळालें. नारदाला गांधर्वविद्या प्राप्त झाली; धनुर्विद्या भरद्वाजाला मिळाली; गार्ग्याला देवर्षिचरित्र समजलें आणि कृष्णात्रेयाला चिकित्साशास्त्र कळून आलें.

पुढें वादकुशल ऋषींनीं न्यायादि अनेक शास्त्रें निर्माण करून हेतु, वेद, वचनें आणि सदाचार यांच्या योगानें त्यांनीं ब्रह्माचें कथन केलें. ज्याला आदिअंत नाहीं, अशा त्या परब्रह्माचें ज्ञान देवतांना व ऋषींनाहि नाहीं. तें ज्ञान एकट्या त्या भगवान् नारायणाला मात्र झालें आणि पुढें त्याच्यापासूनच सांसारिक दुःखावरील औषधच कीं काय असें तें ज्ञान ऋषिगण, मुख्य मुख्य देव, असुर आणि राजर्षि यांना प्राप्त झालें. ज्या वेळीं परमात्म्याच्या प्रेरणेवरून प्रकृति महदादि भाव निर्माण करिते, त्या वेळीं या प्रकृतीच्या साह्यानें सर्व

जगताची उत्पत्ति होते. एका दीपापासून ज्याप्रमाणें दुसरे सहस्रावधि दीप लागतात, त्याप्रमाणें या प्रकृतीपासून हजारों वस्तु निर्माण होतात. त्या प्रकृतीला अंत नसल्यामुळें तिचा क्षय होत नाहीं. मायाधिष्ठित परमात्म्यापासून महत्तत्त्व उत्पन्न होतें. त्यापासून अहंकार, अहंकारापासून आकाश, आकाशापासून वायु, वायूपासून तेज व तेजापासून जल आणि जलापासून पृथ्वी निर्माण होते. अशा या आठ प्रकृति उत्पन्न होऊन त्यांवर या जगाचें अस्तित्व चाललें आहे.

या आठ प्रकृतींपासून पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियांचे विषय आणि मन हीं सोळा उत्पन्न झालीं. त्यांपैकीं श्रोत्र, त्वक्, नेत्र, जिह्वा आणि घ्राण हीं पंचज्ञानेंद्रियें असून पाय, हात, वाणी, गुद आणि शिस्न हीं पंच कर्मेंद्रियें आहेत. त्याचप्रमाणें शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पांच विषय आहेत. या सर्वांना व्यापून मन राहिलें आहे. तें त्या सर्वांमध्यें वास्तव्य करून राहिलें आहे. रसज्ञानाच्या वेळीं मन हेंच जिह्वा होतें व भाषणाचे वेळीं हेंच वाणी होऊन राहतें. इंद्रियांचा ज्यांच्यांशीं संबंध आहे, ते सर्व पदार्थ म्हणजे मनच होय. हे सोळा विकार म्हणजे या सोळा देवताच होत. त्या मनुष्याच्या देहामध्यें असून त्यांना ज्ञान करून देणाऱ्या आत्म्याची त्या उपासना करीत असतात. जिह्वा हा जलाचा गुण असून घ्राणेंद्रिय हा पृथ्वीचा गुण आहे. श्रोत्र हा आकाशाचा गुण आहे, नेत्र अग्नीचा आणि स्पर्श हा वायूचा गुण आहे. अशा प्रकारें सर्व प्राण्यांची व्यवस्था सर्वदा चालली आहे. मन हें सत्त्वगुणाचें कार्य असून त्याची उत्पत्ति प्रकृतीपासून आहे. ती प्रकृति सर्वांच्या हृदयामध्यें असणाऱ्या आत्म्यापासून होत असते. हीं प्रकृतीहून पर अशा आत्म्याच्या आश्रयानें सर्व चराचर विश्वास चालवितात. नवद्वारांनीं युक्त असें जें पवित्र शरीररूपी नगर तें या वरील तत्त्वांनीं निर्माण झालें असून महात्मा त्याला व्यापून राहिला आहे, म्हणूनच त्याला पुरुष ( पुरि शेते सः ) असेंम्हटलें आहे.

तो आत्मा अजर व अमर असून मूर्त व अमूर्त हीं त्याचींच स्वरूपें होत. हा सर्वव्यापी असून सगुण आहे, तसाच सूक्ष्महि असून सर्व पंचमहाभूतांना व गुणांना आश्रयभूत आहे. दिवा लहान असो, किंवा मोठा असो, तो सर्व ठिकाणीं प्रकाशात्मकच असतो, त्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं असणारा आत्माहि ज्ञानस्वरूपी आहे. त्या आत्म्याच्या योगानें श्रवणेंद्रियाला

शब्दाचें व चक्षुरिंद्रियाला रूपाचें ज्ञान होतें. देह हा केवळ ज्ञानाला निमित्त-मात्र असून आत्मा हाच ज्ञानाश्रय आहे. लांकूड फोडलें तरी त्यामधील अग्नि दृष्टिगोचर होत नाहीं, त्याचें घर्षण केल्यानेंच तो दृष्टोत्पत्तीस येतो, त्याप्रमाणें शरीरांतील आत्म्याचें ज्ञान योगानें होतें. ज्याप्रमाणें नदी आणि पाणी किंवा सूर्य आणि किरणें यांचा संबंध असतो, त्याचप्रमाणें देह आणि आत्मा यांच्या मधील संबंध आहे. स्वप्नामध्यें पांच सूक्ष्म इंद्रियांसह जीवात्मा शरीरत्याग करून बाहेर जातो, त्याप्रमाणें मरणकालीं हा आत्मा एक देह सोडून दुसऱ्या देहांत प्रवेश करितो. पूर्वजन्मांत कर्मांशीं हा आत्मा बद्ध झाल्यामुळें आपल्या कर्मानुसार मनुष्य दुसऱ्या जन्मांत प्रविष्ट होतो. ह्याला तें नवीन शरीर प्राप्त होतें, ह्याचें कारण तें कर्मच होय. आत्म्याला त्यानें केलेलें बरें वाईट कर्म दुसरीकडे नेत असतें. एका देहाच्या त्यागानें दुसऱ्या देहांत आत्म्याचा कसा प्रवेश होतो, हें तुला दुसऱ्या भूतसमुदायाचें वर्णन करून सांगतों. १२.३.२१०.

---

## अध्याय २११ वा.

[ १ युधिष्ठिराला कर्मप्रवृत्तिकारणकथन. ]

( १ ) **भीष्म**—चार प्रकारच्या स्थावर व जंगम भूतमात्रांचा नाश आणि त्यांची उत्पत्ति कशी होते, हें स्पष्टपणें समजत नाहीं व त्यांचें ज्ञान उत्तम प्रकारें होण्यास कांहीं साधन दिसत नाहीं. मन हेंहि अव्यक्त अशाच आत्म्याचें स्वरूप आहे. अश्वत्थबीजामध्यें पूर्वीं व्यक्त नसलेला मोठा वृक्ष जसा असतो व तो उदय पावल्यावरच दृष्टोत्पत्तीस येतो, त्याप्रमाणें अव्यक्त अंतःकरणापासून दृश्य पदार्थ व्यक्त स्थितीला येत असतात. ज्या-प्रमाणें लोहाचा अचेतन तुकडा लोहचुंबकाला जाऊन चिकटतो, त्याप्रमाणें पूर्वजन्मार्जित संस्कारांनीं अविद्यादि भाव त्या व्यक्त स्थितींत आलेल्या शरीराशीं संबद्ध होतात. तसेंच परमात्मज्ञानास साधनीभूत असे ब्रह्मापासून मिळविलेले सच्चिदानंदादि भावहि त्याला जडतात. पूर्वीं जीवाशिवाय पृथ्वी, आकाश, स्वर्ग, भूतें, ऋषि, देव, दैत्य इत्यादि कांहींहि नसल्यामुळें जीवाला त्यांचा मुळींच संबंध नव्हता. शाश्वत व अविनाशी आत्मा सर्व प्राण्यां-मध्यें आहे. हा आत्मा मनाला मूलभूत असून अनिर्वचनीय आहे. कर्म वासनेच्या मुळेंच घडत असतें व कर्मानेंच वासनांची उत्पत्ति होते. अशा

रीतीनें हें अनंत भूतचक्र चालू आहे. ही वासनात्मक बुद्धि त्या चक्राचा तुंबा असून व्यक्त शरीर आणि इंद्रियें हीं आरा आहेत, क्रिया ही धाव असून रजोगुण हा कणा आहे. हें चक्र आत्म्याच्या नजरेखालीं सतत फिरत असतें.

ज्याप्रमाणें तिळ घाण्यामध्यें पिळून काढले जातात, त्याप्रमाणें अज्ञानजन्य सुखदुःखांनीं व्याप्त हें जगत् रजोगुणानें आक्रांत होऊन या चक्रांत पिळून निघतें. इतक्या जन्मांच्या फेऱ्यांमधूनहि प्राणी अहंकारानें आशेला गुंतून कर्में करीत राहतो आणि ह्या कार्यकारणसंबंधामुळें हीं कर्मेंच पुनः कारण होतात. कारणांमध्यें कार्यांचा किंवा कार्यांमध्यें कारणांचा प्रादुर्भाव न होतां कर्में उत्पन्न होण्याला कारण म्हणजे कालच होय. तर सांगितलेल्या आत्म्याच्या देखरेखी-खालीं एकत्र असलेल्या आठ प्रकृति आणि सोळा विकार ह्यांचा परस्परसंबंध घडण्यास कारणहि कर्मच होय. जीव पूर्वदेहांतून निघाला असतां प्राण, सूक्ष्म इंद्रियें आणि संस्कार यांसह पूर्वकर्मानुसार वाऱ्यानें उडविलेल्या धुळीप्रमाणें आत्म्यानें दाखविलेल्या वाटेनें लोकांतराला जात असतो. तथापि वायूला ज्याप्रमाणें त्या धुळीचा वगैरे संबंध जडत नसतो, त्याप्रमाणें त्या जीवाला देखील प्राणादिकांचा संबंध घडत नाहीं. आत्म्याचा संबंध देहेंद्रिया-दिकांशीं आहे, म्हणून त्यांचे गुणांशीं त्याचा संबंध आहे, असें समजतां नये. आत्म्यासंबंधीं उत्पन्न झालेल्या शंकेचें निरसन भगवान् वेदानें केलें आहे. राजसूययज्ञकाळीं राजाला ज्याप्रमाणें कृत्रिम रीतीनें मूर्धाभिषिक्तत्व इत्यादि साधनांची जरूरी असते, त्याप्रमाणें मुमुक्षूला देखील विद्यासाधनकाळीं कर्तृत्वादि कृत्रिम धर्मांची जरूरी असते. ज्याप्रमाणें यज्ञफलाच्या उपभोगकाळीं राजाला मूर्धाभिषिक्तत्वादि धर्मांचा त्याग करणें अवश्य असतें, तसेंच मुमुक्षूलाहि कर्तृत्वादि धर्मांचा त्याग करणें आवश्यक होतें. भाजलेलें बीज ज्याप्रमाणें पुनः अंकुर घेत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानदग्ध झालेल्या क्लेशांचा परिणाम आत्म्यावर होत नसतो. १२. ३. २११.

---

## अध्याय २१२ वा.

[ १ प्रवृत्तिमार्गाचा त्याग व निवृत्तिमार्गाचा स्वीकार. ]

(१) भीष्म—ज्याप्रमाणें प्रवृत्तिमार्गाकडे लागलेल्या लोकांस तोच धर्म इष्ट वाटत असतो, त्याप्रमाणें ज्ञाननिष्ठ लोकांना ज्ञानावांचून दुसरें कांहींच

इष्ट वाटत नाहीं. वेदज्ञ आणि वेदोक्त अग्निहोत्रादि कर्में व शमदमादि साधनांचें आचरण करणारे लोक फार थोडे आहेत. त्यांना स्वर्ग आणि मोक्ष यांपैकीं मोक्ष श्रेष्ठ असें वाटत असून ते त्या प्रशस्त ज्ञानमार्गाची आवड धरितात. सज्जनांनीं ह्या मार्गाचा स्वीकार केला असल्यामुळें हा अनिंद्य आहे. याजकडे सारखी बुद्धि लावून तो आचरिल्यास मनुष्याला तो श्रेष्ठ मोक्ष मिळतो. शरीराभिमानी लोक रजोगुण व तमोगुण ह्यांपासून उत्पन्न होणाऱ्या लोभ-क्रोधादिकांच्या मार्गे लागून विषयांचा उपभोग घेत असतात. देहाचा संबंध सोडून मोक्ष मिळविण्याची इच्छा असेल, तर अशुद्ध अशा प्रवृत्ति-मार्गाचा स्वीकार करूं नये. चित्तशुद्ध्यर्थ फलत्यागपूर्वक कर्में केल्यास हरकत नाहीं. असें कर्म केल्यानें त्याला शुभ लोक प्राप्त होतात.

ज्याप्रमाणें सोनें आटविलें असतां त्यांत लोखंडाची भेसळ असल्यास तें चकाकत नाहीं, त्याप्रमाणें अंतःकरण अशुद्ध असल्यास त्यांत ज्ञानाचा प्रकाश पडत नसतो. जो लोभाला बळी पडून कामक्रोधादिकांच्या मार्गे लागतो आणि धर्म सोडून अधर्मानें वागतो, त्याचा समूळ नाश होतो. म्हणूनच शब्दादि विषयांचे ठायीं अति आसक्ति ठेवूं नये. हर्ष, क्रोध आणि विषाद हीं त्रिगुणांचीं तीन कार्यें आहेत. सत्व, रज आणि तम या त्रिगुणांनीं आणि पंचमहाभूतांनीं बनलेला जो देह त्यामध्यें हर्ष, शोक, विषाद यांची उत्पत्ति झाल्यास दोष तरी कोणाला द्यावयाचा अथवा स्तुति तरी कोणाची करावयाची? हर्षादि उत्पन्न होणें हा सत्त्वगुणाचा धर्म आहे. स्पर्श, रूप, रस इत्यादि विषयांचे ठिकाणीं मूर्ख लोक आसक्त होतात आणि त्यामुळें अज्ञानानें शरीर हें पंचमहाभूतांचें कार्य आहे, हें त्यांना समजत नाहीं. मृत्तिकेचें घर मृत्तिकेनेंच लिंपतात, त्याप्रमाणें पृथ्वीनें बनविलेला हा देह राखावयाचा असल्यास पार्थिव अन्नादिकांच्या सेवनानेंच त्याचें रक्षण केलें पाहिजे. मध, तेल, तूप, मांस, मीठ, अनेक प्रकारचीं फलमूलें आणि वेगवेगळीं धान्यें हीं पाणी आणि मृत्तिका यांचींच कार्यें आहेत.

ज्याप्रमाणें वनवासी जनाला मिष्टान्नभोजनाची आवड नसते, त्याप्रमाणें मुमुक्षु जनालाहि मिष्टान्नाचें प्रेम नसावें. जो मिळेल तो जाडाभरडाहि आहार करून त्यानें रहावें. मुमुक्षूसारखेंच संसारारण्यांत राहून व श्रमतत्पर होऊन क्षुधेची निवृत्ति होऊन शरीरधारण होईल, एवढेंच अन्न भक्षण करावें. मुमुक्षु

आणि गृहस्थाश्रमी या दोघांनींहि सत्यता, शुचिर्भूतता, सरलता, वैराग्य, ऊर्जस्विता, पराक्रम, शांति, धृति, विचार व तप यांच्या योगानें, आपल्या सभोंवतींचे सर्व पदार्थ विषयात्मक आहेत, असें जाणून शांतीची इच्छा असल्यास उदार अंतःकरणानें सर्व इंद्रियांचा निग्रह करावा. सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांनीं प्राणी मोहित होऊन अज्ञानामुळें जन्ममरणांच्या फेऱ्यांत सांपडून चक्राप्रमाणें फिरत असतात; म्हणून अज्ञानानें आपणांला जडणाऱ्या दोषांचा नीट विचार करून अज्ञानजन्य दुःख व अहंकार यांचा त्याग करावा. महाभूतें, इंद्रियें, सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण, ईश्वरासह सर्व त्रैलोक्य हीं अहंकारावरच अवलंबून असतात. ज्याप्रमाणें काल हा त्या त्या वेळीं त्या त्या ऋतूचे गुण प्रकट करितो, तसाच सर्व भूतांचे ठायीं अहंकार हा कर्मप्रवर्तक आहे.

तमोगुण हा अज्ञानापासून उत्पन्न झालेला असून मोह पाडणारा आहे. सत्त्वापासून प्रीति व रजापासून दुःख हीं तीन या त्रिगुणांपासून झालीं आहेत. प्रसन्नता, आनंदापासून उत्पन्न होणारी प्रीति, संशयाभाव, धृति, स्मृति हे सत्त्वाचे गुण होत. त्याप्रमाणें काम, क्रोध, प्रमाद, लोभ, मोह, भय, ग्लानि, विषाद, शोक, निकृष्ट गुणांवरील प्रेम, मान, गर्व आणि अनार्यता हे रजोगुण व तमोगुणांचे विकार आहेत. ह्या प्रत्येक गुणाचा कमीअधिकपणा आपल्या शरीरांत काय प्रमाणानें आहे, हें नित्यशः पाहत जावें.

युधिष्ठिर—पितामहा, मुमुक्षु लोकांनीं कोणत्या दोषांचा त्याग केला आहे ? कोणते दोष त्यांनीं बुद्धीच्या योगानें नष्ट केले आहेत ? कोणते दोष एकदां सोडले असतांहि त्यांना पुनः पुनः येऊन चिकटतात आणि कोणते दोष घडले असतां ते आपली कार्यसिद्धि करूं शकत नाहींत, तसेंच ज्ञानवान् मनुष्यानें बुद्धीनें व विचारानें कोणत्या दोषांच्या बलाबलांच्या संबंधानें विचार करावा, ह्याविषयीं मला संशय उत्पन्न झाला आहे, तर तूं त्याचें उत्तर दे.

भीष्म—दोषांचा उच्छेद केला असतां आत्मा शुद्ध होतो आणि पुनः त्याला दोष चिकटत नाहींत. ज्याप्रमाणें लोखंडी कुऱ्हाड लोखंडी सांखळीला तोडून टाकिते व धार जाऊन स्वतःहि नष्ट होते, त्याप्रमाणें ध्यानाच्या योगानें शुद्ध झालेली बुद्धि मनुष्यांच्या दोषांचा नाश करून आपणहि नष्ट होते. रजोगुण,

तमोगुण आणि शुद्ध सत्त्वगुण यांच्याच योगानें मनुष्याला देहप्राप्ति होते. यांपैकीं सत्त्वगुणानेंच मनुष्य ब्रह्मलोकाला जातो म्हणून शुद्धांतःकरणी मनुष्यानें रजोगुण व तमोगुण यांचा त्याग करून केवळ सत्त्वगुणाचाच आश्रय करावा. यज्ञादि कर्में हीं अंतःकरणशुद्धीसाठींच सांगितलीं आहेत. परंतु सांख्यांच्या मतें त्या यज्ञकर्मांत पशुहिंसा होत असल्यामुळें तीं पापमूलकच होत. तीं देहाचा आत्म्याशीं संबंध तोडून टाकण्याला, तसेंच शुद्धधर्माचें पालन करण्याला कारण आहेत. रजोगुणाच्या योगानें मनुष्य अधर्माचीं कार्यें करितो, द्रव्यप्राप्तीचे उपायांत मग्न होतो आणि नानाप्रकारचे विषयोपभोग घेतो. तमोगुणानें लोभमूलक आणि क्रोधजन्य कार्यें तो करितो. तो सर्वदा हिंसा-कर्मांत आसक्ति ठेवितो. त्यामुळें निद्रा, तंद्री व सुस्ती ह्यांनीं तो व्याप्त असतो. जो मनुष्य सत्त्वनिष्ठ असतो, तो सर्वदा सात्त्विक पदार्थांचेंच सेवन करितो आणि श्रद्धा व विद्या यांनीं युक्त होऊन अत्यंत शुद्ध व ज्ञानसंपन्न होतो. १२.३.२१२.

---